# इनिइड

अनुवादक : प्रा. द. र. घोडके

( The Aeneid by Virgil या पुस्तकाचे भाषांतर )

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मुंबई

# इनिइड

(The Aeneid by Virgil
या पुस्तकाचे भाषांतर)

अनुवादक
**प्रा. द. र. घोडके**

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ
मुंबई

प्रकाशक :

सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ,
मंत्रालय, मुंबई–४०० ०३२



मुद्रक :
न्यू सन्मित्र प्रिंटर्स,
१०५८/अ, दीनानाथ बिल्डिंग,
गावभाग, सांगली–४१६ ४१६.

किंमत ३३ रुपये

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळातर्फे प्रा. दत्तात्रय रघुनाथ घोडके यांनी अनुवादित केलेल्या " इनिइड " या पुस्तकाचे प्रकाशन करण्यास मंडळास आनंद होत आहे.

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ
मुंबई

मुंबई
दिनांक २८ जून १९८३

माझे माता पिता

ति. रघुनाथ राजाराम घोडके

ति. सौ. जानकी रघुनाथ घोडके

यांचे चरणी

द. र. घोडके

# अनुक्रमाणिका

# व्हर्जिलच्या " इनिइड " या लॅटिन महाकाव्याच्या मराठी अनुवादाची प्रस्तावना

नगराज हिमालयाच्या पर्वतराजीत जसे कांचनगंगेचे शिखर आपल्या अतीव उंचीने उठून दिसते तसे काव्याच्या प्रांतात महाकाव्य हे त्याच्या विशाल भव्य-दिव्यत्वाने उठून दिसते. महाकाव्य हे थोर महाकवींच्या कल्पकतेची, प्रतिभेच्या सामर्थ्याची, कलाविलासाची व जीवनाचा आशय उलगडण्याच्या मानवी प्रयत्नांची सर्वोच्च भरारी आहे. आपण भारतीय आपल्या संस्कृतीचा रत्नाकर म्हणून जसे महाभारत रामायण या संस्कृत महाकाव्यांना मानतो तसे पाश्चिमात्त्य जग होमरचे ग्रीक भाषेतील 'इलिअड' व व्हर्जिलचे लॅटिन भाषेतले 'इनिइड' या महाकाव्यांना फार मानते. अर्थात् या दोन महाकाव्यांची प्रकृती भिन्न आहे; पण आपापल्या विशिष्ट श्रेणीत दोघांना अत्युच्च मानाचे स्थान प्राप्त झाले आहे.

व्हर्जिलच्या 'इनिइड'चे साक्षेपी रसग्रहण करण्यासाठी प्रथम महाकाव्य या साहित्यप्रकाराचे विशेष व त्याचे दोन प्रकार "पारंपारिक महाकाव्य" व "साहित्यस्फूर्त" अथवा "संस्कारित महाकाव्य" यांचे विवेचन करणे अवश्य आहे. होमरचे 'इलिअड' हे पारंपारिक महाकाव्य गणले जाते. यालाच "Traditional Epc" Authentic Epic " किंवा "Epic of Growth" अशाही संज्ञा आहेत. व्हर्जिलचे "इनिइड" हे "साहित्यस्फूर्त महाकाव्य" म्हणून ओळखले जाते. याला "Literary Epic" किंवा "Epic of Culture" असेही म्हणतात.

महाकाव्याच्या सिद्धांतांचे विवेचन शोकात्यिकेप्रमाणेच प्रथम ॲरिस्टॉटल (इ. स. पूर्व ३८४ ते इ. स. पू. ३२२) या ग्रीक आद्य समीक्षकाने आपल्या "काव्यशास्त्र" (The Poetics) या टीकाग्रंथात केले आहे. मात्र शोकात्मिकेचे जितके विस्तृत विवेचन त्याने केले आहे तितके महाकाव्याचे केलेले नाही. त्याने तत्कालीन ग्रीक महाकाव्ये व विशेषत: 'इलिअड' या महाकाव्याच्या अनुषंगाने हे विवेचन केले आहे. "संस्कारित महाकाव्य" त्या काळांत नव्हतेच; नामवंत असे संस्कारित महाकाव्य पुढे व्हर्जिलने इ. स. पूर्व १९ चे सुमारास लिहिले.

ॲरिस्टॉटलची महाकाव्याची कल्पना पुढीलप्रमाणे आहे.

"महाकाव्याचे कथानक एकसंध असावे. आदि, मध्य व अंत सुव्यवस्थित रचावे. कथानक स्वयंपूर्ण, गतिमान्, एकाद्या चैतन्यपूर्ण जीवासारखे ( organic ) असावे. त्यापासून आनंद प्राप्त व्हावा. महाकाव्य सत्यघटनांवर आधारलेले असावे पण महाकाव्य म्हणजे इतिहास नव्हे. इतिहासात अनेक घटना विस्कळितपणे एकापाठोपाठ वर्णिलेल्या असतात. महाकाव्याच्या कथानकांत एकसूत्रता हवी. महाकवी आपला विषय म्हणून एखादीच मध्यवर्ती, महत्त्वपूर्ण घटना निवडतो व मग तिच्याभोवती तिच्याशी संबंधित अशा घटनांचा तपशील कुशलपणे गुंफतो. होमर हा आदर्श महाकवी आहे. त्याने ट्रॉयचा संपूर्ण रणसंग्राम विषय म्हणून न घेता, वेढ्याच्या दहा वर्षांपैकी फक्त शेवटच्या वर्षातील एक महत्त्वाची घटना "ॲकिलीजचा प्रकोप" याची निवड केली.

महाकाव्य हे बऱ्याच अंशी शोकात्मिकेप्रमाणेच असते. त्यांत दृश्ये नसतात व ते कथनात्मक असते हाच काय तो फरक. महाकाव्याच्या कथानकातही मध्यवर्ती व्यक्ती उच्चपदस्थ, थोर असतात व कथानकाच्या गतीत भाग्यचक्राची उलथापालथ व सत्यस्थितीची अचानक प्रखर जाणीव यांचा अंतर्भाव असतो. कथनाची शैली गंभीर, भारदस्त असावी. कथनात व वर्णनात नाट्यगुण ( dramatic quality ) असणे अवश्य आहे. महाकाव्यात नाट्यगुण नसेल तर ते केवळ घटनांचा रुक्ष आढावा होईल. विस्मित करणाऱ्या, भावनांचा कल्लोळ निर्माण करणाऱ्या घटनांतून व व्यक्तीव्यक्तींच्या संभ्रम उत्पन्न करणाऱ्या संघर्षातून, या संभ्रम संघर्षाच्या अंतिम फलिताबद्दल उत्कंठा जागृत करून ती सतत वृद्धिंगत करण्यांत नाट्यगुणाचा उत्कर्ष होतो.

महाकाव्यांत अद्भुत रसाची उत्पत्ती करणे आवश्यक आहे. अतिमानुष यंत्रणांच्या द्वारे अद्भुत रस उत्पन्न होऊन तो महाकाव्याला उच्च पातळीवर नेतो. अतिमानुष यंत्रणेत ( Supernatural element ) अवास्तव घटनासुद्धा खपून जातात. मात्र त्या वास्तविक वाटाव्या अशा कुशलतेने कवीने रंगवल्या पाहिजेत. होमर या कलेत अत्यंत कुशल होता.

महाकाव्यात कथानकापेक्षा व्यक्तींना जास्त महत्त्व असते. (शोकात्मिकेत कथानक जास्त महत्त्वाचे) व्यक्तीदर्शन त्या त्या व्यक्तीच्या भाषणातून, कृतीतून व्हावे. कवीने कथनात्मक पद्धतीने व्यक्तीचित्रें रेखाट नयेत."

ॲरिस्टॉटलनंतर अनेक युरोपीय समीक्षकांनी महाकाव्याच्या वैशिष्ठ्यांचे विवेचन केले आहे.

पारंपारिक महाकाव्य हे वीरवृत्तीप्रधान युगाचे (Heroic Age) अपत्य आहे. हे युग म्हणजे शूर व्यक्तींच्या कर्तृत्वाची गाथा होती. हे वीर ज्या लढाया लढत त्यात द्वंद्व युद्धांना व व्यक्तीगत पराक्रमांना महत्त्व असे. आदर्श, थोरपुरुष म्हणजे आकर्षक व्यक्तीमत्वाचा, बलदंड, पराक्रमी धैर्यशील वीर असे मानीत. कुरुप, भित्रा, दुबळा पुरुष हास्यास्पद ठरे. या युगाच्या समाजरचनेत या वीर पुरुषांचे वर्चस्व असे. कृषीवलादि शांततामय व्यवसाय चोखाळणाऱ्याना नगण्य मानले जाई. मात्र नंतरच्या सुधारणायुगांत निर्माण झालेला वर्गभेद या समाजांत नव्हता. वीरपुरुष जेव्हा युद्धात गुंतलेले नसत तेव्हा शेती, गुरे मेंढ्या वळवणे, नौकानयन वगैरे ते करीत. समुद्रावर व्यापार व प्रसंगानुसार लूटमारी ते करीत. मात्र त्यांची मालमत्ता किंवा स्त्रिया कुणी पळवल्यास त्याचा सूड ते घेत. त्यांच्या जीवनाला नीतीमूल्यांचे बंधन नसे.

याचा अर्थ या वीरवृत्तीप्रधान युगात अराजकता किंवा स्वैराचार होता असा मात्र नव्हे. समाजजीवनाचा केन्द्रबिंदु म्हणजे वीरश्रेष्ठ, शासक पुरुषाचा निवास. त्याच्याभोवती त्याच्या आप्तेष्ट मित्रांचे वर्तुळ असे. या वर्तुळात सर्वजण एकमेकांचे हितसंरक्षण करण्यास बांधलेले असत. मात्र हा एकोपा आदिम ( primitive ) समाजाइतका दृढ नेहमीच नसे. एकाच घराण्यांत अंतर्गत यादवी रक्तपात, सूड, त्या सूडाबद्दल प्रतिसूड यांची मालिका पुष्कळवेळा आढळे. बरीच ग्रीक शोक नाटचे या अंतर्गत यादवीवर रचलेली दिसतात.

वीरवृत्तीप्रधान समाज ही मानव समाजाची पौगंडावस्था असे म्हणता येईल. तत्पूर्वीचा आदिम समाज ही बाल्यावस्था होती व तदनंतरच्या सुधारणा-युगांतील समाज ही परिपक्व पूर्णावस्था होय. धीरवृत्तीप्रधान युगांतील समाज निर्बंधांना झुगारणारा, व्यक्तीगत शौर्याची ब्रीदे मिरवणारा व जीवना-नंदाचा मनसोक्त उपभोग घेणारा असा होता. शत्रूचे युद्धात पारिपत्य, पाहुण्याचे उदार आतिथ्य, धार्मिक उत्सव, मेजवान्या यात हे वीर स्वतःला सारख्याच उत्साहाने जणू झुगारून देत. युद्धात पराक्रम गाजवल्यावर, मेजवान्यांच्या वेळी स्वतःच्या शौर्याची प्रौढी मिरवणे, परस्परांत वादंग माजवणे चारजणांकडून आपल्या व आपल्या पूर्वजांच्या साहसांची वर्णने ऐकणे यांत ते कालक्रमणा करीत. मात्र अनिर्बंध भावनावेगावे, प्रत्येक प्रांतांत अतिशयोक्त वर्तनाचे हे युग महान होते

यांत शंका नाही. होमरसारख्या महाकवीला इलिअडसारखे थोर महाकाव्य लिहिण्याची स्फूर्ती याच युगाने दिली. मार्स ही युद्धदेवता व म्युझेप या कलादेवता यांच्या पूजनाला वाहिलेले हे युग उत्साहाने, स्वाभिमानाने, आत्मविश्वासाने, डवरलेले होते.

पारंपारिक महाकाव्याचा कवी या वातावरणातून; व त्यांतल्या वीरकृत्यांतून स्फूर्ती घेई. तो त्या वातावरणाशी समरस झालेला असे. ही महाकाव्ये वाचून, ऐकविली जात. श्रोत्यांच्या अंतःकरणाला ती भिडत कारण त्यातील घटना, वर्णनें त्यांच्या अनुभूतीचा भाग असत पारंपारिक काव्यांत त्याकाळच्या समाजांत प्रचलित असलेल्या लोककथा, व पुरातन काव्य समाविष्ट असत. पिढ्यान्‌पिढ्या ही पारंपारिक महाकाव्ये नव्या कवींच्या नव्या कृतींची भर पडून वृद्धिगत होत जात. आपले महाभारत हे असेच अनेक कवींच्या कृतीनी गुंफिलेले आहे. मूळचा व्यासांचा "जय" नावाचा इतिहास, प्रत्येक पिढीतल्या व्यासाच्या कृतीची भर पडत शेवटी "महाभारत" या नावाने ओळखण्यात येऊ लागला.

पारंपारिक महाकाव्य व संस्कारित महाकाव्य यांच्यामधल्या अनेक फरकांपैकी हा एक फरक प्रमुख आहे. पारंपारिक महाकाव्याला अनेकांचा हात लागलेला असतो तर संस्कारित महाकाव्य एका कवीची कृता असते. व्हर्जिलचे "इनिइड", मिल्टनचे "पॅरडाइज् लॉस्ट", डांटचे "डिव्हाइन कॉमेडी" ही एका कवीची कृती आहे. हे महाकवी, पारंपारिक महाकाव्यांच्या जनकाप्रमाणे आपल्या काव्यांतील वातावरणाशी एकजीव नसतात. त्यांच्या भावना, विचार, सस्कार वीरवृत्तीप्रधान युगातील नसून, ते ज्या युगांत लिहितात, त्या सुधारणायुगातील असतात. पण अभ्यासाने, परिश्रमाने व आपल्या काव्यशक्तीच्या सामर्थ्याने ते पुरातन युग पुनरुज्जीवीत करतात व त्यांतील अनुभूती आपल्या वाचकांपर्यंत पोचवतात.

अतिमानुषयंत्रणा ही सर्व पारंपारिक महाकाव्यात वापरलेली असते. होमरपासून हा पायंडा पडला होता व तो नंतरच्या महाकवींनी चालू ठेवला. वीरवृत्तीप्रधान युगांतल्या पौगंडावस्थेतील समाजाला अद्‌भुताचे आकर्षण असते व त्याची देवादिकांवर श्रद्धा असते. होमरच्या श्रोत्यांना युद्धांत आपल्या पूर्वजांच्या बाजूने देव लढत असत अशी वर्णन वाचून अभिमान वाटत असेल व त्यांच्या अंगावर रोमांच उभे रहात असतील. आपल्या महाभारतातही देवराक्षस यक्षगंधर्व किन्नर यांचा समावेश आहेच. ऑलिंपियानिवासी देवदेवतांच्या कथा होमरच्या

श्रोत्यांना चिरपरिचित असत. याशिवाय ग्रामदेवता, गृहदेवता, स्थलदेवता, प्रत्येक देवतेला रोचक असे होमहवन, शकुन, भाकिते वगैरे गोष्टी त्यांच्या दैनंदिन जीवनाचा भाग होता.

या संदर्भात एक गोष्ट मात्र लक्षात घेण्याजोगी आहे. होमरने या देवदेवतांना इलिअडमध्ये नेहमी दुय्यम स्थान दिलेले आहे; कारण महाकाव्य ही वीरांच्या कर्तृत्वाची गाथा असे, देवांच्या कर्तृत्वाची नव्हे. आदिम युगातील लोककथांत अतिमानुषयंत्रणेला अग्रस्थान असे. पण वीरवृत्तीप्रधान युगांत देववीरांना त्यांच्या कर्तृत्वात फक्त साहाय्य करीत; त्यांच्या उज्ज्वल कर्तृत्वाला अद्भुतरसाची डूब देऊन त्याला जरा जास्त लकाकी आणीत, एवढेच. शिवाय देवांची कृपा लाभणं हा मानवांचा गौरव होता. देव साहाय्य करीत ते महामानवांना, येरागबाळ्यांना नव्हे. मात्र ॲरिस्टॉटलच्या मते हा अद्भुत रस म्हणजे अगदी वाऱ्यावरच्या वावड्या नसाव्यात. तो शक्य कोटीतला असावा. नाहीतर महाकाव्य म्हणजे फक्त अवास्तव अशी कपोलकल्पित नवलिका ( romance ) ठरेल. अद्भुत गोष्टी वास्तव घटनांच्या वर्णनात अत्यंत कुशलपणे गुंफण्याबद्दल, ॲरिस्टॉटलने होमरची वाखाणणी केली आहे.

महाकाव्याचा हेतू वाङ्मयानंद देणे हा असला तरी त्याच्यामागे काही सखोल हेतू असतोच. वास्तव घटनांच्या, कल्पनाशक्तीची जोड देऊन केलेल्या कथनांतून महाकवी मानवी जीवनाच्या आशयाचा शोध घेत असतो. प्राचीन युगातील व समकालीन युगातील समस्या उलगडता, उलगडता त्याला शाश्वत, विश्वात्मक सत्याचाही साक्षात्कार होतो व आपल्या वाचकांपर्यंत तो पोचवण्यात तो यशस्वी होतो. या सार्वत्रिक, सार्वकालीन गूढांचा उलगडा करतांना तो आपल्या पूर्वीच्या पिढ्यांतील थोर महाकवींना वाट पुशीत जातो. रामायण महाभारतातील आशय पंचमहाकाव्यांच्या कवींना आपल्या काळाच्या संदर्भात समकालीनांना ज्ञानप्रकाश पुरवण्यात निश्चितच मार्गदर्शक झाला असावा. होमर व्हर्जिलचे बोट धरूनच डांटेमिल्टन यांनी त्रैलोक्याचा ठाव घेतला.

पारंपारिक महाकाव्यांचा, विशेषतः होमरचा आदर्श पुढे ठेऊन, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली वगैरे देशातील कवी महाकाव्ये लिहू लागले. अर्थात सुधारणा-युगांतल्या या कवींची काव्यस्फूर्ती, वीरवृत्तीप्रधान युगातल्या वातावरणाची नसून त्या युगांतल्या साहित्यापासून झालेली असे; म्हणूनच या महाकाव्याला Literary Epic किंवा सांस्कारित महाकाव्य ( Epic of Culture ) असे म्हणण्यात येऊ

लागले. व्हर्जिलला 'इनिइड' लिहिण्याची स्फूर्ती मुख्यत: होमरपासून, तसेच इतर जुन्या महाकाव्यातून, लोककथांतून मिळाली. व्हर्जिलने या अनेक स्फूर्तीस्थानांतून एकत्र केलेली साधनसामुग्री महाकाव्यात आपल्या प्रतिभेच्या सामर्थ्याने कशी परिणत केली याचा विचार करण्यापूर्वी व्हर्जिलचे जीवन व इनिइडपूर्वीची त्याची काव्यकृती याकडे एक दृष्टीक्षेप टाकणे आवश्यक आहे.

इटलीच्या ऑगस्टन युगांतला (इ. स. पूर्व ४४ ते इ. स. १४) व्हर्जिल हा थोर कवी त्याच्या जीवनाबद्दल प्रत्यक्ष अशी माहिती फारशी मिळत नाही. त्याच्या काव्यांतून व त्याच्या समकालीन होरेससारख्यांच्या लिखाणातून काय थोडी माहिती मिळते तेवढयावरच समाधान मानणे भाग पडते. त्याचा जन्म इ. स. पूर्व ७० मध्ये १५ ऑक्टोबरला मँटुआनजीकच्या अँडीज या गावी झाला. आपल्या जन्मस्थानाचे वर्णन व्हर्जिलने इनिइडमध्ये केले आहे. याच वर्षी इटलीतले जुने लोकसत्ताक राज्य मोडकळीस येऊन पाँपी हा शासनाचा मुखत्यार झाला होता. व्हर्जिलचे बालपण खेडयातच गेले. त्याचा पिता शेतीवाडी व इमारती लाकडाचा, मधमाशा पाळण्याचा वगैरे व्यवसाय करी. त्यामुळे व्हर्जिल झाडाशेतात, गुराढोरात व पक्षीप्राण्यांच्या सान्निध्यात वाढला. या ग्रामीण जीवनाचे पडसाद त्याच्या तरुणपणातील जॉर्जिकस् व एक्लोग्स् या काव्यांतून उमटले आहेत. ग्रामीण जीवन हे धर्मश्रद्धेस व इतर अनेक सद्गुणास पोषक आहे असे मत या काव्यांत तो प्रदर्शित करतो. त्याच्यावर बाल्यदशेत धार्मिक संस्कार मोठ्या प्रमाणांत झाले असावे. यौवनदशेत एपिक्युरस या तत्त्ववेत्त्याच्या भोगवादी तत्त्वज्ञानाचा त्याच्यावर काही काळ प्रभाव पडला; तरी बालपणचे धार्मिक संस्कार त्याच्या अंत:करणपटलावरून पुसले गेले नाहीत.

त्याचा पिता खेडूत असला तरी महत्त्वाकांक्षी होता. नानाव्यवसाय करून त्याने बऱ्यापैकी पैसा कमावला होता. आपल्या मुलातली सुप्त गुणवत्ता ओळखून त्याने त्याच्या शिक्षणाची उत्तम सोय केली होती. प्रथम मिलनला व नंतर रोमला व्हर्जिल विद्याभ्यासासाठी गेला. त्याच्या शिक्षकांनी त्याला ग्रीक कवींच्या कृतींची व अॅलेक्झँड्रीन काव्याची गोडी लावली. सायरो या तत्त्वज्ञानशिक्षकाने त्याला भोगवादी तत्त्वज्ञानाची ओळख करून दिली. पण या तत्त्वज्ञानात तो फार काळ रमला नाही. लुक्रेशिअसच्या तत्त्वज्ञानाने त्याच्या मनाला पुष्कळ समाधान दिले. पण त्याच्या अंत:करणात तत्त्वज्ञानापेक्षा काव्यालाच जास्त प्राधान्य या काळात होते.

सत्तावीस वर्षांचा झाल्यापासून तो कविता करू लागला. व्यावहारिक जीवनात मात्र तो अद्यापि स्थिर झाला नव्हता. त्याने त्याकाळी अत्यंत लोकमान्यता पावलेल्या वक्तृत्वकलेचा (Rhetoric) अभ्यास केला होता. पण बोलतांना तो अडखळत असल्यामुळे वकिलीच्या व्यवसायात त्याला यश आले नाही. पण बोलताना तो चाचरत असला तरी आपल्या मित्रांपुढे तो आपली काव्ये अत्यंत परिणामकारक रीतीने वाचून दाखवीत असे.

ज्युलियस सीझरचा खून इ. स. पू. ४४ मध्ये झाला. व्हर्जिलने आपल्या जॉर्जिक्स या काव्यसमूहात, पहिल्या काव्याच्या शेवटी या घटनेचा उल्लेख केला आहे. सीझरनंतर ऑक्टेव्हिअनचा (यानेच बादशहा झाल्यावर पुढे ऑगस्टस हे नाव धारण केले) उदय झाला. ज्या सैनिकांच्या मदतीने त्याने रोममध्ये सत्ता मिळवली त्या सैनिकांना खूष करण्यासाठी, त्याने जुन्या मालकांच्या जमिनी काढून घेऊन त्या या सैनिकांना बक्षीस दिल्या. त्या प्रकरणात व्हर्जिलचा पिता आपल्या शेतीवाडीला मुकला. व्हर्जिलने आपल्या निर्वासित, खचलेल्या पित्याला संभाळून सायरोच्या घरी आश्रयास आणले. इनिइडमध्ये इनीआस आपला वृद्ध पिता अँकायसीस याला ट्रॉयच्या भडकलेल्या ज्वालांमधून खांद्यावरून बाहेर काढतो हा प्रसंग व्हर्जिलने आपल्या जीवनातल्या या घटनेवरूनच रंगवला असावा.

पुढे व्हर्जिलला ऑगस्टस बादशहाचा आश्रय मिळाला. वक्तृत्व कलेचे अध्ययन एकाच गुरुपाशी केल्यामुळे त्या उभयतांची मैत्री होती. व्हर्जिलची जमीन परत मिळाली व नंतरचा त्याचा जीवनक्रम स्नेह्यांच्या साहाय्याने व बादशहा ऑगस्टसच्या कृपेने सुखकर झाला. या काळांत खड्यात वाढलेल्या व्हर्जिलला नागरी, खानदानी रहाणीची व दरबारी रीतरिवाजांची ओळख झाली. ऑगस्टस बादशहाचा सहवास झाल्यामुळे, इनिइडमध्ये इनिआसची व्यक्तीरेखा आदर्श राजपुरुष म्हणून त्याला रेखाटता आली.

पण एकंदरीने रोमचे वातावरण त्याला रुचण्याजोगे नव्हते. दरबारातले मतलबी, ढोंगी व कारस्थानी वातावरण त्याच्या स्वभावाला मानवले नाही. रोम सोडून तो नेपल्सला गेला. तेथे शांत, स्थिर जीवन व्यतीत करीत असताना त्याने एकलाग्स् ( Eclogues ) या निसर्गवर्णनाच्या व निरागस, समाधानी ग्रामीण जीवनाच्या कविता लिहिल्या. जॉर्जिक्स ( Georgics ) या काव्यसमूहात निसर्गाशी जवळीक साधणाऱ्या जीवनचित्रांबरोबर जीवनविषयक तत्वचिंतनही

आहे. या काव्यांनी त्याने इटलीतल्या रसिकांचे मन जिंकून घेतले. आयुष्याची शेवटची दहा अकरा वर्षे त्याने इनिइड हे महाकाव्य लिहिण्यात व्यतीत केली. इ. स. पू. १९ मध्ये तो ग्रीसला गेला. तिथली भूमी प्रत्यक्ष पाहून, त्याला इनिइड मधल्या ट्रॉयच्या वर्णनावर सफाईचा हात फिरवायचा होता. आणखी तीन वर्षे इनिइडला परिपूर्णता आणण्यात तो खर्च करणारा होता व नंतर तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात उर्वरित जीवन वेचण्याची त्याची मनीषा होती. पण वाटेतच त्याला मृत्यूने गाठले. त्याच्या कलावंत दृष्टीने इनिइड अद्यापि निर्दोष झालेले नसल्यामुळे ते प्रसिद्ध न करता, जाळून टाकावे असे त्याने आपल्या मित्रांना बजावले होते. पण त्याच्या मित्रांना तसे करवले नाही. त्यानी ते ऑगस्टस बादशहाला दाखवले. त्यातले पहिले तीन सर्ग बादशहाने पूर्वीच ऐकले होते. त्याला ते आवडले होते. संपूर्ण काव्य पाहिल्यावर त्याने ते त्वरित प्रसिद्ध करण्याची आज्ञा केली व रसिक जगाला एका महान्, अमर कृतीचा लाभ झाला. चंद्राला आपल्यावरच्या डागांबद्दल विषाद वाटत असेल पण जगमात्र त्याच्या अमृतमय, धवल चंद्रिकेत न्हातांना अपार आनंदाच्या अनुभूतीने सुखावते, उल्हासित होते, एका अनोख्या उदात्त, मनोरम वातावरणांत विहार करू लागते.

जॉर्जिक्स व एक्लागस् लिहिल्यानंतर व्हर्जिलचे चित्त महाकाव्य लिहिण्याकडे लागले. होमरच्या इलिअडसारखे महान् काव्य आपल्या हातून लिहिले जावे अशी महत्त्वाकांक्षा त्याच्या अंतःकरणात उदय पावली. त्याची प्रतिभेची झेप आता महाकाव्याला वेधण्यास समर्थ झाली होती. त्याची कल्पकता व कला पूर्णत्वास पोचली होतीच. आता तो महाकाव्यास योग्य अशा विषयाचा शोध घेऊ लागला. महाकाव्य हे वीरवृत्तीप्रधान युगातल्या शूरांच्या कर्तृत्वाभोवती गुंफले जाते ही जाणीव त्याला होती. त्याच्यासमोर रोमन कवींनी लॅटिनमध्ये लिहिलेली महाकाव्ये होती. नीव्हिअस या इ. स. पूर्व तिसऱ्या शतकातल्या कवीने पहिल्या प्युनिक युद्धावर महाकाव्य लिहिले होते. त्यात सिसिलीवर रोमने मिळवलेल्या विजयाची गाथा होती. एनिअस या लॅटिन कवीने तर महाकाव्याचा आवाका विस्तृत प्रमाणावर असावा या धारणेने, इनीआसने ट्राय सोडले त्या कालापासून रोमच्या इतिहासाची सुरुवात करून तो आपल्या कालापर्यंत भिडवला. अठरा सर्गात रोमचा इतिहास महाकाव्यांत गुंफणारा एनिअस (इ. स. पू. २३० ते इ. स. पू. १७०) लॅटिन महाकाव्याचा एक नामवंत पाईक मानला जातो. इतिहासावर आधारलेल्या या महाकाव्याला व तत्सम इतर महाकाव्यांना "annals" हेच नांव पडले व त्या कवींना annalists इतिहास लेखक अशी संज्ञा प्राप्त झाली. कारण

एनिअसने आपल्या महाकाव्याचे नांव Annales Romais – रोमचा इतिहास असेच ठेवले होते. अॅकिअस, फ्युरिअस या लॅटिन कवींनीही अशी इतिहासजमा महाकाव्ये लिहिली. काही कवींनी बादशहा ऑगस्टस याच्या इच्छेनुसार त्याच्या शौर्याचे व राजधुरीणत्वाचे पवाडे गाणारी महाकाव्ये लिहिली. व्हर्जिललाही सम्राट ऑगस्टसबद्दल अत्यंत आदर व कौतुक होते. त्या उभयतांचा गाढ स्नेहही होता. पण समकालीन विषयावर लिहिलेल्या महाकाव्यांत वीरवृत्तीप्रधान युगातल्या प्रेरणा व धारणा प्रगट करणे अशक्य आहे, ही जाणीव त्याला होती. एनिअसने प्राचीन इतिहास, विषय म्हणून निवडला होता. पण त्याच्या महाकाव्यांतही, इतर 'ॲनलिस्टस्' प्रमाणेच कलेचे दर्शन व तज्जन्य एकसंधपणा प्रतीत होत नव्हता. ही महाकाव्ये केवळ अनेक घटनांची विस्कळित व कांहीशी रुक्ष वर्णने होती.

विषयाची निवड करतांना व्हर्जिलला दोन गोष्टी साधायच्या होत्या. वीर-वृत्तीप्रधान युगांतले कथानक तर निवडायचे होतेच; पण त्या कथानकाचा त्याला ऑगस्टन युगाच्या वीरश्रीशी व कर्तृत्वाशी संबंध जोडायचा होता. आद्य राष्ट्रीय महाकाव्य रचण्याची त्याची मनीषा होती. रोमनांची अस्मिता, स्वाभिमान, आशा आकांक्षा यांचे पडसाद त्याच्या महाकाव्यात प्रकट व्हावयास हवे होते. ग्रीसचा संबंध रोमच्या संस्थापनेशी व ऑगस्टस बादशहाने घडवून आणलेल्या राष्ट्रगौर-वाशी जोडण्यासाठी त्याने ट्रोजन वीर इनीआस याला आपला वीरनायक करण्याचे योजले. अर्थात् रोमचे संस्थापक लांडगीच्या दुधावर वाढलेले रेथस व रोम्युलस हे होते ही लोककथा प्रचलित होतीच, पण व्हर्जिलने इनीआसबद्दलची ग्रीक लोक-कथा निवडली. या कथेचा उल्लेख इ. स. पू. सहाव्या शतकातल्या सिसिलीतल्या एका कवीने, स्टेसिकोरसने, केलेला होता, इटलीत ट्रोजन वसाहत होईल, बापलेक-नातू असे तीन ट्रोजन ट्रॉयचे देव घेऊन समुद्र पर्यटनास निघतील असे त्याने लिहिले होते. असे ट्रोजनांचे पुतळे ठिकठिकाणी समुद्रतीरी आढळतही होते. एनीअस या महाकवीनेही रोमनवंश जोव्हपासून उद्भवला व इनीआस हा त्याच वंशातला असे लिहिले होते. इनीआसच्या अप्रतिम शौर्याच्या व त्याच्या उज्ज्वल भवितव्याचा उल्लेख होमरने इलिअडमध्ये केला होताच.

याप्रमाणे महाकाव्याला शोभेल असा वीरनायक निवडल्यावर व्हर्जिलने आपल्या महाकाव्याची रुपरेखा साधनसामुग्री जमवावयास सुरुवात केली. व्हर्जिल आपली कलाकृती सर्वांगांनी परिपूर्ण व्हावी म्हणून नेहमीच अत्यंत परिश्रम, ती उत्स्फूर्त झाल्यावर व पद्यपंक्तींत उतरल्यानंतरही करीत असे. कधी कधी तर तो कथानकाचा सबंध आराखडा प्रथम गद्यात लिहून काढीत असे.

इनिइडची सुरुवात ट्रॉयच्या पतनापासून होणार होती. ट्रॉयच्या प्रसिद्ध फसव्या लाकडी घोड्याचा वृत्तांत जवळजवळ शब्दशः व्हर्जिलने पायसँडर नावाच्या रोमन कवीपासून घेतला असे एक समीक्षक म्हणतो. या कवीने ज्युपिटर ज्युनोच्या विवाहापासून सुरूवात करून रोमचा इतिहास आपल्या कालापर्यंत (पायसँडरचा काल अनिश्चित आहे) आणून भिडवला होता. नंतरचे इनिआसचे समुद्रपर्यटन व त्यातली साहसे संकटे होमरच्या ओडिसीतल्या ओडिसस याच्या साहसवर्णनांवरून सुचली आहेत, इनीआसच्या कार्थेजमधल्या वास्तव्याची कथा नीव्हिआसने आपल्या महाकाव्यांत घातली होती. कार्थेज व रोमन साम्राज्य यामधल्या ऑगस्टन युगांतील स्पर्धेने कार्थेजचे नाव व्हर्जिलच्या काळी फार गाजत होते. शिवाय रोमन जनतेला दूरदूरच्या देशांविषयी त्याकाळी उत्पन्न झालेले कुतूहल या वर्णनानी तृप्त होणार होते. नाना स्थळांच्या वर्णनात व्हर्जिलने आपल्या काळांत उपलब्ध झालेली भौगोलिक माहितीही वापरली, इनीआस इटलीत येऊन पोचल्यावर त्याचे तेथील इटॅलिअनांशी जे युद्ध झाले, त्यातील वर्णनें पुष्कळशी इलिइडमधील तत्सम वर्णनां-वरून केलेली आहेत. शत्रूच्या गोटांत रात्री हेर पाठवून टेहेळण्या करणे, दोन्ही पक्षातल्या योद्धयांच्या याद्या व त्यांच्या शस्त्रास्त्रांची तपशीलवार वर्णने, स्वपक्षातील वीरांच्या अंत्यसंस्काराच्या वेळी शत्रू पक्षांतील कैद करून आणलेल्या योद्धयांचा बळी देणे, अंत्यसंस्कारानंतर आयोजित केलेल्या क्रीडास्पर्धा, उभयपक्षांत होणारे संधी व नंतर त्यांचा झालेला भंग, इनीआस व इटॅलिअन वीर, तुल्यबल टर्नस यांचे अंतिम, निर्णायक युद्ध वगैरे उदाहरणे देता येतील. इनिइडमधील अनेक घटना होमरच्या इलिअडचे वारंवार स्मरण करून देतात. इनीआसची माता व्हीनस ज्युपिटरकडे आपल्या पुत्रावरच्या संकटांतून त्याला वाचवण्याविषयी साहाय्य मागायला जाते तेव्हा ॲकिलीजची माता थ्यूसची भेट घेते याची आठवण होते. ट्रोजन्स कार्थेजच्या बंदरात येतांना धुक्याखाली देव त्याना संरक्षणार्थ झाकतात हा प्रसंग ओडिसस धुक्याने आच्छादित असा फीॲशिअनांच्या बंदरांत जातो या प्रसंगावरून घेतलासे वाटते. मर्क्युरी डायडोकडे निरोप घेऊन येतो तसाच हर्मीज कॅलिप्सोकडे येतो. व्हीनसची इनीआसचा पिता याच्याशी मुलाखत होमरच्या ॲफ्रोडायटीच्या स्तोत्रांतून घेतली आहे. डायडो इनीआसला आपली साहसे निवेदन करण्याची विनंती करते, तशीच ॲल्सीनॉस ओडिससला करतो. ओडिसीमध्ये पेनेलोपीच्या अनेक विवाहेच्छूचे वर्णन आहे तसे डायडोच्या विवाहेच्छूंचे आहे. ॲकिलीज पॅट्रोक्लसच्या अंत्यसंस्कारानंतर क्रीडास्पर्धा आयोजितो तसाच इनीआस पित्याच्या अंत्यसंस्कारानंतर आयोजितो. हेक्टरचा भूतात्मा इनीआसशी बोलतो तेव्हा पॅट्रीक्कमचा भूतात्मा ॲकिलीजची बोलतो त्याचे स्मरण होते. इटलीतील

अनेक स्थळांशी व रोमन देवदेवतांशी संबंधित अशा अनेक लोककथाही व्हर्जिलने आपल्या कथानकात वापरल्या आहेत.

याप्रमाणे व्हर्जिलने आपली साधनसामुग्री निरनिराळ्या ठिकाणांहून उसनी घेतली असली तरी आपल्या प्रतिभेच्या, व कलेच्या सामर्थ्याने तिच्यात त्याने नवचैतन्य निर्माण केले आहे या विस्कळित घटनांना एकसूत्रता आणणेही आवश्यक होते. विस्कळित घटनांचे वर्णन ॲरिस्टॉटलच्या महाकाव्याच्या व्याख्येत बसत नव्हते. व्हर्जिलने आपल्या वीरनायकाच्या एकमेव ध्येयाने या सर्व घटनांना– प्रवास, साहसे, लढाया-एकसंधपणा आणला, इनीआसला नवी नगरी वसवून, ट्रॉयच्या देवांना नवीन आश्रयस्थान मिळवून द्यायचे होते. या एकमेव सूत्रावर त्याच्या सर्व हालचाली होत होत्या.

इनीआसला या ध्येयाने प्रेरित करून व्हर्जिलने आपले महाकाव्यामागील दुसरे उद्दिष्ट साध्य केले. वीरवृत्तीप्रधान युगातील कथानक व वीरनायक निवडून इलिअड सदृश महाकाव्य रचण्याचे उद्दिष्ट साधनसामुग्री गोळा करून त्याने साध्य केले होते. दुसऱ्या उद्दिष्टानुसार त्याला आपले महाकाव्य राष्ट्रीय स्वरूपाचे, राष्ट्रगौरवाचे, आपल्या काळातील आशाआकांक्षा, प्रेरणाधारणा यांचे प्रातिनिधिक करावयाचे होते. व्हर्जिलच्या काळांतील रोमनजनतेची साम्राज्य स्थापण्याची मनीषा व परमेश्वराचे वरदान त्यांच्या प्रिय रोमनवंशाला लाभले असल्यामुळे ही मनीषा पूर्ण होण्याबद्दल दृढ आत्मविश्वास–या तत्कालीन राष्ट्रीय धार्मिक धारणा इनीआसच्या ध्येयात प्रतिबिंबित झाल्या आहेत. इनीआसच्या संकल्पित नगरीत व युद्धोत्तराच्या शांततासमृद्धीच्या काळांत व्हर्जिलने ऑगस्टन युगाची प्रतिमा सूचकपणे उभी केली आहे. आरंभीच ज्युपिटर व्हीनसपुढे जे इनीआसच्या उज्ज्वल भवितव्याचे व त्याच्या भावी वंशजांच्या वैभवाचे वर्णन करतो ते ऑगस्टन युगाला लागू पडते. 'इनीआसचे वंशज असीम साम्राज्य स्थापन करतील; ते अतुल पराक्रमी असतील; रोमन जनता युद्धकला व इतर कलाकौशल्ये यांत नैपुण्याचा उच्चांक गाठील.' असे ते वर्णन आहे. इनीआसने आश्रयस्थान मिळवून दिलेले ट्रॉयचे देव पण म्हणतात.

'आम्हाला तू दूरवर सागरावरून वाहून आणले आहेस; तुला आमचे आशीर्वाद आहेत. आम्ही तुझ्या वंशजांची कीर्ती आकाशापर्यंत भिडवू. तुझ्या नगरीला साम्राज्याची राज्ञी करू. इटॅलिअन राजा लॅटिनस याला फॉनसची देववाणी सांगते.

"तुझा जावई म्हणून एक परकीय येईल (इनीआस) व त्याच्या नेतृत्वाखाली सारी भूमी, सारे सागर एका साम्राज्य छत्राखाली येतील." कार्थेजमध्ये ज्युनोच्या मंदिरात भित्तीचित्रांवर व इनीआसच्या ढालीवर ज्या घटना रेखाटल्याचे वर्णन आहे त्या सर्व ऑगस्टसच्या युगातील भावी उज्ज्वल घटनांच्या सूचक आहेत. कार्थेजमधल्या राज्ञी डायडोच्या थाटाच्या मेजवान्यांत ऑगस्टस राजाच्या दरबारी वैभवाचे व थाटामाटाचेच प्रतिबिंब आहे. इनीआस, ओडिससप्रमाणे अधोलोकी गेला तेव्हा त्याचा पिता अँकायसिस याला त्याचे वंशज दाखवतो. हे आत्मे पुढे रोममध्ये जन्म घेणार होते, या वंशजात ऑगस्टसचा समावेश आहे. मात्र ऑगस्टसचे नांव न घेता व्हर्जिलने त्याला ज्युलिअस, असे संबोधून त्याला आयुलसचा (इनीआसपुत्राचा) वंशज म्हटले आहे. राज्यावर येण्यापूर्वी ऑक्टेव्हिअनने आपल्या दत्तकपित्याचे, ज्यूलिअस सीझरचे नाव धारण केले होते. ऑगस्टसच्या भावी विजयाचे व समृद्ध रोमन साम्राज्यांत नागरी सद्‌गुणांच्या होणाऱ्या प्रतिष्ठापनेचे, तसेच या सद्‌गुणांपासून व वंचित होणाऱ्यांच्या पारिपत्त्याचे वर्णनही इथे समाविष्ट आहे. इनिआसच्या इटलीतल्या वास्तव्याच्या वर्णनांत, रोमनांना रोचक वाटतील असे परिचित स्थळांचे निर्देश व तत्संबंधित लोककथा व्हर्जिलने कौशल्याने गुंफल्या आहेत.

याप्रमाणे व्हर्जिलने अनेक समकालीन तपशील आपल्या महाकाव्यांत सूचकपणे समाविष्ट करून आद्य राष्ट्रीय स्वरूपाचे महाकाव्य लिहिण्याचे आपले मनोगत सिध्दीस नेले. व्हर्जिलच्या या संकल्पनाद्वारा, इ. स. पू. दहाव्या शतकांत रचलेली ग्रीक पारंपारिक महाकाव्ये व लॅटिन साहित्यस्फूर्त महाकाव्ये यामधला आणखी एक फरक स्पष्ट होतो पारंपारिक महाकाव्य ही व्यक्तीगत कर्तृत्वाची व व्यक्तीमाहात्म्याची गाथा असे. पण व्हर्जिलचे संस्कारित महाकाव्य हे राष्ट्रीय कर्तृत्वाची, राष्ट्रगौरवाची गाथा आहे. शिवाय ते समकालीन राष्ट्रीय आशाआकांक्षा, प्रेरणाधारणा यांचे सूचकपणे प्रतिनिधित्व करते, पारंपारिक महाकाव्यांप्रमाणे या संस्कारित महाकाव्यांमध्येही वीरवृत्तीप्रधान युगांतले वीरपुरुष, त्यांची युध्दे, त्यांचा दिनक्रम यांची वर्णने कलापूर्ण अशी रेखाटलेली असतात. पण साहजिकच या कवींना त्या पुरातन कालापासून प्रत्यक्ष स्फूर्ती मिळालेली नसल्यामुळे व त्या कालाशी ते एकजीव झालेले नसल्यामुळे, या महाकाव्यांत पारंपारिक महाकाव्यासारखा भावनांचा स्वयंस्फूर्त उमाळा व कथनाची सहजताजन्य, अनलंकृत परिणामकारकता नसते. पारंपारिक महाकाव्यांपासून व्हर्जिलसारख्या कवींनी स्फूर्ती घेतलेली असते; त्यांच्या महाकाव्यांत ते ज्या सुसंस्कृत, सुधारणायुगांत वावरत असतात त्यांतले संस्कार अपरिहार्यपणे उमटतात; म्हणूनच या रोमन महाकाव्यांना

साहित्यस्फूर्त, साहित्यिक किंवा संस्कारित महाकाव्ये अशी त्यांचे भिन्नरुप दर्शवणारी संज्ञा प्राप्त झाली.

होमरचे इलिअड आपल्या युगाचे आपल्या समाजाचे प्रतिनिधित्व करते; पण ते फक्त अथेन्सच्या गौरवाची गाथा आहे. त्या युगांत राष्ट्राची कल्पना उदयास आली नव्हती; ग्रीक नगरराज्यांचे भिन्नभिन्न समूह होते पण त्यांना एकत्र बांधणारी साम्राज्याची कल्पना नव्हती. संघटित कर्तृत्वापेक्षा व्यक्तींच्या कर्तृत्वाचे ते युग होते. पण व्हर्जिल प्रतिनिधी आहे ऑगस्टसच्या धुरीणत्वाखाली उदयाला आलेल्या विशाल रोमन साम्राज्याचा. या ऑगस्टस युगात रोमला शांतता, समृध्दी, प्रतिष्ठा लाभली होती. तत्पूर्वीची यादवी, अशांतता, असुरक्षितता, दैन्य समाप्त झाले होते. राष्ट्राभिमानाने, प्रखर आत्मविश्वासाने डवरलेले रोमन अखिल जगावर आपले साम्राज्य स्थापण्याची स्वप्ने पहात होते व ती स्वप्ने ऑगस्टस सत्यसृष्टीत उतरवीत चालला होता. त्यामुळे दिवसेंदिवस अधिकाधिक उफाळून येत असलेल्या राष्ट्राभिमानाचा, देशप्रेमाचा, अस्मितेचा हुंकार व्हर्जिलनें आपल्या महाकाव्यांत उमटविला.

पारंपारिक महाकाव्यांत नसलेले आणखी एक महत्त्वाचे अंग व्हर्जिलच्या इनिइडमध्ये प्रकट झाले आहे. ते म्हणजे त्यांत अंतर्भूत असलेले मानवतावादाचे नवीन तत्त्वज्ञान हा मानवतावाद रोममध्ये ऑगस्टन युगांत उदय पावू लागला होता. या युगापूर्वी जे यातनाकष्टांचे दशावतार रोमनांनी पाहिले होते त्यामुळे त्यांच्यात परदुःखाची जाणीव व तद्विषयक कणव उत्पन्न झाली होती. होमरच्या वीरपुरुषांना युध्दाबद्दल अपरिमित उत्साह व भीती होती. त्यामुळे होणारा रक्तपात, प्राणांची व वित्ताची हानी, प्रियजनांची ताटातूट याबद्दलचा विचार त्यांच्या अंतःकरणाला स्पर्श करीत नव्हता. पण व्हर्जिलचे वीरपुरुष विशेषत: इनीआस, हे युध्दाकडे केवळ ध्येयसिध्दीचे एक अपरिहार्य साधन म्हणून पहात. युध्दाबद्दल उल्हास नसून फक्त कर्तव्यबुध्दी होती. इनीआसला रक्तपाताने बरबटलेल्या युध्दाबद्दल उबग वाटतो. पित्याचे प्राणरक्षण करण्यासाठी लॉससने इनीआसशी झुंज घेतली व त्यात तो ठार झाला; तेव्हा इनीआसला त्या विजयाबद्दल हर्ष किंवा गौरव वाटण्याऐवजी त्या मृत मुलाबद्दल अपार करुणा त्याच्या हृदयांत दाटून आली. तत्कालीन वीरांच्या पध्दतीप्रमाणे जित लॉससचे चिलखत, लूट म्हणून त्याच्या मृतदेहावरून त्याने ओरबाडून काढले नाही. शत्रूच्या मृतवीरांचेसुध्दा उचित अंत्यसंस्कार व्हावे याबद्दल ते इनिइडमधले वीर दक्ष असत. ॲकिलिजने

हेक्टरच्या मृतदेहाची केलेली विटंबना किंवा शत्रूच्या मृतवीरांची शवे कोल्हया-गिधाडांपुढे फेकण्याची भाषा इनीइडमध्ये आढळत नाही. ही माणुसकी वीरवृत्ती प्रधान युगांत उस्फूर्त झालेल्या पारंपारिक महाकाव्यात आढळणे शक्य नव्हते. ती सुधारणायुगात विकसित झालेल्या संस्कृतीची प्रेरणा होती.

महाकाव्यांत अद्‌भुतरस निर्माण करून त्याला भव्य दिव्य पातळीवर नेण्यासाठी अतिमानुषयंत्रणा ( Supernatural element ) वापरणे अवश्य आहे असे ॲरिस्टॉटलने म्हटले आहे. व्हर्जिलने तदनुसार ऑलिंपस निवासी अनेक देवदेवता इनिइडमध्ये घातल्या आहेत. होमर मधल्या देवांची नांवे ग्रीक, झ्यूस, ॲप्रॉडायटी, हीरा वगैरे आहेत तर त्याच देवांची रोमन नांवे ज्युपिटर, व्हीनस ज्युनो, व्हल्कन, ॲपॉलो वगैरे आहेत. हे देव, इलिअड मधल्या देवाप्रमाणेच, वीरकृत्ये करणाऱ्या आपल्या भक्तांना साहाय्य करतात या इलिइडमधल्या देवां-खेरीज इटलीतील रोमन देवायतनांतले जुट्‌नु, फॉनस' पॅन निरनिराळ्या अप्सरा, सिलव्हॅनस, सिबिली, सॅटर्न, जॅनस, पायकस, पिल्युम्नस, व ठिकठिकाणच्या इटलींतल्या स्थलदेवता, ग्रामदेवता वगैरेचाही समावेश व्हर्जिलने केला आहे; व्हर्जिलला इलिअडमधल्या देवदेवतांची अभ्यासु व्यासंगाने व प्राचीन रोमन देवांची, व त्यांच्या प्रीत्यर्थ होणाऱ्या यज्ञयाग, होमहवन वगैरेंची ऐकीव व प्रत्यक्ष माहिती होती. या दोहोंचा सांधा त्याने कुशलतेने जोडला आहे. प्राचीन रोमन हे कर्मकांड भक्तीने व काटेकोरपणे आचरीत, कुठल्या देवाला कुठला बळी प्रिय आहे, यज्ञीय बलीवर्द कुठल्या प्रकारचा असावा. अशुभाची नजर पडू नये म्हणून उपाध्यायांनी आपले मस्तक जांभळ्या वस्त्राने कसे आच्छादावे, यज्ञस्थलाची निवड कशी करावी या सर्व रोमनांच्या जुन्या चालीरिती व्हर्जिलने अभ्यासिल्या होत्या. व्हर्जिलचे समकालीन रोमनही धर्मनिष्ठ, धर्मभीरु होते स्वत: ऑगस्टस बादशहा हा धर्मश्रद्ध होता व राष्ट्राच्या एकीकरणासाठी धर्मश्रद्धांचे पुनरूज्जीवन करण्याचा त्याचा प्रयत्न होता. ही धर्मनिष्ठाच रोमन साम्राज्याला एकत्र बांधून ठेवणारी शक्ती होती असे म्हणण्यास हरकत नाही. रोमन सेनापती युद्धावर निघण्यापूर्वी मार्स या युद्धदेवाची प्रार्थना करीत. यामुळे व्हर्जिलने, केवळ इलिअडचे अनुकरण म्हणून नव्हे तर राष्ट्राच्या धार्मिक आचार विचार, श्रद्धासमजुती प्रति-बिंबित करण्यासाठी देवदेवता, भूतात्मे, देववाणी, शकुनअपशकुन वगैरे अति-मानुषयंत्रणा इनीइडमध्ये समाविष्ट केली. स्वत: व्हर्जिलही या धर्मश्रद्धेच्या व अदृश्य शक्तींच्या मानवावरील प्रभावाच्या ग्रामीण वातावरणात वाढला होता.

रोमनांना देवदेवतांविषयी तसाच पितरांविषयी व थोर मृतांविषयी अत्यंत आदर होता. म्हणून व्हर्जिलने इनीइडच्या सहाव्या सर्गात इनीआसला अधो–लोकात पित्याची भेट घ्यायला पाठवून त्या लोकाचे विस्तृत वर्णन केले आहे. आपले जीवनाविषयक तत्त्वज्ञानही अँकाअसिसच्या मुखाने त्याने वदवले आहे. इनीआसला अधोलोकात सर्व थोर मृतात्म्यांचे दर्शन होते. या मृतात्म्याना इह–लोकाविषयी ओढ आहे; ते पुनर्जन्म घेण्यास उत्सुक आहेत. अधोलोकातील पाप्यांच्या वाटचास येणारा यातनामय विभाग व पुण्यात्म्यांचा एल्शिअम, यांची वर्णने प्रत्ययकारी व उद्बोधक आहेत. हे मरणोत्तर जीवन वर्णिताना व्हर्जिलच्या कल्पनाशक्तीचा अपूर्व विलास अत्युच्च कोटीला पोचला आहे. हे जीवन सर्व–साधारण कल्पनेप्रमाणे वाटते तसे धूसर, भीतीप्रद, अवास्तव नसून सुंदर, प्रसन्न आहे, जडशीळ नसून गतीमान, उल्हसित आहे. पृथ्वीवर ज्यांची ताटातूट झाली त्या प्रियजनांचे येथे पुनर्मीलन होते. डायडो मयत पतीच्या मीलनात सुखी झालेली दिसते.

या हेडीजच्या – अधोलोकाच्या वर्णनात व्हर्जिलने होमर, व समकालीन इतिहास, तत्त्वज्ञान, धार्मिक समजुती व नीतीमूल्ये यांचा उत्तम समन्वय साधला आहे. अधोलोकात प्रवेशण्यापूर्वी इनीआस होमहवन करतो व एक सुवर्णपर्ण शाखा कक्षेवर घेतो. ही शाखा जणू इहलोक व अधोलोक यांना जोडणाऱ्या स्नेहबंधनाचे प्रतीक आहे. सिबिली त्याला मार्गदर्शन करते. निरनिराळ्या प्रकारे मृत्यू पावलेल्या मृतात्म्यांच्या पांच विभागांतून ते टार्टरसपाशी येतात. सिबिली पाप्यांना इथे भोगावयास लागणाऱ्या यातनांची वर्णने करते; पण त्या अतिभयंकर प्रदेशांत ती त्याला नेत नाही. नीतीमूल्ये व कायदे झुगारून देणारे पापी–व्यभिचारी, विश्वास-घातकी,बांधवद्रोही–इथे ठेवण्यात येत. या वर्णनांत व्हर्जिलने प्राचीन व समकालीन नीतीमूल्यांची उत्तम सांगड घातली आहे. नंतर इनीआस जातो एलिशिअममध्ये–धन्यपुण्यात्म्यांचा स्वर्ग. इथे लख्ख प्रकाश, सुखद हवामान असते. इथे इनीआसला प्राचीन युगातले सर्व थोर वीरपुरुष दिसतात. लक्षात घेण्याजोगी गोष्ट म्हणजे व्हर्जिल इथे व्यक्तीमहात्म्याचा उदोउदो न करतां राष्ट्रासाठी, धर्मासाठी ज्यानी आपले सर्वस्व वेचले त्या थोर पुरुषांचा–वीरांचा कलावंतांचा धर्मात्म्यांचा उल्लेख करतो.

आणि मग इथेच इनीआसला अँकायसिस भेटतो. आपल्या पित्याला भेटण्या साठी तर त्याने हा सगळा अट्टाहास केला होता. सिसिलीत मरतांना अँकायसिसने

इनीआसला बजावले होते, "तू हेडीजमध्ये ये. मग मी तुला तुझी भावी नगरी व तुझा वंश यांचे सारे वृत्त कथन करीन." पायथॅगोरस या तत्त्ववेत्त्यांची पुनर्जन्माची कल्पना व्हर्जिलने स्वीकारली आहे. नंतर अँकायसिस इनीआसला जीवनाचे गूढ उकलून सांगतो. या तत्त्वज्ञानावर प्लेटोच्या तत्त्वज्ञानाची दाट छाया आहे व भारतीय तत्त्वज्ञानाशी त्याचे साधर्म्य उघड दिसते. या सर्व विश्वाचा संचालक एक महात्मा आहे व त्याचा दिव्यांश प्रत्येक जीवात्म्यांत आहे. जडदेहाच्या साप-ळ्यात अडकल्यामुळे हा जीवात्मा महात्म्याचे स्वरूप ओळखू शकत नाही. तो संसाराच्या जंजाळात गुरफटून स्वतःमधला दिव्यांशही दृष्टीआड करतो. या शृंखलांतून सुटका झाल्यावर, मरणोत्तर अग्नी, जल, वायू वगैरेंकडून शुद्धी झाल्यावर तो एलिशिअममध्ये येतो व येथे त्याला दिव्यस्वरूप प्राप्त होते; पुढे त्याला कालांतराने पुनर्जन्म येतो.

व्हर्जिलचा अधोलोक व त्याचे तत्त्वज्ञान होमरहून भिन्न आहे तसे त्याचे ऑलिंपस निवासी देवही होमरहून भिन्न आहेत. त्यांच्या कृती इलिअडमधल्या व ओडिसीतल्या देवदेवतांसारख्याच आहेत. अथीनी ओडिससला मदत करते तशीच व्हीनस इनीआसला करते. पॉसीडोन ओडिससवर समुद्रप्रवासांत संकटे आणतो तशीच ज्यूनो इनीआसच्या प्रवासांत अरिष्टे आणते. प्रत्यक्ष युद्धातही हे देव आपापल्या पक्षांच्या बाजू संभाळीत असतात. इलिअडमध्ये पॉसीडॉन झ्यूसपुत्र डारडॅनस याच्यापासून उत्पन्न झालेला ट्रोजनांचा वंश नष्ट होऊ नये म्हणून इनी-आसला रणक्षेत्रातून दूर नेऊन वाचवतो, तशीच ज्युनो टर्नसला इनीआसपासून दूर घेऊन जाते. अप्सरा जुटुर्नु आपला भाऊ टर्नस याच्या बाजूने लढते.

पण कृती समान असली तरी इनिइडमधल्या देवदेवतांचे स्वभावगुण होमरचित्रीत देवदेवतांच्या स्वभावगुणांहून भिन्न आहेत. वीरवृत्तीप्रधान युगातल्या मानवांप्रमाणे या युगातील महाकाव्यांच्या देवदेवता ही मुक्त भावनांच्या आहारी जाणाऱ्या, रांगड्या, बालिश वाटतात. स्पर्धा, द्वेष, क्रोध, हेवा या असंमत भाव-नांच्या दडपणाखाली त्या आपल्या भजनी न लागणाऱ्या भावनांच्या मार्गात अडचणी उत्पन्न करतात. इनिइडमधील देव सुधारणायुगाच्या प्रकृतीप्रमाणे गंभीर भारदास्त औचित्याने व संयमाने वागणारे आहेत. इलिअडमधली प्रणयदेवता अॅफ्रॉयडायटी निर्दय व हिणकस पातळीवरची वाटते. इनिइडमधील प्रणयदेवता व्हीनस केवळ इनीआसच्या मातेसारखीच नव्हे तर जगन्मातेसारखी वत्सल, मोहक व वर्तणुकीने मृदु, गोड वाटते. देवांचा राजा ज्युपिटर इनीइडमध्ये यज्ञावंत,

समदर्शी व गंभीर वृत्तीचा आहे. इलिअडमधला देवराज झ्यूससारखा तो विषयी, जुलमी, मत्सरी व आततायी नाही. ऑलिंपसनिवासी देवदेवता दीर्घद्वेषी, कोपिष्ट, अन्यायी, निर्घृण असतील ही कल्पनाच व्हर्जिलला करवत नाही. शिवाय इलिअड ओडिसीतल्या देवांप्रमाणे व्हर्जिलचे देव सर्वशक्तीमान नाहीत. त्यांच्याही वर "नियती" ही एक शक्ती आहे व तिच्या संकेतानुरुप मानवी व्यवहार चालू असतात. स्वत: ज्युपिटर सुद्धा नियतीच्या संकेतात हस्तक्षेप करीत नाही. "प्रत्येक मानवाचे 'कर्म' असते व त्याचप्रमाणे बरे वाईट भोग त्याच्या वाटयास येतात व ते त्याने भोगलेच पाहिजेत. या कष्टातून तावून सुलाखून त्याचे व्यक्तीमत्त्व उमळून उठते." असे तो व्हीनसला सांगतो. या विचारसरणीला अनुसरूनच व्हर्जिल आपल्या देवांकडून मानवांना फक्त प्रेरणा देण्याचे व भावी घटनांची सूचना देऊन त्यांना सावध करण्याचे कार्य, बहुतांशी करवतो. सोकीक्लीज या ग्रीक शोकात्मिकाकराप्रमाणे व्हर्जिलही इनीइडमध्ये मानवाच्या कर्तृत्वाला जास्त महत्व देतो. त्याच्यावर स्टोइसिझमचा (Stoicism) पगडा या काळात बऱ्याच प्रमाणावर पडलेला दिसतो. एमिक्युरसचा भोगवाद त्याच्या मनांतून केव्हाच गला होता. मानवाने आपल्या भावना संयमित कराव्या व जीवनांतील सर्वोच्च शक्तीला स्मरून सद्सद्विवेकाची व सदाचाराची कास धरावी म्हणजे त्याचे जीवन सुखी व कृतार्थ होईल हे झेनोचे स्टोइसिझमचे तत्वज्ञान पुढेही रोममध्ये पुष्कळच लोकप्रिय होते. सेनेका, एजिक्टेटस व मार्कस ऑरेलिअस या थोर तत्त्ववेत्यांनीही या तत्त्वज्ञानाला पाठिंबा दिला.

व्हर्जिलचे व इनीआसचेहीं अंतिम तत्त्वज्ञान हेच आहे »ी केवळ व्यक्तीगत हितासाठी नव्हे तर राष्ट्राचे श्रेयस साधण्यासाठी मानवाने संकटांना न जुमानता, नेहमी प्रयत्नशील रहाणे हे त्याचे पवित्र कर्तव्य आहे. ध्येयसिद्धीसाठीं घेतलेल्या कष्टांतून मानवाचे व्यक्तीमत्व उजळून निघते. आपल्या अनुभवावरून परदु:खाची कल्पना येते व त्याबद्दल करुणा उत्पन्न होते. ख्रिश्चन तत्त्वज्ञानाने जो करुणेचा माणुसकीचा संदेश पुढे जगाला दिला तो व्हर्जिल इनीइड या द्वारा रोमनांना अखिल मानवजातीला देतो. जीवनांत दु:ख अपार आहे; त्याच्यापासून निवारा मिळतो तो परपीडा जाणून अंत:करण द्रवते तेव्हा : म्हणूनच की काय सेंटपॉल, रोमच्या वाटेवर व्हर्जिलच्या समधीपाशी उभा राहून म्हणाला होता.

"तू आज जीवंत असतास तर !" "कवीश्रेष्ठा, केवढं नवजीवन आपल्या अभिनव काव्याच्याद्वारे तू दिलंस जगाला"

महाकाव्याला साजेल असे भव्य, व्यापक स्वरूपाचे व आकर्षक असे कथानक व्हर्जिलने इनिइडसाठी निवडले. ट्रॉयचे पतन हा प्राचीन व कार्थेज आणि रोमन साम्राज्याची स्थापना हा तात्कालीन विषय व्हर्जिलच्या समकालीनांना अद्भुत-रम्य व अत्यंत महत्वाचा वाटण्याजोगा होता. इनिइडचे कथानक तीन खंडे-आशिया, आफ्रिका व युरोप यामध्ये घडणार होते. त्याचा प्रवास ट्रॉय, सिसिली, कार्थेज लिशिअम, टायवर तीर, इटलीच्या सात टेकडचा असे लांबचे पल्ले गाठीत होणार होता. अशा कथानकांत भाग घेणाऱ्या व्यक्ती तशाच महामना, आदर्श, महान ध्येयासाठी अविरत झगडणाऱ्या अशा हृया महाकाव्यांतील प्रमुख व्यक्ती उच्चपदस्थ, थोर कर्तृत्वाच्या असाव्यात असे ॲरिस्टॉटलने म्हटलेच आहे. इनीइडचा वीर नायक इनीआस हा आदर्श वीर व आदर्श राजपुरुष होताच. पण तो पराक्रमी, आदर्श शासक सम्राट ऑगस्टस याचा पूर्वज शोभेल असा व ऑगस्ट-सच्या उज्वल कर्तृत्वाचे पुनः पुनः स्मरण करून देईल असाही होता. इनिइडमधली इतर पात्रेही अशाच भव्य परिमाणात व्हर्जिलने रेखाटली आहेत.

इलिअडचा वीरनायक ॲकिलीज तसा इनीइडचा इनीआस, तो ॲकिलीज सारखाच पराक्रमी योद्धा आहे. होमरने त्याचा गौरव इलिअडमध्ये केला आहे व त्याचे उज्वल भवितव्यही वर्तविले आहे. मात्र इनीआसच्या अंगी शौर्याखेरीज इतरही गुण आहेत. त्यांतला सर्वांत प्रमुख म्हणजे निष्ठा. ॲकिलीजही मित्रनिष्ठ होता पण इनीआसची निष्ठा व्यापक आहे. म्हणूनच trietas एकनिष्ठ, श्रद्धावंत असे विशेषण व्हर्जिलने त्याच्या नावामागे सातत्याने वापरले आहे. धर्म, आपलीं नगरी, किंबहुना अखिल मानव जातच यांच्याविषयी त्याला जिव्हाळा आहे. त्याच्या श्रेयस् संबंधी त्याची बांधिलकी त्याच्या रोमरोमात भिनली आहे. त्याचे सर्वजीवन या ध्येयनिष्ठेने रसरसले आहे. उत्तम योद्धा समदर्शी शासक पितृनिष्ठ पुत्र, कनवाळु पिता, कुशल लोकनेता या सर्व बिरूदानी त्याचे नाव इनीइडभर लख-लखताना दिसते. वीरवृत्तीप्रधान युगातल्या शूर पुरूषांचा रांगडेपणा त्याच्यात आढळत नाही. त्याच्या वृत्तीत सुसंस्कृत माणसाची मृदु मानवता आहे. भर युद्धांत शत्रुवर विजय संपादिल्याच्या क्षणीही त्याला शत्रूविषयी कणव वाटते. होमरचे वीरनायक "नगरी लुटणारे" असे बिरुद मिरवण्यात धन्यता मानीत, पण इनीआसचे ध्येय नवी नगरी स्थापन करण्याचे आहे. कार्थेज प्रथम दृष्टीपथांत येते तेव्हा त्याच्या मनात विध्वंसाचा विचार नसून त्याच्यातील भव्य प्रासादांचे कौतुक असते. तो युद्ध करतो ते अंतिम शांततेसाठी; शांतता नांदेल, असे अनुशासनबद्ध, सम्बध्द असे समर्थ नवे राष्ट्र त्याला निर्माण करावयाचे आहे.

इनीआसचे व्यक्तीचित्र होमरच्या वीरपुरुषांसारखे अंतःकरणाला भिडत नाही असा काही समीक्षकांचा आक्षेप आहे. पण हा व्हर्जिलचा दोष नसून, तो ज्या युगांत जन्मला त्या युगाचा परिणाम आहे. हे सुधारणायुग अंतःस्फूर्त, सहजपूर्ण अशा भावनावेगांचे नसून संयमित, संस्कारित भावनांचे होते. या युगात लिहिणारा कवी कितीही कलावंत व व्यासंगी असला तरी प्राचीन युगाची प्रकृती तशीच्यातशी त्याच्या कृतीत उतरणे कठीण होते. शिवाय व्हर्जिलचा इनीआस हा नियतीच्या हातचे खेळणे होता. तिच्या संकेतपूर्तीचे एक साधन होता असेच व्हर्जिलला सुचवायचे होते. त्यामुळे त्याच्या वागण्यांत स्वयंस्फूर्त भावनांचा उफाळणारा उमाळा दिसत नाही. युद्धांत तसाच प्रीतीत तो सारखाच स्थितप्रज्ञ, अथवा थंड, रुक्ष आहे असे प्रतीत होते. डायडोविषयीची त्याची भीती तिच्या भीतीइतकी बेबंद अनिवार नाही, तिच्यापासून दूर होताना, तिची विरहाने तडफड होते तशी त्याची होत नाही. इथे व्हर्जिलच्या स्टोइसिझमची सावली त्याच्यावर पडल्याचा भास होतो.

एकनिष्ठता, श्रध्दा ही त्याची भावना मात्र सतत ज्वलत आहे. आपल्या ध्येयापासून, कितीही अडथळे आले तरी डगमगून तो विचलित होत नाही. डायडोचे प्रीतीबंधन, तिने दाखवलेले राज्याचे, संपत्तीचे प्रलोभन तिचा आक्रोश–यापैकी कशालाही बळी न पडता, आपल्या ध्येयसिद्धीसाठी कार्थेजच्या बंदरातून तो आपली जहाजे हाकारतो. आपल्या ध्येयाबद्दल निष्ठा तसाच त्याच्या पूर्तीबद्दल त्याला आत्मविश्वास आहे. टर्नसच्या फाजील अहंकाराच्या व लॅटिनसच्या दुबळ्या, सदैव आशंकित अशा इच्छाशक्तीच्या पार्श्वभूमीवर हा आत्मविश्वास उठून दिसतो.

इनीआसचे व्यक्तीचित्र रेखाटतांना व्हर्जिलच्या डोळ्यांपुढे त्याचा स्नेही व उत्तुंग व्यक्तीमत्वाचा, आदर्श राजपुरुष व राष्ट्रपुरुष सम्राट ऑगस्टस होता यांत शंका नाही. ऑगस्टसने रोममध्ये पुनरुज्जीवित केलेल्या सुवर्णयुगाची वर्णने, भाकितांच्या रुपांनी व्हर्जिलने इनीइडमध्ये जागोजाग पेरली आहेत. इनीआसच्या अंगचे सद्गुण ऑगस्टसच्या ठायी त्याला दिसत होते. व त्याप्रमाणेच जणू त्याने ते रेखाटले. ऑगस्टसही सच्चा मित्र, पितृभक्त, पराक्रमी योद्धा, चतुर व समर्थ शासक, राष्ट्राचा तारणहार व थोर साम्राज्य संस्थापक होता. इनीइडच्या आठव्या सर्गात शेवटच्या पन्नास ओळीत केलेले युद्धाचे वर्णन ऑगस्टसने अॅक्टिअम येथे अँटनीवर मिळवलेल्या महत्त्वाच्या, निर्णायक, अभूतपूर्व विजयाचे निश्चितच स्मरण करून देते.

इट्रुस्कनांचा मुख्य इव्हँडर व त्याचा पुत्र पॅलस यांच्या व्यक्तीचित्रांत वीरवृत्तीप्रधान युगांतील रांगडेपणा व भावनांतील सहजता आणि रोमनवंशाचा भारदस्तपणा, श्रद्धा व काटकपणा यांचे मिश्रण आहे. इव्हँडरच्या रांगड्या जीवनक्रमाचे व त्याने केलेल्या इनीआसच्या रांगड्या आतिथ्याचे वर्णन आकर्षक आहे व त्याचा पुत्रशोक हृदयस्पर्शी वाटतो.

एक गोष्ट लक्षात येते की ट्रोजनांपेक्षा इटॅलिअनांची व्यक्तीचित्रे रेखाटण्यात व्हर्जिल जास्त यशस्वी झाला आहे, व त्याची मौलिक प्रतिभा येथे जास्त प्रमाणांत उठून दिसते. ट्रोजनवीर रेखाटतांना त्याच्या मनावर होमरचा प्रभाव होता. इटॅलिअनांच्या स्वभावदर्शनाच्या वेळी तो स्वतंत्र आहे. शिवाय इनीआसच्या शत्रूपक्षातील वीरांचे वर्णन करतांनाही त्याने दाखवलेली निर्मळ गुणग्राहकता स्पृहणीय आहे. टर्नस व मेझॅंटिअस यांचे धैर्य व निष्ठा व्हर्जिलने परिणामकारकरीत्या रेखाटली आहेत. टर्नस मोठा हिंमतवान व मनस्वी वृत्तीचा आहे. त्याच्या परीने तो आपल्या भूमीशी एकनिष्ठ आहे. इटलीमध्ये ट्रोजनांच्या वंशाला थारा देणे त्याला रुचण्याजोगे नव्हते. लॅटिनसकन्या लॅव्हिनिआ हिच्याशी त्याचा वाङ्निश्चय झालेला होता व आता लॅटिनस तिला इनीआसला देऊ पहात होता. हेलनसाठी ग्रीक लढले तसे लॅव्हिनिआसाठी इटॅलिअनांनी लढावे हे वाजवीच होते व त्याच्या या निर्धाराबद्दल आदर उत्पन्न होतो. तो पॅलसला ठार करतो पण त्याला अंत्यसंस्कार नाकारीत नाही. डॉनिआ राज्याचा प्रमुख डायॉमीडीज त्याला साहाय्य देण्याचे नाकारतो तरी त्याचे धैर्य खचत नाही. देव व नियती त्याच्याविरुद्ध ठाकली आहेत हे तो जाणून आहे; तरीही तुल्यबल इनीआसशी लढत देऊन धारातिर्थी पडण्यास तो तयार होतो. आपला वृद्ध पिता डॉनस याला आपले अंत्यसंस्कार करण्याचे समाधान मिळावे एवढीच त्याची अंतिम इच्छा आहे. मनस्वी व भावनांवर निर्बन्ध घालणे ठाऊकच नसलेला टर्नस आपल्या शौर्याने, धैर्याने, स्वाभिमानाने व स्वदेशभीतीने इनीआसइतकाच प्रभाव आपल्या मनावर टाकतो.

मेझॅंटिअस या इट्रुरिआच्या पदभ्रष्ट राजाचे व्यक्तीचित्र, काही समीक्षकांच्यामते टर्नसइतकेच प्रभावी आहे. दहाव्या सर्गात तो टर्नसच्या बाजूने लढतो व खुद्द इनीआसशी झुंज घेतो त्यावेळी त्याच्या धैर्याबद्दल कौतुक व आदर वाटतो. त्याच्या भावना अकृत्रिम व वास्तवतापूर्ण अशा रेखाटल्या गेल्या आहेत. आपले रक्षण करतांना मृत्यू पावलेल्या आपल्या पुत्राबद्दलचा–लॉससबद्दलचा त्याचा शोक अंत:करण विदीर्ण करतो.

पण साऱ्या इनिइडमध्ये अंत:करणावर कायम ठसा उमटवणारी व्यक्तीरेखा कोणती असेल तर ती कार्थेजची राज्ञी डायडो हिची. तिची सर्वच कथा, तिच्या दारुण शोकान्ताने अविस्मरणीय झाली आहे. डायडो ही कितीतरी काळ नृत्य, संगीत, चित्रकला भित्तीचित्रे, काव्य वगैरे कलामाध्यमांचा विषय होऊन राहिली होती, इनीइडमध्ये माणुसकीचा ओलावा मोठ्या प्रमाणांत डायडोच्या कथेत आढळतो. व्हर्जिलने तिच्या दु:खाशी समरस होऊन तिचा शोकान्त रंगवला तेव्हा तिचा हा शेवट आपल्या वीरनायकाच्या व्यक्तीमत्त्वाचे तेज झाकाळण्यास कारणीभूत होतो याचा त्याला जणू विसर पडला होता.

डायडोच्या कथेच्या पूर्वभागांत देवांचा हात पुष्कळसा होता. ज्यूनोने इनीआसच्या ध्येयसिद्धीच्या मार्गात विघ्न आणण्यासाठी सागरात वादळ निर्माण करून इनीआसची जहाजे कार्थेजच्या शत्रूपक्षाच्या किनाऱ्यावर लोटली. पण व्हीनसने ज्युपिटरचे साहाय्य घेऊन कार्थेजच्या नागरिकांच्या व राज्ञीच्या मनांत इनीआसविषयी सहानुभूती व मित्रभाव उत्पन्न केला. नंतर ज्यूनोने इनीआस डायडोच्या विवाहबंधनात अडकून पडावा म्हणून डायडोच्या अंत:करणांत इनीआसविषयक अतिप्रबळ प्रणयभावना निर्माण केली.

पण खरे म्हणजे डायडोच्या प्रीतीला देवांच्या मध्यस्थीची आवश्यकता नव्हती. डायडो ही कार्थेजची संस्थापिका व राज्ञी होती खरी–पण अखेर ती एक स्त्री होती. पतीच्या मृत्यूनंतर ती प्रीतीला आंचवलेली होती. तिच्या स्त्री सहजवृत्तीवर इनीआसच्या भरदार, समर्थ पौरुषत्वाची मोहिनी पडली; भावाचा विद्रोह व पतीवध यानी पोळलेल्या तिच्या मनाला निर्वासित इनीआसची, त्याने सोसलेल्या कष्टांची कणव वाटू लागली. इनीआसही पत्नी विरहाने व्यथित होताच. हे समदु:खी जीव एकमेकांकडे साहजिकच आकर्षित झाले. त्याने आणलेल्या बहुमोल नजराण्याने व त्याच्या साहसी कृत्यांच्या श्रवणाने हे आकर्षण वृद्धिगत झाले. पितृमुखी अॅस्कॅनिअसला, अपत्यस्पर्श माहीत नसलेल्या आपल्या छातीशी तिने प्रीतीच्या आवेगात कवटाळले.

पण या उमलत्या प्रणयभावनेला शरण जाण्यापूर्वीची डायडोच्या मनांतली खळबळ व्हर्जिलने अत्यंत सूक्ष्मदर्शी जाणीवेने रेखाटली आहे; इनीआसच्या आगमनापूर्वी डायडोच्या अंत:करणावर मृतपतीविषयक प्रेम व निष्ठा यांचेच साम्राज्य होते. अनेक विवाहेच्छू तिचा पिच्छा पुरवीत होते; पण पुनर्लग्नाचा विचार तिच्या मनाला स्पर्श करू शकला नव्हता. पण इनीआसच्या दर्शनाने तिच्या

मनांत संघर्ष उद्‌भवला व त्याने तिचे मन ढवळून काढले. तिला दुःस्वप्ने पडतात. पती दिसल्याचा भास होतो. काही काळ या भावनांच्या ओढाताणीने ती अस्वस्थ व त्रस्त होते. पण शेवटी नवोदित प्रीतीचा विजय होतो, व इनीआसच्या प्रीतीच्या लाभाने ती तृप्त होते. इनीआसच्या छोटचा प्रतिमेला, मांडीवर खेळवण्याची स्वप्ने पाहू लागते.

पण या प्रणयपूर्तीच्या धुंदीत ती आपले राज्ञीचे कर्तव्य विसरून जाते. इनीआस येण्यापूर्वी तिच्या नव्या नगरीत कितीतरी प्रगतीपथावर वाट चालणारे प्रकल्प सुरू झाले होते, पण राणीचे दुर्लक्ष झाल्यामुळे आता ते सर्व मंदावले होते. या कर्तव्यच्युतीचा दंडच जणू नियतीने तिला केला.

तिच्या वर्तमान व भावी सुखाची मंदिरे एकदम धडाधड कोसळली. मर्क्युरीचा निरोप मिळाल्यावर इनीआस प्रणयाच्या धुंदीतून जागृत झाला होता. आपल्या ध्येयपूर्तीसाठी प्रवासास पुन्हा निघण्याचा बेत त्याने ताबडतोब मुक्रर केला. डायडो घाबरली, इनीआसला आपली नगरी, संपत्ती देऊ करू लागली. पण त्याचा निर्धार अढळ असलेला पाहून आपला विश्वासघात केल्याबद्दल ती निंदू लागली, त्रागा करू लागली, पण इनीआस शहाजोगपणे म्हणाला, "विवाहाचे वचन मी कधी दिले होते तुला ?" त्याने तिला समजावण्याचा आटोकाट प्रयत्न केला. आपल्या बांधीलकीबद्दल, मर्क्युरीच्या निरोपाबद्दल, मृत पित्याने दर्शन देऊन ध्येयाचा विसर पडल्याबद्दल दटावल्याबद्दल परोपरीने सांगितले. पण प्रीतीच्या सहजीवनाचे स्वप्न भंगल्यामुळे डायडो वेडीपिशी झाली होती. त्याची जहाजे मोडून तोडून त्याचा प्रवास अशक्य करण्याचा ती बेत करते; पण इनीआसला वेळीच दैवी सूचना मिळून तो आधीच पळ काढतो.

त्याच्या पाठलागाचा वेडा विचार ती सोडुन देते; पण आता तिच्या प्रथम-पतीच्या प्रीतीच्या स्मृती तिच्या अंतःकरणात पुन्हा उसळू लागतात. आपला व्यर्थ पावित्र्यभंग झाल्याचा तिला खेद होतो. इनीआसला आता ती शिव्याशाप देऊ लागते. शेवटी जगणे अशक्य होऊन, इनीआसची तलवार उराशी कवटाळून ती आत्मघाता-साठी चितेवर चढते. शेवटच्या क्षणी तिला एक प्रकारची शांती लाभते. तिचे गत-जीवन कृतार्थ होते. ती म्हणते,

"मी एक विख्यात नगरी वसवली. माझ्या नगरीचे तट उभारत जात असताना मी पाहिले. पतीवधाचा सूड मी घेतला. माझे जीवन भाग्यशाली होते–

अखेरपर्यंत तसेच राहिले असते जर ट्रोजन नौका कार्थेजच्या किनाऱ्याला लागल्याच नसत्या तर!"

अधोलोकांत तिला इनीआस दिसतो तेव्हा ती त्याच्याकडे तिरस्काराने पहाते. त्याच्या खेदोद्गारांकडे अधिक्षेपाने ती पाठ फिरवते. आपल्या पतीशी झालेल्या पुनर्मीलनांत ती तृप्त, सुखी असते. एकंदरीने डायडोची व्यक्तीरेखा ही व्हर्जिलच्या मनुष्यस्वभावाच्या सखोल ज्ञानाचे व मानवाच्या अंतर्मतीतील गुंता-गुंतीच्या भावना व विचारतरंग कुशलपणे रंगवायच्या सामर्थ्याचे सर्वोत्कृष्ट उदाहरण आहे.

इनीइडचे भव्य, दिव्य कथानक, त्यातील कथावस्तूला साजेशा महान् व्यक्ती व त्यात गुंफलेले तत्त्वचिंतन व माणुसकीचा आदेश यामुळे त्याला विश्वसाहित्यांत श्रेष्ठ स्थान प्राप्त झाले आहे. या श्रेष्ठत्वांत त्याच्या अर्थवाही, समर्थ, कलालंकृत भाषाशैलीचा सिंहाचा वाटा आहे. व्हर्जिल आपल्या काव्यावर पुन्हा पुन्हा हात फिरवून त्याला निर्दोष सुभगता आणीत असे. त्याने स्वतःच म्हटले आहे की "अस्वली ज्याप्रमाणे आपल्या नवजात पिल्लांना चाटून चाटून आकारास आणते, त्याप्रमाणे मी माझ्या काव्यपंक्ती पुन्हा पुन्हा घासून पुसून परिपूर्णत्वास नेतो." व्हर्जिलने योजलेले शब्द वेचक व अभिप्रेत आशयाला समर्पक अभिव्यक्ती देणारे असतात, तो भाषाप्रभू आहे. त्याची शैली प्रसंगानुरुप कधी वीरश्रीला स्फुरण देते तर कधी कारुण्यात भिजते; कधी भावनांची पकड घेते तर कधी शाश्वत सत्ये तत्त्वचिंतनात गुंफून विचारांना चालना देते. त्याच्या मूळ लॅटिन पद्यपंक्तीचे नादमाधुर्य तालबद्धता याची समीक्षकांनी तोंड भरून वाखाणणी केली आहे. टेनिसन या इंग्लिश कवीने व्हर्जिलच्या कलाविकासाला आपल्या एका कवितेत गौरवले आहे.

"......... thine ocean roll of rhythm sound for ever of Imperial Romes I salute thee .....

Wielder of the stateliest measure ever moulded by the lips of man"

स्थलांचे प्रसंगांचे, निसर्गाच्या विविधरूपांचे व मानवाच्या अंतरंगातील भावनांच्या इंद्रधनुष्याचे वर्णन करण्याची व्हर्जिलची शैली प्रभावी, सूक्ष्मदर्शी व कलावती आहे. मनाला मोहून टाकणारे वक्तृत्वकलेचे ( rhetoric ) गुण तिच्यात ओतप्रोत भरलेले आहेत. व्हॉल्टेमर व्हर्जिलला "वक्त्यांचा कवी" म्हणतो. प्राचीन

काली वक्तृत्वकलेला फार महत्व होते. महाकाव्याच्या भव्य आकारबंधाला व नवरसांनी नटलेल्या कथौघाला तर अशा शैलीची अत्यंत आवश्यकता असते. ते ते प्रसंग डोळ्यांपुढे हुबेहुब उभे करून भावनांची पकड घेणाऱ्या व बुद्धीला गुंतवून टाकणाऱ्या इनिइडमधल्या वर्णनांची पुढील काही उदाहरणे देतां येतील. ज्वाला भडकलेल्या पराभूत ट्रॉयमधील कोलाहल, इनीआसची पित्याला व पुत्राला घेऊन सुरक्षित निसटण्याची धडपड, त्याची पत्नीशीं झालेली ताटातूट, हेक्टरच्या व पत्नीच्या भूतात्म्यांचे दर्शन, समुद्रपर्यटनांतले वादळाचे थैमान व खवळलेल्या पंच–महाभूतांपुढे मानवाची अगतिकता, वाटेत लागलेल्या काही ज्ञात व काही अनोख्या भूप्रदेशांचे दर्शन, कार्थेजचे प्रथम दर्शन व बंदरातील शांत, प्रसन्न सागर, अधो लोकांतली दृश्ये, इटलीतील इव्हँडरच्या राजधानीतील स्थले, व्हीनस–दैवी तेजबल यांकित अद्भुतरम्यता–व इनीआस-पौरुषाचा साक्षात्कार घडविणारे देखणेपण-यांची भेट, डायडोची अखेर, ॲकायसिसचा मृत्यू, पॅलसचे अंत्यसंस्कार, युद्धातील आणिबाणीचे क्षण,–या साऱ्या वर्णनांतून व्हर्जिलच्या भाषाशैलीचे सामर्थ्य पूर्णांशाने प्रगट झाले आहे.

व्हर्जिलच्या उपमा उत्प्रेक्षा त्याच्या वर्णनात चैतन्य ओततात, निसर्ग व प्राणीजगत बालपणापासून त्याला परिचित होते. जलाशय, पर्वतराजी, रानेवने, हंस, करकोचे, रानडुकरे यांना, आपली वर्णने प्रत्ययकारी करण्यासाठी जणू तो साद घालतो. प्रचंड सैन्याच्या मोर्च्याची तुलना तो गंगा व नीलनदीच्या विस्तृत व वेगवान प्रवाहाशी करतो. कार्थेजमधले कामकरी मधमाशासारखे सतत कार्यरत असतात. कार्थेज सोडतांना सामानसुमान घेऊन ओळीने समुद्रतीरी जाणाऱ्या ट्रोजनांची तुलना, पावसाळ्याच्या आरंभी तोंडात धान्याचे कण घेऊन धावणाऱ्या मुंग्यांशी केली आहे. खडिता डायडोची, बेसावध असतांना घायाळ झालेल्या हरिणीशी व अधोलोकी ॲकेरॉनच्या कांठी शॅरोनच्या होडीभोवती जमा होणाऱ्या असंख्य भूतात्म्यांची रानांतली शरदारंभीची पानगळ व उष्ण प्रदेशांकडे थव्याने जाणाऱ्या पक्ष्यांशी तो तुलना करतो.

व्हर्जिलची युद्धातल्या हालचालींची वर्णने होमरइतकी वास्तवदर्शी नाहीत असे कांही समीक्षक म्हणतात. कुशल सेनापती नेपोलिअन व्हर्जिल वाचल्यावर म्हणाला होता, "इनीइडमधल्या सैन्याच्या व्यूह रचना व हालचाली भ्रामक व खुळचा आहेत." व्हर्जिलचे युद्धाचे ज्ञान, होमरसारखे स्वानुभवजन्य नव्हते हे खरेच, पण प्राचीन युद्धशास्त्रातले नसले तरी समकालीन युद्धाचे डावपेच त्याला

माहीत होते. नवव्या सर्गात रूटुलिअन योद्धे विशिष्ट सेनाव्यूह रचून इनीआसच्या शिबिरावर हल्ला करतात. ती सैन्याची रचना वास्तवदर्शी म्हणून प्रसिद्ध पावली आहे. अकराव्या सर्गातला इनीआसच्या सेनेचा लॉरेन्टसवर हल्ला 'Furing movement या नावानें अजूनही ओळखला जातो. मात्र व्हर्जिल होमरसारखा रणदुंदुभींच्या आवाजाने रोमांचित होत नाही व झुंज घेताना होणारा उन्मादक आनंद त्याला माहीत नाही. युद्धांतले कष्ट, दुःख, यातना या त्याच्या हृदयाची जास्त जोराने पकड घेतात.

इनीइडवर व्हर्जिल आणखी तीन वर्षे मेहनत घेऊन ते परिपूर्ण करणार होता. पण आपणास उपलब्ध असलेले इनीइडही त्यातील कलाविलासाने, कल्पकतेने, मानवांच्या सुखदुःखाशी समरस होणाऱ्या व्हर्जिलच्या सहृदयतेने व व्यक्तीगत अनुभूतीतून वैश्विक अनुभूती साकार करणाऱ्या त्याच्या प्रतिमेच्या भरारीने रसिकांचे मन जिंकून जाते.

इनिइड हा आज शतकानुशतके पश्चिम युरोपचा आवडता ग्रंथ होऊन राहिला आहे. होमरच्या खालोखाल श्रेष्ठ महाकवी म्हणून तो ओळखला जाऊ लागला. युरोपीय विद्वानांच्या व्यासंगात व्हर्जिलच्या लॅटिन काव्याचा अभ्यास हा एक अत्यंत महत्वाचा भाग मानला जाई. व्हर्जिलच्या मृत्यूनंतर इनिइड प्रसिद्ध झाले व त्याच्या कीर्तीच्या दुंदुभी पश्चिम युरोपभर गाजू लागल्या; कवी इनिइडचा आदर्श पुढे ठेऊन आपली महाकाव्ये रचू लागले. मँटुआ ही व्हर्जिलची निवासभूमी कलादेवतांचे माहेरघर मानली जाऊ लागली. त्याच्या काव्यावर समीक्षा प्रबंध लिहिले जाऊं लागले. मध्ययुगातही त्याच्या काव्याचा दबदबा कायमच राहिला. पंधराव्या शतकांत इटलीत पांडित्याच्या पुनरुज्जीवनाची ( Renaisance) लाट आली व ती पश्चिम युरोपभर पसरली. तेव्हां ग्रीक व लॅटिनमधील अभिजात वाङ्मयाचा अभ्यास अधिकच जोराने सुरु झाला. नाना भाषांत इनिइडची भाषांतरे झाली व त्यांनी अनेक कवींना स्फूर्ती दिली. डांटे या इटॅलियन महाकवीने आपल्या साहित्यस्फूर्त " द डिव्हाइन कॉमेडी " या महाकाव्यात व्हर्जिलला उद्देशून उद्गार काढले आहेत –

"ज्या शैलीने मला सन्मान मिळवून दिला ती मी तुझ्यापासून घेतली. तू माझा गुरु आहेस."

इनिइड हे श्रेष्ठ साहित्यस्फूर्त तसेच आद्य राष्ट्रीय महाकाव्य आहे. इटलीतील भूमी, भूमीपुत्र, राष्ट्रपुरुष यांची यशोगीते जाऊन, रोमची संस्कृती व विचारधन याना त्याने अमरत्व प्राप्त करून दिले आहे. शिवाय ही फक्त इनीआसची किंवा रोमन वंशाची उत्कर्षकथा नसून हा अखिल मानवजातीच्या प्रगतीचा आलेख आहे. मानववंश दैवी संकेतानुरुप यातनांतून, नैराश्यातून, परिश्रमांतून अखेरीस कैवल्याला कवटाळणार आहे. हा दिव्य संदेश व्हर्जिलने "इनिइडच्याद्वारा सर्व जगाला दिला आहे व म्हणूनच या महाकाव्याला केवळ लॅटिन साहित्यातच नव्हे तर जगाच्या साहित्यांत मानाचे अढळ स्थान प्राप्त झाले आहे.

सौ. कमलाबाई टिळक

दिनांक १० जुलै १९७८.

# परिचय

व्हर्जिलचे इनिइड हे महाकाव्य मूर्तिपूजक आणि क्रिश्चन युगांच्या मधील प्रवेशद्वार आहे. व्हर्जिलच्या (जन्म क्रि. पू. ७० मृत्यू क्रि. पू. १९) मृत्यूच्या वेळी हे काव्य अपूर्ण होते. ही घटना प्राचीन रोमच्या लोकसत्ताकाकडून सम्राटाच्या हाती सत्तेचे स्थलांतर झाल्यानतर आठ वर्षांनी आणि क्रिश्चन युगाच्या आरंभाच्या काही वर्षांपूर्वीची आहे. व्हर्जिल त्या प्रवेशद्वाराचा कवी आहे.

प्रारंभी रोम ही शत्रूंनी वेढलेली एक लहान वसाहत होती. आणि जीव धरून राहण्यासाठीही तिला स्वाभिमानी, शिस्तबद्ध आणि अदम्य इच्छाशक्तीची सातत्याने आवश्यकता होती. रोम टिकून राहिले आणि लागोपाठ मिळविलेल्या कष्टसाध्य विजयांनी ते जागतिक सत्तेप्रत पोहोचले.

प्रारंभीचा इतिहास अस्पष्ट आहे. परंतु हे घडण्यास बहुतांशी अविरत युद्ध–प्रसंगांची किमान पाच शतके लागली असावीत असे दिसते, आणि त्या काळात रोमनांनी सकृद्दर्शनी त्यांच्या ठायीच्या असामान्य गुणाबरोबरच त्यांच्या वाट्यास आलेल्या विशेष दैवी कृपेचा त्यांचा भाग आणि त्यांचे थोर भाग्य यांच्या सहाय्याने अनन्यसाधारण यश संपादन केले रोमचा नेत्रदीपक उदय हा एक आश्चर्याचा आणि विशेषत: पुढे लोकसत्ताकाच्या उत्तर कालखंडात जेव्हा शांतता आणि समृद्धीच्या नवीन संधीमुळे आणि नास्तिकत्वाच्या नव्या उदयाने राजनिष्ठा, सच्छीलता आणि आत्मत्याग हे परंपरागत स्वभावविशेष धिक्कारले जात होते त्या काळी स्वत: रोमनांनाही तो एका विशिष्ट भक्तिचा विषय होता लोकांनी त्या काळी आपल्या पूर्वीच्या मौलिक, नैतिक वारश्याकडे वळून पाहण्यास सुरवात, केली. आणि त्यांना रोमच्या कुळकथेत आणि जीवनदायी आणि काव्यात्मकदृष्ट्या सत्य असलेल्या रोमनकल्पित पुराणकथेत अधिकाधिक रस वाटू लागला. प्राचीन रोमची वीरता, जिच्यामुळे फार पूर्वीचे प्रजासत्ताक निर्माण होऊ शकले होते आणि जगू शकले होते ती सश्रद्ध आणि उदात्त निष्ठा क्रिश्चन सेवाधर्माला अर्पण करण्यापूर्वी नष्ट झाली नाही. व्हर्जिल हा त्या मानवी अनुभूतीतील भव्य अवस्थेचा सर्वश्रेष्ठ कवी होता. त्याने त्या अवस्थेचे सार काढून ती संक्षिप्तपणे शब्दांकित केली. आणि निर्मितीच्या किमयेने त्याने सर्व आगामी युगे एका नव्या प्रकाशाने तेजोमय केली.

व्हर्जिलच्या जीवनाविषयी काही माहिती उपलब्ध आहे. पण तिचे प्रमाण फार मोठे नाही. त्याचे पूर्ण नाव पब्लिअस व्हर्जिलिअस मॅरो असे होते. त्याचा जन्म त्या काळी उत्तर इटली ज्या नावाने ओळखले जात असे त्या सिसॅल्पाईन गॉल मधील मॅन्टुआ जवळ झाला. त्याच्या वडिलांची तेथें शेतवाडी होती. बाल व्हर्जिलला फारच चांगले शिक्षण मिळाले होते, आणि ते पूर्ण करण्याकरिता तो रोमला गेला. विज्ञानासहित सर्वविषयांमध्ये त्याला स्वारस्य असावे असे दिसते. जरी त्याने लवकरच महत्वाच्या अनेक रोमन व्यक्तिशी स्नेह संपादन केला होता, आणि त्यामधे पुढे पहिला सम्राट ऑगस्टस झालेल्या तरुण ऑक्टेव्हिअसचा समावेश असण्याचा संभव आहे, तरी रोमपासून दूर, शांत जीवनच त्याने पसंत केले. तो अति संकोची वृत्तीचा होता आणि त्याची प्रकृती नेहमीच तोळामासा असे. तो लवकरच नेपल्स येथे रहावयास गेला, आणि तिथेच त्याने आपले बहुतेक जीवन लेखन वाचनात व्यतीत केले. क्रि. पू. १९ साली तो ऑगस्टस बरोबर ग्रीसच्या प्रवासाला निघाला, परंतु तो अतिशय आजारी पडला आणि त्याला परत यावे लागले. ब्रिंडिसी येथे त्याला मृत्यू आला. मृत्यूपूर्वी त्याने आपल्या मित्रांना 'ईनिड' जाळून टाकण्यास सांगितले, परंतु आपला निर्णय बदलण्यास त्यास प्रवृत्त केले गेले असावे असे दिसते, आणि व्हेरिअस आणि टचूका यांना ते संपादित करण्यास आणि प्रसिद्ध करण्यास त्याने अनुमती दिली.

ते दोघेही तरुण असताना सम्राट ऑगस्टसने व्हर्जिलच्या कल्पनाशक्तीची पकड घेतली होती. रोमनविश्वाला तो शांतता आणि सुव्यवस्था प्राप्त करून देईल हे व्हर्जिलला दूरदृष्टीने उमगले असावे असे दिसते आणि ऑगस्टसने खरोखरच या दोन्ही गोष्टी रोमला दिल्या. रोमच्या श्रेष्ठत्वाच्या आणि इटलीच्या वैभवाच्या पुनरुत्थापनावर व्हर्जिलचा उत्कट विश्वास होता, आणि ऑगस्टस आणि त्याचा प्रधानमंत्री मिसिनस यांचे धोरणही तसेच होते. हे उभयता व्हर्जिलचे आश्रयदाते होते व त्याच्या इच्छानुरुपच तो आपली काव्यरचना करी. परंतु ऑगस्टस कधी कधी कठोर मार्गाचा अवलंब करी; त्याबद्दल व्हर्जिल त्याला क्षमा करू शकला नाही; आणि विशेष म्हणजे नंतरच्या आपल्या काव्यात काही ठिकाणी त्याने ऑगस्टसवर संदिग्धरित्या टीकाही केली वाढत्या वयाबरोबर अधिक मवाळ होत गेलेल्या ऑगस्टसला सुधारण्याकरिता व्हर्जिलच्या आणि त्याचा मित्र, थोर ललित कवी होरेसच्या प्रभावाचे खरेच सहाय्य झाले असण्याचीही शक्यता आहे.

व्हर्जिलने तीन वाङमयीन काव्यकृती मागे ठेवल्या. काही लहान कविताही त्याच्या नावावर आहेत. परंतु दोन अगदी छोटया परंतु सुंदर कविता सोडल्या तर बाकीच्या निदान सध्याच्या स्वरूपात आहेत तशा तरी, त्याने लिहिल्या असाव्यात असे आता सामान्यतः मानले जात नाही.

निश्चितपणे त्याने लिहिलेल्या त्या तीन कवितांपैकी पहिली ही 'ग्राम-गीतांचा' संग्रह आहे, या काव्य प्रकारालाच 'ब्युकॉलिक्स' ( Bucolics ) किंवा 'एक्लोग्ज' ( Eclogues ) असेही म्हणतात. या दहा लहान कविता असून कवीने प्रतिपादिल्याप्रमाणे त्या काल्पनिक मेंढपाळ आणि इतर ग्रामजनांविषयीच्या काल्पनिक कथा आहेत असे भासते; परंतु कधी कधी खऱ्याखुऱ्या व्यक्तींचाही उल्लेख त्यांच्यामधून आढळतो, त्यांतील काही व्यक्ती समकालीन आहेत; शिवाय अतिशय गोंधळवून टाकणाऱ्या रूपकांद्वारा काही सत्य घटनांचे सूचक उल्लेखही केले आहेत. हे काव्य रम्य विचार आणि चित्रप्रतिमांनी ओतप्रोत भरलेले असून त्यातील लॅटिन भाषेचे नादमाधुर्य केवळ वर्णनातीत आहे आणि त्याच्या अंतरंगात सखोल जाण आहे.

दुसरी कविता आहे 'जॉर्जिक्स' या नावाचे शेतवाडी काव्य. या कवितेच्या चार खंडात शेतकऱ्यांना पिके, झाडे आणि पशुधनाविषयी, विशेषतः मधमाशां-विषयीं माहिती आणि सल्ला दिला आहे; परंतु तो काव्यात्मक भावना आणि छटा यांच्या, पुष्कळ ठिकाणी विलोभनीय आणि कुठे कुठे तर उदात्त अवगुंठनात दिला आहे.

'ईनिइड' ही व्हर्जिलच्या कवितांतील तिसरी आणि शेवटची सर्वात दीर्घ कविता आहे. परपरारूढ कथांवर आधारलेल्या या कवितेत खुद्द रोमची प्रस्थापना होण्याच्या फार पूर्वीपासूनची रोमन राष्ट्राची काल्पनिक कुळकथा आहे.

ते एक महाकाव्य आहे. महाकाव्य हा काव्यातील एक विशाल प्रांत आहे. त्याचा प्रारंभ चार हजार वर्षांपूर्वी बॅबिलोनच्या गिलगॅमेशया महाकाव्यापासून आणि पुढे एक हजार वर्षानंतर होमरच्या 'इलिअड' आणि 'ओडिसि' या महाकाव्यापासून झाला आहे; आणि अन्य काळात आणि अन्य स्थळातही, विशेषतः आशिया आणि युरोपमध्ये त्याचा आविष्कार घडला आहे. महाकाव्याची व्याख्या करणे अवघड आहे. परंतु कदाचित् असे म्हणणे युक्त होईल की महाकाव्य ही एक आख्यानात्मक

दीर्घ कविता असते; तिच्यात विपुल घटना असतात. ती मानवी जीवनाविषयी असते आणि मानवी आणि अतिमानवी शक्ती यांच्यातील संबंधाविषयी विचार करावयास लावते; तिच्यातील मुख्य पात्रे ' वीरपुरुष ' (उदात्त नायक) असतात; म्हणजेच ती माणसे कोणत्यातरी प्रकारे सामान्य जनांहून अधिक सामर्थ्यशाली असतात, परंतु दैवी सामर्थ्याच्या खालच्या पातळीवर असतात. महाकाव्ये एकतर " मौख्य " कविता असतात. जे लोक लेखनकलेला अजून पुरते सरावले नव्हते अशा लोकांनी त्या रचलेल्या असतात; किंवा संस्कृतीच्या प्रगत अवस्थेत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे ' मौख्य ' काव्याच्या जुन्या परंपरेतून विकसित झालेल्या लिखित कविता असतात.

महाकाव्य जसे असावे तशीच ' ईनिइड ' ही अत्यंत प्रभावीपणे कथन केलेली, विविध घटनांनी परिपूर्ण अशी एक चित्तवेधक कथा आहे, कथा म्हणूनही अवांतर विचार लक्षांत न घेता ती वाचता येईल. परंतु कथेशिवाय आणखीही काहीतरी तिच्यात आहे. ती लाक्षणिक, आणि एका अर्थाने रूपकात्मक आशय असलेले चलत्‌चित्रही आहे.

परंपरेने रूढ झालेल्या कथांनुसार काही रोमनांचा वांशिक संबंध होमरच्या काव्याने सुविदित झालेल्या ट्रॉय नगरीच्या ट्रोजनांपर्यंत पोहोचू शकत होता. असे म्हणतात की ट्रॉयचे पतन झाल्यानंतर ट्रोजन राजपुत्र इनिआस तेथून निसटला व त्याने इतर ट्रोजनांसह समुद्रावरून इटलीच्या पश्चिम किनाऱ्याकडे प्रयाण केले. तिथे तो व त्याचे सहकारी स्थाईक झाले आणि कालांतराने त्यांच्या वंशजांनी प्राचीन रोमचा प्रथम पाया घातला किंवा त्याच्या पायाभरणीस सहाय्य केले. व्हर्जिलने ही परंपरारूढ कथा पुन्हा विस्ताराने व कलात्मकतेने वर्णिली व तद्‌द्वारा आपल्या कल्पनाचक्षूपुढे उभे असलेले प्राचीन रोमचे भव्यदिव्य चित्र शब्दसृष्टींत साकार केले.

' ईनिइड ' मधे आपण जेव्हा ट्रॉय सर करून त्याला नामशेष करणाऱ्या ग्रीकांविषयी वाचतो तेव्हा या अंतिम सर्वनाशातून कुणीही ट्रोजन वाचू शकेल असे वाटत नाही. अवशिष्ट ट्रोजनांच्या नव्या नियतीचा आरंभ अशा दारुण निराशेतून होतो; आणि नंतरही ते आपला दुर्धर, साहसी मार्ग आक्रमीत असताना काहीवेळा घोर निराशेने ग्रासले जातात. तरीही भगिरथ प्रयत्नांनी आणि असीम सहन-शीलतेने त्यांनी परिस्थितीवर मात केली, आणि त्यामुळेच रोमचे भविष्यकालीन

अधिराज्य व वैभव शक्यसृष्टीत आले. ट्रोजनांना यश प्राप्त झाले ते त्यांच्या स्वतःच्या सामर्थ्यापेक्षा दैवी सहाय्य आणि दैवी प्रोत्साहनामुळेच झाले. समग्र कथाच दैवी साक्षात्कार आणि धमकावण्या, आज्ञा आणि उपदेश, स्पष्टीकरणे, आणि काही वेळा देवाचे प्रत्यक्ष सहाय्य यांच्या मालिकामधून गुंफलेली आहे.

ट्रोजनांचा नेता इनीआस हा प्रीतीदेवता व्हीनसचा आणि मानवी पिता अँकायसीस यांचा पुत्र होता असा समज होता. व्हीनस इनीआसचे रक्षण करी. परंतु देवांची सम्राज्ञी आणि देवाधिदेव ज्युपिटरची पत्नी जूनो ही ट्रॉयची शत्रू होती आणि तिने इनीआसला भयंकर विरोध केला. ज्युपिटरला अर्थातच या प्रश्नाच्या दोन्ही बाजूंचा विचार करणे आवश्यक होते; म्हणून त्याने आणि नियतीदेवतेने एक होऊन ट्रोजनांना सहाय्य केले आणि त्यांचे यश निश्चित केले. एखाद्या व्यक्तीवर किंवा बाजूवर कृपा व दुसऱ्याला विरोध करून इतर देव आणि देवतांही अशा रीतीने यामध्ये गुंतल्या होत्या. या कवितेत हे देव आणि देवता मर्त्य माणसांशी प्रत्यक्ष किंवा स्वप्नातून, दृष्टांतातून, शकुनांच्या सहाय्याने आणि द्रष्टयांच्या आणि भविष्यज्ञात्यांच्या भाषिताद्वारा संपर्क साधतात. या भूलोकावरील व्यवहार अन्यलोकातील शक्तींच्या आधीन असतात. याविषयी व्हर्जिलला शंका नव्हती. हे अन्य जग सर्वसाधारणपणे, परंतु निश्चितच नेहमी नव्हे, अदृश्य असले तरी त्यामुळे मिथ्या मात्र मुळीच ठरत नाही. या कवितेच्या मध्यावर त्याने आपल्या या श्रद्धेच्या एका भागाचे स्पष्टीकरण समाविष्ट केले आहे.

ही श्रद्धा या कवितेच्या धारणेला अत्यंत आवश्यक आहे. कारण मानवी व्यवहार मानवी आणि अतिमानवी गुणांनी आणि कृतींनी कसे नियंत्रित केले जातात आणि विशेषतः, दौर्बल्य आणि नैराश्य या प्रारंभीच्या प्रवृत्तीतून शेवटी श्रेष्ठ सार्वभौमत्व रोमने कसे प्राप्त केले हे दाखवून व्हर्जिल वस्तुतः या जगाचे खरेखुरे काव्यात्मक रूप रेखाटीत होता. इनीआस स्वतः अनेक वेळा आशा सोडून द्यायला सिद्ध झालेला आहे; पण प्रत्येक वेळी त्याला कुठूनतरी आश्वासन मिळते; आणि त्याचे कोणतेही दोष असले तरी–आणि तसे त्याच्यात अनेक दोष होते, ईश्वरी आवाजाकडे तो कधीही दुर्लक्ष करीत नसे.

जगात घटना कशा घडतात याचे दर्शन 'ईनिइड' घडविते. प्रथमदर्शनी यातील काही गोष्टी चमत्कारिक वाटतात. परंतु थोड्या विचारांती यातील प्रत्येक गोष्ट जीवनाशी प्रामाणिक आहे असे वाटणे संभवनीय आहे. आपण स्वतःच

आपली अनुमाने काढायची असतात. परंतु तो काढीत असताना, प्रत्यक्ष प्रतिपादन केलेली किंवा लादलेली नव्हे, तर प्रसंगातून आणि कृतींच्या परिणतीतून सहजरीत्या प्रकट होणारी काही महत्वाची नैतिक मूल्ये आढळतात. उदाहरणार्थ आचरण संबंधीच्या दोन दंडकांचा 'ईनिइड' सातत्याने आणि समर्थपणे पाठपुरावा करीता असते. एक मुख्यत: ग्रीक पिंडांचा 'अतिरेक टाळा' आणि दुसरा मुख्यत: रोमन आहे. 'निष्टावंत रहा' म्हणजेच देवांशी, मातृभूमीशी, आणि कुटुंबाशी, आणि आश्रितांशी व मित्रांशी एकनिष्ठ रहा. व्हर्जिल इनीआसला नेहमी 'सत्यशील निष्ठावंत इनीआस' असे संबोधितो; आणि व्हर्जिलने अविचारी अतिरेक व्यक्तीला सर्वनाशाप्रत कसा नेतो याची अनेक उदाहरणे दिली आहेत. एखादी वस्तू किंवा व्यक्ती यावरील सर्वंकष प्रेमाने वाहवत जाऊन माणूस अमर्याद प्रेमाचा कसा अतिरेक करतो यावर त्याने विशेष भर दिला आहे. सागरावरील वादळानंतर ट्रोजन वीर जेव्हा उत्तर–आफ्रिकेतील कार्थेजच्या किनाऱ्याला येतात तेव्हा ईनीआस आणि कार्थेजची राणी डायडो परस्परांच्या प्रेमात पडतात आणि ज्या नियती–नुसार त्याला पुढे इटलीस जाणे कर्मप्राप्त होते, त्या नियतीकडे पाठ फिरवून ते एकत्र राहण्याचे ठरवितात. कथेच्या या भागात व्हर्जिल 'इनीआसला सत्यशील' असे विशेषणही लावीत नाही. कालवशात् स्वर्गातून यथोचित कानउघाडणी झाल्या नंतर आज्ञाधारकपणे इनीआस समुद्रप्रवासाला निघतो. या विश्वासघाताने प्रक्षुब्ध होऊन डायडो त्याला शाप देऊन आत्मघात करते. तिच्या शापाच्या परिणामी रोम आणि कार्थेजमध्ये जवळ जवळ सातत्याने शंभर वर्षाचे घोर वैर निर्माण झाले. आणि ईनीइडच्या शेवटी आपला मित्र पॅलस याच्या मृत्यूचा सूड घेण्याकरिता इनिआसने पराभूत शत्रू टर्नसला खुनशीपणाने ठार मारले. ज्या मित्राचे रक्षण करण्यात तो अयशस्वी झाला होता त्याच्या स्मृतीने इतर सर्व विचार त्याने मनातून हद्दपार केले. या अप्रस्तुत क्रौर्याने त्याने आपला विजय कलंकित केला नसता तर इटलीचा पुढचा इतिहास कदाचित कमी रक्तलांछित आणि कमी कटु झाला असता की काय असे वाटू लागते.

बहुतेक श्रेष्ठ काव्ये दुष्टपणा, हिंसकता आणि भेसूरता यांच्याशी संबंधित असतात. परंतु अनेक वेळा, निदान सुसंस्कृत समाजात, याच प्रकारच्या काव्यातील समग्र प्रवृत्ती वस्तुत: शांततामय सद्गुण, मानवता, आणि समन्वय यांच्याकडेच कललेली असते. व्हर्जिलच्या काव्यात ही प्रवृत्ती प्रकर्षाने आहे. फार थोडे कवी व्हर्जिल इतके हळुवार आणि सहानुभूतीशील असतील, आणि त्याच्या बाबतीत तर समन्वय आणि सुसंवादित यांच्या कल्पना त्याचे मन सर्वस्वी व्यापून राहिलेल्या

आहेत. आणि व्हर्जिलच्या मते शूर वीरश्रेष्ठांनी समरांगणावर दाखविलेले शौर्य तेवढेच काहीं धीरोदात्त कृतीत गणले जात नाही, आणि केवळ त्यांच्या धैर्यावर व निर्धारावरच काही महत्वाची भवितव्ये अवलंबून नसतात

नियतीने नियुक्त केलेला राजा म्हणून इनीआसने इटलीचे राज्य जिकायचे आहे आणि स्वर्गस्थ देवदेवता त्याला मार्गदर्शन आणि सहाय्य करणार असतात. त्याची माता व्हीनस त्याला अग्नी आणि लोहकामाचा देव व्हल्कन,–ज्याच्यासाठी राक्षस व ज्वालामुखी एटना पर्वताची शक्ती राबत असते– याने खास त्याच्याकरिता घडविलेली शस्त्रे व चिलखत देते. व्हर्जिल आपले बरेचसे प्रभावी, चातुर्य, आपल्या उपमांतून व्यक्त करतो. या सर्व मानवी व दैवी स्वभाव–गुण आणि कृतींच्या बरेचवेळा, परतु नेहमीच नव्हे, प्राण्यांच्या बरोबर किंवा निसर्गातील प्रचंड शक्तींबरोबर केलेल्या छोटया तुलना आहेत. व्हर्जिलच्या सर्वच उपमांचा काळजीपूर्वक अभ्यास करणे आणि त्यांची परस्परांशी तुलना करणे उपयुक्त ठरणार आहे. व्हल्कन जेव्हा इनीआसकरिता शस्त्रे घडविण्याकरिता आपल्या शय्येवरून ताडकन् उठतो तेव्हा व्हर्जिल त्याच्या करिता एक उपमा योजतो व्हल्कनच्या तत्परतेची तुलना तो, आपल्या मुलांचे भरण पोषण करण्याकरिता आणि कुटुंब एकसंध राखण्याकरिता रात्रभर मागावर विणत बसणाऱ्या झोपडीतील एखाद्या गरीब मातेच्या निष्ठावंत इच्छाशक्तीशी करतो. एखाद्या सामान्य गृहिणीच्या धैर्यशाली निष्ठेहून आणि निश्चयी इच्छाशक्तीहून दुसरी कोणतीही गोष्ट श्रेष्ठ नाही; अगदी साम्राज्यांवर वर्चस्व गाजवणारी व त्यांची उलथा पालथ करणारी प्रचंड शक्ती ताब्यात असणाऱ्या महाभूतांच्या शक्तींचा दारूण निर्धार सुद्धा–असेच जणु व्हर्जिल म्हणून गेला आहे.

व्हर्जिलचे काव्य या प्रकारे मनावर परिणाम करीत जाते. कथेच्या वेधकतेत व्यत्यय न आणता मधून मधून सारख्या सूक्ष्म अर्थछटा पेरलेल्या असतात. त्या नजरेतून सहज सुटतातही; पण त्यांचे मर्म लक्षात घेतले तर मिळणारा आनंद अवर्णनीय असतो. अनपेक्षितपणे, एकाएकी, व्हर्जिलच्या काव्यातील एखादा खोल आशय हळुवारपणे उकलत असताना पाहणे म्हणजे एखाद्या सौंदर्यवस्तूच्या अनुभूती इतक्याच भावपूर्ण आणि उत्कट अशा कलात्मक आनंदाचा लाभ होण्या–सारखे आहे. आणि या बहुतेक अनुभवांचा आस्वाद जे उघड आहे, त्याकडे दुर्लक्ष न करता कथेचे केवळ वाचन केल्यानेही घेता येतो. कदाचित येवढयावरही समाधान मानणे योग्य होईल. किंवा कदाचित व्हर्जिलच्या रचनापद्धतीचे अवलोकन

करून तो काव्य कसे करीत असे हे पाहणे हे केवळ व्हर्जिलला अधिक योग्य न्याय देण्यापुरतेच नव्हे तर त्याच्या वाचकांनाही लाभदायक ठरणार आहे. ईनिइडची निर्मिती अत्यंत प्रभावी प्रतिभा आणि अनंत श्रम यांतूनच घडली आहे.

व्हर्जिलच्या कार्यपद्धतीचे एक चांगले व प्रत्ययवादी उदाहरण प्रारंभीच्या एका प्रसंगात आहे. या प्रसंगात व्हीनस इनीआसला सुंदर परंतु पापिणी असलेल्या हेलेनचा वध करण्यापासून परावृत्त करते. दुर्दैवाच्या अंतिम बिंदूवर इनीआस असताना त्याचे नगर ट्रॉय पादाक्रांत होऊन अग्नीमुखी पडले असताना, या सर्व अनर्थाचे मूळ असलेल्या स्त्रीला शासन करण्याचे समाधान मिळविण्याहून इनीआसला दुसरे काहीही करण्यासारखे उरले नसताना व्हीनस अचानकपणे प्रकट होते आणि त्याला ' क्रोधिष्ट न होता, चांगल्या गोष्टींचा विचार करावा, वाईट गोष्टींचा करू नये आणि व्यवहारी व्हावे ' असे सांगते.

व्हर्जिलला ज्ञात असलेल्या ट्रॉयच्या पाडावाच्या दुय्यम प्रतीच्या एका ग्रीक वृत्तांतानुसार हेलेन सापडली आणि तिचा वध करण्याची इच्छा झाली ती इनी–आसला नव्हे परंतु मेनेलॉसला. मेनेलॉस हा एक ग्रीक राजा होता आणि हेलेनचा तो पूर्वपति होता; तो त्याच्यापासून पळून आली होती. तो त्याला परत प्राप्त करून देण्याकरिताच ग्रीकांनी युद्ध केले. परंतु ती त्याला जेव्हा शेवटी सापडली तेव्हा तो इतका संतापलेला होता की तो तिचा वध करणार होता. व्हीनस अगदी वेळेवर मेनेलॉस पुढे प्रकट झाली आणि तिने त्याला जाणवून दिले की अजूनही हेलेन ही एक चांगली भार्या होऊ शकेल, आणि तिचा वध करणे म्हणजे मुर्खपणाने एक सुंदर वस्तू केवळ व्यर्थ दवडणे ठरेल. मग मेनेलॉसने हेलेनला जीवदान दिले. या पूर्वीच्या वृत्तांतातील ही घटना आपल्यापरीने वेधक आहे आणि गमतीदार वाटण्यासारखी आहे; ती एका अगदी साध्या सरळ कथेतील एक समाधानकारक भाग आहे असे मानण्यासही प्रत्यवाय नाही. परंतु तिला तसा खोल आशय आणि उदात्तताही नाही. मेनेलॉस स्वाभाविकपणेच चिडलेला आहे परंतु त्याच्यात उच्च स्तरावरची शोकात्मक भावनोत्कटता नाही. सबंध दहा वर्षांच्या युद्धात हेलेन करिता झुंजायचे आणि शेवटी तिला परत घेऊन जायचे नाही हा मूर्खपणाच झाला असता. व्हीनसने मेनेलॉसच्या स्वार्थपरायणतेला आवाहन केले ती प्रीतीदेवता असल्यामुळे आणि सौंदर्यवती हेलनवर तिची नित्य कृपादृष्टी असल्यामुळे तिने तसे करणे तिचे कर्तव्यच होते. परंतु या प्रकारात कुठेही प्रभावी प्रेरणा नाही व कुठेही सूचक उच्च कार्यशक्ती नाही आणि वाचकास विचार करावयास लावणारी एकही गोष्ट नाही.

असाधारण प्रतिभा वेगळ्या प्रकारे आविष्कृत होते. इथे व्हर्जिलला काही अधिक करावे लागले नाही. केवळ एकदोन कुंचल्याचे स्पर्श पुरेसे होते. मेनिलॉअसच्या ऐवजी त्याने इनीआस आणला. परंतु परिणाम मात्र विलक्षण आहे. तो सर्व प्रसंगच उदात्त श्रेणीला पोचतो. हेलेनचा वध करण्याला इनीआसला अत्यंत समर्थनीय कारण आहे. केवळ स्वार्थ हा त्याचा हेतू नाही. हे नाटय अत्यंत उत्कट आहे. व्हीनस कुणी केवळ बेजबाबदार प्रीतीदेवता नसून त्याची साक्षात् माता आहे. तिच्या उपदेशातील एक गाढ नैतिक सखोलता व एक आगळी व्यापकता क्रिश्चन मतप्रणालीशी सदृश आहेत. ट्रॉयचे पतन देवांच्या प्रकोपामुळे झाले असल्यामुळे कुणाही मानवाला दोषी ठरवू नकोस असे ती इनीआसला सांगते, आणि इथे व्हर्जिलला एका जुन्या कवितेतील एक ओळ मिळाली. 'दोषी हेलन नाही परंतु पॅरिस आहे' त्याने केवळ 'परंतु' बदलून 'किंवा' घातले; आणि लिहिले 'पॅरिस किंवा हेलन कुणीच दोषी नाही.' आणि सर्व द्वेष आणि सूडाची भावना यांच्याविरुद्ध आपला विरोध हळूवारपणे नोंदविला. या अशा सूक्ष्ममर्मग्राही मार्गांनी व्हर्जिलने आपल्या कथेत चेतना ओतली आणि विशेषतः तिच्यातील नाजूक, कोमल क्षणात, तत्पावेतो काव्याला अपरिचित असलेला गाढ आशयाचा तेजोरस ओतला. हा आशय अंतिम सत्याच्या पुष्कळच जवळ जाऊन पोहोचला होता. इतकी समीपता व्हर्जिल पूर्वीच्या कोणत्याही कवीला साधली नव्हती.

व्हर्जिलची प्रतिभा नेहमी अशाच प्रकारे कार्य करीत असे. समग्र ईनिइडमध्य अशाच परस्परांशी संबंधित असलेल्या अंतर्दृष्टीच्या दिव्य साक्षात्कारांनी गुंफलेली सुसंबद्ध पद्धती दिसते. दृष्टातून अदृष्ट व्यक्त करण्याचे सामर्थ्य श्रेष्ठ कवींच्या प्रतिभेत असते; आणि त्यांनी जर स्वतःच्या आणि इतरांच्या जीवनाच्या निरीक्षणांचा विपुल संचय केला आणि नंतर प्रचंड दबावाखाली त्याचा संकोच केला तर परिमित शब्दांनाही सूचकतेचे आणि समर्थ अनुनयाचे श्रेष्ठ सामर्थ्य प्राप्त होते आणि अदृष्टाची अभिव्यक्ती ते अधिक प्रभावीपणे करू शकतात. निःसंशय ते नेहमीच जेवढे अत्यंत महत्वाचे असते तेवढेच नेमके अचुकपणे वेचतात. परिणामी केवळ सामान्य घटनांचे कथन करण्यास समर्थ असलेलीच नव्हे तर त्यांच्या मागील सर्वव्यापी सत्य प्रकट करण्यास समर्थ असलेली अशी रुपकात्मक आणि लाक्षणिक भाषाशैली सिद्ध होते.

असे श्रेष्ठ कवी कालाची सीमा उल्लंघून भूतपूर्व जीवनातही प्रवेश करतात आणि अशा जगाचे दर्शन घडवितात की जे एका माणसाचे किंवा माणसांच्या एक

पिढीचे जग नसते तर मागच्या एका मागून एक येणाऱ्या अनेक पिढ्यांचे जग असते. किंबहुना ते एका समग्र संस्कृतीचेही दर्शन असते. जी अनुभुती सार–रुपाने साकार होते ती कदाचित अनेक शतकांची अनुभूती असेल; आणि एकाच प्रतिभाशाली कवीने एकाच काव्यात्मक आविष्कारात तिचा संकोच आणि केन्द्रीकरण केलेले असेल. ' ईनिइड ' मध्ये व्हर्जिलने ग्रीक आणि रोमन अनुभूतींचा असाच संकोच आणि केन्द्रीकरण केले आहे.

हे साध्य करण्याकरिता व्हर्जिलला असंख्य ग्रंथांचे वाचन आणि मनन करावे लागले, आणि त्याला स्वतःची शब्दरचना, त्याचप्रमाणे स्वतःच्या विचारांचे स्वरूप या वाचनमननांतून प्रादुर्भूत होईल अशी योजना करावी लागली. त्याची कार्यपद्धति ही अशी होती. त्यामुळे त्याला वर्तमान कालातील आणि भूतकालातील अनेक लोकांशी विशेषतः प्राचीन कवींशी संपर्क साधता आला, आणि या काव्याच्या रचना कालात सातत्याने तो त्यांच्याशी स्नेहसंबंध प्रस्थापित करीत राहिला. व्हर्जिलने हे इतक्या यशस्वीपणे साधले की त्याने बहुविध विषयांवर एकदमच काव्यरचना केली असे म्हणतात. तो एका आदर्श काव्यसृष्टीत जगला आणि आपला तेथील पूर्वीच्या काव्यांशी असलेला संबंध तुटू न देता त्याने या सृष्टीतून नवनवी उच्च शिखरे गाठण्याचा मार्ग शोधून काढला, असे म्हणणे अधिक सत्याला धरुन होईल. व्हर्जिलने पूर्वीच्या अगणित काव्यात्मक विचारांच्या संकलनातून निर्मिलेल्या या काव्य विचारविश्वाची पुनर्रचना केली आणि ते नव्याने सुसूत्र केले. अशा तऱ्हेने त्याने लाक्षणिक आणि अंशतः प्रतीकात्मक अशा बाह्यदृष्यांमागील सत्य विश्वाविषयी त्याला जे कथन करायचे होते ते यथायोग्य कथन करणाऱ्या भाषेची निर्मिती केली.

खलजनांसहित सर्व विविध प्रकारच्या लोकांच्या सर्व दृष्टीकोनांविषयी व्हर्जिलला सहानुकंपना व सहानुभाव होता. प्रश्नाची एकच बाजू मांडण्यात त्याला समाधान नव्हते. जेव्हा सत्यच विरोधात्मक किंवा अतार्किकही भासत असे आणि जेव्हा त्याच्याशिवाय दुसरे कुणीही त्याच्या तळातील आशय स्पष्ट करणे शक्य नव्हते तेव्हा लोकांविषयीचे किंवा वस्तूंविषयीचे सत्य सांगणे त्याला आवश्यक वाटे त्याच्या विस्तृत वाचनावर आधारलेली त्याची विपुलसंदर्भात्मक पद्धती संपूर्ण सत्य – म्हणजेच ' कलेतील सत्य ' – ' वास्तवातील क्षुद्र सत्य नव्हे– ' कथन करण्यास त्याला सहाय्य करीत असे. एखादा विषय परिमित शब्दात जीवंतपणे रेखाटण्याची आणि त्याचा वास्तविक व रसरशीत ठसा वाचकांच्या मनावर

उठविण्याची देणगी व्हर्जिलला निश्चितच लाभली होती. परंतु सामान्यत: छायाचित्रातील वास्तवता साधण्याचा त्याचा उद्देश नसे. कुंचल्याच्या थोड्याच पण प्रतिभाशाली फटकाऱ्यांनी, सामान्यजनांना चित्रणीय चेहऱ्यात जे काही दिसते त्यासारखे मुळीच न दिसणारे परंतु प्रत्येक सुरकुतीची नक्कल करून काढलेल्या चित्रापेक्षा सत्याशी अधिक साधर्म्य साधणाऱ्या व्यक्तिचित्रे काढणाऱ्या चित्रकारा–प्रमाणे तो होता. ही तुलना आणखीही पुढे नेता येईल. व्हर्जिल हा आपला चित्रविषय पूर्ण समजून घेण्याकरिता तो त्याक्षणी कसा दिसतो हे पहाणाऱ्या व नंतर तत्पूर्वीच्या चित्रकारांनी त्या विषयाच्या निरनिराळ्या वेळी काढलेल्या व्यक्तिचित्रांच्या सहाय्याने ती व्यक्ती तिच्या जीवनाच्या पूर्व कालखंडात कशी होती, हेही समजून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या व्यक्तीचित्रे काढणाऱ्या चित्रकारासारखा होता.

व्हर्जिल आपले ग्रंथ एखादा व्यक्तीचित्रे रेखाटणारा चित्रकार पूर्वीची व्यक्तीचित्रे जशी वापरतो तशी वापरतो. जेवढे साहित्य जमविणे शक्य होते तेवढे तो जमवी. परंतु त्याने कशाचीही कधी जशीच्यातशी नक्कल केली नाही. आणि एकाचवेळी एकापेक्षा अधिक आपल्याला प्रेरणा करणारी साधने आपले कार्य करीत राहतील याबद्दल तो दक्षता घेई. होमर हा त्याच्या मुख्य मार्गदर्शकापैकी एक होता आणि 'ईनिइड' च्या प्रारंभीच्या ओळीत होमरच्या दोन्ही काव्यांच्या सुरवातीच्या ओळीतील सूचितध्वनींचा त्याने उपयोग केला आहे. सर्व 'ईनिइड' मध्ये अथपासून इतिपर्यंत होमरच्या आठवणी येत राहतात, आणि 'ईनिइड' च्या निर्मितीत सहाय्यभूत झालेल्या असंख्य वाङ्मयीन कृतींपैकी होमरची केवळ दोनच काव्ये आहेत. घटना आणि पात्रे अशा तऱ्हेने घडविली गेली आहेत. उदाहरणार्थ स्वत: इनीआसमध्ये समग्र कथानकातून ऐतिहासिक पात्राप्रमाणे तळपणाऱ्या जीवंत आणि खऱ्याखुऱ्या सम्राट ऑगस्टसशिवाय, होमरच्या काव्यात एक गौण कार्यभाग असलेल्या काहीशा वेगळ्या इनीआसचेच केवळ अस्फुट प्रतिबिंब नसून, होमरच्या ॲकिलीजचे, त्याच्या युलिसीसचे (किंवा ओडिसिअस), आणि त्याच्या हेक्टरचेही आहे ! आणि त्याच्याशिवाय इतर ग्रंथांतून घेतलेली हर्क्युलीझची आणि कदाचित आणखीही काही पात्रांचीही अस्फुट प्रतिबिंबे आहेत. 'वास्तव आणि आदर्श यांचा संयोग करून सत्य अधिक तेजोमय करण्याची व्हर्जिलची पद्धती होती.' व्हर्जिलचे तत्वज्ञानविषयक विचारही अंशत: त्याच्या पूर्वीच्या वेगवेगळ्या लेखकांकडून घेतलेले आहेत. त्याच्यावर ल्युक्रिसिअसचा फार मोठा प्रभाव होता. व्हर्जिलला त्याचे ग्रंथ सुपरिचित होते, आणि 'ईनिइड'मध्ये त्याने त्याच्या शेकडो

वाक्प्रचारांचा मुक्त उपयोग करून कल्पना सूचित केल्या आहेत. परंतु ल्युक्रिशिअसच्या आधिभौतिक तत्त्वज्ञानाशी त्याचा तीव्र मतभेद असल्यामुळे व्हर्जिल त्याच्या विचारांचा स्वीकार करू शकला नाही. उलटपक्षी ल्युक्रिशिअसच्या वाक्प्रचारांचा त्याच्यावर प्रभाव असूनही ल्युक्रिशिअसचे तत्वज्ञान उलटे करून त्यामधून प्लॅटोच्या आदर्शवादी तत्त्वज्ञानाप्रमाणे काही तरी ध्वनित करण्यात व्हर्जिलला आनंद वाटत असावा.

ईनिइडच्या मध्यावर जेव्हा इनीआसला 'डिव्हाईन कॉमेडी' मधील डॅन्टे-प्रमाणे मृत्यूच्या पलिकडील आत्म्यांच्या विश्वात जाऊ दिले आहे तेव्हा त्याला तिथे प्रवेश मिळविण्याकरिता एका 'सुवर्णाच्या डहाळीचा' शोध करून ती परवान्या-सारखी बरोबर घेऊन जावे लागले. व्हर्जिलला ही डहाळीची कल्पना सुचवायला बऱ्याच गोष्टी निश्चितच कारणीभूत झाल्या असाव्यात, तथापि त्यातील सर्वात अधिक महत्वाची कोणती असावी याबाबतीत संशय नाही. निरनिराळ्या ग्रीक लेखकांविषयी व्हर्जिलच्या कालापूर्वी थोड्या अगोदर लिहिलेल्या एका ग्रीक कवितेत एके ठिकाणी प्लॅटोच्या वाङ्मयीन कृतींचा 'सर्व गुणांनी, सर्व बाजूंनी झगझगणारी सुवर्णाची फांदी' असा उल्लेख केला आहे. सुजाण आणि प्रगतीशील राजनीतीतज्ञतेला आवश्यक असलेला आंतरिक विवेक प्राप्त करण्यास नैतिक सत्व शीलता आवश्यक आहे हे प्रतिपादन करण्याकरिता व्हर्जिलने आपल्या विशिष्ठ पद्धतीने या मार्गाचा अवलंब केला आहे.

व्हर्जिल दक्षतेने आणि हेतूपूर्वक काव्यरचना करीत असे. कधी कधी तो एका दिवसात साधारणतः एकच ओळ लिहीत असे. ईनिइड लिहिण्यात त्याने अकरा वर्षे घालविली, आणि इतक्या कठीण, भव्य प्रमाणावर इतक्या तपशिलवार कल्पिलेल्या आणि इतक्या परस्पर विरोधी रचनाविषयक निकडींना तोंड देणाऱ्या कार्याच्या मानाने हा काळ अल्पच होता. तो जगला असता तर त्याचे पुनर्लेखन करण्याकरिता आणखी तीन वर्षे घालविण्याचा त्याचा मानस होता. म्हणून हे काव्य सदोष आहे परंतु त्यात नेमके आणखी काय करण्याचा त्याचा उद्देश होता हे कळत नाही. उपलब्ध असलेल्या ईनिइडमधे काही अप्रयोजकता आणि विसंगती आहे; परंतु तशी ती बहुधा सर्वच दीर्घ आणि विशेषतः श्रेष्ठ साहित्यात असते एकच विधान किंवा कृती एखाद्या भागात एखाद्या पात्राला जोडलेली असेल तर अन्य भागात दुसऱ्या पात्राला जोडलेली असेल; आणि कुठे कुठे एखाद्या काल-खंडाचा किंवा अंतराचा मेळ व्हर्जिलने या काव्याच्या अन्य भागात उल्लेखिलेल्य

कालखंडाशी किंवा अंतराशी कसा घातला आहे हे समजणे अवघड पडते. या अनवधानाने झालेल्या क्षुल्लक चुकांना फारसे महत्व नाही. व्हर्जिल आणखी जगला असता तर यापैकी काही दोष तरी त्याने बहुधा दूर केले असते.

या महाकाव्यात काही गोष्टी अशाही आहेत की ज्या आपल्याला चमत्कारिक वाटल्या तरीही त्या व्हर्जिलच्या कलेचे एक आवश्यक अंग आहेत. आणि व्हर्जिलच्या कलेचे स्वरूप लक्षात घेतले तर त्या चमत्कारिक वाटणारही नाहीत. केवळ एखाद्या छायाचित्रकाराप्रमाणे चित्रण करण्यात व्हर्जिलला समाधान नव्हते आणि केवळ' वास्तवाच्या मर्यादेत राहून कथन करता येईल त्याहून अधिक विस्तृत सत्यकथन करणे त्याला पसंत होते म्हणूनही या चमत्कारिक गोष्टी त्या काव्यात आल्या असतील. उदाहरणार्थ काही ट्रोजन काही थोडया, अगदी छोटया जहाजातून प्रवास करतात. परंतु त्यांना लागणारी प्रत्येक गोष्ट – त्याचे आतिथ्य करणाऱ्या त्यांच्या विविध यजमानांना नजर करण्याकरिता लागणारी सर्वतऱ्हेची वस्त्रप्रावरणे आणि रत्नजडित अलंकार, व कधी त्यांच्या विविध देवतांना बळी देण्याकरिता लागणारे बैल मेंढे वगैरे पशु–सर्वच गोष्टी त्यांच्याजवळ असतात. याचे थोडक्यात कारण म्हणजे शक्याशक्यतेच्या सामान्य मर्यादांपेक्षा या प्रसंगातील प्रतिमाविश्व आणि प्रतीकात्मक सूचकता अधिक महत्वाच्या आहेत. ट्रोजनांचे पूर्व वैभव आणि सामर्थ्य आणि त्यांनी अद्यापही जतन केलेली त्यांची उच्चकुलीन उदात्तता आणि धर्मप्रवणता यांचा आपल्या मनावर ठसा उमटविणे हे अधिक महत्वाचे आहे; सर्व कथा खरेच घडली अशी आपली खात्री झाली की नाही याला फारसे महत्व नाही कारण कुणीही ती खरी मानण्याची शक्यता नाहीच.

नंतर युद्धाचा प्रश्न उभा राहतो व्हर्जिलने वर्णन केलेल्या काही विशिष्ट लढाया एकाच ठिकाणी आणि एकाच काळात झाल्या असाव्यात असे दिसत नाही कारण त्या मध्ये भिन्न व विसंगत युद्धपद्धती आणि शस्त्रे यांची गुंतागुंत आढळते. व्हर्जिलच्या कलातत्वांना आणि त्याच्या, अनेक गोष्टींचे, किंवा एकाच गोष्टीच्या उत्क्रांतीच्या वेगवेगळ्या अवस्थांचे लेखन एकाच वेळी करण्याच्या पद्धतीला हे अनुसरूनच आहे. होमरच्या लढायाप्रमाणे त्याला सर्व लढाया जुन्या पद्धतीने रंगविता आल्या असत्या, किंवा ज्युलिअस सीझरच्या लढायांप्रमाणे समकालीन पद्धतीच्या दाखविता आल्या असत्या परंतु त्याला अधिक काही तरी साधण्याची ईर्ष्या होती. सर्वच युद्धे कशी असतात हे दाखविण्याची त्याची पद्धत होती. एक विशिष्ट लढाईचे वर्णन करणे त्याला संमत नव्हते, कारण युद्धात सर्वसाधारणपणे काय घडते याचे ते योग्य उदाहरण कदाचित् असू शकत नाही.

या काव्यात अतिशयोक्तीही आहे. अतिशयोक्ती हे तर महाकाव्याचे वैशिष्टयच आहे, परंतु महाकाव्याच्या पद्धतीशी अपरिचित असलेल्या वाचकांना त्याचे आश्चर्य वाटेल. महाकाव्याच्या काल्पनिक परीजगात अतिशयोक्ती अगदी स्वाभाविकच वाटते. अतिशयोक्ती बालीशही नसते. अनेक काळी व स्थळी होऊन गेलेल्या प्रतिभावंत कवींनी सखोल आणि सत्य आशयव्यक्त करण्याकरिता अवलंबिलेले ते एक प्रौढ आणि महत्वाचे प्रतीकात्मक साधन आहे सामान्यत: व्हर्जिल आणि त्याहीपेक्षा होमर आपल्या अतिशयोक्तीच्या बाबतीत बरेच संयमशील आहेत. समराची तीव्रता वाढेल तसतसे स्वयंप्रेरणेनेच अधिकाधिक तप्त अग्निज्वाला फेकणारे शिरस्त्राण घालणारा आणि युद्धविषयक अधिकाधिक उत्सुकतेबरोबर ज्याच्या मुद्रेतून प्रत्यक्ष अग्नीस्फुल्लिंग बाहेर पडतात असा व्हर्जिलचा टर्नसही अतिविलक्षण नाही. स्फुल्लिंग आणि ज्वाला ही टर्नसचा स्वभाव व्यक्त करण्याकरिता योजिलेल्या पुनरावर्ती प्रतिमेचा एक भाग आहे. तो एक अतिविलोभनीय नायक आहे, तरुण, उमदा, देखणा, दिलदार, शूर आणि अभागी; आणि त्याच्या विजेत्याहून, इनीआसहून, तो निश्चितच अधिक आकर्षक होता. परंतु त्याच्या ठायी एक दोष होता. तो अति कोपिष्ट होता. आणि टर्नसचा हा क्रोधांगार निर्मितीक्षम नाही. व्हर्जिलने हे दोन उपमांतून दर्शविले आहे. एक टर्नसकरिता व दुसरी इनीआसकरिता योजलेली आहे; आणि प्रत्येक उपमा एखाद्या भांड्यातील किंवा कटाहातील पाण्याविषयी आहे. टर्नसविषयीच्या उपमेत पाणी उकळून ओसंडते आणि त्यातून धूर आणि वाफ वर जाते. इनीआसविषयीच्या उपमेत जलाच्या पृष्ठावरून प्रकाशकिरण परावर्तित होतात आणि लवकरच जसजसे पाणी उसळण्याचे थांबते तसतसे ते स्थिर होतात. अंगी दोष असूनही इनीआसला शेवटी प्रकाश दिसतो, परंतु टर्नसच्या वाट्यास शेवटी अंधारच येतो. एखाद्या शास्त्रीय ग्रंथातून व्हर्जिलने जर इनीआस आणि टर्नस यांचे मानसशास्त्रीय स्वभाव-विश्लेषण केले असते तर त्या ग्रंथाचा विस्तार भयंकर वाढला असता. आहे या स्वरुपात काही प्रासंगिक कुशल प्रतिमांमधून सत्याचे एक भांडारच खुले झाले आहे.

व्हर्जिलची कला. प्रतिमा, प्रतीकात्मक संदर्भ आणि कुशल कथाकथन एवढ्यापुरतीच मर्यादित नाही, विविधतेच्या श्रेष्ठ दंडकाला अनुसरुन त्याच्या कलेत विविध प्रकारच्या प्रमाणबद्धतांचा आणि आकृतीबंधांचा समावेश होतो. ईनिइडमधे सूर्योदय आणि सूर्यास्त वरचेवर होत असतात त्यांची विविध वर्णने जरी सारखी भासली तरी ती नेमकी सारखी कधीच नसतात; आणि याचे उघड कारण असे दिसते की निवडलेल्या अभिव्यक्तींतून आगामी दिवसातील किंवा

रात्रीतील प्रसंग आणि घटना सूचित करायच्या असतात. समग्र काव्यातच सर्वत्र शब्दांची निवड आणि योजना अनेक सूक्ष्म तत्वांनुसार केलेली आहे. त्यांच्यातील व्यंजने, स्वर आणि ताल ही केवळ त्या ओळीतील इतर शब्दांशी संवादी असावयास हवीत एवढेच नव्हे तर त्या परिच्छेदातील इतर ओळीतील शब्दांशीही संवादी असायला हवी असतात; शब्दांचा आरंभ योग्य अक्षराने होतो, अंतही योग्य ध्वनीने होतो, आणि ते शब्द अर्थ आणि नादाच्या आकृतीबंधातही चपखलपणे बसतात म्हणूनच त्या शब्दांची निवड केली जाते. एकत्र, सन्निध असलेल्या ओळींमध्ये परस्पर प्रतिध्वनी आणि परस्परांशी असलेला विरोध यांचा कलात्मक संबंध असतो, आणि एखाद्या स्थळातील एखाद्या ओळीत त्या काव्यातील अति दूरच्या एखाद्या ओळीचाही अर्थगर्भ प्रतिध्वनी उमटतो. तालाचे विविध झंकार या काव्यात आहेत. काहींचे नियमन मात्रांच्या लघुगुरुत्वाने केले आहे; काहींचे मात्रांवरील आघातांनी केले आहे, आणि काहींचे स्वरोच्चाराने केले आहे आणि हे ताल अंतर्गत प्रक्रियेतून साधणाऱ्या स्वत:च्या आणि इतर रचनाच केवळ जुळवितात असे नसून आशयालाही सहाय्यभूत होतात. ज्यांना लॅटिन भाषेतील एक शब्दही कळत नाही तेही व्हर्जिलच्या काव्यातील नादमाधुर्याचा आस्वाद घेऊ शकतात.

हे सर्व कलागुण गद्य भाषांतरात नष्ट होणार खरेच, पण पुष्कळसे, खरे म्हणजे खूपच नष्ट होण्याची गरज नाही; कारण व्हर्जिलच्या काव्यातली महत्वाची जमेची बाजू म्हणजे त्यातील कथानक, नाटयगुण आणि कथानक नाटय यांतून प्रकट होणारे आशय. म्हणून साध्यासुध्या गद्यात व्हर्जिलची कथा सादर करण्यात समाधान मानणारा अनुवाद वाचणे म्हणजे व्हर्जिलच्या काव्याला केवळ अगदीच अन्याय करणे असे मानण्याचे कारण नाही. अशा अनुवादातूनसुद्धा व्हर्जिलच्या काव्यातील कलागुणांचा आस्वाद घेता येईल.

असा अनुवाद साधणे हेही सोपे नाही. शक्य असेल तर अशा अनुवादात जे खरोखरी महत्वाचे आहे ते गाळून चालणार नाही, आणि ज्यामुळे व्हर्जिलच्या अधिक महत्वाच्या आशयांत बदल किंवा विकृती निर्माण होईल असे काही पदरचे जास्त घालूनही चालणार नाही. परंतु व्हर्जिलची कला इतकी सूक्ष्म आणि कलाकुसरीची आहे, आणि त्याची भाषाशैली अचूक आकलन होण्यास इतकी अवघड आहे की काय गाळावे किंवा काय विस्तारावे म्हणजे मुळास धक्का लागणार नाही हे निश्चित करणे कठीण आहे. व्हर्जिलचे शब्द इतके अन्योक्तीगर्भ असतात की त्यांचा पूर्ण अर्थ साकल्याने उभा करण्याचा प्रयत्नही करता येत नाही, आणि ते जरी शक्य

असले तरी त्यामुळे शब्दविस्तार अमर्याद वाढेल व मलतीच निराशाजनक गुंतागुंत होईल. आणि तरीही त्याची वाक्यरचना इतकी संक्षेपपूर्ण आहे. आणि परिमित शब्दात विस्तृत आशय व्यक्त करण्याचे त्याचे सामर्थ्य इतके वेधक आहे की अनुवादात काही विस्तार आवश्यक ठरतो, वस्तुतः सूचकतेचे वाहन असलेल्या काव्याचे, वाच्यार्थाचे वाहन असलेल्या गद्यात रुपांतर करताना विस्तार साधारण-पणे अनिवार्यच असतो; पण व्हर्जिलच्या काव्याचे गद्यात रुपांतर करताना त्याच्या विशिष्ट भाषाशैलीमुळे आणखी जास्तच विस्तार करणे अपरिहार्य होते. आवश्यक तेवढे सर्व व्यक्त झालेच पाहिजे ही निकड आणि वाजवीहून अधिक व्यक्त केले जाण्याचे भय, तसेच कथेचा ओघ सुस्पष्ट आणि प्रवाही राखण्याची आवश्यकता आणि मूळ संहितेचा नेमका आशय कोणता आहे हे जितके शक्य होईल तितके शोधून काढण्याची किंवा त्याविषयी निर्णय घेण्याची अखंड जबाबदारी या दोहोमध्ये आगळचा तीव्रतेचे संघर्ष होत राहातात. या असल्या अनावस्था प्रसंगी, माझ्या अनुवादात काही दोष, नजर चुका आणि काही उघड चुका टाळल्या गेल्या असतील अशी आशा मला करता येत नाही. हे तिन्ही प्रकारचे दोष कदाचित् विपुलही असतील. आणि जरी काहीही चुकले नसले तरी कांहीतरी चुकल्यासारखे वाटणे शक्य आहे कारण काही शब्दांवर अन्याय न करता एखाद्या वाक्याला किंवा परिच्छेदाला न्याय देणे निदान मला तरी पुष्कळ वेळा अशक्य वाटते. अंशांपेक्षा पूर्ण अधिक महत्वाचे आहे; परंतु अंशाचाही अधिकार आहेच की.

भाषेचा विचार करता, व्हर्जिलचे प्रत्येक भाषाशैलीवर कमालीचे प्रभुत्व आहे असे आढळून येते. त्याच्या शैलीत 'दिव्य साक्षात्कारी भव्यता' आहे असे म्हटले जाते. परंतु त्याच्या लॅटिनमध्ये मृदु, संथ स्वरातले अत्यंत कोमल कारुण्याचे निनादही उमटतात. साधारणपणे तो भारदस्तपणे व भाषेच्या सर्व उपचारांकडे लक्ष असल्यासारखे लिही. पण कधीकधी अगदी मुक्तपणेही लिही. मधूनमधून परिणामकारक अशी बोलीभाषाही वापरी व कुठे तर काहीसे ग्राम्यपणेही लिही. फार थोर व्यक्तींमध्ये आढळणारा लहरीपणा थोडचा प्रमाणात व्हर्जिलमध्येही सापडतो. लोकसंमत ठराविक भाषेचा त्याला अत्यंत उबग येत असे. मोठमोठ्या कविश्रेष्ठांना हा असा उबग येतोच.

या विराट काव्याच्या गद्य भाषांतराकरिता तितकीच यथोचित अशी शैली गवसणे सोपे नाहीं. काय योजिले पाहिजे हे कळणे तितकेसे अवघड नव्हते. परंतु त्याची योजना करता येणे हा फारच वेगळा भाग आहे. हे गद्य समकालीन हवे,

काही प्रमाणात तरी प्रवाही हवे, आणि त्यामध्ये कुठेही वाचताना फार मोठ्या ठेचा लागू नयेत असे हवे. ईनिइडचा कथाप्रवाह कंटाळवाणा, मंदगती, अनाकलनीय व वाचण्यास दुष्कर करणे वाचकांना आणि स्वतः व्हर्जिलला‌ही अत्यंत अन्यायकारक ठरेल. पण योजिलेले गद्य शक्यतो वैयक्तिक स्वरुपाचे आणि विसाव्या शतकाच्या मध्यातील प्रचलित गद्य असूनही उपयोग नाही. भाषांतरकाराने शक्यतो स्वतःच्या लेखन शैलीतील वैयक्तिक लकबी टाळायला पाहिजेत, आणि प्रसंगी दुसऱ्या लेखकांच्या शैलीस जास्त स्वाभाविक ठरतील अशा वाक्प्रचारांचाही स्वीकार करायला हवा. बोलीभाषेतील अगदी नवीन वाक्प्रचार आणि विशिष्ट वर्गातच प्रचलित असलेल्या भाषेतील चमत्कृतीही टाळल्या पाहिजेत. पुरोहितवर्ग, खलाशी किंवा सैनिक यांनाच केवळ परिचित असलेल्या पारिभाषिक संज्ञा वापरून चालणार नाही, शक्य असेल तर पन्नास वर्षापूर्वीच्या आणि पन्नास वर्षानंतरच्या लोकांनाही बऱ्याच प्रमाणात स्वाभाविक वाटेल अशीच भाषा वापरली पाहिजे; निदान हा आदर्श असला पाहिजे. ईनिइडची कथा साधी सरळ सांगायची तर त्यामध्ये इतर व्यत्यय येऊ देऊ नयेत. अशा तऱ्हेचे व्यत्यय एखाद्या विशिष्ट काळाच्या, स्थळाच्या किंवा समाजाच्या विशिष्ट उल्लेखानी निर्माण होतात.

व्हर्जिलला 'ईनिइड' हा ग्रंथ पाश्चात्य जगातील प्रमुख धर्मनिरपेक्ष ग्रंथ आहे. मुद्रणकलेचा शोध लागल्यानंतर थोड्याच काळात जवळ जवळ पाचशे वर्षे दरवर्षी त्याची निदान एक तरी नवी मुद्रित आवृत्ति प्रसिद्ध होत असे. त्यापूर्वी युरोपातील धर्मनिरपेक्ष ग्रंथांत 'ईनिइड' हा सर्वात अधिक माहित असलेला लोकप्रिय ग्रंथ होता असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. रोमन कालापासून आजवर त्याच्याइतका सातत्याने सुप्रसिद्ध असा दुसरा ग्रंथ निश्चितच नाही. साधारणतः ईनिइड हा नेहमीच सर्वोत्कृष्ट ग्रंथ मानला गेला आहे. आणि ते सर्वश्रेष्ठ काव्य आहे असे प्रतिपादन करणे हे नेहमीच सोपे वाटत गेले आहे.

व्हर्जिलच्या मृत्यूनंतर लवकरच त्याची देवाप्रमाणे उपासना होऊ लागली. त्याचा मृत्यू क्रिश्चन शकापूर्वी झाला असला तरी त्याला क्रिश्चन पूजाविधीत आणि क्रिश्चन कलेत स्थान प्राप्त झाले. 'अ-युद्धी लोकांचा प्रेषित' असे त्याला मानण्यात येऊ लागले. तो जादुगार असावा असे मानले गेले होते आणि त्याने करून दाखविलेल्या चमत्कारांवर लिहिल्या गेलेल्या एका ग्रंथाची मध्ययुगात अनेक भाषांत भाषांतरे झाली होती. डॅन्टेचा तो 'प्रेमळ गुरु' होता आणि क्रेटिअेन व ट्रॉय, शेक्स्पिअर, मिल्टन, कॅमीन्स, पोप, व्हिक्टर ह्युगो, टेनिसन आणि इतर

अनेक कवींची घडण करण्यात त्याचा मोठा वाटा आहे. कुणी पहिल्या दर्जाचा पाश्चिमात्य कवी त्याच्या प्रभावापासून मुक्त आहे की काय हे मला माहित नाही. असे म्हणतात की त्याच्या ( Pastoral Poems ) 'ग्रामजीवनावरील कवितामधील पहिल्या चार ओळीतील बीचवृक्षाच्या विस्तारलेल्या फांद्यांच्या छायेत पावा वाजविणाऱ्या एका स्वस्थचित्त मेंढपाळाचे शब्दचित्र युरोपातील सर्व साहित्यात आढळते. व्हर्जिलने आधुनिक भाषांवरही थोडाफार परिणाम घडविला आहे. कारण लॅटिनपासून झालेल्या भाषातून आणि काही प्रमाणात इतर भाषांतूनही काही वाक्यरचना लॅटिन भाषेच्या सर्वसाधारण नियमानुसार न होता व्हर्जिलच्या वैयक्तिक शैलीप्रमाणे होतात. आजही बऱ्याच गुंतागुंतीच्या प्रश्नांवर लांबलचक वाद होत असतात. या सर्व प्रश्नांना व्हर्जिलने आजपर्यंतच्या उत्तरात सर्वोत्कृष्ट ठरेल असे उत्तर देऊन ठेवले आहे; आणि तेही काटेकोर युक्तिवादाने परिपूर्ण अशा थोडक्या शब्दांत. अभिजात परंतु तरीही गूढ अशा व्हर्जिलच्या या सूज्ञपणातून 'सॉर्टस व्हर्जिलिआनी' चा, व्हर्जिलच्या काव्य पंक्तींच्या सहाय्याने भविष्य वर्तविण्याच्या प्रसिद्ध पद्धतीचा ताबडतोब उगम झाला. असंख्य महत्वाच्या आणि महत्व नसलेल्या व्यक्तींनी व्हर्जिलच्या ग्रंथाच्या सहज उघडलेल्या पानावर, डोळे मिटून, बोट ठेवून निर्णय घेतले आहेत. उदाहरणार्थ पहिल्या चार्लस्‌ने नॅसेबीच्या लढाईपूर्वी असा निर्णय घेतला होता. ही पद्धती आजही प्रचलित आहे.

व्हर्जिलच्या काव्याचे सामर्थ्य वर प्रकाशात झेपावणाऱ्या भूमीतील बीजाप्रमाणे आहे; आणि ते अजूनही सतत वाढत आहे. ईनिइडमधील प्रत्येक तपशील कुणालाही अगदी रोमनांनाही, कळलेला नाही; आणि असे अनेक लोक आहेत की जे सर्व जाणण्याच्या प्रयत्नात त्या कथेतील सर्वोत्तम भाग हरवून बसले आहेत. ते 'सर्वोत्तम' काय आहे हे सांगणे अवघड आहे. त्याना काय लाभले हे सांगण्याकरिता त्यांनी विक्षिप्त मार्गाचा अवलंब केला असला तरी, वाचकांना सामान्यतः खूप लाभले असावे असे वाटते. अर्थात व्हर्जिलला विरोधक होते. ( Pastoral Poems ) ग्रामजीवनावरील कविता प्रसिद्ध झाल्याबरोबर जरी त्याला एकदम कीर्ती प्राप्त झाली होती तरी त्याच्या हयातीतही त्याच्या विरूद्ध ग्रंथलेखन झाले होते. तरीही एकूण त्याच्या अत्यंत प्रभावशाली कीर्तीची अवहेलना जेरिकोच्या भिंतीसारखी पुढे मागे कोसळलीच आहे.

त्याच्या काळापासून आजवरच्या त्याच्या कीर्तीचा इतिहास पाहता इतर काही करण्यास लोकांना वेळच कसा मिळाला याचे आश्चर्य वाटते. इंग्लीश कवी

ड्रायडनने 'अखिल कवींत आपल्या अभिजात गुणांनी आणि राजतेजाने उठून दिसणारा कवीश्रेष्ठ' असे व्हर्जिलचे वर्णन केले आहे. असा हा व्हर्जिल सर्वांच्या प्रशस्तीस व निष्ठावंत कृतज्ञतेस पात्र आहे नंतरच्या काळातील एका रोमन समीक्षकाने म्हटल्याप्रमाणे "टीकेने आणि प्रशंसेने अविचलीत राहण्याचे व्हर्जिलचे विलक्षण वैशिष्टच आहे." अशी एक भावना असण्याची शक्यता आहे. परंतु बहुधा असे असावे की निष्ठेच्या उद्गात्या व्हर्जिलला मानवजातीची त्याच्या वरील निष्ठा प्रिय असावी. आणि तरीही त्याच्या उदात्त व्यक्तिमत्वाच्या सान्निध्यात भययुक्त आदराची भावना अनिवार्य असावी. एक प्रसिद्ध चित्र-संग्रहालय पाहण्यास आलेल्या एका प्रेक्षकाची एक गमतीदार कथा आहे. ती चित्रे पाहून तो प्रेक्षक तेथील एका परिचरापाशी उद्गारला "लोक या चित्रांचे एवढे अवडंबर का माजवितात तेच मला कळत नाही! मला तर त्यात काहीच विशेष असे दिसत नाही." त्यावर त्या परिचराने दिलेले उत्तर अत्यंत मार्मिक होते; "महाशय माफ करा, या चित्रांच्या परीक्षेचा इथे प्रश्नच नाही."

**दत्तात्रय रघुनाथ घोडके**

१ मे १९८३

## सर्ग पहिला

# ट्रोजनांचे कार्थेजला आगमन

पूर्वी ग्रामजीवनाची तरल गीते गायिलेला मी कवी आहे. वनराई मागे टाकून नंतरच्या माझ्या काव्यांत मी जवळच्या शेतवाड्यांत आलो. अत्यंत कसून काम करून घेणाऱ्या शेतकऱ्यांची सुद्धा आज्ञा पाळण्याला मी त्या शेतवाड्यांना शिकवले. आणि शेतकऱ्यांना माझे काव्य आवडले. परंतु आतां मी मार्सच्या रौद्र संघर्षाकडे वळत आहे.

ही कथा आहे शस्त्रांची आणि एका माणसाची. दैववशात् देशाबाहेर काढला गेलेला. ट्रॉयची भूमी सोडून नौकेवर आरूढ होऊन इटलीच्या लॅव्हिनिअनच्या किनाऱ्यावर पोचणारा तो पहिला माणूस. प्रवासामध्ये भूमीवर आणि सागरावरही त्याला अनंत आपत्तींना तोंड द्यावे लागले. परमेश्वराची तशी इच्छा होती, कारण जूनो निर्दय झाली होती आणि आपला क्रोध विसरू शकत नव्हती. युद्धांतही त्याला अपार यातना भोगाव्या लागल्या होत्या. तरीही शेवटी आपले नगर वसवण्यांत आणि आपल्या कुलदैवतांची लॅटिन भूमीवर प्राणप्रतिष्ठा करण्यात त्याला यश आले. लॅटिन राष्ट्राची, अल्बाच्या उमरावांची आणि रोम शहराच्या गर्वोन्नत तटबंदीची उत्पत्ती अशी झाली.

ह्या सर्व प्रकरणाचा आरंभ कसा झाला आणि सत्वशील म्हणून प्रसिद्ध असलेल्या एका माणसाला साहसपूर्ण असा दीर्घ प्रवास करण्याला आणि अनंत आपत्तींना तोंड देण्याला क्रोधाच्या आहारी जाऊन, स्वर्गसम्राज्ञी जूनोने कसे भाग पाडले व त्यामुळे तिच्या थोरवीचा कस कसा उतरला हे सांगण्याचे स्फूर्ती सामर्थ्य मला लाभो अशी मी प्रार्थना करतो. खरेच! स्वर्गस्थ देवांच्या ठायी अशी द्वेषभावना असावी ह्यावर विश्वास बसत नाही.

पूर्वी इटलीसमोर, टायबर नदीच्या मुखाच्या विरुद्ध दिशेला पण दूर, कार्थेज नांवाचे प्राचीन नगर होते. टायर देशातून आलेल्या लोकांनी तेथे आपले

वसतीस्थान केले होते. कार्थेजमध्ये संपत्ती आणि सामर्थ्य होते; तेथे युद्धांत कौशल्य आणि क्रौर्य दिसून येई. असे म्हणतात की जूनोचे जगांतील इतर सर्व नगरांपेक्षां कार्थेजवर अधिक प्रेम होते याबाबतीत तिने सेमॉसलाही दुय्यम स्थान दिले होते. तिने आपली शस्त्रें आणि आपला रथ तेथे ठेवला होता. कार्थेजला त्रिखंड पृथ्वीची राजधानी बनवावी व त्याने सर्व पृथ्वीवर आधिपत्य गाजवावे अशी तिची मनीषा होती. आपली सर्वशक्ति आणि आपले प्रयत्न तिने त्याच्या संवर्धनाच्या कारणी लावले होते. नियती देवता आपल्या इच्छेला उचलून धरील अशी तिला आशा होती. परंतु दुसऱ्या एका मानववंशाकडून, ट्रोजन वंशातील योद्धयांकडून एक दिवस टायरांच्या या बालेकिल्ल्याचा पाडाव होणार आहे, ट्रॉयच्या रक्तातून एक शूर प्रमत्त राष्ट्र निर्माण होणार आहे, त्याची अधिसत्ता विस्तीर्ण, प्रदेशावर चालणार आहे आणि त्यांच्या चढाईने आफ्रिकेचा नाश होणार आहे हे जूनोने ऐकले होते आणि तिने असेही ऐकले होते की मानवाच्या नशिबाचे जाळे सतत विणीत असणाऱ्या अधिष्ठात्री देवतांनी हीच योजना आखली होती व या योजनेचेच तिला भय वाटत होते. ट्रोजन युद्धाचाही तिला विसर पडणे शक्य नव्हते. या युद्धात तर ती आपल्या आवडत्या अर्गॉसकरिता आघाडीवर लढली होती. या संघर्षाच्या बीजाचे आणि त्यामुळे तिला आलेल्या भयंकर क्रोधाचे तिला स्मरण होते. पॅरिसच्या निकालामुळे तिच्या सौंदर्याचा झालेला अन्याय्य उपमर्द तिच्या मनांत घर करून राहिला होता. शिवाय समस्त ट्रोजन वंशाविषयीच तिच्या मनांत कमालीचा मत्सर होता. गॅनिमीडचे अपहरण कसे केले गेले आणि नंतर त्याचा सन्मान कसा केला गेला हेही ती विसरू शकत नव्हती.

जूनोच्या प्रकोपाची ही अशी कारणे होती. आणि ज्या उर्वरित ट्रोजनांचा संहार ग्रीकांना किंवा निर्दय ॲकिलीझलाही करता आला नाही ते ट्रोजन वादळी सागरावर चोहीकडे, या प्रकोपामुळेच भटकत राहिले होते; दैवाच्या लहरीवर वर्षानुवर्षे सागरासागरातून जगभर भटकत होते आणि तरीही जूनोने त्यांना लॅशिअमपासून दूरच ठेवले होते. रोमन जीवनाच्या प्रारंभाची कष्टांच्या रुपात अशी जबरदस्त किंमत द्यावी लागली.

ट्रोजनांनी सिसिलीहून सागरी प्रवास सुरु केला होता. भूमी नुकतीच त्यांच्या दृष्टी आड झाली होती. ब्राँझने मढविलेल्या वल्हयांनी घुसळलेले समुद्राचे खारे पाणी फेसाळत होते. ते गलबतावर आनंदाने शिडे उभारीत होते. तितक्यात काळजातली खोल जखम सतत वहात ठेवीत आलेली जूनो स्वतःशीच म्हणाली : 'मी, पराभूत? मी, युद्धातून माघार घ्यावी? ट्रॉयच्या राजपुत्राला इटलीच्या

किनाऱ्यापर्यंत पोहचू न देण्याचेही सामर्थ्य माझ्या ठायी नसावे ? दैव मला प्रतिरोध करते हं ! पण मिनर्व्हाने जेव्हां आरगाईव्हचे सर्व आरमार अग्नीमध्ये नष्ट केले आणि सर्व खलाशांना जलसमाधी दिली तेव्हां ह्याच दैवाने तिला मात्र प्रतिरोध केला नाही. आणि हे तिने कशासाठी केले ? तर केवळ एका माणसाकरितां--ऑइलिअस पुत्र अेजॅक्स हा एकटाच वेडा झाला आणि त्याने पाप कर्म केले म्हणून. मिनर्व्हाने तेव्हां ज्यूपिटरचे सर्व भक्षक अग्न्यस्त्र हाती घेतले आणि ते मेघांमधून भिरकावले. तिने गलबतांच्या चिरफळ्या उडविल्या आणि वाऱ्याने समुद्राचा पृष्ठभाग फाडून काढला. त्या विद्युज्ज्वालांनी अेजॅक्सच्या छातीचा भेद केला आणि तो शेवटचे क्षण मोजीत असतां तिने त्याला वाऱ्याच्या जोराने वर उचलून एका टोकदार खडकावर खिळवून टाकले. आणि मी मात्र, सर्व देवांची सम्राज्ञी, जोव्हची बहिण आणि पत्नी, माझ्या प्रतिष्ठेच्या अग्रमानाने एका जमातीशी इतकी वर्षे लढत आहे ! यापुढे कोणी जूनोच्या थोरवीला मान देईल का ? किंवा नम्रपणें प्रार्थना करून तिला वेदीवर हवीर्भाग अर्पण करील का ?

तिच्या क्रुद्ध मस्तकात अशा विचारांचे मंथन चालू असतांना ती सरळ जेथे वादळी मेघांचे निवासस्थान आहे व जेथे पिसाट वाऱ्यांचे मुक्तीकरिता बेभान थैमान चाललेले असते त्या इओलियाकडे गेली. तेथे एका विस्तृत गुहेच्या गर्भात हे वारे एकमेकांशी धडका घेत असतात, व वादळांच्या गर्जना उठत असतात; परंतु त्यांच्यावर अधिसत्ता गाजविणारा ईओलस त्यांना वठणीवर आणून दाबांत ठेवीत असतो. तिथे हे पिसाट वारे बंद दारांना धडका देत धावपळ करीत असतात. आणि सर्व पर्वत त्यांच्या क्रुद्ध हुंकाराने निनादत असतो. परतु ईओलस त्यांच्यावर उच्चस्थानी स्थिरपणे सिंहासनाधिष्ठित झालेला असतो आणि राजदंड धारण करून त्यांच्या उद्दामपणाला आळा घालीत असतो आणि त्यांचा आवेश आवरीत असतो. तसे नसते तर झंझावातांनी सर्व भूमीभाग प्रत्येक सागर आणि गाढ अवकाश केव्हांच दांडगाईने उधळून लावले असते, आणि साऱ्या अंतराळात त्यांना ह्याकलीत भिरकावून दिले असते. सर्वशक्तीमान जगत्पिता ज्युपिटरला याची पूर्ण कल्पना होती म्हणूनच त्याने सर्व वाऱ्यांना हद्दपार करून त्या अंधाऱ्या गुहेत बंदिवान केले होते. त्यांच्यावर पर्वतराशींचे दडपण रचून ठेवले होते. त्यांच्यावर एक राजा नियुक्त केला होता आणि एका कायमच्या शासनपत्राच्याद्वारें या वाऱ्यांना प्रतिबद्ध कसे करायचे व ज्युपिटरची आज्ञा झाल्यास त्यांना मोकळेही कसे सोडायचे या बद्दलच्या सूचना दिल्या होत्या. वाऱ्यांच्या याच अधिपतिची आता जूनोने नम्र प्रार्थना केली.

'हे राजा इओलस, सर्व देवांचा पिता व सर्व मानवांचा अधिपती जो ज्युपिटर त्याने तुला सागराच्या लाटा शमविण्याची आणि वाऱ्यांच्या सहाय्याने त्यावर वादळे उठविण्याची शक्ति दिली आहे. ज्यांचा मी द्वेष करते असे काही लोक इट्रस्कन समुद्रावरून प्रवास करीत आहेत, ते खुद्द ट्रॉय आणि ट्रोजन घराण्यांची पराभूत कुलदैवते घेऊन इटलीकडे निघाले आहेत. तुझ्या वाऱ्यांना खवळून उठू दे, त्यांची गलबते बुडवून टाक. सागराचे पाणी त्यांना गडप करून टाकू दे. किंवा त्यांची गलबते एकमेकांपासून दूर दूर भिरकावून दे, त्यांचे खलाशी लाटांवर फेकून दे आणि त्यांना समुद्रांवर भरकटू दे. माझे पदरी अप्रतिम लावण्यवती अशा चौदा समुद्रपऱ्या आहेत. डिओपी ही त्या सर्वांत सुंदर आहे. मी तिचा तुझ्याशी विधिपूर्वक विवाह लावून देते. आणि तू मजवर केलेल्या मोठ्या उपकाराचे फल म्हणून ती तुझ्या बरोबर अनंत काल संसार करील व तुला सुंदर पुत्ररत्नांच्या पितृत्वाचा लाभ करून देईल."

उत्तरादाखल इओलस म्हणाला, 'महाराज्ञी, आपले काम केवळ स्वेच्छे-नुसार निर्णय घेण्याचे आहे आणि माझे कर्तव्य फक्त आपल्या आज्ञेचे त्वरीत पालन करण्याचे आहे. या छोट्या राज्यावर माझी जी सत्ता आहे ती सर्व आपल्यामुळे आहे. कारण आपल्यामुळेच मजवर ज्युपिटरचा अनुग्रह झाला. आपल्यामुळेच मला देवांच्या पंक्तीस भोजनाला बसता येते आणि वादळी मेघांवरील व वादळावरील सत्ता आपणांकडूनच मला प्राप्त झाली आहे.'

असे म्हणून त्याने आपला त्रिशूळ गरगर फिरविला व जेथे त्या कड्यावरील कवच विरळ होते तेथे मर्मभेदी आघात केला. सर्व वारे सज्ज खडे राहिले आणि त्याने पाडलेल्या गव्हरांतून ते वेगाने बाहेर पडले. झंझावाताने पृथ्वी हादरली, त्यांच्या तुफानी फटक्यांनी त्यांनी पृथ्वी हादरून टाकली, नंतर ते वारे सागरावर झेपावले, पूर्वेकडील आणि दक्षिणपूर्वेकडील आणि दक्षिणेकडील आणि आफ्रिकी वारे आपल्या खोल वसतीस्थानातून घोंगावत सारे फोडीत तोडीत पिसाटून आले आणि समुद्राच्या अक्राळ विक्राळ लाटा त्यांनी किनाऱ्यावर उधळून लावल्या. माणसांच्या आरोळ्या उठल्या, शिडांचे दोर करकरू लागले. क्षणात ट्रोजन डोळ्यांपुढून सूर्यप्रकाश हिसकला गेला. रात्रीसारखा अंधार ट्रोजन खलाशांच्या भोवती समुद्रावर पसरला. आकाशात उंचावर ढगांचा कडकडाट होऊ लागला आणि हवेत विजा सतत चमकू लागल्या. जिकडे पाहावे तिकडे ट्रोजनांना साक्षात् मृत्यू भेडसावू लागला. मरण-भयाने गलितगात्र होऊन, इमीआस विव्हल झाला. आकाशांतील नक्षत्रगणाकडे हात पसरून तो मोठ्याने आक्रंदला : 'तुम्ही किती भाग्यवान होता ! त्रिवार

आणि त्याहूनही अधिक भाग्यवान होता! आपल्या माता पित्याच्या देखत ट्रॉयच्या उच्च भिंतींच्या छायेत आणि रणांगणावर वीरगती मिळविण्याचे तुमचे भाग्य होते. हे डायोमिड! परम पराक्रमी ग्रीका, तुझ्या वीरबाहूंनी माझा अंत का केला नाही? इलिअमच्या रणभूमीवर, जिथे ॲकिलीजच्या भाल्याने विद्ध झालेल्या शक्तिशाली सर्पिडॉन आणि शत्रुहंता हेक्टर यांना वीरगती लाभली आणि जिथे सिमॉइस असंख्य चिलखते, शिरस्त्राणे आणि ते सर्व शूर मृत योद्धे आपल्या प्रवाहाखाली खोल बुडवून लोटीत नेतो, तिथे माझ्या आत्म्याला मृत्यूनंतर लाभणारी मुक्ती का दिली नाही!'

इनीआसच्या मुखातून हे दुःखोद्‌गार सारखे बाहेर पडत असतानाच उत्तरेकडून सरळ त्याच्या गलबताच्या शिडावर, चित्कार करणाऱ्या वाऱ्याचा, प्रचंड आघात झाला व आभाळाएवढ्या लाटा उसळल्या, वल्ही मोडली, गलबत गर्रकन फिरले आणि त्याच्या बाजूवर लाटा कोसळू लागल्या. पाण्याचा एक प्रचंड उंचच-उंच पर्वत चालून आला. कांही खलाशी लाटांच्या टोकावर कसेबसे सावरून लटकत राहिले. काहींना लाटा तळात घुसतांना दिसल्या आणि घुसळलेले पाणी व वाळू यांच्या खालच्या खुद्द समुद्रतलाचे दर्शन होऊ लागले. दक्षिण वाऱ्याने नंतर अन्य तीन गलबतांना तडाखा दिला, आणि त्यांना गरगर फिरवून इटलीपासून दूर मध्यसमुद्रांत अर्धवट बुडलेल्या मोठ्या, "अल्टार" टणक खडकावर भिरकावले. पूर्व वाऱ्यांनी आणखी तीन गलबते खुल्या समुद्रातून हाकारून उथळपाण्यांत आणि भुसभुशीत फसव्या वाळूत नेली व शेवटी किनाऱ्यावर ढकलून त्यांच्यावर वाळूचा पर्वत रचला आणि हे सारे पाहून त्यांचे मित्र हताश झाले. एका गलबतात विश्वासपात्र ऑरन्टीसच्या आधिपत्याखाली लिसिअन लोक होते. इनीआस तिकडे पाहात असतानाच एक राक्षसी लाट त्या गलबताच्या मागच्या भागावर कोसळली. त्या गलबताचा सुकाणुधर खाली डोके आणि वर पाय असा पाण्यात गलबतावरून भिरकावला गेला व खाली तोंड करून पडला. ते गलबत तीन वेळा होते तेथेच चक्राकार फिरले. आणि नंतर पाण्यातील प्रचंड भोवऱ्यात अडकले, आणि त्या भोवऱ्याने त्याला समुद्रतळी ओढले. त्यावरील काही खलाशी इतस्ततः पाण्यावर पोहतांना दिसत होते. भग्न गलबताचे तुकडे, खलाशांचे सामान आणि ट्रायमधून वाचवून आणलेल्या मौल्यवान वस्तु लाटांवर तरंगत होत्या वादळाने इलिऑनिअस आणि शूर अँकेटीझच्या दोन बळकट गलबतावर हल्ला केला होता. ॲबास आणि वृद्ध ॲलेटीझ असलेल्या दुसऱ्या दोन गलबतांचीही वाट लागली होती. प्रत्येक गलबताच्या फळ्या फुटल्या होत्या. त्यांची भगदाडे रुंदावली आणि कराल समुद्र धो धो आत घुसला.

परंतु या वेळेपावेतो समुद्राच्या गरजत्या खळबळीने आणि त्याच्या शांत गर्भातूनही गरगर फिरणाऱ्या प्रवाहांनी नेपच्यूनला मोकाट सुटलेल्या वादळाची जाणीव करून दिली होती. भयंकर खवळून त्याने आपले डोके समुद्राच्या लाटांच्या-वर काढले; आपली प्रशांत दृष्टी फेकली आणि त्याला खवळलेल्या लाटांनी व कोसळणाऱ्या आकाशाने इनीआसचे आरमार आणि त्याचे ट्रोजन सहप्रवासी उधळून लावलेले दिसले आपल्या खुनशी बहिणीचे जूनोचे कपट कारस्थान त्याला तात्काळ उमगले. पूर्व आणि पश्चिम वाऱ्यांना त्याने आपल्या समोर बोलावले आणि तो त्यांना सुनावू लागला :

'वाऱ्यानों! तुमच्या उच्च कुलाभिमानाची मजल येथवर जाते तर! माझ्या खास अनुमतीशिवाय आकाशात आणि पृथ्वीवर हाहाकार उडविण्याची आणि सागरावर पर्वतप्राय लाटा उठविण्याची तुम्हांला हिंमत होते! थांबा, तुम्हाला दाखवितो! — पण नाही— प्रथम सागरावरील या वादळी लाटा शमविल्या पाहिजेत. आणि नंतर तुमच्या या अधिक्षेपाबद्दल तुम्हांला जबर शासन भोगावे लागेल. जा येथून! ताबडतोब चालते व्हा, आणि तुमच्या त्या राजाला माझा निरोप सांगा. निर्घृण त्रिशूळामुळे प्राप्त होणारी सागरावरची अधिसत्ता ही मला मिळाली होती, त्याला नाही. त्याची सत्ता तुम्हाला आणि पूर्व वाऱ्याला ज्या खडकांतील प्रचंड गुहेत ठेवले आहे तेथे आहे. तीच ईओलसची राजसभा आहे. वाऱ्यांच्या बंदीशाळेचे त्याने व्यवस्थित रक्षण करावे आणि मग आपल्या राज-सत्तेची हवी तेवढी मिजास दाखवावी.' हे बोलणे संपण्याच्या आतच त्याने हेलाव-णारा सागर शांत केला. मेघमंडळाला त्याने उधळून लावले आणि सूर्याला परत आणले. त्याचे हे काम झाल्यावर ट्रायटॉन आणि सायमॉथी यांनी गलबते रेटली आणि तीक्ष्ण खडकांतून सोडवली. आपल्या त्रिशूळाचा टेकू लावून नेपच्यूनने त्यांना मदत केली. लाटांच्या शिखरावरून हळुवारपणे धावणाऱ्या आपल्या रथातून हिंडत त्याने सागर शांत केला, तसे वाळूचे प्रचंड बांध पुन्हा दिसू लागले, हा सर्व प्रकार एकाद्या प्रचंड जनसमुदायात अचानक उद्भवणाऱ्या दंगली सारखा होता. खालच्या थरातील लोक स्वतःचे स्थान विसरुन, सहजस्वभावानुसार, बेभान होऊन भडक-तात आणि लगेच जळते पलिते आणि दगड फेकू लागतात. कारण रानटी भावना भडकल्या म्हणजे त्यांना शस्त्रे सहज सापडतात. मग एखादी आदरणीय, चारित्र्य-संपन्न प्रशंसनीय कर्तृत्ववान व्यक्ति त्यांच्या दृष्टीपथांत येते. तसे झाले म्हणजे ती माणसे शांत होऊन लक्षपूर्वक ऐकून घेतात. ती व्यक्ती त्यांच्याशी बोलते. त्यांचा भावनावेग शांत करते. आणि त्यांच्या कार्यशक्तिना वेगळे वळण लावते.

तसाच हा प्रकार होता. तसाच आता सागरावरील कल्लोळ कमी झाला. सागराधिपती नेपच्यूनने सागरावर एकदाच दृष्टी टाकली. बस्स. आकाश निरभ्र झाले. त्याने घोडे वळवले, लगाम सैल सोडले आणि त्याचा गमनोत्सुक रथ उड्डाण करू लागला.

अगदी थकून गेलेल्या इनीआसने व त्याच्या सोबत्यांनी आपल्या आटोक्यातल्या सर्वात जवळचा किनारा गाठण्याची पराकाष्ठा केली, आफ्रिकेच्या किनाऱ्याच्या रोखाने त्यांनी सुकाणू फिरविले. तिथे एका लांब समुद्रधुनीच्या टोकाला एक निवांत निवारा आहे. समुद्रधुनीच्या तोंडाशी एक बेट आहे. त्यामुळे समुद्राकडून येणारे पाणी दुभंगते आणि दोन प्रवाहांनी बाजूला जाते. समुद्रधुनीच्या दोन्ही तीरांवर खडकांचे धडकी भरविणारे प्रचंड सुळके आकाशांत घुसले आहेत. त्यांच्या छायेतील या विस्तृत खाडीतील पाणी शांत आणि सुरक्षित आहे. पाण्याच्या पलिकडे, किनाऱ्यावरील वृक्षांच्या सळसळत्या पानांचा पडदा खाली उतरणीवर जातो, आणि त्याच्या मागे गूढरम्य, छायाघन, पुढे झुकलेल्या वृक्षवृंदांनी झाकून टाकलेली हिरवी गर्द पर्वतराजी उंचावते. या कड्यांच्या पायथ्याशी, समोरच एक गुहा आहे. त्या गुहेत युगायुगांच्या जलधारांची गोठलेली झुंबरे आणि निर्मल जलप्रवाह आहेत, खडकांत कोरलेली आसने आहेत. तिथे जलपऱ्यांची वस्ती आहे, वादळाने झोडपलेल्या दमवलेल्या गलबताला स्थिरावण्याकरिता दोरखंडाची किंवा आपल्या अणकुचीदार टोकांनी समुद्रतळाची पकड घेणाऱ्या नांगराचीही येथे आवश्यकता नसते. इनीआसने आपल्या आरमारांतील अवघी सात गलबते मोठ्या प्रयासाने पुन: एकत्र केली, आणि त्याने त्या चिंचोळ्या खाडीत प्रवेश केला. कोरड्या जमिनीवर पाय ठेवण्याची ओढ लागलेले ट्रोजन गलबतांतून उतरले आणि पायतळीच्या वाळूच्या स्पर्शाने सुखावले आणि खारे पाणी अंगावरच वाळू देत समुद्र किनाऱ्यावर विसावले. पहिल्या प्रथम अॅकेटीझने चकमकीने ठिणगी पाडली, पाचोळ्यांत ठिणगीने पेट घेतल्यावर त्याभोवती वाळलेली लाकडे रचली व लवकरच ज्वाला पेटल्या. हालअपेष्टांनी इतरजण खूप शिणले होते तरी त्यांनी वादळांतून वाचविलेले परंतु समुद्राच्या पाण्याने खराब झालेले धान्य आणि शिजविण्याकरिता पात्रे आणली. दगडावर धान्य भरडून त्याच्या भाकरी भाजण्याची त्यांनी तयारी केली.

त्यांचा हा उद्योग चालला असता इनीआस एका खडकावर चढला. तिथून दूर समुद्रापलिकडील विस्तृत अखंड दृश्य सरळ समोरच दिसत होते. वादळाने झोडपलेली परंतु अजूनही तरंगणारी काही ट्रोजन गलबते—कदाचित् अँथिअस,

कॅपिस किंवा कायकसचे उंच चित्रांकित वराम असलेले गलबत दिसेल अशी त्याला आशा होती. पण समुद्रावर एकही गलबत नव्हते; मात्र किनाऱ्यावर तीन काळवीट आणि त्यांच्या मागे लांब ओळीत हरिणांचा सबंध कळपच त्या दरीत चरताना त्याला दिसला. तो एकदम थबकला. त्याने चटकन एक धनुष्य आणि निष्ठावंत अॅकेटीझने संभाळून आणलेले गतिमान बाण घेतले. पहिल्या तीन बाणांतच झाडांच्या फांद्यांसारखी उंच शिंगे असलेले ते तीन काळवीट पडले. नंतर तो त्या कळपाकडे वळला. त्याच्या बाणांच्या वर्षावाने गोंधळून तो कळप त्या हिरव्या वनराईत चौखूर उधळला. उर्वरित प्रत्येक गलबताकरिता एक अशी सात धिप्पाड जनावरे हर्षभराने पाडल्या नंतरच इनीआसनें बाणांचा वर्षाव थांबविला. तो बंदराकडे परतला व आपल्या साथीदारांत त्यानें त्यांच्या मांसाची वाटणी केली. त्याचप्रमाणे सिसिलीच्या किनाऱ्यावर गलबतांवर आरूढ होतांना दयाशील अॅसेस्टीझने त्यांना शूरास साजेल अशा औदार्याने दिलेले मद्याचे बुधलेही त्याने आपल्या खलाशांत वाटले, आणि नंतर त्यांचा दुःखपरिहार करण्याकरिता तो म्हणाला :

'माझ्या मित्रांनों, आपण दीर्घकाळ आपत्ती सोसल्या आहेत. त्या आप-ल्याला अपरिचित नाहीत. याहूनही भयंकर संकटे तुम्ही साहिली आहेत. पूर्वी-प्रमाणे आताही दैवीशक्ती तुमच्या संकटाचा अंत करील. जिथे सिलाचे भयंकर पिसाट समुद्रश्वान भुंकतात त्या खडकांमधून तुम्ही आपली. गलबते हाकारली आहेत. अश्मदानव सायक्लोप्सशीही तुम्ही झुंज दिली आहे. तुम्ही आपले दुःख आणि भय सोडून धीर धरला पाहिजे. तुम्ही आतां जे भोगीत आहांत त्याकडे वळून पाहण्यांतही एक दिवस तुम्हांला कदाचित् आनंद वाटेल. पुनः पुनः सर्वस्व पणाला लावून सर्व प्रकारच्या संकटातून आपण मार्ग काढला आहे. पण हा मार्ग लेशिअमकडे जाणारा मार्ग आहे. नियतीदेवतेने आपल्याला तेथे घर आणि विसांवा देऊ केला आहे. तिथे सार्वभौम ट्रॉयला पुनः संजीवनाचा अधिकार प्राप्त होण्याचा संभव आहे म्हणून हिंमत धरा. भल्या दिवसाकरिता शक्ती आणि धीर राखून ठेवा.'

तो हे असे धीराचे शब्द बोलला खरा परंतु अंतर्यामी तो खचून गेला होता. कारण ज्या चिंता तो वाहात होता त्या खरोखरच अवजड होत्या. तरीही त्याने आपले दुःख आंतल्या आत दाबले आणि आत्मनिर्भर आणि आनंदी मुद्रा धारण केली. ज्याची मेजवानी ते लवकरच झोडणार होते त्या शिकारीची व्यवस्था करण्यास आता ट्रोजन सज्ज झाले. काही जणांनी चामडी सोलून काढली आणि

आंतील मांस दिसू लागले. नंतर काही जणांनी त्याचे तुकडे केले, आणि ते थरथरत असतांनाच त्यांत सळया खुपसल्या. कांहींनी ते शिजविण्यासाठी काहिली ठेवण्याकरितां किनाऱ्यावर जागा शोधल्या व त्यांच्याखाली अग्नी पेटविला. नंतर त्यांनी भोजन केले व ते ताजे तवाने झाले. त्यांनी हिरवळीवर आडवे पडून मुरलेल्या मदिरेचे आकंठ प्राशन केल्यावर त्यांनी रुचिर मृगमांसाचे क्षुधातृप्ती होईपर्यंत यथेच्छ सेवन केले. जेवणानंतरची आवराआवर झाल्यावर बराचवेळ ते सागरांत हरपलेल्या आपल्या सहकाऱ्यांविषयी जडमनाने बोलत होते. ते अजूनही सुखरुप असतील ही आशा व कदाचित् त्यांचा अंत झाला असेल आणि ते मानवी हांकेच्या पलिकडे गेले असतील ही भीती अशा दोन भावनांच्या मध्ये ते जणू थबकून उभे होते. सत्यशील इनीआसचे मन सर्वांहून अधिक दुःखी होते.शूर ऑरॉन्टीस आणि ॲमिकस यांच्या दैवगतीच्या विचाराने किंवा त्याचे पराक्रमी मित्र लायकस, गायस आणि क्लोॲन्थस यांच्या दैवदुर्विलासाच्या विचाराने त्याचे मन उसासत होते.

त्यांचे भोजन आतां संपले होते. उच्च स्वर्गातून ज्यूपिटर, ज्यावर शुभ्र शिडांचा संचार चाललेला असतो त्या समुद्राकडे,खालच्या सपाट भूमीकडे, किनाऱ्याकडे व अफाट जगाच्या पाठीवरील राष्ट्रांकडे पहात होता. अवकाशाच्या अत्युच्च शिखरावर तो उभा होता, आणि त्याची दृष्टी राजशाही कार्थेजवर स्थिरावली. या सर्व समस्यांचा तो गंभीरपणे विचार करीत असतां व्हीनस त्याला एकाएकी म्हणाली : 'अनाद्यनंत संकेतानुसार मृत्युलोकावरील आणि स्वर्गातील जीवमात्राच्या नियंत्या, प्रभो,' बोलत असतांना दुःखाने ती खिन्न झाली होती आणि तिच्या चमकणाऱ्या नेत्रांत अश्रू उभे राहिले. 'तुझ्या विद्युद्रुपी वज्रानेही आम्हांला धडकी भरते. माझा प्रिय पुत्र इनीआस आणि त्याचे ट्रोजन यांनी तुझा असा कोणता भयंकर अपराध केला असेल बरे ? मृत्यू पुन्हा पुन्हा त्यांच्यापुढे उभा ठाकला आहे. आणि आतां ते इटलीकडे निघाले म्हणून सारें जग त्यांना बंद झाले आहे. याच ट्रोजनांचे वंशज, ज्यांच्या धमन्यांतून टयूसेरचे पुन्हा एकवार दमदार बनलेले रक्त वाहत असेल आणि जे लोकनायक बनतील ते रोमन लोक कालांतराने सागरावर आणि जमिनीवर साम्राज्य करतील असे तुम्ही मला अभिवचन दिले होते. बाबा, कुठल्या विचाराने तुमच्या मनाचा कल आता पालटला आहे? ट्रॉयचा भयानक सर्वनाश झाला तेव्हां तुमच्या या अभिवचनानेच माझा शोक मी आवरला होता. कारण त्या सर्वनाशाच्या दुर्दैवाची भरपाई या नव्या विधिलेखाने होणार होती, हे मला जोखतां येत होते. परंतु ट्रोजन आता तर एका संकटातून

दुसऱ्या भयंकर संकटात लोटले जात आहेत. तेच दुर्दैव त्यांचा अजूनही पाठपुरावा करीत आहे. हे सर्वसत्ताधीश सम्राटा, त्यांच्या या भयंकर दिव्यांची तू कशी सांगता करणार आहेस ? अँटेनॉर प्रत्यक्ष ग्रीक सैन्याच्या फळीतून निसटला आणि ॲड्रिॲटिक समुद्राच्या उत्तर टोंकाशी जिथे लायबर्निअनांची सत्ता आहे, जेथे टायमॅक्स नदीच्या नऊ मुखांतून सागराच्या लाटा भूगर्भातील गव्हरांतून खळाळून उसळत असतात आणि सागराची गर्जना भूमीवरील कुरणांतही ऐकूं येते, तेथपर्यंत सुखरूप पोहोचण्यात त्याने यश मिळविले. आणि इतकेच नव्हे तर जेथे ट्रोजनांना वसाहत करतां येईल अशी जागा त्याने शोधून काढली आणि तिथे पॅड्यूआनगरी वसविली. तेथील नागरिकांना त्याने ट्रोजन नांव दिले, आणि भिंतींवर ट्रोजनांची शस्त्रे लटकविली. तेथे तो सर्व विपत्तींपासून मुक्त होऊन सुखासमाधानाने नांदत आहे. आणि आम्ही, साक्षात् तुझी अपत्ये, ज्यांना स्वर्ग दुर्गावरही आरोहण करण्याची तुझी स्वतःची अनुज्ञा आहे त्यांचा मात्र केवळ एका व्यक्तीच्या क्रोधामुळें अत्यंत क्रूर विश्वासघात झाला आहे. आमची गलबते नष्ट झाली आहेत. आणि आम्ही इटलीच्या किनाऱ्यापासून दूर फेंकलो गेलो आहोत. तुमच्यावरच्या आमच्या भक्तीचे तुम्ही हेच का फल आम्हांला देणार आहात ? आम्हांला जे राजपद मिळायचे आहे त्यावर तुम्ही आम्हांला ह्या रीतीने बसवणार आहात काय ?'

देवामानवांच्या पित्यानें तिजकडे पाहून स्मित केले. याच स्मिताने वादळ शांत होत असत, आकाश निवळत असे. तिचे मस्तकावघ्राण करून तो म्हणाला : सिथेरिअन, मुली, भिऊं नको. तुझ्या माणसांचे भवितव्य सुरक्षित आहे. त्यामध्ये कांहीही व्यत्यय येणार नाही. तुझी नगरी तू पाहशील. लॅव्हिनिअमच्या तटाच्या भिंती तू पाहशील. मी तुला तसे अभिवचनच दिले आहे. आणि थोर अंतःकरणाच्या इनीआसची कीर्ती तू गगनापर्यंत उंचविशील. कोणत्याही विचारामुळे माझ्या मनाची चलबिचल झालेली नाही. पण आतां, त्याच्या विषयीच्या चिंतेमुळें तुला इतकी टोचणी लागली आहे म्हणून, अधिक दूरचे भविष्य मी तुला सांगतो आणि देवतांची नोंदपत्रे उलटून त्यातील गुपिते उघड करतो, ऐक ! इटलीमध्ये इनीआस एक मोठे युध्द करील आणि दुराभिमानी लोकांचे पारिपत्य करील. त्याच्या योध्दयांकरिता तो जीवनाचा एक नवा मार्ग—प्रस्थापित करील. आणि त्यांच्या संरक्षणाकरिता तो तट बांधील. लॅशिअमवर त्याची सत्ता सुरू झाल्यानंतर तीन उन्हाळे आणि रटलिअनांवरच्या विजयानंतर तीन हिवाळे छावणीत काढीपर्यंत तो राहील. परंतु त्याचा तरुण पुत्र ॲसकॅनिअस, ज्याला 'आयुलस'

हें दुसरे नामाभिधान प्राप्त झाले आहे आणि जो इलिअमचे सार्वभौमत्व अबाधित होते तोवर 'आयलस' म्हणून ओळखला जात होता तो प्रत्येक भ्रमण करणारा महिना राजशाही दिमाखाने गाजवीत, संपवीत तो पूर्ण तीस वर्षे राज्यसत्ता गाजवील, कार्यरत व सामर्थ्यशाली आयुलस आल्बा लाँगाची मजबूत बांधणी करील. आणि लॅव्हिनिअम येथून आपली जुनी राजधानी तेथे हलवील. हेक्टरच्या आप्तांच्या एका राजवंशाची सत्ता तेथे राहील. या राजवंशातील इलिआ या जोगिणीस मार्सपासून जुळी मुले होईपर्यंत म्हणजे तीनशे वर्षे या वंशातील राज तेथे राज्य करतील. त्यानंतर लांडग्याने पालन केलेला, लांडग्याची लाल तपकिरी कातडी परिधान केल्यामुळे उठून दिसणारा रोम्युलस गादीवर येईल, तो मार्सच्या नावाखाली तटबंदी बांधील आणि आपल्या लोकांना 'रोमन' असे स्वतःच्या नावाच्या अनुरोधाने संबोधील. रोमनांच्या सत्तेला मी देश कालाच्या मर्यादा घालीत नाही. त्यांना मी सर्वसत्ता बहाल केली आहे. आणि तिला अंत असणार नाही. जी क्रुद्ध जूनो सध्यां समुद्र, पृथ्वी आणि आकाश यांची भयाने गाळण उडवीत आहे त्या जूनोला ही तिची योजना — बदलावी लागेल. ती आणि मी टोगा परिधान करणाऱ्या ह्या राष्ट्राला, या रोमन राष्ट्राला जोपासून पृथ्वीचा स्वामी करू हा माझा आदेश आहे. पांच वर्षांचे कालखंड एका पाठोपाठ सरतील आणि नव्या युगाचा आरंभ होईल. अॅसॅरॅकसचे घराणे फिथियाचा आणि कीर्तीमान मायसीनीचा पाडाव करतील. अॅरगॉस जिंकतील आणि तेथे सत्ता गाजवतील. आणि नंतर ट्रॉयच्या उच्च कुलात सीझरचा जन्म होईल. त्याचे अधिराज्य समुद्रापलीकडे आणि त्याची कीर्ती नक्षत्रखचित आकाशापर्यन्त पसरेल. 'ज्युलिअस' हे त्याच्या थोर पूर्वजाचे– 'आयुलसचे' नांव त्याला प्राप्त होईल. पूर्वेकडील लुटीने गौरववृद्धी झालेल्या ज्युलिअसचे तूच एक दिवस स्नेहपूर्ण चित्ताने स्वर्गांत स्वागत करशील. लोक आपली प्रार्थना ऐकण्यासाठी त्यालासुद्धा साकडे घालतील नंतर ही आमची प्रक्षुब्ध शतके युद्धव्यग्र शस्त्रे खाली ठेवतील. आणि दयामय होतील. शुभ्र केस असलेली फायडेलिटी, व्हेस्टा या देवता, व सहाय्यक क्विराईन रोम्युलस आणि त्याचा बंधु रीमस कायदेकानु करतील. युद्धाची भयंकर लोखंडी कवाडे बंद होतील; आणि निर्घृण शस्त्रांच्या ढिगाऱ्यावर टेकून, रक्ताळलेल्या मुखाने गर्जना करणारी परंतु ब्राँझच्या शेंकडो साखळदंडांनी पाठीमागे जेरबंद केलेली, राक्षसी आणि पिसाट रक्तपिपासा, त्या कवडाआड सुरक्षितपणे बंदिवान होईल.

त्याने असे भविष्य कथन केले आणि मईआचा पुत्र मरक्युरी ह्याला भूलोकांवर पाठविले; हेतू हा की आफ्रिकी प्रदेश आणि विशेषतः कार्थेज व

त्याची नवी उभी केलेली तटबंदी ट्रोजनांचें अतिथी म्हणून स्वागत करण्यास खुली असावी, आणि डायडोने ज्यूपिटर निर्मित योजनेच्या अज्ञानामुळें त्यांना आपल्या प्रदेशांत येण्यास प्रतिबंध करू नये. आपल्या पंखांचा वल्ह्याप्रमाणे उपयोग करीत मक्युरीने विशाल आकाशांतून झेप घेतली. निमिषार्धात तो आफ्रिकेच्या किनाऱ्यावर पोचला. ज्यूपिटरच्या आज्ञा त्याने पार पाडल्या आणि कार्थेजि-अनांनी त्याच्या दैवी इच्छेनुसार वैरभावना मनांतून दूर सारली; विशेषत: राणी डायडोच्या ठायी त्याने ट्रोजनांविषयी सहिष्णुता आणि सद्भावना निर्माण केली.

रात्र विचारांत घालविल्यानंतर सत्यशील इनीआॅसने पहाटेच्या प्रसन्न-वातावरणांत नवीन प्रदेशाची पाहणी करण्याचे ठरविले. वादळाने आपल्याला कोणत्या किनाऱ्याला लावले आहे; तेथील जमीन मशागतीतील नव्हती, म्हणून तेथे कोणते प्राणी राहतात, माणसे की रानटी पशु याची नेमकी माहिती आपल्या सोबत्यांना द्यावी असा त्याचा उद्देश होता. वृक्षांच्या निबिड छायेत त्याने आपली गलबते लपवून ठेवली. तेथें भोवताली वनराजीनी आच्छादित उंचवट होते व वरून डोंगरांचे कडे झेपावले होते. एकट्या ॲकेटीझला बरोबर घेऊन तो बाहेर पडला. रुंद लोखंडी टोकाचे दोन शिकारीचे भाले त्याच्या हातात थरथरत होते. या वृक्षांच्या छायेत– त्याची आई त्याला भेटली. तिचे रूप आणि वस्त्रे नवयौवनेची होती. शस्त्रेही तशीच होती. एखाद्या स्पार्टन युवतीसारखी किंवा घोड्यांनाही दमवून मागें टाकणाऱ्या, किंवा गतिमान हीब्रस नदीहूनही अधिक वेगाने धावणाऱ्या त्या थ्रेशियन हॅरपॅलिसी सारखी ती होती. मृगया-निपुण शिकाऱ्याप्रमाणे तिने आपल्या खांद्यावर सिद्धचाप लटकविले होते. तिचे केस वाऱ्यावर भुरभुरत होते. तिच्या वाऱ्यावर झुळझुळणाऱ्या कुडत्याच्या लांब-सडक चुण्या एकत्र करुन बांधलेल्या होत्या. तिचे गुडघे उघडेच होते. ती प्रथम बोलली. 'अहो, तरुण महाशय, तुम्हाला माझी एक बहीण कोठे दिसली काय? तिने चित्याच्या कातड्याचा ठिपके असलेला झगा घातला आहे, आणि तिच्या पाठीवर बाणांचा भाता आहे.. ती इथेच भटकत असावी किंवा एकाद्या फेसाच्या शितोड्यांनी आच्छादलेल्या वराहाच्या मागावर हाका घालीत असेल. पाहिली असलीत तर कुठे ते मला सांगा.'

व्हीनस असे म्हणाली आणि तिचा पुत्र उत्तर देऊ लागला, 'नाही; तुझी कोणतीही बहीण मला दिसली नाही. आणि तिचा आवाजही माझ्या कानी आला नाही.' हे युवती पण–मी तुला कसे संबोधू? तुझे रूप मानवी नाही आणि तुझा

आवाजाचे स्वरही मानवी नाहीत. देवते! तू खचित देवताच असावीस. तू अपॉ-लोची बहीण तर नाहीस? किंवा कुणा अप्सरांची एखादी आप्त? तू कुणीही ऐस, आमच्या आपत्तींतून आमची सुटका करण्याकरितां तुझ्या कृपेची मी याचना करतो. कृपा करून आम्ही कोठल्या आकाशाखाली उभे आहोत, कोणत्या देशाच्या किनाऱ्याला लागलो आहोत ते सांग. राक्षसी लाटांच्या उन्मत्त वादळाने आम्हाला येथे हाकलून आणले आहे आम्ही कोठे आहोत, येथील रहिवासी कोण आहेत हे माहित नसल्यामुळे आम्ही आता येथे भटकत आहोत. तू आम्हांला सांगितलेस तर तुला आम्ही अनेक बळी देऊ. तुझ्या वेदीवर आत्ता ते मरून पडतील."

आणि व्हीनस म्हणाली, 'अशा प्रकारच्या सन्मानाला पात्र अशी मी कोणी नाही, बाणांचा भाता धारण करण्याची व उंच, वरपर्यंत बांधलेल्या फितांचे गर्द-लाल शिकारी चढाव वापरण्याची कार्थेजीनिअन युवतींची ही नेहमीचीच पद्धत आहे. हा जो प्रदेश तुम्हांला दिसत आहे त्यावर टायरमधील फिनीशिअनांची सत्ता असून अॅगेनॉर घराण्याचे ह्या नगरावर राज्य आहे. पण त्यांच्या भोंवती आफ्रिका खंड आहे, आणि आफ्रिकनांना लढाईत जिंकणे शक्य नाही. राणी डायडो आपल्या भावापासून सुटका करून घेण्याकरिता टायरहून येथे आली आणि आमच्या या नगराचे राज्य तिच्या सल्ल्याने चालते. ती एक तिच्यावर झालेल्या अन्यायाची मोठी आणि गुंतागुंतीची कहाणी आहे परंतु त्या इतिहासातील मह-त्वाच्या घटना मी तुम्हांला सांगते.'

डायडोचा विवाह सायकिअसशी झाला होता. सर्व फिनीशिअनांमध्ये त्याची सर्वात अधिक जमीन होती. आणि दुर्दैवाने तिचे त्याच्यावर उत्कट प्रेम होते. तिच्या पित्याने तिला त्याला दिले तेव्हां ती लहान वयाची होती. तो तिचा प्रथम विवाह होता. तिचा भाऊ पिग्मॅलिअन त्यावेळी टायरच्या गादीवर होता. तो एक अजोड दुष्ट प्रवृत्तीचा राक्षस होता. त्या दोघांमध्ये विनाशकारी संघर्ष निर्माण झाला. पिग्मॅलिअन संपत्तीच्या अभिलाषेने इतका आंधळा झाला होता की एका पवित्र धार्मिक समारंभाचे समयी दबा धरून बसून, सायकिअसला तो बेसावध असतांना त्याने कट्यारीने भोसकून ठार मारण्याचे महापातक केले. परंतु आपल्या बहिणीच्या प्रेमाच्या सामर्थ्याची भीती बाळगायला पाहिजे हे तो विसरला. बराच काळ पिग्मॅलिअनने आपले पापकर्म लपविले. डायडोला अनेक खोटया सबबी सांगून त्याने तिच्या मनांत आशा निर्माण केली, तिच्या हृदयव्यथित कर-णाऱ्या चिंतेला क्रूर फसवणुकीने झुलविले. पुढे ती निद्रिस्त असता सायकिअसचा भूतात्मा तिच्या स्वप्नांत आला. त्याच्या देहाचे दफन अजूनही झाले नव्हते. त्याचा

भयप्रद पांढरा फटफटीत चेहरा तिच्या दृष्टीपुढे आला. त्या धार्मिक विधीच्या प्रसंगी आपली पाशवी हत्या कशी केली गेली ते त्या भुतात्म्याने उघड केले. छातीतील कटचारीच्या जखमा तिला दाखविल्या आणि राजवाड्यांतील सर्व दुष्ट कपटांचा भेद केला. त्याने तिला मायदेश सोडून तात्काल दूर निघून जाण्याचा आग्रह केला. तिच्या प्रवासासाठी उपयोगी पडावे म्हणून दीर्घकाल भूगर्भात गुप्त राहिलेल्या विस्मृत, विपुल धनाची तिला माहिती दिली. या दृश्याने डायडोला धक्का बसला व ती प्रयाणाची तयारी करू लागली. तिने आपल्या बरोबर नेण्यासाठी दुष्ट राजा पिग्मॅलिअनचा आत्यंतिक तिरस्कार करणारी व त्याचे तीव्र भय बाळगणारी माणसे जमविली. सर्व एकत्र येऊन त्यांनी समुद्रपर्यटनास सिद्ध असलेली जहाजे घाईघाईने ताब्यात घेतली आणि त्यावर तो खजिना चढविला. कृपण पिग्मॅलिअन संपत्तीच्या साठ्याला मुकला कारण तो जहाजांतून समुद्रपार झाला होता. आणि या समग्र मोहिमेचे नेतृत्व एका स्त्रीने केले होते. ती माणसे येथे आली. नव्या नगरीच्या, कार्थेजच्या तटबंदीच्या भव्य भिंती, आणि तिच्या किल्ल्याचे चालू असलेले बांधकाम तुम्हाला आताच दिसत आहे. एका बैलाच्या संपूर्ण खालीत जेवढी जमीन वेढून घेता येईल तेवढी जमीन त्यांनी विकत घेतली त्या घटनेपासून अजूनही त्या जमिनीला 'खाल' असेच म्हणतात. परंतु मला हे सांगा, तुम्ही कोण आहात, कोणत्या देशातून आलात आणि कोठे जाणार आहात.'

या प्रश्नाचे उत्तर देतांना इनिआसच्या अंतःकरणातून एक खोल निःश्वास उमटला, 'हे देवते,मी जर मुळापासून आमच्या आपत्तींचा आणि दिव्यांचा इतिहास सांगितला,आणि तुला ऐकावयास वेळ असला तर त्याचा शेवट होण्यापूर्वीच सायंतारा आकाशाची कवाडे बंद करील आणि दिवस झोपी जाईल. तुझ्या कानावर कधी पुरातन ट्रॉय नगरीचे नांव आले असेल तर ती नगरी सोडल्यापासून आम्ही अनेक अज्ञात सागरांतून भटकत आहोत. आणि शेवटी लहरी वादळाने आम्हांला आफ्रिकी किनाऱ्याला लावले आहे. मी इनीआॅस आहे. मला सत्यशील म्हणतात. शत्रूपासून रक्षिलेली माझी कुलदैवते मी माझ्या गलबतांतून नेत आहे. माझी कीर्ती दिगंती पसरलेली आहे. आणि जेथे जोव्हपासून माझ्या कुलाचा प्रारंभ झाला त्या इटलीच्या शोधांत मी आहे. मी माझ्या प्रारब्धाने नियत केलेला मार्ग आक्रमीत आहे माझ्या दैवी मातेने मार्गदर्शन केल्याप्रमाणे — फ्रिजिअन सागरांत मी वीस गलबतांसह प्रवेश केला. त्यांतून, पूर्ववाऱ्यापासून आणि सागराच्या वादळी लाटापासून वाचविलेली केवळ सातच गलबते शिल्लक आहेत. प्रथम आशियातून, नंतर युरोपमधून गृहहीन होऊन मी येथे आफ्रिकेच्या उजाड प्रदेशात अनोळखी असा दैन्यावस्थेत भटकत आहे.'

परंतु त्याची गाऱ्हाणी अधिक ऐकण्याची व्हीनसची इच्छा नव्हती. त्याची शोकगाथा मध्येच थांबवून ती म्हणाली, 'तुम्ही कुणीही असा, मला वाटते स्वर्गस्थ देवांना तुमच्याविषयी खचित अप्रीती नसावी. तुम्ही अजून जिवंत आहात; टायरांच्या नगरीत आलेले आहांत; याच मार्गाने राणीच्या प्रासादाच्या प्रवेश-द्वाराशी जा. कारण मी तुम्हाला हे सांगू शकते की उत्तरेकडे वळून वाऱ्यांनी आपली दिशा उलटया बाजूकडे बदलली आहे. तुमची जहाजे सुरक्षित स्थळी आली आहेत. तुमचे सहकारी तुमच्याकडे परतले आहेत. असे घडले नसेल तर माझ्या मात्यापित्यांचे प्रतिपादन खोटे होते आणि त्यांनी मला दिलेले भविष्यकथनाचे पाठ अयशस्वी झाले असे म्हणावे लागेल. आनंदाने एका पंक्तीत भ्रमण करणारे ते बारा राजहंस पहा. ज्यूपिटरचा गरूड उंच आकाशांतून खाली झेपावला होता आणि आताच त्या राजहंसांचा आकाशातून आरपार पाठलाग करीत होता. तरीही त्यातील काही हंस भूमीवर उतरतांना दिसत आहेत. बाकीचे काही, जिथे हे हंस आताच विसावले आहेत त्या भूमीकडे आकाशातून पाहत आहेत. जसे हे आनंदाने पंख फडफडणारे हंस सुरक्षित परतले आहेत आणि कांही उंच आकाशात मोठ्याने शब्द करीत मुक्त विहार करीत आहेत तशी तुमचीही कांही जहाजे ट्रोजन खलाशांसहित बंदरात सुरक्षित आहेत. उरलेली शिडांत वारा भरून बंद-राच्या मुखाजवळ येत आहेत. म्हणून तुमचे भ्रमण असेच चालू ठेवा आणि ही वाट नेईल तिकडे जा.

असे म्हणून व्हीनस परतली तेव्हां तिचे रूप दैदीप्यमान झाले. तिच्या कंठावर गुलाबी कांती पसरली व स्वर्गीय सुगंधाची लहर तिच्या दैवी केशसंभारातून दरवळली. तिचे वस्त्र पायापर्यंत खाली ओघळले आणि तिच्या केवळ पदन्यासा-वरूनच ती देवता आहे हे स्पष्ट झाले. इनीआसने आपल्या मातेला ओळखले आणि ती अदृश्य होत असतांनाच त्याची हांक तिच्या मागोमाग दौडत गेली. 'अरेरे, तू सुद्धां कठोर आहेस! पुन: पुन: तू अशा फसव्या रुपांतरांनी का तुझ्या प्रत्यक्ष पुत्राची वंचना करतेस? तुझ्या हातांत हात देऊन मोकळेपणाने मी तुझे शब्द का ऐकू नयेत? आणि मी तशाच मोकळ्या मनाने तुझ्याशी का बोलू नये?'

तिला असे अधिक्षेपाने बोलून तो नगरीच्या तटाच्या दिशेने चालू लागला. व्हीनसने आपल्या दैवी शक्तीने त्या दोघां ट्रोजनांना, कुणी पाहू नये किंवा स्पर्श करू नये, अटकाव करू नये किंवा ते तेथे का आले असे विचारू नये म्हणून दाट धुके त्यांच्या भोवती पसरविले व घन अशा ढगांच्या आवरणाने त्यांना वेढून घेतले आणि ती स्वत: उंच आकाशांत भ्रमण करीत पॅफॉसकडे निघाली. आनंदाने ती

आपल्या प्रासादात परतली. तिथे तिचे मंदिर आहे आणि त्या मंदिरात शंभर वेदी शिबाच्या धुपाने नित्य धगधगत असतात आणि ताज्या फुलांच्या मालांचा सुगंध सतत दरवळत असतो.

मध्यंतरी आपला नेमलेला मार्ग अनुसरीत ट्रोजन लोक लगबगीने चालू लागले. आता ते एक नगरीवर झुकलेली भली मोठी, उंच टेकडी चढत होते. त्या टेकडीवरून पायथ्याशी असलेल्या तटबद्ध नगरीचे दृश्य दिसत होते. जिथे पूर्वी आफ्रिकी लोकांच्या फक्त झोपड्याच होत्या,तिथे उभविल्या जाणाऱ्या भव्य इमारती, प्रवेशद्वारे, फरसबंदी केलेले राजमार्ग व त्यावरील वर्दळ इनीआस आश्चर्यचकित होऊन पाहू लागला. टायरिअन लोक कामाच्या गडबडीत लगबगीने वावरत होते. कांही भिंतींकरिता रेषा आखीत होते, आणि प्रयासपूर्वक बांधीत असलेल्या आपल्या बालेकिल्ल्याकरिता उतरणीवरून दगड वर खेचीत होते. काही इमारतीसाठी योग्य स्थळ शोधून तिच्या आराखड्यांच्या बाह्यरेषा नांगरांनी सरी पाडून खोदीत होते. आणि ज्यांचा मान राखला जाईल असे कायदे करीत होते आणि राज्यव्यवस्थेसाठी अधिकारी तसेच लोकप्रतिनिधी निवडीत होते. एका ठिकाणी बंदराकरितां जमीन खोदण्याचे काम चालू होते. दुसरीकडे एक तुकडी नाट्यगृहाकरिता खोल पाया काढण्याकरितां जमिनीची आखणी करीत होती. संकल्पित रंगमंचाच्या बाजूंना उभे करण्याकरितां भव्य उंच आणि सुंदर खांब दगडाच्या खाणींतून खोदून कापून काढीत होते. ग्रीष्म ऋतूच्या शांत प्रारंभकालांत, सूर्यप्रकाशाने न्हालेल्या आणि फुलांनी बहरलेल्या वनप्रदेशांत, मधमाशा जशा कामात गुंग असतात, मधमाशांची पूर्ण वाढलेली नवी पिढी उघड्यावर मोकळ्या हवेत संभाळून आणीत असतात; पोळ्यांमधल्या फुगत चाललेल्या एकेका घरांत स्वच्छ पारदर्शक मध ओतीत असतात आणि अशा रीतीने सांभाळून त्यांना गोड अमृताने तुडुंब भरीत असतात, किंवा मध गोळा करून आणण्यासाठी नेमलेल्या मधमाशांनी आणलेला मधाचा भार स्वीकारीत असतात, किंवा आपल्या क्षेत्रातून ऐदी नरांच्या झुंडी हुसकावून लावण्याकरितां व्यूहरचना करीत असतात. तशीच टायरिअनांची कार्यमग्नता भासत होती. सगळीकडे कामाला उधाण आलेले असते आणि दवण्याच्या सुगंधासह मधुगंधही दरवळत असतो.

इनीआसने त्या वास्तुकडे वरपर्यंत दृष्टी टाकली आणि तो उद्गारला, 'अहा ! तुम्ही भाग्यवान आहांत! कारण तुमच्या नगरीच्या भिंती आतापासूनच उंचावू लागल्या आहेत. चमत्कृतीने संरक्षणासाठी निर्माण झालेल्या धुक्याच्या अवगुंठनात तो जनसमुहातून पुढे चालला. कार्थेजच्या लोकांत मिसळूनही त्याला कोणी पाहू शकत नव्हते.

नगरमध्यावर दाट छाया देणारी वृक्षराई होती. वादळी पर्यटनामुळे हादरलेल्या फिनिशिअनांना येथेच जमीन खणतांना एक प्रतीक सांपडले होते. जूनोने आपल्या दिव्य ज्ञानाने त्यासंबंधी पूर्वीच भाकित केले होते. ते एका तेज घोड्याचे शिर होते. हे राष्ट्र युद्धांत असाधारण यश संपादन करील आणि तेथे शेकडो वर्षे समृद्धी नांदेल असा त्या प्रतीकाचा अभिप्राय होता. त्याच जागेवर फिनिशिअन डायडो जूनोचे एक वैभवशाली भव्य मंदिर उभविण्यास प्रारंभ करीत होती. त्यातल्या भक्तीने अर्पण केलेल्या वस्तु बहुमोल होत्या. तेथे त्या देवतेच्या समर्थ अस्तित्वाचा साक्षात्कार होत होता. त्या मंदिराच्या पायऱ्या ब्रॉंझच्या उंच उंबऱ्यापर्यंत गेल्या होत्या, तुळया ब्रॉंझमध्ये बसविल्या होत्या. दरवाजे ब्रॉंझचे होते व त्यांच्या वजनामुळे त्यांच्या बिजागऱ्या कुरकुरत असत. या राईत इनीआसला एक विलक्षण अनुभूती झाली. त्याच्या मनांतील भय प्रथमच शमले; आणि आपत्तीत असूनही जीवनाविषयी आशा बाळगण्याचा आणि काहीशी उमेद धरण्याचा त्याला प्रथमच धीर झाला. त्याचे कारण असे होते की राणीची प्रतीक्षा करीत असतां त्या महामंदिरांतील सर्व गोष्टींचे त्याने अवधानपूर्वक अवलोकन केले. नगरीचे वैभव, कारागिरांचे अहमहमिकेचे उच्च कौशल्य आणि शिल्पाची भव्यता यांचे त्याला आश्चर्य वाटले. ट्रोजन युद्धाच्या, इलिअमच्या परिसरांत होऊन गेलेल्या सर्व लढायांचा यथाक्रम चित्रपट त्याला तेथे दिसला. कारण त्यांची कीर्ती सर्व पृथ्वीतलावर पसरली होती. ॲगमेमनॉन आणि मेनेलॉस तेथे होते. आणि प्रायमही. आणि या तिघांच्याही बाबतीत निर्दय असलेला ॲकिलीझही तेथे होता. इनीआस थबकला, त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले आणि तो उद्गारला, 'ॲकेटीझ! जगाच्या पाठीवर असा एक तरी देश किंवा स्थळ आहे का की जेथे आपल्या विपत्तींचा वृत्तांत पोहोचला नाही? हा येथे प्रायम पाहा. येथेही माणसाच्या थोर सद्गुणांना मान आहे. जगताच्या दुःखाविषयी दया आहे. अल्पजीवी मानवतेविषयी सहानुभूती आहे. सर्व भय दूर सार. तुजविषयी जी समज येथे व्यक्त झाली आहे तीच तुला तारण्यास साहाय्य करणार आहे.' असे तो म्हणाला. ती तर केवळ चित्रकृतीच होती. तरीही खोल निश्वास टाकीत आपले विचार त्याने त्यांच्यावर खिळू दिले. आणि त्याचे मुख अश्रुधारांनी ओले झाले. त्याच्या मनःचक्षूंसमोर ट्रॉयच्या तटबंदी भोवती लढणारे शत्रु पुनः उभे राहिले. एका बाजूस ट्रॉयच्या शूर योद्ध्यांनी चढविलेल्या हल्ल्यापुढे पळून जाणारे ग्रीक दिसत होते तर दुसऱ्या बाजूस माघार घेणारे ट्रोजन होते आणि शिरस्त्राण घातलेला रथारूढ ॲकिलीज त्यांचा पाठलाग करीत होता. अश्रूंमधूनच त्याने, दुसऱ्या दृश्यांतील, पूर्वरात्रीच्या निद्रासमयी फितुरीमुळे डायमिडच्या हाती पडलेले आणि त्याने उद्ध्वस्त केलेले

ऱ्हीससच्या छावणीतील हिमासारखे शुभ्र तंबू ओळखले, आणि त्या दृश्यांत त्या भयंकर संहारानंतर रक्ताने माखलेला खुद्द डायमिडही चित्रित केला होता. ट्रॉयमधील चारा चाखण्यापूर्वीच किंवा झान्थसचे पाणी पिण्यापूर्वीच तिथले तेज घोडे तो ग्रीकांच्या छावणीकडे पिटाळून लावीत होता. दुसरीकडे आपल्यापेक्षा कितीतरी जास्त पराक्रमी अशा ॲकिलीझबरोबर लढणारा आणि त्याच्यापुढून पळ काढणारा बिचारा तरुण ट्रॉयलस चित्रित केला होता. त्याची शस्त्रे इतस्ततः विखुरली होतीं, घोडे उधळले होते, व रिकाम्या रथातून लोंबकळत तो पाठीवर फरपटत होता. तरीही लगाम त्याच्या हातांत होता, मान आणि केस जमिनीवर फरपटत होते आणि त्याचा पाठीमागे रोखलेला भाला मागे धुळीत रेषा ओढीत होता. त्याच सुमारास ट्रॉयच्या स्त्रिया केस मोकळे सोडून प्रार्थना व शोक करीत जमावाने रस्त्याने चालल्या होत्या. त्या तळहातांनी वक्षावर ताडन करीत पॅलसच्या मंदिराकडे, तिला अर्पण करण्याकरिता बरोबर एक महावस्त्र घेऊन त्या निघाल्या होत्या. पण ती निःपक्षपाती नव्हती. कारण ती तोंड फिरवून जमिनीकडे पाहत होती. ॲकिलीझचे आणखी एक चित्र रंगवले होते. आपल्या रथामागून तीन वेळा इलिअमच्या तटाभोवती फरपटत नेलेले हेक्टरचे प्रेत तो सुवर्णाच्या मोबदल्यांत विकीत आहे असे त्यांत दाखविले होते. आपल्या शस्त्रविहीन आणि रथविहीन मित्राचे निष्प्राण शरीर आणि प्रायमने याचनेने पसरलेले निशस्त्र हात पाहून इनीआसने एक दीर्घ विदारक उसासा सोडला. ग्रीक सेनांनीबरोबर निकराने लढत असलेल्या आपल्या स्वतःचे चित्रही त्याने ओळखले. आपली देवदत्त शस्त्रें धारण करून पूर्वेकडील सैन्याचे नेतृत्व करणारा कृष्णवर्ण मेम्नॉन व त्याच्या लढणाऱ्या सैन्याच्या फळ्याही त्याला दिसल्या. आणि चंद्रकलाकृती ढाली घेऊन हल्ला चढविणाऱ्या ॲमेझॉनच्या सेनेचे नेतृत्व करणारी युद्धाने बेभान झालेली पेन्थेसिलीही एका चित्रांत होती. हजारो योद्ध्यांमध्यें ती तळपत होती. तिचे अनावृत वक्ष आणि त्याखालील सुवर्णमेखला दिसत होती. ही वीरकन्या योद्ध्यांबरोबर झुंज करण्याचे साहस करीत होती.

डार्डन इनीआसची दृष्टी त्या चित्रांवरच अचंब्याने खिळली होती, तो ती ट्रॉयची दृश्यें स्तिमित होऊन, गुंग होऊन एकाग्रतेने पाहात असतांनाच स्वतः लावण्यमयी राणी डायडो युवकांच्या मोठ्या लवाजम्यांसह मोठ्या थाटांत मंदिराकडे आली. आपल्या डाव्या उजव्या बाजूला हजारों गिरिदेवतांचे थवे घेऊन, युरोटसच्या किनाऱ्यांवर किंवा सिन्थसच्या उतरणीवर आपल्या नर्तकींना नृत्य करावयाला लावतांना डायना जशी दिसते तशी डायडो दिसत होती. इतर सर्व

देवतांहून डायना उंच आहे. खांद्यावर बाणांचा भाता लटकवून ती डौलाने मार्ग आक्रमते त्यावेळी लॅटोनाचे हृदय शब्दातीत आनंदाने भरून येते. डायडो तिच्या-सारखीच होती. तिच्यासारखीच डायडो आनंदाने आपल्या भोवतालच्या प्रजा-जनांसमवेत चालली होती. आपल्या भावी राज्याच्या रचनेचे कार्य लवकर पूर्ण करण्याची तिची मनीषा होती. देवतेच्या गाभाऱ्याच्या प्रवेशद्वाराला सन्मुख होऊन मंदिराच्या घुमटाखाली केंद्रस्थानी ती एका उच्चासनावर विराजमान झाली. तिच्या भोवती तिचे सशस्त्र रक्षक होते. लगोलग ती आपल्या प्रजाजनांकरितां नवीन दंडक व नियम घोषित करीत असतां आणि आपल्या समतोल न्यायबुद्धीने किंवा चिठ्ठ्या टाकून त्यांच्याकडून अपेक्षित असलेल्या श्रमाची योग्य विभागणी करीत असतां इनीआसला त्यांच्याकडेच येत असलेली अँथिअस, सर्जिस्टस आणि धैर्यवान क्लोन्थस आणि त्यांच्या मागून येणारी काळ्याकुट्ट वादळाने समुद्रावर पांगून दूरच्या किनाऱ्याला लागलेली ट्रोजन मंडळी आणि त्यांच्याही मागून येणारा मोठा जन-समुदाय अचानक दिसला, या दृश्याने इनीआस आणि ॲकेटीझ आश्चर्यचकित होऊन थबकले. ते अत्यंत आनंदित झाले होते पण थोडेसे चिंताव्यग्रही होते. त्यांच्या सहकाऱ्यांशी हस्तांदोलन करण्याकरिता ते कासावीस झाले होते. परंतु हा चमत्कार घडला कसा असा प्रश्न पडून ते गोंधळूनही गेले होते. अजूनही मृदु धुक्याच्या अवगुंठनांत असल्यामुळे त्यांनी काही इशारा केला नाही, पण त्यांची काय अवस्था झाली, त्यांनी जहाजे कोठे नांगरली होती आणि ते कार्थेजला का आले हे जाणण्याच्या आशेने ते नुसते त्यांच्याकडे पाहात राहिले. कारण त्य कोलाहलातून मंदिराकडे जात असलेल्या लोकांच्या गर्दीत आपली हकीकत सहानुभूतीने ऐकून घेण्याची विनंती करण्याकरिता आलेले ट्रोजनांच्या प्रत्येक जहाजावरील प्रतिनिधी होते.

ट्रोजनांनी आता मंदिरात प्रवेश केला होता, आणि प्रत्यक्ष राणीशी बोल ण्याची त्यांना अनुज्ञा मिळाली होती. त्यांच्यातील सर्वात ज्येष्ठ अशा आयलिऑ-निअसने शांत आत्मनिर्भरतेने आपले वृत्त सांगण्यास प्रारंभ केला; 'महाराज्ञी, आपणास ज्युपिटरने आपले नवे नगर वसविण्याची अनुमती दिली आहे, आणि आपल्या न्यायबुद्धीने रानटी जमातींचे पारिपत्य करण्याचे कर्तव्य आपल्यावर सोपवले आहे. वादळाने प्रत्येक समुद्रावर भरकटत नेलेले आम्ही अभागी ट्रोजन आहोत. आमच्या जहाजांवरील भयंकर अग्निज्वालांचें शमन करण्याची आणि पापभीरू माणसांवर दया दाखविण्याची आपणांस आम्ही प्रार्थना करीत आहोत. आपण आमच्यावरील आपत्तींचा अधिक बारकाईने विचार करावा. खड्गबलाने

आपली आफ्रिकन भूमी उद्ध्वस्त करण्याकरितां किंवा आपले गोधन लुटून किनाऱ्याकडे हाकारण्याकरितां आम्ही आलो असण्याची मुळीच शक्यता नाही. आम्ही पराभूत असल्यामुळे आम्ही कधीच इतके उन्मत्त आणि आक्रमक असू शकत नाही. खरेच नाही ! परंतु ग्रीक ज्याला हेस्पेरिया 'पश्चिम भूमी' या नावाने संबोधितात असा एक प्राचीन प्रदेश आहे. तेथील वीरांच्या बाहूत बल आणि सुपीक जमिनीत कस आहे. इनोट्रियन हे त्याचे रहिवासी होते. परंतु त्यांचे वंशज त्या प्रदेशाला त्यांच्या एका नेत्याच्या नांवावरून इटली असे संबोधितात, असे म्हणतात. त्या इटलीकडे आम्ही आपले सुकाणू वळवीत होतो इतक्यात वादळें आणणारे नक्षत्र जे मृगशीर्ष त्याच्या उदयाच्या सुमारास सागरावर प्रचंड वादळे उठली. अदृश्य अशा वालुकामय उथळ भागात आमची गलबते लोटली गेली. माथेफिरू वादळी वाऱ्याने आमची गलबते भयंकर खडकांवर फेसाळणाऱ्या लाटांवर फेकली गेली; आणि आम्ही कांही थोडे लोक आपल्या ह्या किनाऱ्याला लागलो. आता आम्हांला हे सांगा की येथे कोण राहते ? अशी ही कोणती मातृभूमी आहे की जेथे अशा रानटी प्रथा संमत आहेत ? उजाड वाळवंटात जे स्वागत झाले असते तेही आम्हांला येथे मिळाले नाही. आपल्या प्रजाजनांनी आमच्यावर हल्ले करण्यास सुरवात केली आहे. आणि ते आम्हाला किनाऱ्यावर पाऊलही ठेवू देत नाहीत. आपणांस माणसांची किंवा त्यांच्या मानवी शस्त्रांची ही क्षिती नसेल तर आपण निदान याचे तरी स्मरण असू द्यावे की न्याय आणि अन्याय जाणणारे देव अस्तित्वात आहेत. इनीआस आमचा राजा होता. त्याच्याहून अधिक न्यायी, अधिक सात्विक आणि युद्धांत अधिक प्रतापी असा दुसरा कोणीही राजा नसेल. जर नियतीदेवतेने त्याचे रक्षण केले असेल, तो जर अदय अशा परलोकांत अद्यापी गेलेला नसेल आणि भूतलावरील वायूतूनच श्वसनाने शक्ति मिळवीत असेल तर आम्हांला कांही भय नाही. आतिथ्यामध्यें आपण त्याच्याशी स्पर्धा करण्याकरितां पहिले पाऊल टाकलेत तर आपणांस पश्चाताप करण्याची कधीच वेळ येणार नाही. सिसिलीत आमचीही नगरें आहेत, आणि तीही युद्धनिपुण आहेत. ट्रॉयच्या रक्ताचा, राजघराण्याचा कीर्तिमान ॲसेस्टीस तेथे आहे. वादळाने जायबंदी केलेली आमची गलबते किनाऱ्याला लावण्याची, आपल्या अरण्यांतून लाकूड कापण्याची व वल्ह्यांकरितां झाडे तोडण्याची आम्हाला अनुज्ञा मिळावी अशी आमची इच्छा आहे. म्हणजे आम्हाला इटली आणि लॅशिॲमला जाता येईल. आमचे उद्दिष्ट इटली, साध्य झाले आणि आमचा राजा आणि सहकारी आम्हांला परत मिळाले तर आम्ही धन्य होऊ. परंतु आम्हांला जर हे परमसौख्य मिळणार नसेल आणि हे ट्रोजनांच्या महान आणि सच्छील नेत्या तू जर आफ्रिकेच्या खोल

सागरतळाशी विसावला असलास आणि आयुलस द्वारा आम्ही आपल्या राष्ट्राचे भवितव्य साकार करू शकणार नसलो तर सिसिलीच्या ज्या चिंचोळ्या समुद्रांतून आम्ही आपल्या भ्रमंतीला प्रारंभ केला तेथे परत जाऊ. तेथे आमचे आश्रयस्थान आहेच आणि तेथे आम्ही ॲसेस्टीसचा राजा म्हणून स्वीकार करू, असे आयलिओ-निअस म्हणाला आणि इतर ट्रोजनांनी तात्काळ त्याचे वक्तव्य उत्साहाने उचलून धरले.

नंतर नतदृष्टि डायडोने परिमित शब्दांत आपले उत्तर दिले. 'ट्रोजन हो, आपल्या मनांतून भय काढून टाका. आणि चिंता बाळगू नका. आमचे जीवन बिकट आहे, आणि हे तर नवं राज्य आहे. म्हणून इतकी दक्षता घेणं मला प्राप्त होते. मला रक्षकांची योजना करावी लागते आणि सीमेवर सतत लक्ष ठेवावं लागतं. परंतु इनीआस आणि त्यांचे संबंधित ह्यांच्याविषयी, ट्रॉय नगरी आणि तिच्या नागरिकांचे पराक्रम व तो भयंकर पेटलेला रणसंग्राम ह्याविषयी ऐकले नाही असा कोण असेल ? आम्ही फिनीशिअन इतके मंदबुद्धी नाही आहोत, किंवा सूर्य आपले घोडे जुंपतो तेव्हां आमच्या टिरिअन नगरीपासून दूरही नसतो. तुम्हाला सॅटर्नच्या आधिपत्याखालील सुकीर्ती हेस्पेरिआला जायचे असो किंवा ॲसेस्टीस राज्य करीत असलेल्या इरिक्सच्या किनाऱ्यावरील प्रदेशांत जायचे असो, संरक्षण देऊन मी तुम्हाला जाण्यास सहाय्य करीन आणि माझ्या अधिकारकक्षेत असलेली सर्व मदत मी माझ्या कोषातून करीन की तुम्हांला येथेच माझ्या राज्यांत बरोबरीच्या नात्याने राहायला रुचेल ? मी उभवीत आहे ही नगरी तुमचीच माना. तुमची गलबते किनाऱ्याला नांगरा. ट्रोजन आणि टिरिअन असा भेद करण्याचे प्रयोजनच नाही. आता माझी एकच इच्छा आहे, तुमच्यासारखाच त्याच वाऱ्यामुळें या किनाऱ्याला लागून इनीआसही येथे यावा. तो कुठेतरी किनाऱ्यास लागला असेल, कुठल्यातरी नगरीत किंवा अरण्यांत मार्ग चुकला असेल या आशेने मी विश्वासू माणसे सबंध आफ्रिकेत शोध घेण्याकरितां नक्कीच पाठविते.'

तिच्या भाषणाने शूर अकेटीझ आणि त्याचा नायक इनीआस हे दोघेही आश्चर्यचकित झाले. धुक्याच्या आवरणांतून बाहेर पडण्यासाठी बराच वेळ ते अतिउत्सुक झाले होते. ॲकेटीझ प्रथम इनीआसला म्हणाला, 'व्हीनसपुत्रा, आता काय करावे असा तुझा विचार आहे ? सर्व सुरक्षित आहे हे तर तू पाहिलेसच. आपले सर्व मित्र आणि जहाजेही परत मिळाली आहेत. एक मित्र मात्र नाहीसा झाला आहे आणि तो समुद्रांत बुडतांना आपणच पाहिले आहे. बाकी सर्वच तुझ्या मातेच्या भविष्यकथनाशी जुळते आहे.'

तो असे म्हणाला इतक्यांत त्यांना वेढणारे धुक्याचे आवरण एकदम दूर झाले आणि नितळ हवेंत विरून गेले. इनीआस चालतांना थांबला आणि दैदिप्यमान तेजानें प्रखर प्रकाशात तो तळपू लागला. त्याच्या मुखमंडला-वर व स्कंधांवर दैवी सौंदर्य विलसू लागले. त्याच्या मातेने त्याच्या केशसंभाराला वेगळेच सौंदर्य प्रदान केले होते. आणि हस्तिदंताला किंवा सुवर्णात जडवलेल्या चांदीला किंवा संगमरवराला कलाकुसर जशी आगळी कांती प्राप्त करून देते तशी त्याच्या देहाला तिने यौवनाची रसरशीत कांती दिली होती आणि त्याच्या नेत्रांत आनंदी वृत्तीचे तेज ओतले होते. नंतर सर्वांना चकित करीत तो राणीला म्हणाला, 'तुम्ही सारे ज्याची प्रतीक्षा करीत आहांत तो मी तुमच्यासमोरच आहे. आफ्रिकी सागरांतून वाचलेला मी ट्रोजन इनीआस आहे. महाराज्ञी, तू एकटीनेच ट्रॉयच्या शब्दातीत संकटांविषयी दया दाखविली आहेस आणि ग्रीकांच्या तडाख्यातून वाचलेल्या, जमिनीवरील व सागरांवरील आपत्तींनी सर्व-शक्तिपात झालेल्या दीनवाण्या असहाय्य अल्पसंख्य अशा आमचे तुझ्या राज्यात आणि घरांत सहभागी म्हणून स्वागत करण्यास तू सिध्द झाली आहेस. तुझे यथोचित आभार मानणेहो आमच्या किंवा उरले सुरलेले जे कोणी डार्डन वंशीय ह्या विशाल भूतलावर कुठेतरी विखुरलेले असतील त्यांच्याही शक्तीबाहेरचे आहे. परंतु इहलोकापलिकडील शक्तींच्या मनांत भला विचार असेल, जर कुठेही न्याय म्हणून कांही असेल किंवा सत्य जाणणारी एखादी चित्त्शक्ती असेल तर त्याच्याकडून मात्र तुला योग्य श्रेय मिळेल. कुठल्या आनंदमय भूमीत तुझा जन्म झाला? तुझे धन्य मातापिता कोण होते? जोवर नद्या सागराला मिळण्याकरितां धावत राहतील, जोवर गिरिस्कंधावर छाया खेळत राहतील, जोवर नभोमंडलात तारका विहरत राहतील तोवर तू ज्याला अत्यंत पात्र आहेस तो मान तुला मिळत राहील; तुझी सुकीर्ती, तुझे नांव, तुझे स्तोत्र मी जेथे जेथे जाईन तेथे तेथे नांदेल.' असे म्हणून त्याने आपल्या उजव्या हाताने आपला मित्र आयलिओनिअस ह्याचा व डाव्या हाताने सेरेस्टसचा हात हाती घेतला आणि नंतर शूर गायस व प्रतापी क्लोन्थसचा हात घेतला व नंतर इतरांचे हात त्याने हाती घेतले.

इनीआसच्या प्रथम दर्शनानेच त्याच्या वाट्याला आलेल्या दुर्दैवाच्या विचा-राने फिनीशिअन डायडो भयचकित झाली. नंतर ती म्हणाली, 'व्हीनसपुत्रा कसले हे दैव भयंकर संकटातून तुझा सतत पाठपुरावा करीत राहिले आहे? कसल्या कुयोगामुळे तुला या रानटी किनाऱ्यावर येणे भाग पडले आहे? फ्रिजिअन

सिमॉईसच्या किनाऱ्यावर डार्डन ॲंकाईसिसपासून दयामय जीवनदायी व्हीनसने ज्याला जन्म दिला तोच का तू इनीआस आहेस? सिडॉनला आलेला टयुसर आता मला आठवतो. मातृभूमीतून त्याला हद्दपार केले होते आणि माझे वडील बीलस यांच्या साहाय्याने नवे राज्य जिकण्याची त्यांची आकांक्षा होती. माझे वडील त्यांनी जिंकलेल्या व त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या संपन्न सायप्रस बेटाची त्यावेळीं लूट करीत होते. तेव्हांपासून ट्रॉयवर कोसळलेल्या आपत्तींची मला माहिती आहे. तुला मी नांवाने ओळखते, आणि ग्रीक सेनानींचीही मला नांवाने माहिती आहे. तुझा शत्रू टयूसरसुद्धां ट्रोजनांची खूप स्तुती करीत होता आणि आपण त्याच प्राचीन टयूक्रियन घराण्यांत जन्मलो असे सांगत होता. म्हणून शूर मित्रांनो, माझ्या घरी चला. तुमच्या सारखाच दैवाने माझाही छळ केला होता आणि शेवटी अनंत हालअपेष्टांतून त्याने मला या भूमीत आसरा दिला आहे. माझे स्वतःचे दुर्दैवाचे अनुभव दुर्दैवी जीवांना साहाय्य करण्यास मला शिकवीत आहेत. इनीआसला उद्देशून असे बोलल्यानंतर तिने त्याला राजप्रासादात नेले. जाता जाता तिने देवाचे आभार मानण्याकरितां विविध वस्तु मंदिराला अर्पण करण्याची आज्ञा केली. तसेच तिने आठवण ठेऊन समुद्र किनाऱ्यावर असलेल्या इनीआसच्या मित्रांकडे वीस बैल, ताठकेसांच्या, नुकत्याच मारलेल्या शंभर वराहांच्या पाठी, शंभर पुष्ट मेंढया, त्यांच्या कोकरांसहित आणि देवाचा प्रसाद म्हणून आनंददायी मदिरा पाठविली. राजप्रासादांत शाही मेजवानीची प्रचंड तयारी चालू होती. मध्यमहालांत मेजवानीची सिद्धता होत होती. शाही जांभळ्या रंगाचे कलात्मक पडदे सोडले होते. मेजावर चांदीची अगणित भोजनपात्रे मांडली होती आणि टायरिअ-नांच्या राष्ट्राच्या व राजघराण्याच्या प्रारंभापासूनच्या सर्व पिढयातील ऐतिहासिक घटनांची शौर्यगाथा कोरलेल्या सोन्याच्या थाळ्या होत्या.

परंतु इनीआसच्या लक्षांत आले की पुत्रावरील त्याचे प्रेम त्याला चैन पडू देणार नाही. त्या प्रेमळ पित्याचे सर्व लक्ष ॲस्कॅनिअसकडेच लागले असल्याने त्याने आकेटीझला सर्व वृत्तांत ॲस्कॅनिअसला सांगून त्याला त्वरित तटबद्ध नगरीत घेऊन यावयास सांगितले. ट्रॉयच्या पतनातून वाचविलेल्या कांही वस्तूही अकेटीझ नजराणा म्हणून घेऊन येणार होता. विविध आकृतींचे भरतकाम केलेले व जरीच्या काठांनी ताठ झालेले महावस्त्र व एक पिवळ्या फुलांच्या आकृतींची किनार असलेली अवगुंठनी, ही अर्गाइव्ह हेलनला भूषविलेली, तिच्या आईने, लीडाने, तिला भेट दिलेली व ती जेव्हा तिच्या अशुभ विवाहाकरितां प्रथम माय-सीनीहून ट्रॉयला निघाली तेव्हां तिने नेलेली वस्त्रे होती. प्रायमच्या जेष्ठ कन्येने,

आयलिओनी हिने एके काळी धारण केलेला राजदंड, तुतीफलाच्या मालेसारखा कंठहार आणि शिवाय सुवर्णाचा रत्नजडीत दुहेरी किरीट अशा वस्तू इनीआसने आणावयास सांगितल्या.

ॲकेटीझ गडबडीने आज्ञापालनार्थ जहाजांच्या वाटेला लागला. परंतु व्हीनस नव्या योजनांचा व मार्गांचा विचार करीत होती. क्यूपिडला मोहक ॲस्कॅनिअसचे रूप धारण करण्यास लावण्याचे व त्याला ॲस्कॅनिअसच्या ऐवजी पाठविण्याचे तिने ठरविले होते. त्याने डायडोचा नजराणा द्यावा व तसे करतांना तिच्या अंतःकरणांत प्रीतिज्योत प्रज्वलित करावी, तिला अस्वस्थ करावे आणि प्रीति रज्जूंनी तिला अंतर्बाह्य बद्ध करावे, कारण फिनिशिअनांच्या दुटप्पीपणामुळे शापित झालेल्या घराला कितपत शाश्वती लाभेल याची व्हीनसला चिंता वाटत होती. जूनोच्या दुष्ट मनसुब्यांनी ती त्रस्त झाली होती. आणि रात्र होऊ लागली तशी तिची चिंता वाढू लागली. म्हणून ती पंख असलेल्या आपल्या पुत्राला म्हणाली, 'मुला, तू माझे सर्वस्व आहेस. माझी शक्ति आणि सामर्थ्य तूच आहेस. ज्युपिटरच्या वादळी वज्राघातांनाही तू जुमानीत नाहीस. तुझ्या दैवी सहाय्यासाठी मी तुजपाशी नम्रपणे तुझी याचना करीत आहे. केवळ निर्दय जूनोच्या दीर्घद्वेषामुळे तुझा बंधु इनीआस ह्याला वादळी सागरावरून कसे भरकटावे लागले हे तुला माहीतच आहे. माझ्या दुःखात तू माझ्याबद्दल सतत सहानुभूती दाखविली आहेस. फिनीशिअन डायडोने त्याला ठेऊन घेतले आहे आणि तिच्यापाशी राहण्याचा ती त्याला गोड बोलून आग्रह करीत आहे. जूनोने संमत केलेल्या कोणत्याही आतिथ्याचे परिणाम काय होतील ह्याची मला चिंता वाटते, आणि या कसोटीच्या क्षणी कांहीतरी निर्णायक असे करण्याला ती मुळीच विलंब लावणार नाही. म्हणून माझ्या स्वतःचाच डाव टाकून तिला पूर्वीच शह देण्याची माझी योजना आहे. प्रीतीज्वालेच्या मेखलेने राणीला असे वेढावे की कोणतीही दैवी शक्ती तिला इनीआस विषयीच्या उत्कट प्रीतीच्या आधीन होण्यापासून विचलित करण्याला समर्थ होऊ नये. असा माझा उद्देश आहे. तुला हे साध्य व्हावे म्हणून तू माझी योजना ऐक. या तरुण राजपुत्राला त्याच्या प्रिय वडिलांनी, इनीआसने बोलावणे पाठवले आहे. ट्रॉयला लागलेल्या आगीतून आणि सागरावरील आपत्तीतून वाचविलेल्या वस्तूंचा नजराणा घेऊन जाण्याची तो आता सिद्धता करीत आहे. मी त्याला निद्रावश करते आणि माझ्या सिथेरिआवरील किंवा आयडॅलिअमधील पवित्र परिसरात लपवून ठेवते, नाहीतर माझा डाव त्याच्या ध्यानांत येईल किंवा ऐनवेळी माझे कारस्थान चालू असताना तो तिथे उपस्थित होईल. एका रात्रीकरितां तू त्याचे रूप धारण कर.

त्याच्या मुद्रेसारखी आपली मुद्रा कर. नाहीतरी तो तुझ्यासारखाच मुलगा आहे. नंतर मेजवानीच्या वेळी मदिरा मुक्तपणे वाहात असतांना आणि डायडो आनंदातिशयाने हृदयाशी धरून तुला आलिंगन देत असतांना आणि तुझ्यावर मधुर चुंबनांचा वर्षाव करीत असतांना तिला नकळत तू तिच्या अंतःकरणात अदृश्य प्रीतीज्वालेची फुंकर घाल. हे जहर तिच्यांत ओत.' क्यूपिडने आपल्या प्रिय मातेच्या आज्ञेचे पालन केले. त्यानें आपल्या स्कंधावरून पंख उतरवले आणि आयुलसच्या चालण्याच्या पद्धतीचे मोठ्या गमतीने अनुकरण केले. व्हीनसने आयुलसच्या नेत्रांत गाढ आणि गोड निद्रा ओतली आणि त्याला हळुवारपणे हृदयाशी धरून कुरवाळीत आपल्या दैवी सामर्थ्याने ती त्याला आयडॅलिअमच्या वृक्षाच्छादित पठारावर उपवनांत घेऊन गेली. मृद् अमरवृक्षांनी छाया पुष्पात त्याचे रक्षण केले आणि आपल्या सुगंधित निश्वासांनी सर्वत्र मधुरता पसरवली.

अकेटीझच्या मार्गदर्शनाखाली आज्ञाधारक क्यूपिड आनंदाने कार्थेजच्या राणीकडे शाही नजराणा घेऊन चालला होता. तो तेथे पोहोचला तेव्हां राणी नुकतीच मध्यभागी पडदे सोडलेल्या सुवर्णासनावर दिमाखाने विराजमान झाली होती. इथेच समोर ट्रॉयचा प्रमुख 'इनीआस' आणि इतर ट्रॉयची मुख्यमुख्य पुरुष मंडळी जमून जांभळ्या रंगाच्या बिछायतींवर स्थानापन्न झाली होती. सेवक हात धुण्याकरितां पाणी घेऊन उभे होते. ते करंड्यामधून रोट्या देत होते आणि त्यांच्यासाठी तलमवस्त्राचे रुमाल आणीत होते. पलिकडे प्रासादाच्या अंतर्भागात पन्नास परिचारिका वाढप करण्याकरितां आपापल्या जागी उभ्या होत्या. तेथील मोठमोठ्या कोठारातून शिधासामग्री सारखी भरीत राहाणे आणि घरातील अग्नी सतत प्रदीप्त करणे ही त्यांची कामे होती. त्याचप्रमाणे समवयस्क असे शंभर दास आणि शंभर दासी मेजावर मद्य आणि अन्न भरभरून आणून ठेवीत होते. या मेजवानींत कलाकुसरी केलेल्या आसनावर स्थानापन्न होण्याकरितां निमंत्रित केलेले अनेक कार्थेज नगरजन शृंगारलेल्या दारातून प्रवेश करते झाले. इनीआसने दिलेले नजराणे पाहून व भावनावेगाने आयुलसप्रमाणे बोलणाऱ्या आणि त्याचे रूप धारण केलेल्या वेषधारी देव क्युपिडकडे पाहून ते आश्चर्यचकित झाले होते. त्यांनी त्या राजदंडाची व पिवळ्या फुलांची किनार असलेल्या अवगुंठनीची प्रशंसा केली. पण सगळ्यांत कठीण अवस्था बिचाऱ्या फिनीशियन डायडोची होती. तिचा सर्वनाश आतां अटळ होता आणि आपली इच्छा ती आवरू शकत नव्हती. ती एकाग्र दृष्टीने पाहात होती आणि तिचा आंतरिक दाह वाढत होता. त्या मुलाच्या रूपाचा आणि त्या सुंदर भेटीचा तिच्यावर सारखाच प्रभाव पडला होता. क्यूपिड

इनीआसला बिलगला होता. इनीआसच्या गळयाभोवती आपल्या हाताचा विळखा घालून तो आपल्या पित्याबद्दल अतिशय प्रेम व्यक्त करीत होता. नंतर तो राणी-कडे गेला. डायडोची दृष्टी आणि तिचे सर्व अवधान त्याच्यावर केंद्रित झाले होते. ती त्याला पुनःपुन्हा कुरवाळीत होती. आणि हृदयाशी धरीत होती. किती सामर्थ्य-शाली देव तिच्या रोमरोमात भिनत होता हे बिचाऱ्या डायडोला माहित असणे शक्य नव्हते. आपल्या मातेची, सिप्रियन-व्हीनसची मनीषा लक्षांत घेऊन सायकि-असंसंबंधीचा समग्र विचार डायडोच्या मनांतून हळूहळू काढून टाकण्यास त्याने प्रारंभ केला, आणि आजवर अशा प्रकारे स्पंदन न पावलेल्या तिच्या हृदयावर व या विचारांना अनभिज्ञ असलेल्या तिच्या बुद्धीवर त्याने चेतनामय प्रीतीच्या रोमांचकारी भावनेचे आघात केले.

मेजवानीतील पहिला भाग संपला, मेजे दूर सारली गेली. मद्याचे मोठमोठे चषक मांडून ते काठोकाठ भरले गेले. मंडळी मोठमोठ्याने एकमेकाशीं बोलू लागली आणि प्रासादाच्या विशाल अंतर्भागात ते आवाज घुमू लागले. सोन्याने मढविलेल्या छताला दिवे लटकले होते, आणि त्यांतील मेणबत्त्यांच्या लखलखींत ज्योतींनी अंधाराला पराभूत केले होते. राणीने रत्नजडीत जड सुवर्ण चषक मागविला. तिने तो जसा बीलसने आणि त्याच्या वंशजांनी पूर्वी अनेक प्रसंगी भरला होता तसा अत्यंत कडक मदिरेने भरला. प्रासादात शांततेचा इशारा झाला आणि ती बोलू लागली.

'हे ज्यूपिटर, आतिथ्याचे नियम तू घालून दिले आहेस असे म्हणतात. आजचा दिवस हा फिनीशिअन आणि ट्रॉयमधून देशांतरित होऊन आलेले, ह्या दोघांसाठी शुभदिवस ठरावा आणि आमच्या पुत्रपौत्रांच्या स्मरणांत राहावा अशी तुझी मनीषा असो, अशी आमची प्रार्थना आहे. आनंददायी बॅकस आणि उदार हृदयी जूनो ह्यांचाही आशीर्वाद लाभावा ही प्रार्थना. फिनीशिअनांनो, आपली सद्भावना व्यक्त करा आणि आजचा आनंद सोहळा साजरा करा!' असे म्हणून तिने मदिरेचें अर्घ्य मेजावर अर्पण केले. त्यानंतर प्रथम आतील मदिरेस ओष्ठस्पर्श करून तिने तो चषक बिटिॲसकडे आव्हानपूर्वक दिला. काठोकाठ भरलेल्या त्या सुवर्ण चषकांतील मदिरेने स्वतःला भिजवीत त्याने तो फेसाळणारा चषक मोठ्या धिटाईने रिता केला. इतर फिनीशिअन उमरावांनी त्यानंतर मद्य प्राशन केले. लांब केस असलेल्या इओपसने आपले सुवर्णमंडित तंतुवाद्य वीणा (लायर) घेतले; आणि त्याचे संगीत निनादू लागले. थोर संगीतज्ञ ॲटलस त्याचा गुरु होता आणि आतां तो भ्रमण करणारा चंद्र आणि जीवमात्रासाठी श्रमणारा सूर्य मानवाची आणि जीव-

सृष्टीची उत्पत्ती, वर्षा, अग्नी, स्वाती नक्षत्र आणि वर्षेचे आगमन सूचित करणारी रोहिणी आणि सप्तर्षी आणि वृश्चिक यांची गीते तो गात होता. शिशिरांतल्या प्रत्येक दिवशी सूर्य सागरांत बुडण्याकरिता गडबडीने का जातो आणि रात्री का रेंगाळत राहतात याची कारणे त्याच्या गीतातून सांगितली होती. फिनीशिअनांनी पुनःपुन्हा त्याची वाहवा केली, आणि ट्रोजनांनी त्यांच्याबरोबर टाळ्या दिल्या. भावीनाश अटळ असलेली दुर्दैवी डायडो स्वतः आपल्या प्रीतीचे आकंठपान करीत रात्रभर अनेक गोष्टी बोलत राहिली. प्रायम आणि हेक्टर विषयी तिने प्रश्नामागून प्रश्न विचारले. उषापुत्र ट्रॉयला आला तेव्हां त्याने कोणती शस्त्रे धारण केली होती हे तिने विचारले. कधी डायमिडच्या घोड्याच्या गुणांविषयी तर कधी अकिलीझच्या उंचीविषयीं तिने चौकशी केली. शेवटी ती म्हणाली, 'परंतु हे माझ्या सन्मान्य अतिथी, तू मला सर्व वृत्तांत पहिल्यापासून कथन करावयास हवा. ग्रीकांनी लावलेला सांपळा, तुझ्या प्रजाजनांवर कोसळलेली आपत्ती आणि तुझी भ्रमंती; कारण पृथ्वीच्या पाठीवर, भूमीवर आणि सागरांवर भ्रमण करीत राहिल्याला तुला आतां सात वर्षे झाली आहेत.'

## सर्ग दुसरा

# इनीआसचे कथन–ट्रॉयचे पतन

ते सर्व शांत झाले, प्रत्येकाचे डोळे उत्कंठेने इनीआसकडे वळले. उच्चासनावरून ट्रोजन प्रमुख इनीआस बोलू लागला.

राज्ञी, ज्याचा आम्ही नित्य शोक करीत आहोत त्या ट्रॉयचे वैभव व ट्रोजन साम्राज्य ग्रीकांनी कसे नष्ट केले हे जे तू शब्दांतून पुनः जीवंत करण्यास सांगत आहेस ते दुःख अति भयंकर आहे. तो दुःखान्त मी स्वतः पाहिला आहे, आणि त्या घटनांत मी मोठा भाग उचलला आहे. त्याचे कथन करताना कुणालाही अश्रु आवरता आले नाहीत, मग तो मार्यमिडॉन असो किंवा डोलोपिअन असो किंवा अदय युलिसिझचा एखादा योद्धा असो. शिवाय उत्तररात्रीची आर्द्र हवा आकाशातून वेगाने पसरत आहे. तारका अस्तंगत होत आहेत. आणि आता आपणही विसावले पाहिजे याचे त्या आपणास स्मरण देत आहेत. तरीही तुला जर खरेच आमच्यावर कोसळलेल्या आपत्तींचा आणि ट्रॉयच्या अंतिम यातनांचा त्रोटक वृत्तांत ऐकण्याची उत्सुकता असेल तर त्याच्या आठवणीनेही माझा थरकाप होत असला आणि त्याची कटुता सोसण्याचे धैर्य माझ्या ठायी नसले तरी मी ती सांगण्यास प्रारंभ करतो.

दैवगतीने निराश झालेल्या व वर्षामागून अनेक वर्षे चाललेल्या युद्धाने खचलेल्या ग्रीक सेनानींनी लाकडाचा एक प्रचंड राक्षसी अश्व तयार केला. त्याच्या कुशीच्या बाजू त्यांनी फर वृक्षाच्या कापलेल्या फळ्यांच्या जाळींनी बनविल्या. मिनर्व्हाच्या दैवी प्रेरणेनेच ती कारागिरी निर्माण झाली होती. घरची परतीची सफर सुखरूप व्हावी म्हणून तो देवांना अर्पण करावयाचा आहे असे त्यांनी भासविले; आणि तशीच अफवा पसरवली होती. नंतर त्यांनी चिठ्ठ्या टाकून, कुणाला नकळत वेचक माणसांची तुकडी निवडली आणि त्या अश्वाचा एखाद्या गुहेसारखा प्रचंड अंतर्भाग सशस्त्र योद्ध्यांनी भरल्यानंतर बंद केला,

ट्रॉयपासून दृष्टीच्या टप्प्यात टेनेडॉस बेट आहे. प्रायमच्या साम्राज्याच्या काळात तेथे सत्ता आणि संपत्ती होती. आणि ते सर्वपरिचित आणि प्रसिद्ध होते. आता तेथे जहाजे नांगरण्यास धोक्याची असलेल्या उपसागराच्या वक्र किनारपट्टी-शिवाय दुसरे काही नाही. ग्रीकांनी आपली गलबते टेनेअॅसपर्यंत हाकारली आणि त्या निर्मनुष्य समुद्रकिनाऱ्यावर ते लपले. अनुकुल वाऱ्याच्या सहाय्याने ते मिसिनीला आणि तेथून परत मायदेशी गेले असे आम्हाला वाटले. म्हणून अनेक दुःखद वर्षानंतर ट्रॉयच्या सर्व भूमीने विसावा घेतला. आम्ही वेशीचे दरवाजे सताड उघडले आणि ग्रीकांनी सोडलेली, आता निर्मनुष्य असलेली किनाऱ्यालगतची ग्रीकांची छावणीची जागा पहावयास जाण्यास आम्हाला आनंद वाटला होय! इथेच डोलोपिअनांचा तळ होता. आणि तिथे पलिकडे निर्दय अॅकिलीझची छावणी होती. त्या तिथे जहाजे नांगरली होती. आणि हीच तुंबळ रणकंदनाची नित्य भूमी होती. आमच्यापैकी काहींनी भयचकित होऊन तो अपरिणीत मिनर्व्हाला अर्पण केलेला प्रचंड अश्व पाहिला. हाच पुढे आमच्या सर्वनाशाचे मूळ ठरणार होता. कदाचित् विद्रोहाने किंवा ट्रॉयचे दुर्दैव पूर्वीच निश्चित झाले असल्यामुळे थायमिटीसने प्रथम सूचना केली की तो अश्व ओढून नगरभितींच्या आत न्यावा व नगराच्या बालेकिल्ल्यावर ठेवावा. परंतु कॅपिससहीत इतर काही जणांनी अधिक सूज्ञपणे विचार केला कारण ग्रीकांनी फुकट दिलेल्या कोणत्याही भेटीत त्यांना विश्वासघाताचा संशय येत असे. समुद्रात लोटून तो नष्ट करावा किंवा त्यास आग लावून तो जाळून टाकावा नाहीं तर त्याचा भेद करून त्याचा अंतर्भाग उघडा करावा असा त्यांनी सल्ला दिला. उरलेल्या लोकात दोन्ही सूचनांना पाठिंबा देण्यात प्रबल मतभेद होता.

परंतु तिथे आमच्या पुढेच नगरच्या किल्ल्यावरून लेऑकून त्वेषाने, गडबडीने बऱ्याच मोठ्या जनसमुदायाबरोबर आला. आमच्यापासून दूर असतानाच तो ओरडला. "माझ्या अभागी मित्रांनो तुम्ही खचितच वेडे आहात! तुमचे शत्रु निघून गेले यावर तुमचा खरोखरच विश्वास आहे काय? विश्वासघाताशिवाय ग्रीक एखादी गोष्ट नजर करतील असे तुम्हाला वाटते काय? युलिसिझला तुम्ही याहून अधिक चांगल्या प्रकारे ओळखत नाही काय? एक तर लाकडाच्या या डोलाऱ्यात त्यांची काही माणसे बंद केली असावीत आणि आता ती आत लपली असावीत. किंवा आपल्या तटबंदीवर मात करणारे, कदाचित आपल्या घरात कसातरी शिरकाव करून घेण्याचे किंवा ट्रॉयला त्याच्या उच्च स्थानावरून शह देण्याचे कसलेतरी रणयंत्र असावे. किंवा त्यामधे आपणास नाशकारक काहीतरी

दुसरे असावे. ट्रोजनांनो, त्या घोड्याचा भरवसा कधीही धरू नका. तो काही का ठरेना, त्यांनी नजराणा दिला तरीही ग्रीकांचे मला भय वाटते. तो बोलत असतानाच त्याने एक मोठा भाला जोराने त्या घोड्याच्या कुशीत फेकला. बळकट लाकडाच्या त्या गोलाकार पोटावर तो थरथरत रुतून बसला. त्या आघाताबरोबर त्या घोड्याच्या खोल गर्भातून गंभीर आवाज आक्रंदला आणि स्वर्गस्थ देवांची पूर्वनियोजित कृपाच आमच्या विरुद्ध नसती किंवा आमची सारासार विचार शक्तीच विकृत झालेली नसती तर लेऑकूनचा आघात बरोबर खोल वर्मावर बसला असता आणि त्याच्या लोखंडी फाळाने ग्रीकांची कुटील नीती उघडी पडली असती, ट्रॉय अजूनही जगून राहिले असते. हे प्रायमच्या गर्वोन्नत नगरी तू अजूनही उभी असतीस !

पण अचानकपणे पाठीमागे हात बांधलेल्या एका अनोळखी तरुणाची आकृती आमच्यापुढे आली. काही ट्रोजन धनगरांना तो दिसला होता आणि खूप आरडाओरड करीत ते त्याला राजा प्रायमकडे पिटाळीत नेत होते. वस्तुतः त्यांनी पकडण्याचीच तो वाट पाहात थांबला होता. ग्रीकांना ट्रॉय नगरी खुली करण्याचाच त्याचा नियोजित हेतू होता. त्याच्या स्वतःच्या धैर्यावर विसंबून त्याच्या बनवाबनवीत यश किंवा निश्चित मृत्यू यापैकी कोणत्याही परिणामाला तो सिद्ध होता. त्याला पाहण्यास उतावीळ झालेले ट्रोजन तरुण धावत आले आणि त्याच्याभोवती गोळा झाले. त्या कैद्याची टवाळी करण्यात ते एकमेकावर मात करीत होते. ग्रीकांनी आम्हाला कसे बनविले हे तुम्ही आता ऐकणार आहात. त्यांच्या विश्वासघातकी वृत्तीच्या या एकाच उदाहरणावरून तुम्ही त्या सर्वांचे आकलन करू शकाल.

तो कैदी आमच्यामधून निघून जिथून सर्वजण त्याला पाहू शकतील अशा जागी गोंधळून असहाय्यपणे थबकला. त्याचे भयभीत डोळे भोवतालच्या ट्रोजनांच्या रांगांवरून फिरले. नंतर तो म्हणाला. "अरे, या भूमीवर किंवा सागरावर मला आसरा मिळेल अशी एकतरी जागा उरली आहे काय ? नाही, या आत्यंतिक हालअपेष्टात मला मुळीच आशा नाही. ग्रीकांच्यात मला कुठेही स्थान नाही आणि इकडे ट्रोजनांतही काही कमी शत्रुत्व नाही; ते तर सूड भावनेनें माझ्या रक्ताचे तहानेले झाले आहेत." या दीनवाण्या बोलण्याने आमची वृत्ती पालटली आणि आमच्यातील प्रत्येक हिंसक विचाराला आळा बसला. तो कोणत्या देशाचा आहे, त्याचे काय काम आहे व असे पकडले जाण्याचा धोका पत्करण्याचे धाडस त्याने

का केले हे सांगण्याचा आम्ही त्याला आग्रह केला. शेवटी भय दूर करून त्याने उत्तर दिले "माझे काहीही होवो परंतु, महाराज, मी आपणास सर्व वृत्तांत सांगतो. आणि तो सत्यच असेल. प्रथमच मी मान्य करतो की मी ग्रीस देशचा रहिवासी आहे. माझे नाव सिनॉन आहे. दैवगतीने मला दुःखी केले असले तरीही तिचा दुष्टपणा मला कधीही असत्यवचनी आणि विश्वासघातकी बनवू शकणार नाही. युद्धात सुकीर्ती प्राप्त झालेल्या पॅलॅमिडिस राजाच्या नावाचा उल्लेख आपल्या कानावर आला असेल. तो निष्पाप असूनही या युद्धास त्याने विरोध केला म्हणून ग्रीकांनी त्याच्यावर राजद्रोहाचा राक्षसी आरोप ठेवून खटला भरला व त्याचा वध केला. तथापी आता तो या जगातून गेल्यावर ते त्याच्यासाठी शोक करीत आहेत. मी लहान असतानाच माझ्या गरीब वडिलांनी पॅलॅमिडिसचा परिसहाय्यक म्हणून मला इकडे युद्धावर पाठविले कारण आमचे नाते जवळचे होते. पॅलॅमिडिस जोवर राज्यपदावर अढळ होता आणि राजमंडळातील राजांवर त्याचा प्रभाव होता तोवर मलाही सन्मान आणि मोठेपणा मिळत होता. परंतु युलिसिझच्या मत्सरी कपटामुळे--तुम्हाला त्याच्या कुटिलनीतीज्ञतेचे आश्चर्य वाटणार नाही. जेव्हा पॅलॅमिडिस हा मृत्यूलोक सोडून गेला त्या वेळी मी पार खचून गेलो. त्या माझ्या निरपराध मित्राच्या दुर्दैवाची खंत करीत एकाकी दुःखी कष्टी व अज्ञात जीवन मी जगू लागलो. परंतु मी खचित मूर्ख असलो पाहिजे कारण माझा संताप मी माझ्यापाशीच ठेवला नाही. मी जर कधी माझ्या मायभूमीला आरगॉसला लढाई जिंकल्यावर परतलो आणि मला संधी मिळाली तर मी त्यांच्यावर सूड घेण्याची प्रतिज्ञा केली. परंतु माझ्या शब्दांनी मी माझ्यावर त्यांचा द्वेषाग्नी ओढवून घेतला आणि मी सर्वनाशाच्या निसरड्या मार्गाला लागलो. कारण तेव्हापासूनच माझ्यावर नवे नवे आरोप करून मला गोत्यात आणण्यात युलिसिझने कधी खंड पडू दिला नाही. सैन्यामधे त्याने सूचक अफवा पसरविल्या व निर्दयपणे माझा नाश करण्याच्या योजना तो आखू लागला. अविश्रांत प्रयत्न करून त्याने कॅलचॅसला आपला साथीदार केले—परंतु या गोष्टी तुम्हाला तपशीलवार सांगून आता काय उपयोग? तुम्हाला ऐकण्याची इच्छा नाही आणि माझे शब्द वाऱ्यावरच जाताहेत. कारण सर्व ग्रीक सारखेच असे तुम्ही साहाजिकच मानता. माझे नाव ग्रीक आहे एवढेही तुम्हास पुरेसे आहे. खरे तर माझ्यावर सूड घेण्याची तुमची वेळ टळू लागली आहे. अहा! इथाकाच्या त्या माणसाला यामुळे किती आनंद होईल! आणि ॲट्रिअसचे पुत्र त्या करिता कोणता मोबदला देणार नाहीत!"

"यामुळे अर्थातच सिनॉनला अधिक खुलासा करण्याविषयी आग्रह करण्याची आम्हाला उत्सुकता लागली. ग्रीकांचा दुष्टपणा व कावेबाजपणा कोणत्या थराला जाऊ शकतो याची आम्हाला मुळीच कल्पना नव्हती. त्या कुशल नटाने आपली कहाणी विमनस्क मनाने पुढे चालू केली."

"दीर्घकाळ चाललेल्या या युद्धाला कंटाळून ग्रीकांना अनेकवेळा युद्धत्याग करावा असे वाटले. ट्रॉयभूमी सोडून जावे व काही उपायाने माघार घ्यावी असा ते विचार करीत होते त्यांनी तसे केले असते तर अगदी माझ्या मनासारखे झाले असते ! परंतु प्रत्येक वेळी वादळी समुद्राने त्यांना रोखले, आणि प्रतिकूल वाऱ्याच्या भयाने त्यांची मने ग्रासली. विशेषतः मेपलच्या फळ्याचा बनविलेला हा घोडा पूर्ण झाला. त्यावेळी तर आकाशात वादळ आणि पावसाची गर्जना उठली. चिंतेने आम्ही युरिपिलसला ॲपोलोला कौल लावण्यास पाठविले. त्याने मंदिरातून हा भयंकर आदेश आणला. "ग्रीकांनो, ट्रॉयच्या सफरीवर निघताना तुम्ही वादळ शांत करण्याकरिता एका कुमारीचा बळी दिलात. 'आताही घरी परतण्याकरिता तुम्ही बळी दिला पाहिजे. कारण एका ग्रीकजीवाची आहुती दिलीत तरच तुमचा मार्ग सुकर होईल" ॲपोलोचा हा आदेश सैन्यात पसरताच सर्व भयभीत झाले, आणि भीतीचे थंडगार शहारे त्यांच्या शरीरातून थरथरले. ॲपोलो कुणाची निवड करील आणि कुणाचा काळ ओढवला आहे हे कुणालाही सांगता येणे शक्य नव्हते. याच वेळी इथाकाच्या युलिसिझने कॅलचॅसला, आमच्या द्रष्ट्याला त्याच्याबरोबर आमच्यापुढे येण्यास भाग पाडले. मोठ्या आरोळ्या उठल्या. देवाच्या आदेशाचा अर्थ स्पष्ट करण्याचा युलिसीझने सारखा आग्रह चालविला. या क्रूर आणि धूर्त दुष्टपणाचा बळी मीच होणार आहे असे भाकीत अगोदरपासूनच अनेक करीत होते, परंतु कसलाही विरोध न करता ते परिणामाची प्रतीक्षा करीत होते. आपल्या शब्दाने कुणाचा यज्ञात बळी पडू नये म्हणून कॅलचॅसने दहा दिवस मौन पाळले. परंतु युलिसीझच्या दुराग्रहापुढे त्याचा निभाव लागला नाही, शेवटी स्वतःची अनिच्छा बाजूला ठेवून त्या द्रष्ट्याने आपले मौन सोडले व त्याने वेदीवर बळी देण्याकरिता माझी निवड केली. इतर सर्वांनी त्याला संमती दिली—कारण 'प्रत्येकाला हे दुर्दैव आपल्याच वाट्यास येईल असे भय वाटत होते आणि ते दुसऱ्याच दुर्दैवी जीवाच्या वाट्यास आले म्हणून त्यांना हायसे वाटले. तो भयावह दिवस लवकरच उगवला. खारवलेले धान्य, माझे शिरोबंध वगैरे मला बळी देण्याच्या विधीची सामग्री व साधने त्यांनी सिद्ध केली. मी बंधनांतून निसटलो आणि मृत्यूपासून स्वतःची सुटका करून घेतली हे मला आता कबूल करायला हरकत

नाही. त्या सबंध रात्री मी सरोवराच्या काठावरील चिखलातील वेळूच्या बेटात ते समुद्रावर निघून जातील अशी व्यर्थ आशा करीत लपून राहिलो. मला माझी पुरातन मायभूमी माझी मुलेबाळे किंवा ज्यांना भेटण्याची मला आतुरला लागली होती ते माझे वडील कधीतरी भेटतील असे मला आता मुळीच वाटत नव्हते. ग्रीक आता बहुधा त्या सर्वांवर मी निसटून गेल्याबद्दलचा सूड उगवतील. माझ्या अपराधाची शिक्षा, माझ्या असहाय्य कुटुंबाचा विध्वंस करून त्यांना भोगायला लावतील. स्वर्गस्थदेव व ज्या शक्तीपासून कोणतेही सत्य लपून राहात नाही त्यांना आणि या माणसांच्या जगात जी कुठली निष्ठा अढळ राहात असेल तिला साक्षी ठेवून, महाराज, मी आपणास प्रार्थना करतो की भयंकर दिव्यांतून गेलेल्या व जे कुणालाही सोसावे लागू नये ते सोसलेल्या माझ्यावर आपण दया करावी.

या अश्रूंमुळे त्याने आपले प्राण वाचविले, इतकेच नव्हेतर आम्हाला त्याच्याविषयी अनुकंपाही वाटू लागली. बेड्या आणि घट्ट दोरांपासून त्याची मुक्तता करण्याची आज्ञा देऊन प्रायमनेच आम्हाला उदाहरण घालून दिले. तो त्याच्याशी ममतेनें बोलू लागला, तू कुणीही अस, येथें कोणी ग्रीक नाही. त्यांना तू ताबडतोब विसरून जा आणि आमच्यातील एक होऊन रहा. आता माझ्या प्रश्नांची प्रामाणिकपणे व सविस्तर उत्तरे दे. हे राक्षसी घोड्याच्या आकाराचे प्रचंड शिल्प उभे करण्यात त्यांचा काय उद्देश होता? ही कुणाची कल्पना होती व त्याचा हेतू काय होता? धार्मिक विधीमधे किंवा रणयंत्र म्हणून याचा काय उपयोग आहे?"

एवढेच बोलून प्रायम थांबला, दुसऱ्यांना ठकविण्यात कुशल असलेल्या सिनॉनने नुकतेच बंधनातून मुक्त केलेल्या आपल्या हाताचे तळवे आकाशाकडे पसरून ग्रीकांच्या इरसाल धूर्तपणाने उंचावले व तो म्हणाला. " हे अखंड तळपणाऱ्या तारकांनो, तुम्ही माझे साक्षीदार आहात, हे ज्याचा उपमर्द करण्यास कधीही कुणी धजले नाही अशा सर्वसत्ताधीशा, तू माझा साक्षीदार आहेस, वेदी, भयानक शस्त्रे, आणि मी एकदा परिधान केलेले बळीचे पवित्र शिरोबंध, हे सर्व माझे साक्षीदार आहेत. ग्रीकांनाच पूज्य असलेल्या बंधनांचा मी आता भंग केला तर ते आता माझ्या लेखी पाप होणार नाही. त्यांच्याविषयी मला वाटणारा तिरस्कार मी व्यक्त केला आणि त्यांनी लपविलेल्या गोष्टी मी प्रकाशात आणल्या तर ते पाप ठरणार नाही. कारण माझ्या मातृभूमीच्या कोणत्याही दंडकाप्रमाणे मी त्यायोगे अपराधी ठरत नाही. मी जर आपणास सत्य सांगितले

तर आणि आपल्या उपकाराची योग्य परतफेड केली आणि ट्रॉय जर अभंग राहिले तर ट्रॉयपाशी माझे एकच मागणे आहे की ट्रॉयने आपल्यावर टाकलेल्या विश्वासाला जागावे, दिलेला शब्द पाळावा."

"या युद्धाच्या प्रारंभापासूनच ग्रीकांना विजय मिळण्याची एकमात्र आशा पॅलसच्या सहाय्यातच होती. परंतु त्या रात्री पावित्र्यभंजक डायोमिड आणि नवे पापकर्म शोधण्यात तत्पर असलेला युलिसीझ, ट्रॉयचे संरक्षक कवच असलेली मिनर्व्हाची मूर्ति तुमच्या पवित्र मंदिरातून हिरावून नेण्याकरिता चोरून लपून आले. नगराच्या वरच्या बालेकिल्ल्यावरील रक्षकांची त्यांनी हत्या केली. त्यांनी ती पवित्र मूर्ती ताब्यात घेतली आणि त्या रक्तलांछित हातांनी आमच्या देवतेच्या शुभ्रकोऱ्या शिरोवस्त्राला त्यांनी प्रत्यक्ष स्पर्श केला त्या रात्रीपासून त्यांच्या विजयाच्या आशाही ओहोटीच्या लाटेसारख्या हटत हटत झिरपून गेल्या त्यांचे सामर्थ्य नष्ट झाले व त्या देवतेने आपले हृदय त्यांच्याविषयी अत्यंत कठोर केले.

"याची प्रचीती त्या देवतेनेच काही चमत्कारांतून करून दिली. ती मूर्ति ग्रीकांच्या तळावर ठेवली नाही तोच तिच्या रोखलेल्या डोळ्यांतून लवलवत्या ज्वाळा उफाळल्या तिच्या सर्वांगाला खारट घाम सुटला. आणि तीन वेळा हाती ढाल व थरथरता भाला घेऊन ती आपल्या चबुतऱ्यावरून आश्चर्यकारकपणे पुढे झेपावली. अंतःप्रेरणेने प्रभावित होऊन कॅलचॅसने ग्रीकांना तात्काळ सागरपार निघून जाण्याचा सल्ला दिला. कारण आता प्रथम आरगॉसला जाऊन त्यांच्या सागरावरील प्रथमप्रयाणाच्या वेळी ज्या देवतेने त्यांच्या डौलदार जहाजांना धोका उत्पन्न केला होता त्या देवतेच्या दैवी कृपेचे अभिवचन दिले होते ते पुन्हा मिळाल्याशिवाय, ग्रीकांच्या कसल्याही हल्ल्याने ट्रॉयची संरक्षक तटबंदी ढासळण्याची आता शक्यता नव्हती, म्हणून ते आता स्वगृही मिसिनी नगरीला परतले आहेत. पुन: शस्त्र सज्ज होण्याकरिता, दैवी सहाय्य पुन्हा प्राप्त करून घेण्याकरिता लवकरच ते सागर ओलांडून त्यांच्या पुनरागमनाने तुम्हाला चकीत करणार आहेत. दैवी शकुनांवरून कॅलचॅसनेच ही योजना त्यांच्याकरिता जुळविली होती. त्याच्या सूचनेवरूनच पॅलसच्या मूर्तीचे जे पावित्र्यविडंबन झाले त्या पापभाराचे क्षालन करण्याकरिताच त्यांनी ही घोडयाची प्रतिमा उभी केली. नगरीच्या वेशीतून आत नेता येऊ नये किंवा तटावरून पलिकडे चढविता येऊ म्हणून ती प्रतिमा कठीण अशा ओकच्या फळयांची जाडजूड व आकाशाला भिडेल एवढी उंच करण्यास त्यानेच भाग पाडले. तसे झाले असते तर त्या प्रतिमेने तुमच्या नगरजनांचे तुमच्या पुरातन धर्माच्या छत्राखाली रक्षणच केले असते. कारण तुमच्या

हातून मिनव्हीच्या या प्रसादाला जर धक्का लागला असता तर कॅल्चॅसवर ज्या भयंकर आपत्ती कोसळाव्यात अशी माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे त्या आपत्ती प्रायमच्या साम्राज्यावर व ट्रोजनांवर कोसळतील. परंतु हा घोडा जर तुमच्या हस्ते तुमच्या नगरीत प्रस्थापित झाला तर पेलॉप्सच्या बुरुजांपर्यंत आक्रमणाची धडक मारण्यास तुम्हाला आशिया मोकळा होईल आणि ही अशी योजना तुमच्या पौत्रांसाठी नियतीदेवता करून ठेवील.

त्याच्या पाखंडीपणाने व धूर्तपणानें फसून आम्ही सिनॉनवर असा विश्वास ठेवला. त्याच्या बनवाबनवीने व खोटया अश्रूंनी ज्या माणसांना टायडिअसचा पुत्र किंवा लॅटिसिअन ॲकिलस, त्याच्या दीर्घ दहा वर्षांच्या युद्धात आपल्या हजार गलबतांच्या ताफ्यानेंही नमवू शकले नाहीत त्या माणसांना जाळ्यात पकडले.

'परंतु आमच्या दुर्देवाने याहूनही प्रचंड आणि भयंकर अनुभव आमच्या वाटयास आला आणि त्या अनपेक्षित धक्क्याने आम्ही विमनस्क होऊन गेलो. नेपच्यूनचा पुरोहित म्हणून चिठ्या टाकून निवड झालेला लेऑकून त्यावेळी विशिष्टपंथीय वेदीवर एका उमद्या बैलाचा बळी देत होता; इतक्यात नुसत्या आठवणीनेही मला कसेतरीच होत आहे; दोन राक्षसी समुद्रसर्प शरीराच्या कमानी करीत टेनेडॉसच्या शांत जलावरून पाणी कापीत भूमीकडे झेपावत होते. त्यांच्या शरीराचे पुढचे भाग आणि त्यांच्या मस्तकावरील रक्तासारखे लाल तुरे लाटांवर उंचावले होते, उर्वरीत शरीरे वळणावळणाची राक्षसी वेटोळी टाकीत मागून सागराच्या पाण्यातून झेपावत होती आणि मागे कापलेल्या पाण्याचे फेसाळलेले रोरावणारे पट्टे उठत होते. ते सर्प लगोलग समुद्र किनाऱ्यावर येऊन थडकले त्यांचे आग ओकणारे डोळे रक्तासारखे लालभडक होते आणि लवलवणाऱ्या जिव्हा फुत्कारणाऱ्या मुखावरुन फिरत होत्या. त्या दृश्याने आम्ही भयाने हतप्रभ झालो, आणि तेथून सैरावैरा धावत सुटलो. ते सरळ लेऑकून वर चालून गेले. प्रथम प्रत्येक सर्पाने लेऑकूनच्या एकेका मुलाला पकडले, त्याच्याभोवती विळखे घालून त्यांना आवळले आणि त्यांना दंश केले आणि त्यांचे चिमणे अवयव भक्षण केले. नंतर त्यांनी शस्त्र धारण करून आपल्या मुलांना वाचविण्याकरिता धावत येत असलेल्या लेऑकूनला पकडले. त्यांनी खवले असलेल्या आपल्या लांबलचक शरीरांचे राक्षसी विळखे दोनदा त्याच्या कमरेभोवती व दोनदा गळ्याभोवती आवळले तरीही त्यांच्या माना आणि मस्तके त्याच्यावर उंचावली होती. त्याचे हात त्या विळख्यांच्या मिठ्या सोडविण्याकरिता पिसाटासारखे झटत होते. घाण आणि काळ्या विषाने त्याची पुरोहिताची वस्त्रे भिजून गेली होती. मानेवर कुऱ्हाडीचा निसटता घाव बसल्यावर मानेला हिसडा देऊन ती कुऱ्हाड दूर भिरकावणारा,

आणि वेदीवरून जखमी होऊन चौखूर उधळणारा बैल जशा डरकाळ्या फोडतो तशा लेऑकूनच्या भयंकर किंकाळ्यानी आकाश दुमदुमले. सर्पद्वय आता माघारी फिरले. निर्दय मिनर्व्हाच्या उंच मंदिराकडे सरपटत तिच्या उच्चासनाधिष्ठीत मूर्तीच्या पायाजवळ तिच्या ढालीच्या वर्तुळामागे अदृश्य झाले. यावेळी थरकाप उडालेल्या प्रत्येक हृदयात आत्यंतिक भयाने प्रवेश केला. लेऑकूनने आपला भाला त्या पवित्र काष्ठाकृतीच्या उदरात भिरकावून त्या अश्वावर केलेल्या पापी व दुष्ट आघाताचे त्याला योग्य प्रायश्चित मिळाले असे लोक म्हणाले. सर्वचजण तो घोडा त्याच्या योग्य हक्काच्या स्थानी ओढून नेण्याची आणि सामर्थ्यशाली मिनर्व्हाच्या क्षमायाचनेच्या प्रार्थनेची जोरजोराने मागणी करीत होते

"आम्ही आमच्या संरक्षक भिंतींना भगदाडे पाडली. सर्वच उत्साहाने कामास लागले. तो ओढून नेणे सुलभ व्हावे म्हणून त्या घोड्याच्या पायाखाली लाकडाचे गोल ओंडके बसवले आणि वळलेले तागाचे दोर त्याच्या मानेला बांधले. गर्भात सशस्त्र योद्धे घेऊन ते मृत्युयंत्र आमच्या तटांवर आरुढ झाले. केवळ त्या दोराच्या स्पर्शानेही भाग्योदय होईल या सुखकारक आशेने कुमार आणि कुमारींनी त्याच्याभोवती स्तोत्रे गाइली. तो पशु वर चढतच गेला आणि नंतर अगदी ट्रॉयच्या मध्यभागी एखाद्या भीतीसूचक चिन्हासारखा खाली आद-ळला. हाय रे, माझ्या इलियमदेशा ! देवांनी तुला वसतीस्थान म्हणून निवडले होते ! तुझ्या भूमीचे व तटबंदीचे ट्रोजनांनी केवढ्या पराक्रमाने आजवर रक्षण केले होते. तो घोडा चार वेळ वेशीमधे अडखळला आणि प्रत्येकवेळी शस्त्रांचा खणखणाट त्यामधून उमटला. परंतु आम्ही मूर्ख, अंध आणि खुळेच राहिलो. आम्ही पुढे सरसावितच राहिलो आणि आमच्या पुनीत नगरीत त्या दुष्ट मूर्तिमंत भयाची स्थापना केली. कोणीही ट्रोजन तिच्यावर विश्वास ठेवणार नाही असा तिच्या देवानेच शाप दिलेल्या कॅसँड्राच्या ओठांनी भविष्यात वाढून ठेवलेल्या घटनेचे पुन्हा एकवार सत्यकथन केले. आम्ही नादान मूर्खांनी तो आमचा शेवटचा दिवस नगरीतील आमचे प्रत्येक मंदिर लतापल्लवांनी शृंगारण्यात व्यतीत केला.

मध्यंतरी तारकांगण फिरले. सागरावर रात्र पसरली आणि अंधाराच्या एकाच आवरणाखाली तिने पृथ्वी उंच आकाश आणि ग्रीकांची कुटील नीती झाकळून टाकली. भक्कम तटबंदीने वेढलेल्या त्या नगरीत, निद्रेच्या आलिंगनात थकलेले ट्रोजन चोहोकडे विसावले होते. त्यांच्याकडून थोडाही आवाज येत

नव्हता. त्याचवेळी ग्रीकांचे सर्व आरमार, सर्व जहाजांची व्यवस्थित रांग करून दडलेल्या चंद्राच्या मित्रत्वाच्या सहाय्यभूत अंधारातून गुप्तपणे टेनेडॉसहून त्यांच्या पूर्वीच्याच धक्क्याकडे येत होते. राजाच्या जहाजावरून अचानक प्रकाशाचा इशारा झाला आणि अन्यायी दैवाच्या संरक्षणाखाली सिनॉनने लपत छपत येऊन घोड्या-वरील पाईनच्या लाकडाचे अडसर दूर केले आणि ग्रीकांना त्यांच्या बंदिवासातून मुक्त केले. घोड्याचे उदर खुले झाले आणि ते मोकळ्या हवेत परत आले. मुक्त झाल्याच्या आनंदात त्या लाकडी पोकळीतून थेसॅन्ड्रस आणि स्टेनीलस हे दोन प्रमुख बाहेर पडले आणि नंतर निर्दय युलिसीझ घोड्याच्या उदरातून खाली सोडलेल्या दोरावरून घसरत खाली आला. नंतर अॅकॅमस व थोआस आले. पेलिअस वंशातील निओटोलेमस आणि पुढे मॅकॅऑन, व मागून मेनेलॉस आणि ज्याने तो घोडा तयार केला होता तो कारागीर इपिअस आले. मदिरेने अधिकच गाढ झालेल्या निद्रेत बुडून गेलेल्या नगरीवर ते चालून गेले. पहारेकऱ्यांना कापून काढून वेशी खुल्या केल्या गेल्या व त्यांनी त्यांच्या सहकाऱ्यांना आत घेतले; आणि योजनेप्रमाणे सैन्याच्या तुकड्या एकत्र आल्या.

दैवी वरदान अशी विश्रांती पामर मानवाला प्रथम स्पर्श करते आणि नंतर हळू हळू आपला गोडवा त्यांच्यावर पसरीत जाते असा तो अवसर होता. माझ्या स्वप्नात हेक्टर माझ्या पुढे उभा राहिलेला दिसला. तो अति दुःखी दिसत होता आणि तो मुक्तपणे अश्रू ढाळीत होता. त्या दिवशी रथामागून ओढला जात असताना तो जसा रक्ताने व धुळीने माखलेला, ओंगळ दिसत होता, तसाच तेव्हा दिसला. आणि ज्या ज्या ठिकाणी चामड्याच्या वाद्या रुतल्या होत्या तिथे तिथे. त्याचे पाय सुजले होते. हाय! त्याचे ते दर्शन किती व्यथित करणारे होते! अॅकिलीजची लूट मिरवीत, संगरातून परतलेल्या त्या पहिल्या हेक्टरपेक्षा, किंवा ज्या वेळी त्यानें ट्रोजनांचे अग्नीगोल ग्रीक जहाजांवर फेकले त्यावेळच्या हेक्टरहून तो किती तरी वेगळा दिसत होता! आता त्याची दाढी विस्कटून तिच्या झिज्या लोंबत होत्या आणि रक्ताने माखून केसांच्या जटा झाल्या होत्या. मातृभूमीच्या तटबंदीचे संरक्षण करताना लढ्यात त्याला झालेल्या जखमा अजूनही दिसत होत्या. मीच त्याच्याशी प्रथम बोललो असे मला स्वप्नात दिसले. मी रडत होतो आणि या दुःखद भेटींकरिता शब्द शोधण्याची मी परा-काष्ठा करीत होतो. "डार्डन भूमीच्या प्रकाशा! ट्रॉयची एकमेव दृढ आशा! तू आमच्यापासून इतका काळ दूर का राहिलास? हेक्टर, आम्ही तुझी किती वाट पहात होतो! तू आता कोणत्या लोकातून परतला आहेस? आम्ही आता थकलो आहोत आणि तुझे कित्येक लोक मृत्युमुखी पडले आहेत आम्हाला आणि आपल्या नगरीला असंख्य साहसातून आणि दिव्यातून जावे लागले आहे. पुन्हा तुझे दर्शन

घडेल असे वाटले नव्हते! परंतु तुझी ती राजस मुद्रा अशी लाजिरवाण्याप्रकारे विरुप कशामुळे झाली आहे? आणि मला दिसतात या जखमा कशा रे झाल्या? त्याने उत्तर दिले नाही आणि माझ्या निरर्थक प्रश्नांकडे लक्षही दिले नाही. गुदमरुन टाकणारा, अगदी काळजाच्या तळातून आलेला हुंदका देत तो म्हणाला. "व्हीनस पुत्रा, तुझ्याभोवती पसरलेल्या अग्नीप्रलयातून तू तुझी त्वरित सुटका करून घे. तुमची तटबंदी शत्रूच्या ताब्यात गेली आहे. आणि सर्व ट्रॉय त्याच्या उत्तुंग मनोऱ्यासह कोसळत आहे. प्रायम आणि आपली प्रियभूमी यांचे भाग्याचे दिवस संपले आहेत. जर कुणाच्या बाहुबलाने आपल्या बालेकिल्ल्याचे रक्षण होणे शक्य असते तर माझ्या बाहुबलाने ते निश्चितच केले असते. परंतु आता ट्रॉयने आपली कुलदैवते व गृहदैवते तुझ्यावर सोपविली आहेत. ती घेऊन तू तुझ्या नशिबाला सामोरा जा. आणि त्यांच्याकरिता, सागरावरील भ्रमंतीनंतर एक दिवस आहेस, ती तटबंदीबद्ध नगरी तू उभविणार आहेस व त्यांच्या थोरवीला साजेल अशा भाग्याला चढणार आहेस त्या भव्य नगरीचा शोध घे." तो हे बोलत असतानाच त्याने स्वत:च्या हातांनी अंतर्गाभाऱ्यातून ते पवित्र शिरोबंध आणि जिच्या ठायी सर्वसामर्थ्य सदैव नांदते ती व्हेस्टा आणि तिचा अखंड प्रज्वलित राहणारा गार्हपत्याग्नी बाहेर आणला.

आता नगरीच्या अंतर्भागातून घाबरलेल्या व्यथित किंकाळ्या माझ्या कानावर येऊ लागल्या, माझ्या वडिलांचे, अँकायसिसचे घर दूर एकीकडे झाडांच्या राईआड होते. परंतु तिथेही रणधुमाळीचा गोंगाट इतक्या मोठ्याने होऊ लागला की वातावरण त्याच्या भयाने ग्रासून गेले. मी झोपेतून दचकून जागा झालो आणि छपरावर अगदी उंच टोकावर चढून लक्षपूर्वक कान देऊन उभा राहिलो. बेबंद वारे वाहत असताना उभ्या पिकाला आग लागावी किंवा पर्वतावरून धो धो कोसळणाऱ्या महापुराच्या वेगवान प्रवाहाने बैलानी राबून पिकविलेली हसरी प्रसन्न पिके जमीनदोस्त करावीत, उभी अरण्ये उन्मळून पाडावीत आणि एखाद्या धनगराने उंच खडक कपारीवरून ती गर्जना असहाय्यतेने भयचकित होऊन ऐकत रहावे तसा तो प्रकार होता. वस्तुस्थितीविषयी आता मुळींच संशय नव्हता. ग्रीकांनी आम्हाला कसे ठकविले हे ताबडतोब ध्यानात आले. डायफॉबसच्या भव्य प्रासादाला अग्नीने केव्हाच अंकित केले होते. आणि तो धडधडून कोसळला होता. शेजारीच युकलेगॉनचा प्रासादही भडकला होता. सिजिअमची विस्तीर्ण खाडी या अग्नीप्रलयाने उजळून निघाली होती, किंकाळ्या उठत होत्या. आणि रणभेरी गर्जत होत्या. बेभान होऊन मी माझी शस्त्रे घट्ट धरली. युद्धाची काही योजना

माझ्या मनात होती असे नाही. परंतु लढा देण्याकरिता एखादी तुकडी एकत्र करून माझ्या सहकाऱ्यांसह मोक्याचे एखादे ठाणे धरून लढावे अशी ज्वलंत ईर्षा हृदयात होती. संतापाने बेभान झालेल्या मला निर्णय घ्यायला अवधीच नव्हता. रणांगणावरील मृत्यू गौरवशाली आहे एवढेच फक्त स्मरणात राहिले होते.

परंतु त्याचवेळी बालेकिल्ल्यावरील अॅपोलोच्या मंदिराचा पुरोहित ऑथ्रिसचा पुत्र पँथस समोर आला. ग्रीकांच्या अस्त्रांपासून तो बचावला होता. आणि आमच्या दाराकडे सैरभैर होऊन धावत येत होता. तो आपल्या छोट्या नातवाला हाती धरून चालवीत होता. आणि त्याने त्याची पवित्र उपकरणे व पराभूत दैवतांच्या मूर्ती बरोबर आणल्या होत्या. 'पँथस' मी ओरडून विचारले, "कोणता भाग सर्वात अधिक धोक्यात आहे ? आपण कोठे मोर्चा लावून झुंजायचे आहे ?" माझे बोलणे संपण्यापूर्वीच तो विव्हळत उत्तरला. "आपल्या डार्डन भूमीचा अंतिम दिवस उजाडला आहे. ही घडी अशी आहे की आपला कोणताही प्रयत्न ती बदलू शकत नाही. आपण ट्रोजन आता संपले आहोत. इलिअम संपले आहे. ट्यूक्रिअन वैभवाचा दिमाख संपला आहे. आता सर्व अरगॉसच्या स्वाधीन आहे. ही ज्यूपिटरची निर्दय इच्छा आहे. कारण ग्रीक आता या आपल्या नगरीचे स्वामी आहेत आणि ती आताच धडधडून पेटते आहे. सशस्त्र योद्ध्यांचा पूर बाहेर लोटीत तो घोडा आपल्या तटाच्या आत मनोऱ्यासारखा उभा आहे. आणि विजयानेच दिमाख दाखवीत सिनॉन अग्नी भडकवीत आहे. ग्रीकांचे ते सार्वभौम मिसिनीहून आलेले, सहस्त्रावधी मुख्य सैन्य उघड्या वेशीशी मोठ्या संख्येने लोटले आहे. बाकीच्या सैन्याने अरुंद रस्ते सज्ज शस्त्रांनी रोखून धरले आहेत. त्यांच्या नग्न खड्गांची तळपती टोके, जणू एक चमचमणारी पोलादी रांगच, तात्काळ यमसदनास पाठविण्यास तत्पर आहेत. वेशीवरील आघाडीचे रक्षकच केवळ प्रतिकाराचा प्रयत्न करीत आहेत आणि ते अंधपणे कसल्याही पूर्व योजने-विना झुंजत आहेत."

पँथसच्या या शब्दांनी आणि कसल्यातरी दैवी प्रेरणेने मला त्या आगीत आणि युद्धात पुढे झुगारून दिले. गर्जना आणि आकाशास भिडणाऱ्या किंकाळ्यांनी आणि सूडाच्या तीव्र भावनेने मला येथपर्यंत वाट दाखविली. रिफिअस आणि सामर्थ्यशाली योध्दा इपिरस अंधुक चन्द्रप्रकाशात माझ्याकडे येताना मला दिसले. त्यांच्यासमवेत हायपॅनिस आणि डायमॅस आणि तरुण कोरोइबस होते. ते सर्व माझ्या बाजूने खडे राहिले. कोरोइबस हा मिगडॉनचा एक पुत्र होता. योगा-योगानेच तो काही दिवसांपूर्वी ट्रॉयला आला होता. प्रायमला आणि आमच्या

राष्ट्राला सहाय्य करण्याचे अभिवचन देऊन कॅसांड्राशी विवाहबद्ध होता येईल अशी त्याला आशा होती. कारण कॅसांड्रावर त्याचे आत्यंतिक, अविवेकी प्रेम होते. आणि त्याने त्याच्या राजकुमारीच्या भयदायक पूर्वसूचना मानल्या नाहीत ही फार दुर्दैवाची गोष्ट होती. खांद्याला खांदा भिडवून उभे राहिलेल्या, युद्धात निर्भर असलेल्या त्यांना मी आवाहन केले. "मर्दांनो, निधड्या छातीच्या वीरांनो–पण शौर्याचा आता आपणास फारसा उपयोग होणार नसला तरी साहसाचा मार्ग शेवटपर्यंत अनुसरायचा असे तुम्ही ईर्षेने ठरविले असेल तर दैवाचे फासे आपल्याला कितपत अनुकूल पडणार आहेत याचा स्वतःच नीट शोध घ्या. ज्यांच्यावर आपले सामर्थ्य अवलंबून होते. त्या देवांनी आपले देव्हारे आणि वेदी सोडल्या आहेत व ते आपणामधून निघून गेले आहेत. जी नगरी तुम्ही वाचवू पाहता ती आताच धडधडत आहे शस्त्रांच्या या गदारोळात स्वतःला झोकून देणे आणि मरणे एवढेच आता आपल्याकरिता उरले आहे. आता आपणाला कोणीही वाचवू शकत नाही ही जाणीवच पराजिताला वाचवू शकते."

या उद्गारामुळे त्यांच्या उमद्या मनांना निर्वाणीचे सामर्थ्य प्राप्त झाले. सतत आतडी तोडणाऱ्या भुकेने आणि घसा सुकून गेलेल्या, मागे राहून त्यांची परतण्याची वाट पाहत असलेल्या आपल्या छाव्याच्या आठवणीने वेडावलेले लांडगे जसे दाट धुक्यातून आंधळेपणाने शिकारीमागे धावतात तसे आम्ही अंधाराच्या काळ्या मुलायम पंखांच्या छायेत भाल्यांच्या गर्दीतून निश्चित मृत्यूकडे दौडत शत्रुच्या फळीमधून थेट मार्ग काढीत ट्रॉयच्या मध्यावर आलो.

त्या रात्रीचे हत्याकांड आणि मृत्यूचे कराल तांडव शब्दांमधून व्यक्त करता येणार नाही. अश्रूंना त्या यातनांची बरोबरी करता येणार नाही. एक प्राचीन नगर धुळीस मिळत होते, आणि त्याच्या दीर्घकालच्या साम्राज्याचा अंत होत होता. सर्वच रस्त्यांवर, घराघरांतून आणि आजवर आमच्या पावलांनी पूज्यबुद्धीने स्पर्शिलेल्या मंदिरांच्या पायऱ्यावर मृतांचे अचेतन देह पडले होते. केवळ ट्रोजनांनीच आपल्या रक्ताने दंड भरला असे नव्हे. कधीकधी पराजितांमध्येही शौर्याचा संचार होत होता, आणि अशावेळी विजयी होऊनही ग्रीक धारातीर्थी पडत होते. मृत्यूच्या सहस्त्र रूपांसह यातना आणि भय यांचे ते एक समग्र वेदनाकांडच होते.

आमच्या तुकडीला प्रथम भेटला तो अॅन्ड्रोजिऑस. त्याच्याबरोबर ग्रीकांची एक प्रबळ तुकडी होती. आम्ही त्याच्या तुकडीतीलच चाल करून जाणारे आहोत असा त्याने गाफीलपणे समज करून घेतला. त्याने आम्हाला मित्रत्वाने आरोळचाही

दिल्या. "मित्रांनो त्वरा करा! तुम्हाला इतका उशीर का झाला आणि असे रेंगाळत का चालला आहात? ट्रॉयनगरीचा मध्य भाग आताच धडधडत आहे आणि इतर सैनिक लूट आणि विध्वंस करीत आहेत आणि तुम्ही आताच उंच गलबतावरून येत आहात काय? पण त्याला आश्वासनात्मक उत्तर मिळाले नाही; आणि त्याचे बोलणे संपण्यापूर्वीच आपण अगदी शत्रूच्या फळीत गवसलो आहोत हे त्याला उमगले. त्या धक्क्याने तो मागे हटला आणि त्याने आपले शब्द आवरले. एखाद्या माणसाने जोराने जमिनीवर पाय टेकावा आणि आपला पाय रानटी काटेरी झाडोऱ्याखाली लपलेल्या सापावर पडला आहे हे समजल्यावर, त्या सर्पाने आपली पोलादाच्या रंगाची निळसर मान फुगवून दंश करण्याकरिता त्वेषाने उंचविल्यावर एकाएकी भयाने दचकून मागे फिरावे तशी त्याची अवस्था झाली. आम्हाला पाहताच अॅन्ड्रोजिआसही तसाच थरथर कापू लागला आणि त्याने माघार घेण्याचा प्रयत्न केला. परंतु आम्ही चढाई केली. ग्रीकांना या भूप्रदेशाची माहिती नव्हती, ते भयभीत झाले होते. आणि आमच्या प्रतिहल्ल्याने ते पुरे वेढले गेले. आम्ही त्यांना जमीनदोस्त केले. आमचे पहिलेच साहस यशस्वी झाले. तेव्हा या विजयाने उल्हसित झालेला साहसी व उत्साही कोरोइबस म्हणाला. "मित्रहो, भाग्यदेवतेचा हा पहिला कौल आपण सूचना म्हणून स्वीकारावा. तिच्या कृपादर्शक हास्याच्या आधाराने, शत्रूवर मात करून आपण एखाद्या सुरक्षित जागी जाऊ. आपल्या ढालींची ग्रीकांच्या ढालींशी अदलाबदल करू. त्यांचे गण-दर्शक स्कंधबंध आपण परिधान करू. शत्रूशी आपण खुल्या मैदानात शौर्याने लढतो की दगाबाजपणे त्यांना ठकवतो याची कोण फिकीर करतो? आपल्याला आवश्यक असलेली शस्त्रे ग्रीकच आपल्याला देतील." या शब्दांबरोबरच त्याने अॅन्ड्रोजिऑसचे पिसांचा तुरा असलेले शिरस्त्राण व त्याची डौलदार चिन्हे कोरलेली ढाल धारण केली; आरगाईव्हचे खड्ग त्याने आपल्या कमरेला लटकविले. पराभूतांची नुकतीच लुटलेली शस्त्रे धारण करून रिफिअस, डायमॅस व आमच्या तुकडीतील इतरांनी मोठ्या उत्साहाने त्याचे अनुकरण केले. ग्रीकांमध्ये मिसळून व परक्या दैवतांना वंदन करीत आम्ही असेच पुढे जात राहिलो. त्या मिट्ट काळोखात आम्ही अनेक समरप्रसंगात लोटले गेलो, आणि जेव्हा जेव्हा आम्ही झुंजलो तेव्हा तेव्हा आम्ही अगणित ग्रीकांना यमसदनास पाठविले. इतर ग्रीक उधळले आणि आपल्या जहाजांकडे पळून गेले. रक्षणाकरिता समुद्रकिनाऱ्याकडे ते धावत सुटले. काही तर उंच चढून त्या घोड्याच्या विशाल उदरात पुनः लपण्याइतके भ्याड होते.

उच्चारावयास दुःख वाटते पण जेव्हा परमेश्वरच आपल्या भक्तीचा अव्हेर करतो तेव्हा त्यावर श्रद्धा ठेवणे हेही निषिद्धच ठरते. कारण आमच्या डोळ्यादेखत

साक्षात प्रायमची कन्या कॅसांड्रा हिला मिनव्र्हाच्या श्वेत मंदिरातून फरपटत ओढून नेले जात होते. तिचे केस वाऱ्यावर उडत होते. तिला आपले जळजळीत नेत्रच केवळ आकाशाकडे असहाय्यतेने वळविता येत होते; कारण बांधल्यामुळे तिला तिचे नाजूक हात प्रार्थनेसाठी उंचविता येत नव्हते. या अवस्थेत कोरिबसला तिच्याकडे पाहवत नव्हते. बेभान होऊन तो ग्रीकांमधे घुसला आणि अटळ मृत्यूच्या स्वाधीन झाला. सर्व शस्त्रानिशी चढाई करून आमचे सर्व पथक त्याच्या पाठोपाठ गेले. आणि आता प्रथमच आमच्यावर आमच्याच बाजूने हल्ला झाला. मंदिराच्या गोपुरातून आमच्यावर भाल्यांचा वर्षाव झाला. आमचे ग्रीक शिरपेच आणि ग्रीक घडणीची शस्त्रे यामुळे त्यांची चुकीची धारणा झाली. आणि अशा तऱ्हेने अति दुःखद कत्तल सुरु झाली. राजकन्येच्या सुटकेच्या प्रयत्नाने संतापून ग्रीकांनी गर्जना केली. सर्वांत अधिक संतापलेला अजॅक्स, ॲगमेमनॉन व मेनेलॉस, सर्व डोलोपिअन सैन्यासह एकवटून आमच्यावर चालून आले. अरण्ये कडाडत असताना आणि नीरिअस सागरफेनामध्ये आपला त्रिशूळ जोरजोराने परजून सागर तळापासून ढवळून काढीत असताना प्रचंड वादळ उठल्यावर परस्परावर आदळणारे वारे पश्चिम आणि दक्षिण, आणि उषेच्या अश्वांवरून दिमाखात दौडत येणारे पूर्व वारे जसे येतात तसे सगळीकडून एकवटून ते आले. ज्यांना आम्ही रात्रीच्या अंधारात पिटाळून लावून सर्व ट्रॉयमधून त्यांचा पाठलाग केला होता होता त्यांच्यापैकी काहींशीही आमची पुन्हा प्रत्यक्ष गाठ पडली. आमच्या फसव्या ढाली आणि शस्त्रातूनही त्यानीच आम्हाला प्रथम ओळखले. आमची भाषा त्यांना अपरिचित होती हेही त्यांच्या लक्षात आले. आम्ही पूर्ण असहाय्य होतो, आणि संख्याबलाने आमच्यावर मात केली होती. कोरोइबस प्रथम पडला. सर्वशक्तिमान देवतेच्या वेदीजवळ पेनेलिऑसच्या हातून त्याचा वध झाला. ट्रोजनामधील सर्वात अधिक न्यायप्रिय रिफिअस पण पडला. तो कधीही सन्मार्गापासून विचलित झाला नाही तरीही परमेश्वराने त्याच्या सत्प्रवृत्तीची तमा केली नाही. हायपॅनिस आणि डायमॅसही त्यांच्या मित्रांकडून घायाळ होऊन मृत्युमुखी पडले. आणि पँथस, तूही! तुझे सर्व पावित्र्य आणि तुझ्या मस्तकावरील साक्षात ॲपोलोचे प्रसादचिन्हही तुझ्या मृत्यूपासून तुला वाचवू शकले नाही. हे इलिअमच्या रक्षे! मला प्रिय असलेल्या सर्वांचे दहन करणाऱ्या शेवटच्या ज्वाले! तुमच्या अस्ताच्या क्षणी मी कोणत्याही धोक्याच्या समरप्रसंगातून, शस्त्रांच्या गर्दीतून कधीही मागे सरलो नाही. पण ग्रीकांच्या हातून मला नक्कीच यावयास हवा होता तो मृत्यू नियतीने माझ्यापासून हिरावून घेतला याला तुम्ही साक्षी आहात. आम्ही आता परस्परांपासून दूर झुगारले गेलो होतो. माझ्याबरोबर वृद्ध आणि शिथिलगात्र इफिटस

आणि युलिसिसकडून जखमी झाल्यामुळे गती मंदावलेला पिलिअस होता. आरो-ळ्यांच्या रोखाने आम्ही सरळ प्रायमच्या प्रासादाकडे गेलो. समराची दाहकता तेथे खरोखर तीव्र होती. तिच्या मानाने नगरीतील इतरत्र चाललेला संगर आणि संहार काहीच नव्हते. त्याच्या संपूर्ण रौद्र स्वरुपांत मार्स आमच्यापुढे ठाकला होता. ग्रीक चढाईने प्रासादाला भिडले होते. त्यांनी प्रवेशद्वाराशी इतकी झुंबड केली की गर्दीत त्यांच्या पाठीवरच्या ढाली एकमेकाशी भिडत होत्या. जागोजागी भिंतीवर शिड्या पक्क्या बसल्या होत्या आणि हल्लेखोर दाराच्या चौकटीच्या वरच्या भागाजवळील शिड्यांच्या पायऱ्यांवर पाय रोवून चढू लागले होते. संरक्षणाकरिता ढाली डाव्या हातात पुढे धरून, उजव्या हातांनी त्यांनी छप्पर पकडलें होते. त्यांना प्रतिकार करण्याकरिता मृत्यूच्या काठावर असलेल्या आणि आता आपली अवस्था आत्यंतिक निराशाजनक आहे याची जाणीव असलेल्या ट्रोजनांनी स्वतःचे रक्षण करण्याकरिता घरांच्या छपरावरील कौलेही उपसली आणि अस्त्रासारखा उपयोग करण्याकरिता मनोरेही खिळखिळे केले. ट्रॉयच्या पूर्वजांना ज्याचा अभिमान होता अशा सोन्याने मढविलेल्या तुळयाही त्यांनी शत्रूवर लोटल्या. काहींनी अनावृत्त खड्गाग्रांनी एकजुटीने प्रवेशद्वारे अडवून त्यांचे समर्थपणे रक्षण केले. धैर्याची नवी लाट सर्वांमध्ये उचंबळून आलेली आम्ही अनुभवली. आणि प्रासादाचे रक्षण करण्याचा, तो लढविणाऱ्यांना दिलासा देण्याचा व पराजितांना नवे सामर्थ्य देण्याचा आम्ही निश्चय केला.

एका गुप्त दारातून प्रासादात लपूनछपून प्रवेश करता येत होता. राजा प्रायमच्या कुटुंबीय मंडळीच्या महालांना जोडणारे हे दार येणाऱ्याजाणाऱ्यांच्या नजरेस येत नसे. आमच्या साम्राज्याच्या काळात बिचारी अँड्रोमॅकी एकटीच या वाटेने छोट्या ॲस्टिॲनॅक्सला त्याच्या आजोबांच्या भेटीसाठी बरोबर घेऊन, हेक्टरच्या मंडळींकडे जाण्याकरिता या वाटेने जात असे. येथून मी प्रवेश केला. आणि उतरत्या छपराच्या सर्वांत उंच टोकावर चढलो. इथून दुर्दैवी ट्रोजन आपली निरुपयोगी निष्प्रभ शस्त्रे फेकण्यात मग्न होते. एका उंच कड्यावरील दुसऱ्या एका वास्तूच्या छपरावर एक मनोरा बांधलेला होता. त्या उंच टोकावरून आम्ही सर्व ट्रॉयभूमी आणि ग्रीकांचा तळ व आरमार पहात असू. वरच्या मजल्यावर जिथे ढिले पडलेले सांधे दिसले तिथे आम्ही पोलादी शस्त्रांनी घाव घातले. त्या उंच स्थानावरून आम्ही तो भाग खेचून वेगळा केला व पुढे लोटून दिला. तो भाग तात्काळ गडगडाट करीत आणि मागे गदारोळ उठवीत हल्लेखोरांच्या अनेक

रांगावर कोसळला. परंतु दुसऱ्यांनी त्यांची जागा घेतली आणि त्यांच्या दगडांचा व सर्व प्रकारच्या अस्त्रांचा वर्षाव किंचितही ढिला पडला नाही.

दर्शनी महालासमोर, प्रासादाच्या अगदी प्रवेशद्वारातच पृथ्वीच्या गर्भात एक हिवाळा काढल्यानंतर, विषवल्लीच्या भक्षणाने पुष्ट झालेला सर्प बाहेर प्रकाशात यावा, त्याने कात टाकून तकतकीत ताजातवाना आणि तरुण व्हावे, सूर्याकडे सन्मुख होऊन उंच छाती काढावी, मागे वळवळणारी वेटोळी असावीत आणि त्याची त्रिदल जिव्हा लवलव करीत असावी, तसा ब्राँझच्या तेजस्वी आवरणात चकाकणारा सशस्त्र गर्वच जणू साकार झाल्यासारखा पायरस उभा होता. त्याच्याबरोबर राक्षसी पेटोफॅस, ॲकिलीझचा सारथी आणि अनुचर ऑटो-मिडॉन आणि स्कायरॉसचे सर्व पथक होते. एकजुटीने ते प्रासादावर चालून आले. आणि त्यांनी छपरावर पेटते पलिते फेकले. सर्वात पुढे असलेल्या पायरसने एक कुऱ्हाड घेतली आणि त्या बळकट दरवाजाचा चुराडा केला. ब्राँझच्या बिजागऱ्यांचे खांब त्यांच्या खोबणींतून उखडले; थोड्याच वेळात त्याने एक फळी फोडून काढली आणि ओकच्या दणकट दारात एक भगदाड पाडून मोठी, आ वासलेली खिडकीच तयार केली. सारा अन्तर्भाग उघडा पडला, सज्जांची एक लांबलचक रांग एक-दम दिसू लागली, आणि राजा प्रायम आणि त्याच्या पूर्वीच्या राजांचे खाजगी निवासस्थान, प्रवेशद्वाराच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या सशस्त्र रक्षकांसह दृष्टीस पडले.

प्रासादात केविलवाणी रडारड, गोंधळ आणि आरडाओरडा चालू होता. स्त्रियांच्या व्यथित कारुण्यपूर्ण रुदनाने प्रासाद इथूनतिथून घुमत होता, आक्रंदन सुवर्ण प्रभांकित तारकापर्यंत भिडत होते. पोक्त स्त्रिया भयातिशयाने वेडावून त्या भव्य प्रासादात उगीचच सैरभैर धावत होत्या. खांबाना मिठ्या मारून त्यांची चुंबनें घेत होत्या. ॲकिलीझप्रमाणेच पायरसही पुढे आला: कसलेही दार किंवा अडसर आणि रक्षक हा हल्ला थोपवू शकले नाहीत. सतत चाललेल्या माराने दरवाजा कोसळून पडला. बिजागऱ्यांचे खांब त्यांच्या खोबणीतून उखडून निघाले आणि पुढच्या बाजूस कोसळले. भयंकर संहारानंतर मार्ग मोकळा झाला. जबरीने दुर्दम्य हल्ला करीत आत प्रवेश मिळवल्यानंतर आणि पहिल्या रक्षकांची कत्तल केल्यावर एखाद्या नदीचे फेसाळलेले पाणी आपले किनारे फोडून त्यावरून उसळत्या प्रपाताप्रमाणे झेपावले, आणि सर्व बांध उलथून तो उन्मत्त पाण्याचा लोंढा नांगरलेल्या जमिनीत घुसतो आणि गुरे आणि त्यांचे गोठे योजनेच्यायोजने दूर प्रदेशात वाहवीत नेतो, त्याहीपेक्षा अधिक मोठ्या ग्रीकांच्या लोंढ्याने प्रासाद

भरून गेला. डोळयांत खून चढलेला पायरस आणि अॅगमेमनॉन आणि मेनेलॉसला मी स्वतः प्रवेशद्वाराच्या अगदी आत आलेले पाहिले. त्यांनी तिच्या शंभर कन्यासहित हेकुबाला व स्वतःच्याच रक्ताने स्वतःच प्रतिष्ठित केलेल्या वेदीतील पवित्र अग्नी भिजवून भ्रष्ट करताना प्रायमला पाहिले. ती पन्नास शयनमंदिरे आणि त्यासमवेत वंशवृद्धीची आशा, आणि ते विजय चिन्हानी आणि पूर्वेकडील सुवर्णाने मंडित झालेले स्तंभ खाली कोसळले. जिथे जिथे अग्नी अजून प्रवेशला नव्हता तिथे तिथे ग्रीकांनी प्रभुत्व प्रस्थापित केले होते.

"प्रायमचा मृत्यू कसा घडला हेही जाणून घ्यायची तुम्हाला उत्सुकता असेल."

ट्रायचे पतन झाले आहे व ते शत्रूच्या हाती पडले आहे, प्रासादाचे दरवाजे चौकटीतून उखडले आहेत, आणि शत्रू आत घुसला आहे हे राजाला दिसले तेव्हा वृद्ध असूनही त्याने वार्धक्याने थरथरणाऱ्या आपल्या खांद्यांवर दीर्घकाल न वापरलेले उरस्त्राण चढविले आणि हतप्रभ झालेले खड्ग कमरेस लटकविले. आणि आपल्या मृत्यूस सामोरे जाण्याकरिता शत्रूच्या ऐन गर्दीकडे तो त्वरेने निघाला. प्रासाद मध्यावर उंच आभाळाखाली अनाच्छादित अशी एक प्रशस्त वेदी होती. तीवर एक जीर्ण बे वृक्ष ओणावला होता व त्याने स्वतःच्या छायेने प्रासादाच्या पावित्र्याला कवटाळले होते. या वेदीभोवताली त्या आता असुरक्षित असलेल्या पवित्र गाभाऱ्यात मूर्तींना मिठ्या घालून हेकुबा व तिच्या कन्या, उतरणाऱ्या वादळात, भरारी मारून निवाऱ्याला येणाऱ्या कबुतरासारख्या बसल्या होत्या पूर्वी तारुण्यात असे त्याप्रमाणे शस्त्रसज्ज झालेल्या प्रायमला पाहून त्याची कीव करीत हेकुबा म्हणाली, "नाथ, तुम्ही अशी शस्त्रे कशाला धारण केलीत? तुम्ही कसला उत्पात करण्यास निघाला आहात? इतक्या त्वरेने तुम्ही कुठे निघाला आहात? आता अशा सहाय्याचा किंवा सशस्त्र एकजूट प्रतिकाराचा उपयोग होण्याजोगा नाही. माझा हेक्टर जरी आज आपल्यात असता तरी तीच अवस्था असती. जाऊ नका इकडे आमच्याकडे या. ही वेदीच आपले सर्वांचे रक्षण करील नाहीतर आपण एकत्र तरी मरु." असे म्हणून तिने त्या वृद्ध राजाला आपल्याकडे ओढले आणि वेदीपाशी त्याच्याकरिता जागा केली.

तेवढ्यात प्रायमचा पुत्र पॉलिटीझ पायरसच्या हातून वध होता होता वाचून, घायाळ होऊन, शत्रुच्या फळीतून व त्यांच्या भाल्यांमधून, लांबलचक कलाकुसर केलेल्या स्तंभांच्या रांगांमधून व रिकाम्या दिवाणखान्यांतून पळत येत

होता. पायरस त्याच्या पाठीवरच मोठ्या त्वेषाने धावत होता. तो आपल्या भाल्याने दुसरा घाव घालण्याच्या अगदी बेतात होता क्षणाक्षणाला तो त्याच्यावर झडप घालण्याइतका जवळ येत होता. शेवटी पॉलिटीझ आपल्या मातापित्यांच्या दृष्टीच्या टप्प्यात आला आणि त्यांच्यासमोरच तो कोसळला आणि रक्ताच्या पाटात त्याचे प्राण धुपून गेले. भोवती मृत्यूचा वेढा पडला असून आणि सुटकेचा एकही मार्ग नसताना प्रायमने स्वतःला किंवा स्वतःच्या क्रोधाला आणि शब्दांना आळा घातला नाही. तो त्वेषाने उद्गारला, "अरे, स्वर्गात जर निखळ अधर्माची दख्खल घेणारी कोणी सत्वशीलशक्ती असेल तर देव तुझ्या दुष्टपणाचे, माझ्या पुत्राचा वध माझ्या प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहायला लावण्याचे, पित्याच्या पुढ्यात केलेल्या या हिडीस अत्याचाराचे योग्य बक्षीस आणि शाबासकी तुला देवो! अरे जो तुझा पिता आहे असा तू खोटा दावा करतोस त्या थोर ॲकिलीझनेही प्रायम त्याचा शत्रु असतानाही त्याला असे वागविले नाही. शरणागताच्या वाजवी हक्कांचा त्याने इमानाने मान राखला. हेक्टरचा निष्प्राण देह त्याने क्रियाकर्मांकरिता परत केला. आणि मला माझ्या राज्यात सुरक्षित परतू दिले." तो वयोवृद्ध राजा असे म्हणाला आणि त्याने आपला भाला फेकला परंतु जोरदार जखमी आघात करण्याची ताकत त्याच्यात नव्हती; ब्राँझच्या ढालीने तो आडवला गेला. तेथे त्याचा नुसता खणकन आवाज झाला आणि ढालीच्या मध्यावर तो रुतून लोंबत राहिला. पायरसने उत्तर दिले, तसे असेल तर मग तू माझा ॲकिलीझकडे जाणारा दूत हो. माझी निंद्य कृत्ये आणि त्याच्या पुत्राने त्याला कसा कलंक लावला ते त्याला आठवणीने सांग, आता मर!" असे म्हणून त्याने प्रायमला, त्याच्या स्वतःच्या पुत्राच्या रक्ताच्या थारोळ्यातून, तो थरथर कापत व घसरत असतांना वेशीपर्यंत थेट फरफर ओढीत नेले, आपला डावा हात प्रायमच्या केसात खुपसला; उजव्या हाताने त्याने आपले तळपते खड्ग उगारले आणि त्याच्या मुठी पर्यंत त्याच्या शरीरात खुपसले. ट्रॉयचा अग्नीप्रलय आणि ट्रॉयच्या तटबंदीचा पाडाव स्वतःच्या डोळ्यांनी पाहिल्यावर प्रायमचे जीवित येथे संपले. ज्याने आशियाई भूमीवरील एका महान साम्राज्यावर आणि लोकांवर धीरोदात्तपणे साम्राज्य केले त्याच्या नशीबी असला मृत्यू होता. त्याचा उंचापुरा देह मस्तकहीन असा किनाऱ्यावर फेकलेला पडला होता. आणि त्याच्याजवळच त्याच्या खांद्यावरून तोडलेले मस्तक पडले होते एक अनामिक कलेवर.

नंतर मला एका बेफाम भयाने ग्रासले. मी जेव्हा भयंकर जखम झालेल्या राजा प्रायमचे प्राण जाताना पाहिले त्यावेळी माझ्या वडिलांचे चित्र मी मनाशी

रेखाटले. कारण दोघेही समवयस्क होते. आणि अनाथ झालेली क्रेऊसा माझ्या घराची लूट आणि माझ्या छोटया आयुलसचे भवितव्य माझ्या डोळयापुढे उभे राहिले. माझ्या पाठीशी किती कुमक अजून आहे हे मी मागे वळून पाहिले. परंतु सगळेच मला सोडून गेले होते. पूर्णतया हतबल झालेल्या त्यांनी एकतर स्वत:ला इमारतीवरून खाली जमिनीवर झोकून तरी दिले होते किंवा नैराश्याने व्यग्र होऊन अग्नीत तरी लोटून दिले होते. असा आता मी एकटाच जिवंत राहिलो होतो. आणि त्याचवेळी मी तिला, टिनडॅरिड हेलनला पाहिले, भडकलेल्या ज्वालांच्या प्रकाशात मी सर्वत्र डोकावीत भटकत होतो. तिथे ती होती—नि:शब्द, निश्चल, एकीकडे--व्हेस्टाच्या मंदिराच्या दाराजवळ लपून राहिलेली. ज्यांचे नगर उध्वस्त झाल होते त्या ट्रोजनांचा आत्यंतिक कडवट द्वेष आणि ग्रीकांकडून तिचा वाजवीरीत्याच घेतला जात असलेला सूड, आणि ज्याला टाकून ती आली होती त्या पतीचा क्रोधाग्नी या सर्वांचे तिला सारखेच भय वाटत होते. ट्रॉय आणि तिची स्वत:ची भूमी या दोहोला ती सारखीच शापभूत ठरली होती. तिरस्कृत अशी ती वेदीजवळच लपून राहिली होती. माझा सर्व द्वेषाग्नी उफाळून आला. माझ्या गृहनाशाचा सूड घेण्याकरिता, तिच्या प्रत्येक अपराधाचे शासन तिला देण्याकरिता मी संतापाने पेटलो होतो. मी स्वत:शीच विचार केला, "ती आपल्या कुठल्याच हिताला धक्का लावून न घेता, स्पार्टा आणि मिसिनीला, तिच्या जन्मभूमीला परतणार आहे तर! विजयी राज्ञी म्हणून तोऱ्याने मिरवणार आहे! ती आपल्या पतीला मातापित्यांना, मुलांना, घराला पुन: डोळे भरून पहाणार आहे! आमच्या देशातील ट्रोजन स्त्रियांचा आणि उमरावांचा परिवार तिची सेवा करण्याकरिता तिष्ठणार आहे! आणि हे सर्व प्रायमचा खड्गाने वध झाल्यानंतर; ट्रॉयची अग्नीप्रलयात राख झाल्यानंतर. आणि आमच्या डार्डन किनाऱ्यावर पुन:पुन: रुधिराभिषेक झाल्यानंतर? नाही! तसे होणार नाही!! स्त्री हत्या करण्यात मोठासा पुरुषार्थ नसेल. अशा विजयामुळे काही सुकीर्ति होणार नाही! परंतु एक भयंकर पाप तुडवून नष्ट केल्याचे, न्यायाला आव्हान देणाऱ्या पापाला शासन केल्याचे काहीसे श्रेय मला मिळेल; आणि या अग्नीप्रलयाचा सूड घेण्याची माझी इच्छा आकंठ पूर्ण केल्याचा आनंद मला मिळेल आणि मला प्रिय असलेल्या सर्वांच्या रक्षांना शांती मिळेल!"

"माझे हे शब्द पिसाटासारखे होते. कारण माझ्या विवेक शक्तीचा उन्मादाने संपूर्ण पाडाव केला होता. व तिच्यावर पूर्ण अधिकार गाजवण्यास सुरुवात केली होती. परंतु ते शब्द उच्चारीत असतानाच माझ्यापुढे माझी स्नेहमयी आई

प्रकट झाली. पूर्वी कधीही इतक्या स्पष्टपणे मला ती दिसली नव्हती. त्या अंधारातून तिची दिव्य, निष्कलंक प्रभा माझ्यावर पसरली. आपले दैवी स्वरूप तिने पूर्णपणे प्रकट केले होते; अमर देवांमध्ये ती अशाच लावण्याने व दिमाखाने विहरत असावी. माझा हात धरून तिने मला थांबवले; आणि तिच्या गुलाब-पाकळ्यासारख्या ओठातून शब्द आले." बाळ, कडवटपणाने असा अनावर क्रोध तुझ्यात कसा जागृत होतो रे! हा असा अंध संताप का? आणि आमच्यावरील तुझे प्रेम तुझ्या विचारातून इतके पार नाहीसे कसे झाले? वार्धक्याने थकलेले तुझे वडील अँकायसिस यांना तू कुठे सोडले आहेस, तुझी पत्नी क्रेऊसा, आणि पुत्र अॅस्कॅनिअस अद्यापी जिवंत आहेत का ते तू प्रथम पहावयास नको काय? त्यांच्याभोवती सर्वत्र ग्रीकांच्या झुंडीच्या झुंडी झडप घालण्याची संधी पहात फिरत आहेत. आणि मी त्यांच्या हिताविषयी दक्ष राहून त्यांचे रक्षण केले नसते तर आतापर्यंत अग्नीज्वालांनी त्यांना ग्रासले असते नाहीतर क्रूर शस्त्रांनी त्यांचा घास घेतला असता स्पार्टन टिनडॅरिडच्या तिरस्कृत सौंदर्यवतीला, हेलनला, आणि पॅरिसलाही तू दूषण देऊ नकोस. दया दाखविली नाही ती देवांनी तेच ट्रॉयला वैभव आणि सत्तेपासून खोल लोटीत आहेत. हे पहा; तुझी मर्त्य दृष्टी मंद करणारे व तिच्यावर पडदा ओढणारे हे तुझ्याभोवतालचे उदासवाणे आणि दमट धुके मी ओढून दूर करते. आईच्या आज्ञेचे तुला भय वाटता कामा नये आणि तिच्या आज्ञा पालन करण्याचे नाकारू नकोस. तुला तिथे ढासळलेल्या बांधकामाचे ढीगच्या ढीग, व एकमेकापासून निखळलेले चिरे दिसत आहेत, आणि जिथे धूळ आणि धुराचे लोट एकत्र वर उठत आहेत तिथे नेपच्यून स्वतः कामाला लागला आहे. तो भिंती फोडून काढीत आहे, आणि त्याच्या बलदंड त्रिशुलाने पाया उखडून टाकीत आहे, सर्व नगरीच तो मूळ जागेवरून उपटून काढीत आहे! व तिथे पलिकडे अतिक्रुद्ध झालेली जूनो स्काईअन वेशीसमोर आघाडीवर उभी आहे. बाजूस खड्ग आणि हृदयात हिंसा असलेली जूनो ग्रीक जहाजावरून चाल करून येणाऱ्या आपल्या मित्रांना पुकारीत आहे. वळून पहा. बालेकिल्ल्याच्या सर्वात उंच भागावर ट्रिटोनिअन पॅलस बसलेली आहे. तिच्या मेघांच्या वस्त्रावरून प्रकाश तळपत आहे. आणि तिच्या वक्षावर निर्दय गॉरगॉनचे शिर आहे. प्रत्यक्ष सर्वश्रेष्ठ जगत्पिताही ग्रीकांचे धैर्य, शक्ती आणि विजय पुनरुज्जीवित करीत आहे, आणि प्रत्यक्ष देवांनाही ट्रॉयच्या योद्ध्याविरुद्ध लढण्याची प्रेरणा देत आहे. बाळ, तू इथून निसट आणि पळून जा. या सर्व संघर्षाचा अंत कर. मी सर्वत्र तुझ्याबरोबर असेन, आणि तुझ्या पित्याच्या दारात तुला सुरक्षित नेईन. तिचे बोलणे संपले आणि नंतर ती

रात्रीच्या घनछायेत अदृश्य झाली. आणि मग मला दिसल्या भीषण आकृती, माझ्या ट्रॉयशी वैर करणाऱ्या देवांच्या राक्षसी शक्ती.

आणि खरेच अग्नीप्रलयामध्ये खचणारे सर्व इलिअम मला स्पष्ट दिसले. साक्षात नेपच्यूनचे उन्मळलेले ट्रॉय आता कोलमडत होते. उंच पर्वतावरील एखाद्या पुरातन रोवन वृक्षाप्रमाणे; तो पाडण्याकरिता शेतकऱ्यांची जणू एकमेकांत स्पर्धा लागली होती. त्यांनी त्याच्या चारी बाजूंनी घातलेल्या कुऱ्हाडीच्या घावामागून घावांनी तो थरथरू लागतो, अगदी आता पडणार असा भास होतो; आणि त्याचा शेंडा व उंचावरील फांद्या हादरतात, हळूहळू हतबल होऊन तो एकदा शेवटचा विव्हळतो; आणि अखेरीस घावांनी घायाळ होऊन आणि उन्मळून पाठीमागे अनर्थ उसळवीत पर्वताच्या उतरणीवरून खाली कोसळतो. तशीच ट्रॉयची अवस्था झाली होती. मी छपरावरून खाली उतरलो आणि देवीच्या मार्गदर्शनाने मी अग्नीज्वालामधून आणि शत्रूमधून माझा मार्ग काढला. शस्त्रांनी मला मधून जाऊ दिले आणि अग्नी माझ्यापासून मागे हटला.

परंतु जेव्हा मी माझ्या वडिलांच्या वसतीस्थानाच्या, त्या जुन्या वास्तूच्या उंबरठ्यावर आलो तेव्हा माझे आद्य कर्तव्य म्हणून ज्याना शोधून काढून उंच पर्वतावर कुठेतरी घेऊन जाण्याची मी उत्कट आशा बाळगली होती त्या माझ्या वडिलांनीच ट्रॉय या पृथ्वीतलावरून नामशेष झाल्यानंतर परदेशी होऊन जीवन कंठण्यास नकार दिला. ते म्हणाले: "तुम्ही सारेजण—वार्धक्याने तुमचे रक्त संथ झालेले नाही. तुमची शक्तीही अजून कायम आहे. आणि निसर्गाने दिलेला जोम तिच्यामध्ये अजून टिकून आहे. माझ्या व्यतिरिक्त इतरांनीच आता सुटकेची त्वरा केली पाहिजे. माझ्यापुरते म्हणाल तर, स्वर्गस्थ देवांची मी जगावे अशी इच्छा असती तर त्यांनी इथेच माझे घर वाचविले असते. मी ट्रॉयचे पतन एकदा तर पाहिलेच आहे. आणि आपल्या नगरीवर दुसऱ्याचा कबजा झालेला पाहूनसुद्धा मी एकदा जिवंत राहिलो आहे. पुरे झाले तेवढे–खरे म्हणजे वाजवीपेक्षा जास्तच झाले! मी असा हा पडून आहे तोंच तुम्ही माझा निरोप घ्या रे, मी माझ्या मार्गाने मग माझ्या मृत्यूचा वेध घेईन. तेवढी दया शत्रू माझ्यावर करील. त्यांचे विचार लुटीवर केंद्रित झालेले असतील. माझ्या अंत्यविधीचे म्हणाल तर–त्याला मुकणे ही द्यावी लागणारी ती एक क्षुद्र किमतच म्हणायची. कारण देवांच्या पित्याने व मानवांच्या राजाने मला त्याच्या वज्राच्या वादळी झंजावाताने भग्न केल्यापासून आणि त्याच्या अग्नीने दग्ध केल्यापासून त्याच्या अवकृपेत मी यातना भोगीत आहेच. माझे आयुष्य अकारण इतकी वर्षे लांबविले गेले आहे." ते असे दृढ

निश्चयाने बोलले, आणि त्यांना आम्ही विचलीत करू शकलो नाही. मग आम्ही, माझी पत्नी क्रेऊसा, अॅस्कॅनिअस आणि घरातील सर्व मंडळी ढसाढसा रडलो, आणि आम्ही त्यांना पुनः पुनः विनविले. त्यांनी--आमच्या कुलप्रमुखाने, स्वतःबरोबरच आमच्याही साऱ्या आशा अशा रसातळापर्यंत खेचण्याचे स्वप्नातही आणू नये, आणि तसे करून आमच्यावर कोसळलेल्या नाशाचे पारडे अधिक जड करू नये." पण तरीही त्यांनी नकारच दिला. ते आपल्या जागचे हलेनात आणि आपला हेकाही सोडीनात.

अति निराश होऊन आणि केवळ मृत्यूची मनीषा धरीत मी माझ्या शस्त्रांकडे पुनः निघालो, कारण मी दुसरे काय करू शकत होतो ? आणि दुसरा कोणता पर्याय माझ्यापुढे होता ? मी म्हणालो : 'बाबा मी घर सोडून आणि तुम्हाला एकटे टाकून जाईन असे तुम्हाला खरोखरीच वाटत होते काय? पित्याच्या मुखातून असला दाहक विचार बाहेर पडू शकतो काय ? या साऱ्या थोर नगरीतील काहीही वाचू नये अशी जर स्वर्गस्थ शक्तींची इच्छा असेल, जर तुमचा निर्धार अविचल असेल आणि तुमच्या स्वतःच्या आणि तुमच्या संबंधितांच्या मृत्यूने ट्रॉयवर कोसळलेल्या विनाशात भर घालण्याचा तुमचा हेतू असेल तर अशा मृत्यूचे दार सताड उघडे आहे. जो पुत्राची हत्या पित्याच्या डोळ्यासमोर करतो आणि नंतर वेदीवर पित्याचा वध करतो तो पायरस, प्रायमच्या रक्ताच्या थारोळ्यातून थेट इथे तात्काळ येईल. पण माझ्या स्नेहमयी माते तू माझे जे अग्नीपासून आणि शस्त्रापासून रक्षण करीत होतीस व मला वाचवून नेत होतीस ते शत्रु माझ्या प्रत्यक्ष घरात घुसून, अॅस्कॅनिअस आणि माझे वडील आणि त्यांच्याबरोबर क्रेऊसा एकमेकांच्या रक्तात, बळी पडलेले मी पहावेत म्हणूनच की काय ? मित्रांनो त्वरा करा ! माझी शस्त्रे आणा. पराजितांना त्यांच्या जीवनाच्या अंतास सामोरे जाण्याचे आवाहन आहे. मला ग्रीकांकडे परत जाऊ द्या. पुनः एकदा रणांगणावर जाऊन मला लढू द्या. आज सूड घेतल्याशिवाय आपण सारे मरणार नाही.

मग मी माझे खड्ग लटकवू लागलो. डावा हात ढालीच्या पट्ट्यात अडकवून मी माझी ढाल पाठीवर ठाकठीक करीत होतो. परंतु मी घरातून बाहेर पडत असतानाच क्रेऊसा दारात उभी असलेली दिसली. तिने मला थोपविले. माझ्या पायाला मिठी घालून आमच्या छोट्या आयुलसला तिने त्याच्या पित्यापुढे, माझ्यापुढे, धरले आक्रंदत ती म्हणाली : "तुम्ही जर मृत्युकडे जात असाल तर जे घडणार असेल त्याला सामोरे जाण्याकरिता आम्हालाही तुमच्याबरोबर त्वरित घेऊन चला. परंतु तुम्ही पाहिलेल्या समरावरून तुम्हाला पुनः युद्ध करण्यात आपल्याला विजयाची थोडी तरी आशा आहे असे वाटत असेल तर येथे आपल्या

घराचे रक्षण करणे तुमचे आद्य कर्तव्य आहे. नाहीतर तुम्ही आपल्या छोटया आयुलसला, तुमच्या पित्याला आणि तुम्ही जिला एकदा आपली पत्नी म्हणून स्विकारलींत त्या मला कुणावर सोपविणार आहात ?

"अशी माझी आळवणी ती मोठमोठयाने करीत होती. तिच्या व्यथित शब्दांनी सारे घर निनादत होते. त्याचवेळी अचानक एक चमत्कार झाला. त्या दोन्ही दुःखी मातापित्यांच्या चेहऱ्यांच्या मधोमध, आणि ज्या हातांनी त्यांनी त्याला धरले होते त्या हातांच्या मधोमध त्या छोटया मुलाच्या डोक्यावरील टोपडयाने पेट घेतला. आणि दाहक नसलेली परंतु तेजस्वी अशी ज्वाला त्याचे मृदु केस चाटू लागली व त्याच्या भालप्रदेशाभोवती खेळू लागली. घाबरून थरथर कापत आम्ही धावलो, ज्वाला विझविण्याकरिता त्याचे केस झटकले, आणि पाण्याने तो पवित्र अग्नी शांत करण्याचा आम्ही प्रयत्न केला, परंतु माझ्या वडिलांनी आनंदभराने आपले डोळे तारकांकडे वळविले, आणि आकाशाकडे हात उंचावून ते म्हणाले : "हे सर्वशक्तिमान ज्यूपिटर, जर प्रार्थनेने तुझ्या इच्छेत बदल होत असेल तर आमच्याकडे एवढे एकदाच पहा. आम्ही केवळ एकच प्रार्थना करतो, आणि आमच्या सद्धर्मपालनाने जर तुझी थोडी कृपा आम्ही संपादन केली असेल तर आम्हाला तुझा कौल दे. आणि हे सुचिन्हच आहे अशी खात्री पटवून दे." त्या वृद्ध राजपुरुषाचे बोलणे संपते न संपते तोच डाव्या बाजूला एकाकी विजेसह मेघांचा गडगडाट झाला आणि रात्रीच्या अंधारातून एक भ्रमणशील तारा निखळला आणि दिव्य प्रकाशरेखा उमटवीत वेगाने खाली आला व त्याने आसमंत उजळून टाकले. आमच्या घराच्या छपरावरून सरकत जाताना तो आम्हाला दिसला. त्याच्या प्रकाशात रस्ते स्पष्ट उजळले होते. आणि नंतर अजूनही तेजस्वी असलेला तारा इडा पर्वताच्या अरण्यात दिसेनासा झाला. त्याचे मागे एक लांब प्रकाशरेखा मात्र उरली होती. आणि दूरवर अवतीभोवती गंधकाच्या धुराचे लोट उठताना दिसत होते. माझ्या वडिलांचें एवढयाने समाधान झाले. ते स्वतः उठले आणि उर्ध्वमुख होऊन त्यांनी आमच्या दैवतांची प्रार्थना केली, आणि त्या पवित्र ताऱ्याची पूजा केली." आता काही माझी नाराजी नाही. माझ्या कुलदैवतांनो, आता मी तुमच्या आणि इनीआस, तुझ्या पाठोपाठ तुम्ही न्याल तिकडे येतो. आपले कुल वाचवा आणि माझ्या नातवाला सुरक्षित ठेवा ! हे पवित्र सुचिन्ह तुमच्या भविष्याचे निदर्शक आहे आणि ट्रॉय आता तुमच्या सामर्थ्यावर विसंबून आहे. आणि मुला माझ्या-बद्दल विचारशील तर मी माघार घेतो. तुझ्या बरोबर जायला मी अनुमती देतो."

" माझ्या वडिलांचे बोलणे संपले, परंतु आता नगरीतून अग्नीची प्रचंड गर्जना आमच्या कानावर आली, आणि भडकत्या ज्वालांनी अग्नीच्या झळया अधिक जवळ आणल्या, "ठीक आहे बाबा." मी म्हणालो. " माझ्या माणसांना तुम्हाला माझ्या पाठीवर उचलून ठेवू द्या. माझे खांदे तुमच्याकरिता सिद्ध आहेत. या प्रेमभाराचे मला ओझे होणार नाही. आपल्या दैवात काहीही असो, संकट आणि मुक्ती सर्व सारखीच वाटून घेऊ. आयुलसने माझ्या बाजूने चालावे, आणि माझ्या पत्नीने आमच्या पाठोपाठ सुरक्षित अंतरावरून चालावे, आणि आता तुम्ही बाकीचे, माझ्या सेवकांनो, मी काय सांगतो इकडे लक्ष द्या. नगरीतून बाहेर पडल्याबरोबर एक छोटी टेकडी लागते. तिच्यावर सिरीसचे प्राचीन ओसाड मंदिर आहे. त्याच्याजवळच आपल्या पूर्वजांनी कित्येक वर्षे पूजिलेला एक जुनाट सायप्रस वृक्ष आहे. निरनिराळ्या मार्गांनी जाऊन आपण तेथे भेटू, बाबा, तुम्ही आपल्या पूर्वजांची गृहदैवते, आपली पवित्र बिरुदे घ्या. मी रणधुमाळीतून सरळ इकडेच आलो. माझ्या हातावर अजूनही ताजे नुकतेच सांडलेले रक्त आहे आणि जिवंत झऱ्यात हात धुतल्याशिवाय मी देवतांना स्पर्श केला तर पाप लागेल." असे म्हणून मी ओणावलो व माझ्या मानेवर व खांद्यावर सिंहाचे लालसर तपकिरी कातडे परिधान केले. नंतर मी माझा भार खांद्यावर घेतला. माझ्या छोट्या आयुलसने आपली बोटे माझ्या उजव्या हातात गुंफली व आपली छोटी पावले जवळजवळ टाकीत तो आपल्या पित्याबरोबर चालू लागला. क्रेऊसा मागून येत होती. अंधाराच्या छायेतून लपतछपत आम्ही असे पुढे गेलो. आतापर्यंत शस्त्रांना पाहून किंवा माझ्यावर चाल करून येणाऱ्या ग्रीकांना पाहूनही मी अगदी निर्भय रहात होतो. पण आता मात्र माझ्या पाठीवरील भाराला व त्याचप्रमाणे माझ्याबरोबर चालणाऱ्या सवंगड्याला धक्का पोचेल म्हणून मी इतका घाबरलो होतो की वाऱ्याच्या झुळुकीचेही मला भय वाटत होते. व किंचित आवाजानेही मी दचकत होतो.

लवकरच मी नगरवेशीजवळ पोहोचलो आणि आपण सगळा मार्ग काटून एकदाचे सुरक्षित पोहोचला असा मी विचार करीत असतानाच एकाएकी पाठीमागून जलदीने येणारा पदरव ऐकल्यासारखा वाटला. अंधारातून दूरवर पहात माझे वडील ओरडले. "मुला, मुला जीव वाचवायचा असला तर लवकर पळ काढ ! शत्रू जवळ येत आहेत; त्यांच्या चमकत्या ढाली आणि लखलखणारी ब्राँझची चिलखते मला दिसत आहेत." नंतर माझ्या चिंतेच्या आणि धावपळीच्या भयंकर ताणामुळे कुठल्यातरी अदय शक्तीने माझे भान हिरावले. कारण मला माहीत असलेले रस्ते सोडल्यानंतर मी वाट चुकलो आणि काहीही खाणाखुणा नसलेल्या

प्रदेशातून धावू लागलो, तेव्हाच—फारच भयंकर गोष्ट घडली—दारुण दुर्दैवाला तिला माझ्यापासून हिरावून घ्यायचे होते म्हणून की काय, माझी पत्नी क्रेऊसा धावायची थांबली की ती वाट सोडून चुकून भलतीकडेच गेली की थकून कुठे खाली पडली आम्हाला काहीच कळले नाही; परंतु आम्हाला ती पुन: दिसली नाही एवढे मात्र खरे! कारण तिची आमची चुकामुक झाली तेव्हा मी एकदाही तिच्याकरिता मागे वळून पाहिले नव्हते आणि सिरीसची जिथे पुरातन कालापासून उपासना होत असे त्या जागृतस्थानी, त्या टेकडीजवळ येईपर्यंत तिचा विचारही माझ्या मनात आला नव्हता. तिथे जेव्हा शेवटी आमची सर्व मंडळी एकत्र आली तेव्हा समजले की फक्त तीच तेवढी आली नव्हती. आणि पुरते काही लक्षात येण्या-पूर्वीच, तिच्या पतीला, पुत्राला आणि तिच्या मित्रांना ती कायमची अंतरली.

त्या भयानक धक्क्याने मी वेडा झालो, प्रत्यक देवतेची मी निर्भत्सना केली आणि सबंध मानवजातीला मी शिव्याशाप दिले. ट्रॉयच्या सबंध सत्यानाशात घडलेली दुसरी कोणतीही घटना माझ्या या हानीइतके माझे हृदय विद्ध करून गेली नाही. मी माझ्या सवंगड्यावर अॅस्कॅनिअस, अँकायसिस आणि आमची ट्रोजन दैवते सोपविली. त्याना एका नागमोड्या दरीत लपवून मी ट्रॉयला परतलो. माझी लखलखती शस्त्रे मी पुन: धारण केली. त्या सर्व साहसातून पुन: एकवार जाण्याचा मी निर्धार केला होता. आणि प्रत्येक संकटास पुन: एकदा सामोरे जाऊन आलेल्या सर्व वाटांनी शोध घेत घेत पुन: ट्रॉय नगरीत परत जायचे मी ठरविले.

अंधारात माझे मार्ग लक्षपूर्वक न्याहाळीत आणि त्यांच्या मागून मागून जात प्रथम मी नगरतटातील ज्या काळोख्या वेशीतून आम्ही बाहेर पडलो होतो तिथे गेलो. मला सतत एका कसल्यातरी भयावह समीपत्वाची जाणीव होती. आणि त्या नितांत नि:स्तब्धतेनेच मी भयभीत झालो होतो. कदाचित ती घराकडे परत गेली असेल—म्हणून मी घराचा मार्गही अनुसरला. ग्रीक त्यात मोठ्या जमावाने घुसले होते, आणि सर्व वास्तु आता त्यांच्या ताब्यात होती. सर्व संपले होते. वाऱ्याने सर्वभक्षक अग्नी उंच छपरावर पसरविला होता. ज्वाला त्याच्यावर झेपावत होत्या, आणि तप्त धूर आकाशात थैमान घालत होता. मी पुढे गेलो आणि बाले-किल्ल्यावरील प्रायमच्या प्रासादात पुन: गेलो, तिथे त्या निर्मनुष्य कोरीव स्तंभांच्या रांगांमधून त्याच कामासाठी खास नियुक्त केलेले फिनीकस आणि भयंकर दिस-णारा युलिसीझ जूनोच्या रक्षणाखाली लुटीवर पहारा करीत होते. अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडलेल्या ट्रॉयच्या सर्व मंदिरांतून लुटलेल्या खजिन्याची रास इथे

रचली होती. देवतांच्या नैवेद्याची मेजे, मदिरेचे मिश्रण करण्याचे जड सोन्याचे चषक, आणि लुटलेली वस्त्रे तेथे होती. भयभीत मुले आणि त्यांच्या माता जवळच लांब रांग करून तिष्ठत होत्या. अंधारात मोठ्याने हाक घालण्याचाही धोका मी पत्करला. दुःखातिशयाने मी क्रेऊसाचे नाव पुनः पुनः व्यर्थ पुकारीत मी माझ्या हाकांनी रस्ते दुमदुमविले. आणि नंतर व्याकूळ होऊन आणि डोळ्यापुढे कुठलीच ध्येयसिद्धी मुळीच दिसत नसताना नगरातील इमारतींमधून मी माझा शोध चालविला असताना माझ्या डोळ्यासमोरच क्रेऊसाचा छायादेह प्रकट झाला. जिवंतपणाहूनही मृत्यूत जास्त उंच दिसणारी तिची विषण्ण छाया पाहून मी थिजून गेलो. माझे केस ताठ झाले. आणि माझा आवाज घशातच गोठला. ती माझ्याशी बोलली आणि तिच्या शब्दांनी माझे दुःख शमले. "प्रिय नाथ, तुम्ही अर्थहीन दुःखाच्या आधीन का होता ? जे घडले ते ईश्वरी संकेताचा भाग आहे. कारण न्यायनीतीची आणि उंच ऑलिंपसवरील सर्वाधिपतीची तुम्हाला तुमच्या प्रवासात क्रेऊसाला ट्रॉयपासून दूर घेऊन जाण्याची मनाई आहे. दूर अज्ञात प्रदेशात जाण्याकरिता तुम्हाला अनंत सागरातून मार्ग काढायचा आहे. जिथून लिडिअन टायबरची संथ धारा समृद्ध कुरणांमधून वाहत असते आणि जेथील पुरुष बलवान असतात त्या पश्चिम भूमीवर तुम्ही पोहोचाल. तिथे सुख आणि राज्य आणि विवाहयोग्य राज्ञी तुमच्या भवितव्यात आहे. तुम्ही एकेकाळी जिच्यावर प्रेम केलेत त्या क्रेऊसासाठी आलेले अश्रु पुसून टाका. कारण मी डार्डनस वंशातील व स्वर्गीय व्हीनसची कन्या असल्यामुळे डोलोपिअन किंवा पायरमीडॉन घराण्याचे औद्धत्य मला सहन करायचे नाही, किंवा ज्या स्त्रियांचे पुत्र ग्रीक आहेत त्यांचे दास्य मला करावयाचे नाही. सर्व देवतांची थोर माता मला ट्रॉयभूमीच्या सरहद्दीतच ठेवीत आहे. आता मी येते. आणि आपल्या उभयतांच्या असलेल्या मुलाचे प्रेम जतन करा !" मला रडू कोसळले. आणि मला तिच्याशी खूप बोलायचे होते; तरीपण एवढेच बोलून ती माझा त्याग करून वातावरणात विलीन झाली. ती जिथे उभी होती तिथे तीन वेळा मी तिच्या मानेभोवती हात गुंफण्याचा प्रयत्न केला; परंतु तिन्हीवेळा माझे करपाश रितेच राहिले आणि ती छाया माझ्या हातून विरल वाऱ्यासारखी किंवा वितळून जाणाऱ्या स्वप्नासारखी निसटून गेली.

रात्र उलटून जात असताना मी माझ्या सहकाऱ्यांकडे परतलो, आणि त्यांची संख्या नवीन आलेल्या मोठ्या जमावाने वाढलेली पाहून मला आश्चर्य वाटले; माता, पती, तरुण पुरुष मातृभूमीला पारखे होण्याकरिता दीनवाणे होऊन एकत्र आले होते. सागरापलिकडील माझ्या निवडीच्या कोणत्याही भूमीला मी त्यांना

घेऊन जावे या एकाच निर्धाराने भोवतालच्या प्रदेशातून ते तेथे आले होते, आणि आपले सर्व वित्त त्यांनी आपल्याबरोबर तयार ठेवले होते, इडा पर्वताच्या शिखराजवळ, उतरणीवर आता प्रभात तारा उगवत होता. येऊ घातलेल्या दिवसाचा तो सूचकच होता. नगरीचे प्रत्येक प्रवेशद्वार ग्रीकांच्या ताब्यात होते व त्यांनी रोखून धरले होते. तिथून सुटकेची आशाच नव्हती. हताश होऊन मी माझ्या वडिलांना उचलले आणि पर्वतांकडे चालू लागलो.

## सर्ग तिसरा

# इनीआसचे कथन–प्रवासवर्णन

जरी अधिक चांगले दैव लाभावे अशी त्यांची योग्यता होती तरी आशियाई साम्राज्य आणि प्रायमचा राजवंश उलथून पडावा अशी स्वर्गस्थ शक्तीमान देवांची आज्ञा होती. वैभवशाली इलिअमचा पाडाव झाला होता आणि नेपच्यूनच्या सर्व यच्चयावत ट्रॉयचे धुमसते अवशेष भूमीवर उरले होते. ईश्वराच्या आज्ञेने आम्हा वाचलेल्या गृहहीनांना जगाच्या पाठीवर आसऱ्याकरिता वसाहती नसलेली भूमी शोधणे भाग पडत होते. म्हणून दैव आम्हाला कुठे नेणार आहे व आम्हाला कुठे वसती करू देणार आहे याचो काहींच कल्पना नसताना आम्ही फ्रिजिअन इडाच्या पायथ्याजवळील टेकड्यांच्या बाजूच्या अॅन्टॅनड्रॉस या नगराच्या खालच्या बाजूस जहाजे बांधण्यास प्रारंभ केला. आम्ही आमची सर्व मंडळी एकत्र केली. उन्हाळ्याच्या आरंभालाच आमचे प्रमुख अँकायसिस यांनी आमच्या दैवनियोजित सफरीवर निघण्याचा आग्रह धरला. माझ्या मातृभूमीचा किनारा, त्यावरील निवाऱ्याच्या जागा आणि ज्यावर ट्रॉय पूर्वी उभे होते ते सखल भूप्रदेश हे सर्व मी साश्रू नयनांनी सोडले. गृहहीन होऊन माझ्या साथीदारांसह, माझ्या मुलासह, छोट्या गृहदैवतांसह व माझ्या वंशाच्या महान दैवतांसह मी अफाट सागरावर प्रस्थान ठेवले.

ट्रॉयपासून थोड्याच अंतरावर मार्सच्या आधिपत्याखालची भूमी आहे तीवरील सखल रुंद प्रदेशात थ्रेशिअन शेतकऱ्यांनी लागवड केली आहे. पूर्वी चंडप्रतापी राजा लायकर्गसने तेथे राज्य केले होते. फार पूर्वीपासून या राज्याचे ट्रॉयशी मैत्रीचे घनिष्ट संबंध होते आणि ट्रॉयच्या वैभवाच्या काळात तर कौटुंबिक संबंध होते. याच भूमीकडे मी आमची गलबते हाकारली, आणि जेथे किनारा वक्राकार होतो ती जागा आमच्या नव्या नगराच्या भिंती बांधण्याकरिता निवडली, या नगरीला माझ्याच नावावरून इनिअडी हे नाव द्यायचे मी ठरविले. परंतु दैव

माझ्या या कार्यास प्रतिकूल होते. मी माझी माता व्हीनस आणि स्वर्गस्थ दैवतांचा अधिपती व माझ्या स्वीकृत कार्यावर अनुग्रह करतील अशा देवता यांच्याकरिता यज्ञ करीत होतो. समुद्र किनाऱ्यावर मी एका उमद्या बैलाचा बळी देण्याची सिद्धता करीत होतो, तिथे जवळच जमिनीवर एक उंचवटा होता, त्याच्या वरच्या भागावर कॉर्नेलची दाट वाढ झाली होती व मर्टलच्या काटेरी देठांची दाट जाळी झाली होती. मी तिथे वर गेलो आणि वेदीवर पसरण्याकरिता पाने मिळवण्यासाठी ही हिरवी झुडपे जमिनीतून उपटण्याचा मी प्रयत्न केला. तिथे एका भयानक आणि आश्चर्यकारक चमत्काराला मला तोंड द्यावे लागले. कारण जें पहिले झुडुप मी मुळापासून जमिनीतून उपटण्याचा प्रयत्न केला, त्यातून काळपट रक्तबिंदू झिरपू लागले; त्या काळ्या बिंदूंनी भूमी डागळली. माझ्या अंगातून एक थंड शिरशिरी चमकून गेली; भयाने माझे रक्त गोठल्यासारखे झाले पण तरीही मी प्रयत्न चालू ठेवला. या रहस्याचे कारण शोधण्याच्या उत्सुकतेने मी प्रतिकार करणारे दुसरे झुडुप खेचले. परंतु पुनः त्याच्या सालीतून काळपट रक्त वाहले. अशा तऱ्हेने अत्यंत आश्चर्यचकित होऊन या भागातील स्थळदेवतांची आणि थ्रेशिअन भूमीवर राज्य करणाऱ्या पिता मार्सची मी प्रार्थना केली. आणि या दुःश्चिन्हाच्या अशुभ आशयाचे कल्याणात रुपांतर करावे अशी याचना केली. माझ्या गुडघ्याने वाळूवर जोर लावून मी माझ्या तिसऱ्या प्रयत्नात बुडख्यांशी अधिक ताकदीने झगडलो. आणि नंतर–त्याचा उच्चार करण्याचे धाडस मी करूं का माझ्या ओठांना खीळ घालूं?– त्या उंचवट्याच्या तळातून एक दीनवाणे विव्हळणे आणि एक मानवी आवाज माझ्या कानावर आला. "इनीआस, तू एका गरीब बिचाऱ्या व्यथिताला का विछिन्न करीत आहेस? माझे इथे दफन झाले आहे. मला आणखी घायाळ करू नकोस व तुझे सत्प्रवृत्त हात पापाने कलंकित करू नकोस. मी कांही परका नाही. मीही ट्रॉयमध्ये जन्मलो आहे. आणि जेव्हा या देठांना अपाय केला जातो तेव्हा त्यातून ठिबकते ते माणसाचे रक्त असते. या लोभी किनाऱ्यांपासून व रानटी प्रदेशातून निघून जाण्याची त्वरा कर. मी पॉलीडोरस आहे. भाल्यांच्या लोखंडी अणकुचीदार वर्षावात मृत्यूनें माझ्यावर मात केली आणि म्हणून भाल्यासारखी वनस्पती माझ्या देहावर उगवली आहे."

"या उद्गारामुळे माझे मन अनिश्चितता व भयाने खचले. या धक्क्याने मी स्तंभित झालो; माझे केस ताठ झाले, आणि माझ्या कंठातून शब्द फुटेना. ट्रॉयच्या नशिबी दीर्घ वेढा आहे, असे दुर्दैवी प्रायमच्या लक्षात आल्यानंतर व ट्रॉयच्या शौर्यावरील त्याचा विश्वास ढळू लागल्यावर त्याने गुप्तपणे प्रचंड

सुवर्ण संचयासह पॉलीडोरसला थ्रेसच्या राजाच्या हवाली केले होते. आणि खरोखरच जेव्हा ट्रॉयचे सामर्थ्य कोसळले, आणि त्याचे वैभव नष्ट झाले तेव्हा हा राजा विजयी ॲगमेम्नॉनला मिळाला. आणि त्याने सर्व विदित नीतीदंडक झुगारून दिले. पॉलीडोरसचा खून केला व सुवर्ण हिरावून घेतले. असे कोणतेही दुष्ट कर्म नाही की जे करंट्या सुवर्णाभिलाषेनें प्रेरित झालेला माणूस करू शकणार नाही. माझी गलितगात्रता हालचाल करण्या-इतकी कमी झाल्यावर मी माझे काही सोबती ट्रॉयचे नेते,—अर्थात त्यांमध्ये माझ्या वडिलांचा समावेश होता. त्यांना एकीकडे घेतले व त्यांना त्या चमत्कारा-विषयी सांगितले आणि त्यांचा त्यावरील अभिप्राय विचारला, 'ही दुष्ट भूमी तात्काळ सोडावी, जेथे आतिथ्यधर्माला कलंक लागलेला होता त्या भूमीशी सर्व संबंध तोडावेत आणि वारा नेईल तिकडे वाऱ्याबरोबर आपली गलबते हाका-रावीत असा सर्वांनीं एकमताने आग्रह धरला, म्हणून आम्ही पॉलीडोरसचे पुनः दफन केले. त्या उंचवटचावर मातीचा ढीग केला. इहलोकात वावरणाऱ्या भूतात्म्यांच्या नांवे एक वेदी उभारली, व तिच्यावर दुःखसूचक काळी शोकवस्त्रे व सायप्रसच्या मृत्युसूचक काळचा फांद्या पसरल्या. इलिअमच्या स्त्रिया रीतीप्रमाणे केस मोकळे सोडून जवळच उभ्या राहिल्या. नंतर आम्ही उष्ण दुधाची फेसाळलेली भांडी व बळीच्या पवित्र रक्ताच्या कुप्यांचा नैवेद्य दाखविला; आणि याप्रमाणे त्याच्या आत्म्यास त्याच्या समाधीत चिरशांती लाभावी म्हणून सर्व विधी केले व आमचे आवाज उंचावून आम्ही निरोप घेतला.

अनुकूल समुद्र भरवशाचा आहे असे दिसल्याबरोबर वाऱ्याने सागर प्रसन्न झाल्यावर व वाऱ्याच्या कुजबुजीने आम्हास सागरावर पाचारण केल्यानंतर माझे सोबती समुद्र किनाऱ्यावर जमले. व त्यांनी आमची गलबते सागरात लोटली. आम्ही आमच्या निवाऱ्याच्या जागेतून बाहेर पडलो आणि गलबते मार्गस्थ झाल्या-वर ती भूमी आणि तिची नगरे मागे पडली दूर सागरात डेलॉस नावाचे एक पवित्र बेट आहे, त्यावर वस्ती करणाऱ्या लोकांवर निरीडची माता व एजिअन नेपच्यूनची फार प्रीती आहे. त्या धनुर्धारी देवाला हे बेट किनाऱ्या किनाऱ्यांवरून भरकटत असलेले आढळले. ती त्याची जन्मभूमी असल्यामुळे आपल्या आईवरील निष्ठेने त्याने ते मायकॉनॉस व गायारॉसला साखळदंडाने जखडून टाकले. साग-रांच्या लाटांचा धिःकार करण्याचे सामर्थ्य असलेली स्थिर भूमी त्याने माणसांच्या वसतीकरिता निर्माण केली. मी आता डेलॉसच्या दिशेने निघालो होतो आणि आमच्या शिणलेल्या खलाशांना तेथील बंदरात सुरक्षित व सुखकर असा आश्रय

मिळाला. आम्ही किनाऱ्यावर उतरलो व त्या अॅपोलोच्या नगरीस वंदन केले. अॅनिअस हा अॅपोलोचा पुरोहित त्याचप्रमाणे तेथील राजाही होता. त्याने त्याच्या मस्तकावर बे वृक्षाची पवित्र पाने व शिरोबंध धारण केले होते. तो आम्हास भेटण्याकरिता आला व त्याने अॅन्कायसिसला आपला जुना मित्र म्हणून ओळखले. आम्हास आपले अतिथी मानून त्याने आमच्याशी हस्तांदोलन केले, आणि आम्ही प्रासादाकडे चालत निघालो. भक्तिभावाने मी त्या प्राचीन शिलामंदिरात प्रवेश केला व प्रार्थना केली; "अॅपोलो! आम्हाला स्वतःची भूमी दे, आम्ही आता थकलो आहोत, आम्हाला चिरंतन टिकणारी तटबंदी असलेली नगरी दे. व तेथे आमच्या रक्ताचा वंश नांदू दे. आमच्याकरिता एखादा नवा बालेकिल्ला मिळू दे. आणि ग्रीकांपासून व निर्दय अॅकिलीझपासून वाचविलेले अवशिष्ट ट्रॉय म्हणून त्याचे यापुढे रक्षण कर. आमचे नेतृत्व कोण करणार आहे? आम्ही कोठे जावे असा तुझा आदेश आहे? आम्ही कुठे वसती करावी? आमचे तू पितृदैवत हो; तुझा मनोदय आम्हास सांग आणि तू आमच्या अंतःकरणांनाच प्रत्यक्ष कौल दे."

"माझी प्रार्थना संपण्यापूर्वीच एकाएकी सर्व सृष्टी, देवाच्या मंदिराचे प्रवेशद्वार आणि त्याचा बे वृक्ष थरथरल्यासारखे झाले, जिच्यावर आम्ही उभे होतो ती सर्व टेकडीच हलत असल्यासारखी दिसली. अंतर्मंदिर खुले झाल्यासारखे दिसले व आतील पंचरसी धातूची कौल लावण्याची तिवई गर्जून बोलल्याचा भास झाला. आम्ही विनीत झालो आणि लोटांगण घातले. आमच्या कानावर आवाज आला." हे सहनशील डार्डन हो, जिच्यातून तुम्ही जन्मलात ती तुमच्या पूर्वजांची भूमी. तुम्ही तिच्याकडे परतल्यावर तुम्हाला वात्सल्याने हृदयाशी घेऊन तुमचा स्वीकार करील. तुमच्या प्राचीन मातृभूमीचा तुम्ही शोध करा. या भूमीत इनीआसचा वंश त्याचे पुत्रपौत्र आणि त्यांचे वंशज त्रिखंड पृथ्वीवर राज्य करतील. अपोलोच्या या वचनामुळे आमच्यामध्ये हर्षाचा कल्लोळ उसळला व खूपच मोठी खळबळ उडाली. अॅपोलोस अभिप्रेत असलेले हे तटबंदी असलेले, जिथे भ्रमंती करणारे आम्ही आमच्या प्राचीन मातृभूमीस परतावे असा आदेश झाला ते नगर कुठले असावे याचा आम्ही विचार करू लागलो. मग जुन्या गोष्टी आठवीत, आमच्या पूर्वापार रुढींचा माझ्या वडिलांनी विचार केला. ते म्हणाले : हे ट्रोजन सरदारांनो, मी काय सांगतो ते ऐका आणि तुमचे आशास्थान कुठे आहे, ते जाणून घ्या. समुद्राच्या मध्यावर महान् जोव्हचे क्रीट नावाचे एक बेट आहे, त्या बेटावर इडा नावाचा पर्वत आहे; आपल्या वंशाचा तो पाळणा आहे. क्रीटचे रहिवासी शंभर मोठ्या नगरातून राहतात आणि ते ज्या भूमीवर राज्य करतात तिची कूस सुपीक आहे.

आणि मी जे पूर्वी ऐकले ते मला ठीक आठवत असेल तर आपला मूळपुरुष टयूसर तिथूनच गलबतातून ट्रॉयभूमीला आला, आणि तेथे त्याने त्याच्या राजधानीकरिता जागा निवडली. कारण तोपर्यन्त इलिअम आणि ट्रोजनांचा बालेकिल्लाही अस्तित्वात नव्हता. लोक त्याकाळी खाली दऱ्यांतून रहात होते. क्रीटहूनच थोर माता सिबीली तिचे धर्मविधी व इडा पर्वताच्या अरण्यात ब्राँझचे झांज वाजविणारे कॉरिबँटस आले. आपल्या पूजाविधीतील उदात्त निःशब्दता, आणि आपल्या थोर देवतेच्या रथास जुंपलेली सिंहाची जोडी हा क्रीटचाच वारसा आहे. म्हणून आता चला, देवाच्या आदेशाने दाखविलेला मार्ग आपण अनुसरू या. वायु देवतेला प्रसन्न करून आपण नॉसॉसच्या राज्याकडे गलबते हाकारू. ज्युपिटरच्या कृपेने आपली सफर फार लांबणार नाही. तिसऱ्या पहाटेस आपल्या गलबतांना क्रेटचा किनारा दिसेल." असे म्हणून त्यांनी वेदीवर यथोचित भोग चढविले. नेपच्यूनला एक बैल तसेच दुसरा दैदिप्यमान अॅपोलोला-वादळाच्या देवतेला काळी मेंढी व दयाळू पश्चिम वाऱ्यांच्या अधिदैवतांना पांढरी मेंढी अर्पण केली.

क्रीटचा राजपुत्र आयडोमिनिअस याला त्याच्या पित्याच्या राज्यातून हद्दपार केले आहे, क्रीट भूमीचा लोकांनी त्याग केला आहे व तिथे आम्हाला कुणी शत्रु भेटणार नाही व उलट आमच्या उपयोगाकरिता तयार मोकळी घरे आढळतील अशी वदंता वेगाने पसरली होती. आम्ही डेलॉसचे बंदर सोडले व वेगाने समुद्रपर्यटनास निघालो. सागराच्या सळसळणाऱ्या प्रवाहातून नाना किनाऱ्याजवळून जिथे टेकडयांच्या उतरणीवर डायोनिससच्या आनंदोत्सवाचा जल्लोष चालतो त्या नॅकसॉसच्या पुढे गेलो. वेळूचे हिरवे बेट ऑलिव्हचे बेट मागे टाकले आणि सागरावर विखुरलेली संगमरवरासारखी धवल पॅरॉस आणि सायक्लेड्सही मागे टाकली. आरोळया ठोकणारे खलाशी चढाओढीने आपल्या कामात गर्क होते. "चला, आपल्या पूर्वजांच्या मातृभूमीस, क्रीटकडे चला !" माझे सोबती एकमेकाला पुढे जाण्यास प्रोत्साहन देताना अशी साद घालीत होते. गलबताच्या पिछाडीकडून वारा वाहू लागला आणि आमच्या मार्गक्रमणास सहाय्यभूत झाला. यथावकाश आम्ही जिथे क्यूरेटीज्ञ रहातात त्या प्राचीन किनाऱ्यावरील प्रदेशाला सुखरुप पोहोचलो.

आम्हाला जी नगरी वसविण्याची उत्कंठा लागली होती तिच्या तटभिंतीच्या कामाला मी जोमाने सुरवात केली. मी तिला "परगॅमीआ" हे नाव दिले आणि माझ्या लोकांनाही ते आवडले. त्यांनी आपल्या नव्या घरांवर प्रेम करावे व आमच्या रक्षणाकरिता उंच गढी बांधावी असे मी त्यांना सांगितले. लवकरच

आमची गलबते किनाऱ्यावर उंचवटयाच्या कोरडया जागी नांगरून पडली होती. आमची तरुण मंडळी विवाह समारंभात आणि नव्या शेतावरील कामात मग्न होती. मी स्वतः नवे कायदेकानू योजण्याच्या व घरे वाटून देण्याच्या कामात होतो; इतक्यात अकस्मात आकाशाच्या विखारी भागातून कोसळलेल्या एका काळजाचा ठाव घेणाऱ्या साथीच्या हल्ल्याने झाडे, पिके आणि माणसे नासून टाकली. मृत्यू हे एकच त्या हंगामातील पीक होते. माणसे इतकी आजारी झाली की एकतर ती आपल्या बहुमोल प्राणाला तरी मुकली किंवा जागचे हलण्याचेही सामर्थ्य त्यांना राहिले नाही. व्याध ताऱ्याच्या तापाने शेते जळून नापीक झाली. रोपे वाळून गेली व रोगट पिकाने आमचे उपजीविकेचे साधनच हिरावून घेतले. मग माझ्या वडिलांनी आम्ही आलो त्या समुद्रमार्गाने परत आर्टिजियाच्या अॅपोलो मंदिरास जावे आणि त्याच्या अनुग्रहाकरिता प्रार्थना करून आमच्या यातनांचा कोणता शेवट त्यास मंजूर आहे, आमच्या या दुर्धर कार्यात आम्ही सहाय्य कुठे शोधावे, आणि आम्ही कोणत्या वाटेने जावे हे विचारावे असा सल्ला दिला.

तो रात्रीचा समय होता. सृष्टीतील प्राणीमात्र निद्रेच्या पाशात विसावले होते. परंतु मी निद्रिस्त असता, भिंतीतील गवाक्षातून येणाऱ्या पूर्ण चन्द्राच्या प्रकाशस्रोतात ट्रॉयच्या दहनाच्यावेळी मी बरोबर आणलेल्या ट्रोजन देवतांच्या पवित्र प्रतिमा माझ्या डोळयासमोर स्पष्ट दिसल्या, आणि त्या माझ्याशी बोलल्या व त्यांच्या वचनांनी माझी चिंता हलकी झाली.

" हे पहा, अॅपोलोने स्वेच्छेनेच आम्हाला तुझ्या शयनागाराकडे पाठविले आहे तू डिलिअन आर्टिजिआला गेला असतास तर जी भविष्य भाषिते अॅपोलोने तुला सांगितली असती, ती तो तुला आताच कथन करीत आहे. अग्नीने ट्रॉयचा नाश केल्यानंतर आम्ही तुझ्या आणि तुझ्या सेनेच्या मागून येत आहोत; तुझ्या संरक्षणाखालीच तुझ्या आरमाराबरोबर आम्ही उसळता सागर ओलांडला. तुझ्या पौत्रांची कीर्ती आम्ही आकाशावेरी उंचवू आणि तुझ्या नगराला सार्वभौमत्व देऊ. म्हणून तू नगरभित्ती सिद्ध कर, तुझ्या श्रेष्ठ दैवतांकरिता भव्य भिंती बांध. तुझ्या निर्वासित जीवनातील दीर्घ प्रयत्नात कसूर करू नकोस, परंतु तुला तुझे वसतीस्थान बदलले पाहिजे. डेलॉसच्या अॅपोलोने तुम्ही क्रीटमध्ये स्थायिक व्हावे अशी आज्ञा कधीच केली नव्हती, आणि त्याने सूचित केलेला किनारा हा नव्हे. ग्रीक ज्याला हेस्पेरिआ, पश्चिमभूमी म्हणतात असा दुसरा एक प्रदेश आहे. त्या प्राचीन भूमीच्या बाहूत व सुपीक प्रदेशात सामर्थ्य आहे. ओनोट्रिअन हे तेथील रहिवासी होते. परंतु त्यांचे वंशज त्यांच्या एका नेत्याच्या नावावरून त्या देशाला

इटली असे संबोधितात असे म्हणतात. इटली हेच आपले खरे घर आहे. डार्डनस आणि दुसरा एक आपला वंशप्रमुख आणि ट्रोजन राष्ट्राचा संस्थापक इॲसिअस हे इटलीतूनच आले होते. चल! उठ! आनंद मान! आम्ही आणलेला संदेश, जो निःसंशय सत्य आहे तो तुझ्या वृद्ध पित्यास सांग. इटलीच्या भूमीचा आणि कोरिथस ग्रामाचा शोध घेत त्याला प्रवास करू दे. डिक्टोच्या पर्वतावरील शेते तुम्हास देण्यास ज्युपिटरचा नकार आहे.

या साक्षात्काराने व आमच्या देवतांच्या प्रत्यक्ष आवाजाने मी गोंधळलो होतो. हे काही केवळ स्वप्न असणे शक्य नव्हते. पुष्पमाला माळलेले त्यांचे केस, बोलताना हलणारे त्याचे ओठ मला समोर प्रत्यक्ष परिचयाचे असे दिसत आहेत, असे वाटत होते. माझ्या अंगावर थंड घाम फुटला. मी बिछान्यातून दचकून उठलो, आकाशाकडे तळवे वर करून प्रार्थनेसाठी हात उंचावले, आणि निर्जल मद्याचे अर्घ्य गार्हपत्या अग्नीस अर्पण केले. आपण आपले कर्तव्य केले या समाधानाने मग काय घडले ते ॲन्कायसिस यांना मी जसेच्यातसे सांगितले हळूहळू त्यांच्या लक्षात आले की वेगवेगळ्या पूर्वजांकडून निर्माण झालेल्या दोन कुलांमधे गोंधळ झाला होता आणि त्यांच्या या चुकीमुळेच या भूमीच्या जुन्या परंपरांचा चुकीचा अन्वयार्थ त्यांनी लावला होता. "ट्रॉयच्या भवितव्याचा भार वाहणाऱ्या माझ्या मुला, हे असे घडणार आहे याचे पूर्वज्ञान *कॅसांड्राशिवाय कुणालाच नव्हते. आता मला आठवते तिच्या एका भविष्यभाषिताने आपल्या कुलाचे हे असे भवितव्य कथन केले होते. आणि तिने आपले भविष्यातील राज्य म्हणून हेस्पेरिआचा आणि इटलीचा पुनःपुन: नामोल्लेख केला होता. 'परंतु ट्रोजन कधी हेस्पेरिआच्या किनाऱ्यापर्यंत प्रवास करतील असे कुणाला वाटले होते?' आणि कॅसांड्राच्या भविष्यकथनाकडे त्यावेळी कोण लक्ष देत होते? आपण ॲपोलोवर श्रद्धा ठेवू या, त्याच्या सूचना स्वीकारू आणि अधिक योग्य मार्गाने जाऊ या." ते असे म्हणाले आणि त्यांच्या सूचना मानण्यात आम्हा सर्वांनाच अत्यानंद झाला. आम्ही जसे थ्रेस सोडून निघालो होतो तसेच क्रीटवरून, आमच्यापैकी फक्त थोड्या लोकांना त्या बेटावर मागे ठेवून निघालो. आम्ही शिडे उभारली आणि आमची डौलाने उभार धरणारी गलबते त्या विशाल सागरावरून वेगाने सरकली.

खुल्या सागरावर आमची गलबते बरीच पुढे गेल्यावर दृष्टीपथात कुठेच जमीन नव्हती; केवळ पाणी आणि आकाश दिसत होते; इतक्यात आमच्या डोक्यावर काळेकुट्ट पर्जन्यवादळ उठले. त्याने वादळ आणि काळोख आणला आणि

पाणी ढवळून अंधारून टाकले. लवकरच वाऱ्याने समुद्राचा पृष्ठभाग घुसळून त्यावर प्रचंड लाटा उठविल्या. वादळाने उधळून लावलेली गलबते विशाल सागरावर विखुरली होती. ढगांनी सूर्यप्रकाश झाकून टाकला आणि अंधार आणि पाऊस यामुळे आकाश झाकळून टाकले. पुनःपुनः ढग फुटून अलग होत होते आणि वीज चमकत होती. आमच्या नियोजित मार्गावरून आम्ही भलतीकडे लोटले गेलो होतो. आणि लाटांमधून अंधपणे भरकटत होतो. माझा सुकाण्या पॅलिनरससुद्धा म्हणाला की आकाशाकडे पाहून दिवस आहे की रात्र हे तो सांगू शकत नव्हता; आणि मध्य सागरात कोणत्याही खाणाखुणा नसताना तो गलबताची दिशा निश्चित करू शकत नव्हता. तीन सबंध दिवस, खरे म्हणजे ते मोजणे अवघडच होते तरी— आणि तितक्याच तारकाहीन रात्री आम्ही डोळ्यात बोट घातले तरी दिसू नये अशा निबिड अंधारात सागरावर भटकत होतो. (एका रात्री बाजूस पेलॉप्स आणि मॅलीच्या गरजणाऱ्या खडकांनी आम्हाला कैचीत पकडले होते. सागराइतकेच जमिनीनेही आम्हाला धोक्यात घातले होते. आणि सतत कराल लाटांनी आम्हाला झोडपले आणि पार भिजवून काढले.) चौथ्या दिवशी आमच्यासमोर, दूर मागे पर्वतराजी आणि पुढे वळसे घेत वर जाणारा धूर असलेल्या किनाऱ्याचे आम्हाला प्रथमदर्शन लाभले. आमची शिडे ढिली पडली आणि आम्ही वल्ही मारण्यास सरसावलो. आमच्या व्हलकरांनी लगेच वल्ह्यावर ताकद लावली; ते आपल्या वल्ह्यांनी समुद्राचा निळा पृष्ठभाग मागे लोटीत होते व आपल्या जोरदार आघातांनी समुद्र फेसाळीत होते.

सागरी अरिष्टातून वाचल्यावर विशाल आयोनिअन समुद्रातील स्ट्रॉफेडिसच्या किनाऱ्यावर मला प्रथम निवारा सापडला. आता ही बेटे स्थिर आहेत परंतु अजूनही त्यांना या ग्रीकनावानेच संबोधितात. त्याचा अर्थ फिरती बेटे असा आहे. शत्रूंना भयभीत करणाऱ्या सेलीनो आणि इतर हार्पींनी फिनिअसचा राजवाडा त्यांना बंद झाल्यापासून आणि त्यांचा पाठलाग करणाऱ्यांच्या भयाने त्या जिथे पूर्वी अन्नग्रहण करीत असत ती मेजे त्यांनी सोडून दिल्यापासून, ही बेटे त्यांचे निवासस्थान झाली होती. हार्पींहून अधिक भयानक दुसरा अतिमानव नाही. ईश्वरी प्रकोपाचा आघातही कधी त्यांचा इतका क्रूर नव्हता. आणि स्टिकसच्या* जलातून इतका दुसरा दुष्ट राक्षस कधी वर आला नव्हता. युवतीचे मुख असलेले ते पक्षी आहेत व त्यांच्या उदरातून दुर्गंधीयुक्त प्रवाह वाहत असतो. त्यांच्या हातांना तीक्ष्ण नख्या असतात व त्यांची मुखे भुकेने सतत फिकटलेली, वखवखलेली असतात.

तो तुझ्याबरोबर होता .... त्याला त्याच्या हरपलेल्या आईची आठवण होते काय ? इनीआस त्याचा पिता आहे आणि हेक्टर त्याचा काका होता हे त्याला माहीत आहे काय ? आणि या जाणीवेने आतापासूनच त्याच्यामध्ये पौरुषसुलभ गुणांचा आणि पुरातनकाळीच्या कडव्या बाण्याचा संचार होतो काय.

"ती माझ्यावर प्रश्नांची ही सरबत्ती करीत होती आणि व्यर्थ दीर्घ हुंदके देऊन शोक करीत होती एवढ्यात प्रायमचा राजपुत्र हेलेनस स्वतःच अनेक अनुचरांसह नगर तटबंदीकडून चालत आला. आपल्या भाऊबंदांची ओळख पटून त्याला आनंद झाला आणि प्रत्येक शब्दाबरोबर अश्रू ढाळीत, बोलत, आम्हाला तो वेशीकडे घेऊन गेला. पुढे चालत असतानाच हे छोटे ट्रॉय, ट्रॉयच्या जुन्या बालेकिल्ल्यासारखा दिसावा असा बांधलेला बालेकिल्ला व झॅन्थस नावाचा पाण्याचा कोरडा खंदक मी ओळखला, आणि मी स्केइअन वेशीच्या उंबरठ्याला नमस्कारसुद्धा केला.

'इतर ट्रोजनही या नगराच्या आदरातिथ्यात सहभागी होण्याकरिता आनंदाने मला येऊन मिळाले. प्रशस्त, स्तंभावर उभारलेल्या दालनात राजाने त्यांचे स्वागत केले. एका चौकात सुवर्णपात्रात भोजन वाढले होते. आणि त्यांच्या हातातील चषकातून त्यांनी बॅकसच्या वरदानाचे (मद्याचे) अर्घ्य सोडले.

'दिवसा मागून दिवस गेले, आणि आता वाऱ्याने आमच्या शिडांना पाचारण केले, दक्षिणवाऱ्याने आमची शिडे भरली आणि फुगली. आणि म्हणून भविष्यकथन करण्याची सिद्धी असलेल्या हेलेनसशी मी बोललो आणि त्याला प्रश्न केले. " हे ट्रोजनपुत्रा, तू स्वर्गस्थदेवांच्या संकेतांचा अन्वयार्थ लावतोस. अपोलोच्या सामर्थ्याचे सत्यस्वरूप तू जाणतोस, पंचरसी तिवया तुला माहीत आहेत. क्लॅरॉस येथील त्याचे बे वृक्ष, तारकांची गति, पक्ष्यांचे बोलही तू जाणतोस, त्यांची उड्डाणे भविष्य कसे सुचवितात हे तुला माहीत आहे. मग तू मला सांग, प्रत्येक धर्मकृत्य मी भाविकपणे करीत असल्यामुळे माझ्या सागरभ्रमणाविषयी माझ्या मनात बरीच आशा निर्माण केली आहे. हार्पी सेलिनोशिवाय प्रत्येक दैवी संदेशाने अगदी पूर्ण अधिकारवाणीने मला दूरप्रदेशात इटलीकडे गलबते हाकारून पुढचा मार्ग क्रमण्यास प्रेरणा दिली आहे. हार्पींनी मात्र माझ्यावर होणाऱ्या दारुण कोपाचे भाकित केले आणि—उल्लेख करणेही पावित्र्यभंगाचे पाप आहे—भयंकर घटना—दुष्काळातून अनर्थ याचे भविष्य वर्तविले आहे. म्हणून विचारतो, मी मुख्यतः कोणते धोके टाळावेत ? आगामी भयंकर दिव्यातून मला कोण सुरक्षितपणे मार्गदर्शन करेल ?

"यावर हेलेनसने प्रथम बैल विधिपूर्वक बळी दिले, आणि प्रार्थना करून देवांचा अनुग्रह संपादन केला. नंतर त्याने आपल्या अभिषिक्त मस्तकावरील बंध

सैल केले आणि दैवी शक्तीने अंगात संचारलेल्या अत्युत्कट उन्मादात त्याने मला हाताला धरून फीबस अपोलोच्या दारी नेले. नंतर तो पुरोहित असल्यामुळे आपल्या प्रभावित ओठातून त्याने भविष्यकथन केले, 'व्हीनसपुत्रा, अतिमानवी शक्तीच्या अनुमतीनेच तू सागरोल्लंघन करीत आहेस हे स्पष्ट आणि निश्चित आहे, देवाधिपतीने नियतीचा तसा वाटाच तुझ्या पदरी टाकला आहे. तशीच दिशा घटनांच्या गतीला तो देतो, भविष्याच्या इतिहासाची पाने तो तशीच उलगडतो. अनेक सत्यातील काही थोडी मी माझ्या शब्दांतून तुला सांगेन. त्यामुळे परक्या सागरावरून तुला अधिक सुरक्षितपणे संचार करता येईल, आणि इटलीच्या बंदरात निवांत आसरा मिळविण्यात तू यशस्वी होशील. उरलेल्या बाबतीत एकतर देवता हेलेनसला काही कळू देत नसाव्या, किंवा सॅटर्निअन जुनो त्याला भविष्यकथनाला प्रतिबंध करीत असावी. म्हणून प्रथमतः हे सांगतो की इटली आता सरळ त्याच्या एखाद्या बंदरात गलबते हाकारण्याइतका जवळ आहे असे तू अज्ञानाने मानीत आला आहेस. परंतु तुझ्यापासून इटली अजूनही फार दूर असून, सागरावरून व किनाऱ्यालगत दूरवर पसरलेल्या प्रदेशावरून तू अनेक दिवस प्रवास करशील तेव्हाच तू तिथे पोहोचणार आहेस. आणि सुरक्षित भूमीवर तू तुझे नगर वसविण्यापूर्वी तुला प्रथम सिसिलीच्या समुद्रात कष्टाने वल्ही मारली पाहिजेत; इटलीचा क्षारसमुद्र तुझ्या गलबतांनी उल्लंघिला पाहिजे, व नरक सरोवरे व सरसीचे एअिअन बेट पार केले पाहिजे. आता मी तुला एक संकेत सांगतो तो तुझ्या मनात पक्का बिंबू दे आणि त्याची आठवण राहू दे; एका अत्यंतिक चिंतेच्या क्षणी, तुला जेथे एक दूरच्या नदीच्या प्रवाहाजवळ, किनाऱ्यावरील सदापर्णी ओक वृक्षाखाली एक विशालकाय पांढरी वराही नुकत्याच जन्म दिलेल्या, तिच्यासारखीच सर्व पांढरी असलेल्या, तिच्या आचळांभोवती जमलेल्या तीस पिलांसह पसरलेली दिसेल, ती जागा तुझ्या नगराची भूमी असेल आणि तिथेच तुझ्या सर्व क्लेशांपासून तुला निश्चित स्वास्थ्य लाभेल आणि तुझी भोजनमेजे भक्षण करण्याच्या भयाने घाबरून जाऊ नकोस; दैव यातूनही तुझ्याकरिता मार्ग काढील, आणि तू ॲपोलोला शरण गेलास तर तोही तुझ्या सहाय्यास येईल. परंतु या बाजूची, इटलीच्या जवळच्या किनाऱ्यावरील, आपल्या सागराच्या भरतीच्या लाटांनी धुतली जाणारी इतर कोणत्याही किनाऱ्याहून आपल्याला अधिक जवळ असलेली भूमी तू टाळली पाहिजेस; कारण तेथील प्रत्येक तटबंदी असलेल्या नगरात ग्रीक वैरी आहेत. यापैकी एका नगरीची स्थापना नॅरिसिअमच्या लॉक्रिअनांनी केली होती. दुसऱ्या एका नगरीत क्रीटचा आयडॉमिनीअस असतो. त्याचे शस्त्रधारी सैनिक सॅलेन्टि–निअनांच्या सपाट प्रदेशात धुमाकूळ घालतात. अन्यत्र मेलिबिआचा प्रमुख

फिलॉक्टेटसचे प्रसिद्ध नगर, छोटे पिटेलिआ आहे; ते त्याला विळखा घालणाऱ्या भिंतींवर स्थिरावल्यासारखे दिसते. परंतु ही सर्व ओलांडून गेल्यावर, आणि तुझे आरमार सागराच्या पलिकडच्या बाजूला सुरक्षितपणे गेल्यावर तू किनाऱ्यावर वेदी बांधून तुझे नवस फेडले पाहिजेस. हे करीत असताना तू जांभळे वस्त्र परिधान केले पाहिजेस, त्याने तुझे केसही झाकले गेले पाहिजेत नाहीतर तू यज्ञयाग करीत असताना आणि पवित्र अग्नी पेटलेला असताना एखाद्या अनाहुताच्या अस्तित्वामुळे दैवी संदेश दुर्बोध होईल. तुझ्याप्रमाणेच तुझ्या सोबत्यांनीही यज्ञयागाचा हा दंडक पाळला पाहिजे. आणि तुझ्या वंशजांना जर प्रत्येक गोष्ट बिनचूक, चित्ताला हुरहुर न लागेल अशी करावयाची असेल तर त्यांनी हा विधी अगदी नेमका असाच पाळला पाहिजे.

"आता तू येथून पुढे गेल्यानंतर वारा तुला सिसिलीच्या किनाऱ्याकडे घेऊन जाईल आणि पेलोरसचे अरुंद अडथळे खुले होऊन तुला अनिर्बंध मार्ग दाखवितील. नंतर तू गलबताच्या डावीकडील जमिनीकडे गलबत वळव आणि उजवीकडील किनारा आणि सागराचा भाग टाळीत खुल्या सागरातून वळणावळणाच्या लांबच्या मार्गाने त्याच दिशेने गलबते हाकार. असे म्हणतात की एके काळी ही सर्व बेटे एक अखंड भूमी होती परंतु फार पूर्वी एका प्रचंड उद्रेकाने तिच्या चिंध्या उडवून दूरदूर भिरकावल्या; कारण कालाची प्रदीर्घ पुरातनता एवढा प्रचंड बदल घडवून आणण्यासही पुरेशी ठरली. आणि नंतर मध्ये समुद्र जोराने घुसला. सिसिलीच्या किनाऱ्यापासून इटलीची नगरे फोडून अलग केली, आणि त्या भगातून नव्या किनाऱ्याने अलग केलेली भूमी आणि नगरे कापीत प्रचंड वेगाने खळखळू लागला. इथे तुझा मार्ग उजवीकडून सिला आणि डावीकडून नित्य अशांत असलेल्या, दिवसातून तीन वेळा राक्षसी लाटांचे आचमन करून तिच्या अगाध सर्वभक्षी विवरात लोटणाऱ्या आणि नंतर पुनः जणू काही तारकांना पाण्याने फटकारण्या-करिता आकाशात भिरकावणाऱ्या करिब्डिजने रोखला जाईल. सिला मात्र एका गव्हरात दडते आणि दृष्टीआड छपून राहते; परंतु ती आपली मुखे बाहेर काढते आणि जहाजे खडकांवर ओढते. कमरेवरचा तिचा भाग सुंदरवक्ष असलेल्या युवती-सारखा मानवी आहे. परंतु तिचा खालचा भाग लांडग्यांच्या पोटांवरून उगवलेल्या डॉल्फिन माशासारखी शेपटे असलेल्या राक्षसी देवमाशासारखा आहे. जिथे सिलाच्या सागरसम निळ्या श्वानांच्या भुंकण्याने खडक दुमदुमत असतात तिथे खोल विशाल गव्हरातील अघोर सीलाच्या एकदासुद्धा दृष्टीस पडण्याचा धोका, घाई गर्दी करून पत्करण्यापेक्षा, दूरच्या वाकड्या मार्गाने जाऊन सिसिलीतील

पॅकिनसच्या भूशिरावरून परत मागे फिरणे अधिक शहाणपणाचे होईल. आणि आणखी एक सांगतो, हेलेनसला दिव्य दृष्टी नक्कीच आहे आणि ॲपोलोच त्याला सत्याची प्रेरणा देतो आणि त्याचे भविष्यकथन विश्वासार्ह आहे— हे व्हीनसपुत्रा तुझे एक सर्वश्रेष्ठ कर्तव्य मी तुला सांगतो इतर सर्व कर्तव्याइतकेच हे महत्वाचे आणि निकडीचे आहे म्हणून मी या सूचनेचा पुनःपुन: पुन:पुन: उच्चार करीन. तू सर्वप्रथम सर्वशक्तिमान जूनोदेवतेची आराधना करावीस, तिची प्रार्थना करावीस, आणि तिची व्रते तू अंत:करणपूर्वक करावीस. तिला शरण जाऊन यज्ञयाग करून त्या सर्वशक्तिमान देवतेला वश करून घ्यावेस कारण याच उपायाने तुला सिसिली मागे टाकून इटलीच्या सरहद्दीत विजयाने प्रवेश करता येईल. इटलीला पोहोचल्यावर तू प्रथम ॲव्हर्नसच्या कूजनपूर्ण अरण्यांमध्ये उदास सरोवरे असलेल्या क्यूमी नगराला भेट दे. तिथे तुला एक उन्मानी कुमारी भविष्यवादिनी भेटेल. ती खडकातील खूप खोल गुहेतून नियतीच्या निवाड्यांचे पूर्वकथन करते. पानावर चिन्हे काढून ती शब्द लिहून काढते, नंतर ती लिहिलेली भविष्यकथने निवडून क्रमाने लावते व ते संदेश तसेच आपल्या गुहेत गुप्त राखून ठेवते. तिथेच ते क्रमवार आणि एका जागीच निश्चल राहतात, परंतु जर एखादेवेळी बिजागरीचा खांब फिरला आणि किंचितही वारा त्यांना स्पर्श करून गेला तरी ती हलकी पाने दाराच्या हालचालीने चाळवतात, आणि ती भविष्यवादिनी ती पाने गुहेत वाऱ्यावर भरकटत असताना ती गोळा करण्याचा किंवा ती भविष्यभाषितांच्या स्वरूपात पुन: नीट क्रमवार लावण्याचा नंतर ती कधी विचारही करीत नाही. म्हणून मार्गदर्शनाकरिता आलेली माणसे उत्तर न मिळताच विन्मुख होऊन परततात आणि या द्रष्ट्या योगिनीच्या भविष्यकथनाविरुद्ध कडवटपणे बोलतात. हा असला तुझ्या बहुमोल वेळाचा महागडा अपव्यय होऊ नये म्हणून मी तुला निक्षून सांगतो की तुझे सोबती कितीही रागवून बोलले; आणि तुझ्या प्रवासाची योजना जरी तुझ्या गलबतांना सागरावर शिडे फुगविणारा पाठीवरचा वारा घेऊन ताबडतोब निघण्याची निकड करीत असली तरीही तू त्या भविष्यवादिनीला भेटले पाहिजेस, आणि आग्रहपूर्वक विनंती करून तिच्याकडून प्रतिसाद मिळव. तू तिला तिचे घट्ट मिटलेले ओठ उघडावयास लाव आणि तिची उत्तरे तिला तिच्या स्वत:च्या वाणीने उच्चारावयास लाव. नंतर ती तुला इटलीतील राज्ये, तुला करावी लागणारी युद्धे, आणि तुझ्यावर येणाऱ्या प्रत्येक दिव्यातून तू तुझी सुटका कशी करावीस किंवा ती कशी सोसावीस ते उघड करील. तू तिची यथोचित आराधना केलीस तर ती तुला प्रवासाला अनुकूल असे बोलेल.

इथे आम्ही प्रथम किनाऱ्याला लागलो आणि बंदरात प्रवेश केला. आमच्या समोरच रानात फिरत असलेले पुष्ट गुरांचे कळप आणि कुरणात राखण नसलेल्या बकऱ्या आढळल्या. आमच्या लुटीत सहभागी होण्याकरिता ज्युपिटरसहित सर्व देवांना पाचारण करून हाती खड्ग घेऊन आम्ही त्या जनावरांवर हल्ला केला. नंतर आम्ही वक्राकार किनाऱ्यावर गवताच्या बैठकी तयार केल्या व सुग्रास भोजनास सुरुवात केली. परंतु अचानक भयंकर वेगाने त्यांच्या टेकड्यावरून खाली झेपावत आणि मोठ्यानें पंख फडफडावीत हार्पींनी आमच्यावर हल्ला केला. त्यांनी आमचे अन्न लुटले, त्यांच्या अमंगल स्पर्शानें त्यांनी सर्वच भ्रष्ट केले. त्यांची दुर्गंधी घृणास्पद होती व त्यांच्या किंकाळ्या भयावह होत्या. मग आम्ही पुनः एकदा भोजनाची सिद्धता केली आणि वेदीतील अग्नी पुनः प्रज्वलित केला. परंतु यावेळी उंच खडकाच्या कपारीखाली खोल (आणि गूढ छाया असणाऱ्या झाडांच्या आडोशाला) आम्ही गेलो. परंतु आमच्या दृष्टीआड लपलेल्या कोलाहल करणाऱ्या त्या कळपाने आमच्यावर दुसऱ्याच कोपऱ्यातून झडप घातली. भक्ष्याभोवती आपल्या पायांच्या नख्या पसरून फेऱ्या घातल्या आणि पुनः त्यांनी आपल्या ओठांनी अन्न भ्रष्ट केले. मी तात्काळ माझ्या सोबत्यांना हाती शस्त्र घेऊन या घृणास्पद जातीशी युद्ध केलेच पाहिजे अशी आज्ञा दिली. मी जसे सांगितले तसेच त्यांनी केले. आपली खड्गे इतस्ततः गवतात त्यांनी लपविली, ढाली दिसणार नाहीत अशा बाजूला ठेवल्या. त्याप्रमाणे हार्पी जेव्हा फडफडाट करीत वक्र किनाऱ्यावर झेपावल्या तेव्हा एका मोक्याच्या जागेवरून मिसिनसने आपली ब्राँझची तुतारी वाजवून इशारा केला. त्या इशाऱ्याबरोबर माझ्या सोबत्यांनी हल्ला केला आणि त्या ओंगळ, घृणास्पद समुद्रपक्ष्यांना खड्गांनी जखमी करण्याच्या उद्देशाने ही अमानुष झुंज देण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्या पंखामुळे आमच्या घावांनी त्यांना काहीच अपाय झाला नाही, आणि कोणताही घाव त्यांच्या पाठीवरील कातडीपर्यंत पोहोचून त्यांना जखमी करू शकला नाही. उरलेले अन्न मागे टाकून आणि त्यांच्या हल्ल्याच्या उबग आणणाऱ्या खुणा ठेवून आकाशात भरारी मारून त्या वेगाने निघून गेल्या. परंतु त्यांच्यातील एकीने स्वतः सेलिनोने, खडकावर उंच बसून भावी दुर्दैवाची दृष्टी असल्याप्रमाणे आमच्याशी बोलून शांतता भंग केली. " हे लाओमिडॉनच्या भाऊबंदांच्या गुरांवर केलेल्या हल्ल्याचे समर्थन करण्याकरिता तू युद्ध करणार तर? हत्या केलेल्या या बैलांकरिता तू लढणार? आणि आमच्या हक्काच्या राज्यातून तू आम्हा निष्पाप हार्पींना हुसकावून लावणार? मग माझ्या बोलण्याकडे लक्ष दे आणि ते तुझ्या मनात पक्के ठसव, कारण मी चंडिकामधील प्रमुख फीबस अॅपोलोला सर्वशक्तिमान देवपित्याकडून प्राप्त झालेले व त्याने मला कथन केलेले

भवितव्य तुला सांगते. तुझ्या सफरीचे अंतिम उद्दिष्ट इटली आहे. तू वाऱ्यांना पाचारण करशील आणि तू इटलीला पोचशील. इटलीच्या बंदरात प्रवेश करण्यास तुला प्रतिबंध केला जाणार नाही. परंतु तू आमच्यावर हल्ला करून केलेल्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून भयंकर भुकेने तू हीच भोजनाची मेजे प्रथम कुरतडल्या शिवाय आणि भक्षण केल्याशिवाय तुला तुझी नगरी प्राप्त होणार नाही. तू तिच्याभोवती भिंती बांधू शकणार नाहीस. या वचनाबरोबरच ती तीरासारखी वेगाने अरण्यात दूर उडून गेली.

'या वचनाने माझ्या सोबत्यांचे रक्त गारठले आणि एकाएकी भयाने गोठून गेले. त्यांची चित्तवृत्ती निराशेने ग्रासली आणि हार्पी देवता असोत किंवा घृणास्पद ओंगळ पक्षी असोत. त्यांच्यापासून आपल्या सुटकेकरिता शस्त्रांवर अवलंबून रहाण्यापेक्षा प्रार्थना व नवस यांवर विसंबावे असा सल्ला त्यांनी मला दिला. किनाऱ्यावर उभे असलेल्या माझ्या वडिलांनी अँन्कायसिसनी, दोन्ही हात पसरून सर्वशक्तिमान परमेश्वराचा धावा केला. त्यांनी आम्हाला आवश्यक ते पूजाविधी नेमून दिले आणि प्रार्थना केली. "देवांनो, या भयाचे निवारण करा आणि अशा सर्व आपत्ती टाळा; दयाळू व्हा आणि सन्मार्गी माणसांचे रक्षण करा." नंतर त्यांनी आम्हाला जहाजे नांगरलेल्या जागेपासून दोरखंड फेकायला सांगितले, आणि शिडे उलगडून सारखी करण्याची आज्ञा केली. दक्षिणवाऱ्याने आमची शिडे ताणली. फेसाळलेल्या लाटांवरुन आम्ही वेगाने गेलो आणि वाऱ्याने आणि सुकाणू-धारकाने आमचा मार्ग निश्चित केला. आता लाटांची मेखला चढविलेले वृक्षाच्छादित झॅसिन्थिअस बेट आणि डयूलिशिअम, सामी आणि नेरिटॉस बेट आणि त्यांच्या तुटलेल्या उंच कड्यासह दृष्टिपथात आले. जिथे लेअर्टीसने राज्य केले होते त्या इथाकाचे खडक आम्ही टाळले. आणि रानटी युलिसीझला जन्म देणाऱ्या त्या भूमीला आम्ही शिव्याशाप दिले. लवकरच आम्हाला ल्यूकेटचा मेघाच्छादित उंच भूप्रदेश आणि खलाशांना ज्याची धास्ती वाटते त्या मुख्यभूमीच्या भूशिरावरील अॅपोलोचे मंदिर समोरच दिसले. थकून गेल्यामुळे आम्ही जमिनीकडे निघालो आणि नाळीवरून नांगर टाकले. किनाऱ्यावर वरामांची एक लांब रांक झाली. आम्ही त्या छोट्या नगरीकडे चालत गेलो.

याप्रमाणे सरतेशेवटी, आशा जवळजवळ सोडून दिली असताना, आम्ही जमिनीवर पाय ठेवण्यात यशस्वी झालो. आम्ही विधिपूर्वक स्नान केले आणि नवस फेडण्याकरिता वेदींवर अग्नी प्रज्वलित केला. नंतर आही अॅकिरअमच्या किनाऱ्या-

वर ट्रोजन खेळ सुरू केले. आणि खूप मोठा समुदाय जमला, माझ्या मित्रांनी कपडे उतरविले. ऑलिव्ह तेलाने तुळतुळीत झालेल्या शरिरांनी मातृभूमीत जसे कुस्त्याच्या मैदानात ते खेळत असत तसे आता ते खेळांमधे गुंगले. शत्रूंपासून सुरक्षितपणे सुटका झाली आणि प्रवासाच्या मार्गावरील अनेक ग्रीक नगरांना आपण टाळू शकलो या विचाराने ते आनंदात होते. या अवधीत सूर्याची एक वार्षिक प्रदक्षणा पूर्ण झाली हिम पडू लागलें. शिशिरातील उत्तर वाऱ्यांनी सागराच्या लाटा अधिक उग्र केल्या. पुढच्या दारावर मी महाप्रतापी आबास वापरीत असे ती ब्राँझमधून कोरून काढलेली ढाल बसविली व तिच्याखाली स्मृति लेख लिहिला. "विजयी ग्रीकांकडून जिंकून घेतलेली व इनीआसने समर्पित केलेली ढाल." नंतर मी व्हलकरांना होडचा बाहेर काढून त्यावर जाण्याची व बंदर सोडण्याची आज्ञा केली. परस्पराशी स्पर्धा करीत जोरजोराने वल्ही मारीत माझ्या माणसांनी लवकरच सागराचा पृष्ठभाग मागे लोटला. लवकरच फिअेशियाचा उंच हवेशीर प्रदेश आमच्या मागे पडताना आम्ही पाहिला आणि शॅऑनिआच्या बंदराजवळ जाईपर्यंत आम्ही एपिरसच्या किनाऱ्याला वळसा घातला. आणि शेवटी डोंगरावरील बथरॉटम नगराला पोहोचलो.

'येथे आम्ही एक विश्वास बसणार नाही इतके विलक्षण वृत्त ऐकले. प्रायमचा पुत्र हेलेनसला राजा म्हणून ग्रीकांनी मान्यता दिली होती. तो इअसिड *पायरसच्या गादीवर बसला होता आणि त्याने पायरसची राणी अँड्रॉमॅकी हिच्याशी विवाह केला होता, अशा तऱ्हेने स्वतःच्या संबंधितातील वराशीच तिचे पुनः एकदा मीलन घडले होते. आश्चर्याने मी स्तंभित झालो आणि प्रत्यक्ष हेलेनसलाच विचारण्याकरिता आणि या अनपेक्षित घटनेविषयी अधिक जाणून घेण्याकरिता मी असाधारण उत्सुकतेने, गडबडीने निघालों. मी किनारा आणि माझी गलबते सोडून बंदरावर जात होतो तो मला स्वतः अँड्रोमॅकीच अचानक भेटली. ती शोकग्रस्त होऊन हेक्टरच्या रक्षेला मधाचे अर्घ्य यज्ञविधीने अर्पण करीत होती. तिच्या नगराजवळील सिमॉईसचे नामाभिधान प्राप्त झालेल्या नदी-किनाऱ्यावरील अरण्यात, हेक्टरच्या हरित तृणाच्छादित थडग्याजवळ ती हेक्टरच्या आत्म्याला आवाहन करीत होती. तिथेच तिने तिच्या शोकावेगाला वाट देण्यासाठी स्थान म्हणून दोन वेदी भक्तिभावाने बांधल्या होत्या. ट्रोजनांची वेषभूषा केलेला माणूस जवळ येत आहे हे पाहून ती भयचकित झाली. या धक्क्याने भांबावून मला पाहता पाहता ती एकदम ताठरल्यासारखी झाली, तिच्यातील चैतन्य नाहीसे झाले. तिला धड उभेही राहता येईना, आणि तिच्या मुखातून शब्द फुटायला बराच वेळ

लागला. "खरेच तू खराखुरा आहेस ? मी माझ्या डोळ्यावर विश्वास तरी ठेवावा काय ? हे व्हीनसपुत्रा, तो तूच आहेस हे मला कळेल काय ? तू जिवंत माणूस आहेस का ? किंवा तुझी जीवनज्योत मालवली असेल व तू परलोकी गेला असशील तर मला सांग हेक्टर कुठे आहे ? ती बोलत असतानाच रडू लागली आणि तिच्या रुदनाने तो अखिल परिसर दुमदुमला. तिचे दुःख इतके अनावर होते की मधून मधून, त्रोटक उत्तरांनीच केवळ मी ते खंडित करू शकलो. "होय, मी खरेच जिवंत माणूस आहे. माझी जीवन यात्रा अजून चालू आहे. मात्र दारुण दुःखात ! •तुझे डोळे तुला फसवीत नाहीत, तुला शंका वाटू देऊ नको. परंतु कीर्तीमान विवाहाने प्राप्त झालेल्या उच्च प्रतिष्ठेस तू वंचित झाल्यानंतर नशिबाने तुझ्या हेक्टरच्या अँड्रोमॅकीच्या थोर योग्यतेस साजेल असे दैव तुझ्यावर पुनः प्रसन्न झाले आहे काय ? तू अजूनही पायरसची पत्नी आहेस काय ?

"अधोवदन होऊन क्षीण आवाजात तिने उत्तर दिले, "हो ट्रॉयच्या उत्तुंग बुरुजांच्या पायतळी वैऱ्याच्या कबरीजवळ मरण्याची शिक्षा झालेली प्रायमची कन्या इतर सर्वांच्यापेक्षा अधिक सुखी आहे. जेत्यांची कामलालसा भागविण्याकरिता चिठ्ठ्या टाकून मिळविलेली ती बंदीवान गुलाम नव्हती. माझे घर जळून गेलेले मी पाहिले. ॲकिलीझच्या तरुण पुत्राच्या घृणास्पद औध्दत्याची बळी होण्याकरिता मला दूर सागरापार नेण्यात आले आणि गुलामगिरीच्या सर्व यातना मी सोसल्या परंतु लेडाची स्पार्टन नात हर्मिऑनी हिच्याबरोबर विवाह करण्याकरिता अत्यंत आतुर झालेल्या माझ्या पतीने मला लवकरच सोडले. आणि हेलेनसकडे त्याची साथी होण्याकरिता माझी बोळवण केली, आम्ही दोघेही घरगुलाम एकत्र आलो. त्याच सुमारास ज्याचा चंडिकांनी त्याच्या अपराधाकरिता अजूनही छळ चालविला होता, आणि ज्याची पत्नी काढून नेण्याचा पायरसने डाव टाकला होता, तो ऑरेस्टेस मत्सराग्नीने पेटून पायरसकरिता टपून बसला होता. त्याने त्याला बेसावध क्षणी गाठले आणि त्याच्याच घरातील वेदीवर त्याला भोसकून ठार मारले. पायरसच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्यातील काही भाग कायद्यानुसार हेलेनसकडे आला. ट्रॉयभूमीतील शॅऑनवरून त्याने शॅओनिया आणि शॅओनिअन पठार ही नावे निवडली आणि डोंगराच्या उतरणीवर इलिअमची गढी, ट्रॉयचा बालेकिल्ला बांधला. परंतु कुठल्या वाऱ्याने, कुठल्या नशिबाने तुला येथे सफरीवर आणले आहे ? कदाचित कुणी देवाने अज्ञानाने आमच्या किनाऱ्याला उतरणे तुला भाग पाडले असावे काय ? तुझा छोटा मुलगा ॲस्कॅनिअस कसा आहे ? तो अजून आहे ना ? अजून शक्तीदायी हवेचे श्वसन करतो ना ? ट्रॉयमध्ये

तेथील बंदर मोठे प्रशस्त आणि शांत आहे. कारण कुठूनही वारा त्याला स्पर्श करीत नाही, परंतु जवळच एटना गडगडत असतो आणि त्यामधून धडकी भरविणारा वर्षाव झडत असतो. कधी कधी तो एखादा काळाकुट्ट धुराचा ढग आकाशात उंच फेकतो; त्यातून मग काजळी धुराचा लोट आणि तप्तशुभ्र शिलारस यांचा स्फोट होतो, आणि अग्नीजिव्हा तारकांना चाटण्याकरिता त्यातून वर लवलवतात. कधी तो पर्वत त्याच्या उदरातील खडक उखडून बाहेर उंच भिरकावतो. त्याच्या खोल तळातील जमीन उकळून उतू जाते. त्या प्रत्येक वेळी भयंकर गर्जना होते. हा वितळलेला खडक तो घनीभूत करतो आणि हवेत उंच उडवून लावतो. त्याची कथा अशी सांगतात की विजेच्या उत्पाताने जळून कोळसा झालेला महाकाय एन्सेलॅडस एटनाच्या प्रचंड ओझ्याखाली दडपून पडला आहे, आणि त्याच्यावर तो विशाल ज्वालामुखी त्याच्या धडधडत्या चुलाणातून ज्वालांचे निश्वास टाकीत उभा आहे; आणि प्रत्येक वेळी जेव्हा एन्सेलॅडस अवघडतो आणि कुशीवर वळतो तेव्हा सर्व सिसिली थरथरतो आणि गुरगुरतो आणि आकाश धुराने झाकून टाकतो. कशामुळे आवाज होत आहे हे पाहू न शकल्यामुळे विलक्षण अनुभव घेत त्या सबंध रात्री आम्ही त्या अरण्यात लपून राहिलो. तेव्हा झगमगणारी नक्षत्रे दिसत नव्हती, आकाशमध्य चांदण्यांच्या दिप्तीने उजळून निघाला नव्हता. घुंगट घेतलेल्या आकाशात केवळ धुके होते आणि त्या रात्रीच्या भयाण समयी चंद्र दाट धुक्यात गुरफटला होता.

'आता नव्या दिवसाची सकाळ होत होती. पूर्वेकडे पहिली किरणे पसरली आणि सूर्योदयाने उंच आकाशातील आर्द्र छाया दूर केलेल्या होत्या. त्याचवेळी एकाएकी अरण्यातून एक विलक्षण अनोळखी माणूस बाहेर आला. दीनवाणा, दैन्यावस्था झालेला व भुकेने कृश झालेला होता. किनाऱ्यावर असलेल्या आम्हाकडे त्याने आपले हात याचनेने पसरले. आम्ही अचंब्याने त्याच्याकडे पाहिले. भयंकर धुळीने तो माखला होता, त्याच्या दाढीची दुर्दशा झाली होती, आणि त्याचे कपडे काट्यांनी एकत्र टाचलेले होते. परंतु इतर सर्व बाबतीत, एकेकाळी ट्रॉयच्या मोहिमेवर आपल्या पित्याची शस्त्रे धारण करून गेलेल्या एखाद्या ग्रीकासारखा तो दिसत होता. समोर डार्डन वस्त्रे व ट्रोजन शस्त्रे पाहताच तो चालता चालता थबकला. भयाने थिजून तो क्षणभर जागच्याजागी खिळल्यासारखा उभा राहिला. नंतर कमरेत वाकून रडत भाकत किनाऱ्याकडे सुसाट धावला. "ट्रोजनहो, तारकांच्या साक्षीने, श्रेष्ठ देवांच्या साक्षीने, आणि ज्या तेजस्वी हवेतून आपण जीवन घेतो त्या हवेच्या साक्षीने मी तुमच्यापाशी भीक मागतो मला तुम्ही घेऊन जा,

तुमच्या मर्जीप्रमाणे कोणत्याही देशाला घऊन चला. माझी एवढीच इच्छा आहे. मी ग्रीकांच्या मोहिमेत सामील झालो होतो हे मी जाणून आहे. ट्रोजनांच्या मायभूमीविरुद्ध मी युद्ध केले हे मी कबूल करतो. माझ्या अपराधाने झालेल्या भयंकर अन्यायास योग्य शिक्षा करावयाची असेल तर त्याकरिता माझे राईएवढे तुकडे करून लाटांवर फेकून द्या आणि मला उजाड सागरात बुडवून टाका. मला मरायचेच असेल तर माणसांच्या हातून आलेला मृत्यू मला सुखाचा वाटेल."

'हे शब्द उच्चारीत असतानाच त्याने लोटांगण घालून माझ्या गुडघ्यांना मिठी घातली. तो कोण आहे, कोणत्या वंशाचा आहे, दैवगतीने त्याला कोणत्या यातना भोगाव्या लागल्या हे सांगण्यास आम्ही त्याला आश्वासन देऊन आग्रह केला. थोडा वेळ थांबल्यानंतर माझे वडील अँकायसीस यांनी आपला हात त्या अज्ञात युवकाच्या हाती दिला आणि या स्नेहशील चेष्टिताने त्याचा धीर वाढविला त्यामुळे शेवटी आपले भय बाजूस सारून तो बोलू लागला.

"मी इथाकाचा रहिवासी आहे, तेथे माझे घर होते. आणि मी दुर्दैवी युलिसीझचा साथीदार होतो. माझे नाव अॅकीमेनिडीस आहे आणि अॅडमॅस्टस माझे वडील होते, ते एक गरीब गृहस्थ होते आणि आम्ही जसे होतो तसेच राहिलो असतो तर बरे झाले असते असे मला किती वाटते! परंतु मी त्याना सोडले आणि सागरसफरीने ट्रॉयला निघालो. सायक्लोप्सच्या त्या गुहेच्या भयंकर प्रवेशदारातून सुटून जाण्याच्या निकडीच्या चिंतेतच माझे सोबती मला विसरले आणि सायक्लोप्सच्या राक्षसी गुहेत मला सोडून ते निघून गेले त्या गुहेचा आतील भाग अंधारा आणि अति विशाल आहे, आणि त्या रक्ताळलेल्या अन्नभक्षणामुळे घाणेरडा आहे. सायक्लोप्स हा राक्षस आहे आणि आकाशाला धडक मारण्याइतका उंच आहे. 'देवांनो, हे असले भय माणसांच्या जगापासून दूर ठेवा. त्याचे दर्शनही आपल्या डोळ्यांना खुपते, आणि कोणताही माणूस त्याच्याशी माणसाच्या भाषेत संभाषण करू शकत नाही. तो त्याच्या दुर्दैवी बळींच्या शरीरातील आतील अवयव आणि काळे रक्त भक्षण करतो. आमच्या टोळीपैकी दोघांना त्याने राक्षसी हातात पकडून तसेच पडल्यापडल्या त्यांना गुहेच्या मध्यावर एका खडकावर आपटलेले मी स्वतः पाहिले आहे. गुहेतील सगळ्या वाटांवर रक्ताचा सडा झाला आहे, आणि रक्ताची तळी आहेत. रक्त ठिबकत असलेले, रक्त साकळून काळे पडलेले, अजूनही उष्ण असलेले आणि त्याचा जबडा मिटताच सांधे थरथरणारे त्यांचे अवयव तो चघळीत असताना मी पाहिले आहे. परंतु त्याच्या कृत्याचे त्याला प्रायश्चित मिळाले आहे. असला रानटीपणा युलिसीझ सहन करणे शक्यच नव्हते. आणि आमच्या या

भयानक कसोटीच्यावेळी युलिसीझने आपली कीर्ति सार्थ केली. कारण भरपूर खाणे झाल्यावर सायक्लोप्स आडवा झाला आणि गुंगीत झोपी गेला. सबंध गुहेत तो आडवा पसरला होता, त्याची मान कलली होती आणि झोपेतच अन्नाचे घास, घट्ट मदिरा आणि इतर घाणीबरोबर मिसळलेले रक्त तो ओकत होता. त्याचवेळी आम्ही स्वर्गस्थ देवांची प्रार्थना केली आणि कामे वाटून घेण्याकरिता चिठ्ठ्या टाकल्या. त्याला घेरण्याकरिता आम्ही सर्वांनी एकदम आत मुसंडी मारली. एका अणकुचीदार हत्याराने आम्ही त्याचा आठ्या पडलेल्या कपाळाखाली खोल बसविलेला, अर्गाइव्हच्या ढालीएवढा किंवा अॅपोलोच्या सूर्याएवढा प्रचंड एकुलता एक डोळा फोडला, आणि मोठ्या हर्षाने आम्ही आमच्या सोबत्यांच्या मृत आत्म्यांचा सूड घेतला. परंतु गरीब बिचाऱ्या प्रवाशांनो तुम्ही इथून सुटून जाण्याची त्वरा केली पाहिजे. किनाऱ्यावरचे तुमचे दोर खेचून काढा. आपल्या विशाल गुहेत मेंढ्यांना पाळून त्यांचे दूध काढणाऱ्या या पॉलिफेमस सारखेच भयंकर, विशालकाय असे दुसरे शंभर सायक्लोप्स इथे आहेत. या चन्द्राकृती किनाऱ्यावरील प्रदेशात ते ठिकठिकाणी राहतात आणि उंच पर्वतावर भटकत असतात. कारण आता तिसऱ्यावेळी चन्द्र आपली शिंगे प्रकाशाने भरीत आहे, आणि तितके दिवस (तीन महिने) मी जिथे केवळ श्वापदेच संचार करीत असतात आणि त्यांच्या गुहा असतात त्या अरण्यातून आणि ओसाड रानातून रखडत मी दिवस कंठिले आहेत. एका खडकावर उभे राहून मी त्या भयंकर सायक्लोप्सना पहात राहतो आणि त्यांच्या प्रत्येक पदरवाने आणि बोलण्याच्या आवाजाने माझा थरकाप उडतो. झाडांच्या फांद्यावरील तुटपुंज्या अन्नावर मी जगत आहे. दगडासारखी रानफळे आणि मुळापासून उपटलेले गवत हेच माझे अन्न आहे. आणि मी जरी सतत लक्ष ठेवून होतो तरी आतापर्यंत या किनाऱ्याकडे येणारे एकही जहाज माझ्या दृष्टीस पडलेले नाही. तुमची जहाजे पाहताच ती कुणाचीही का असेनात मी त्यांच्यावर माझा पूर्ण भरवसा टाकण्याचे ठरविले. कारण एकदा या भयंकर सायक्लोप्स जमातीपासून माझी सुटका झाल्यानंतर निश्चितच माझे काहीही झाले तरी मला चालणार होते. त्यांना तोंड देण्यापेक्षा तुमच्या इच्छेनुरूप कोणत्याही मार्गाने मी तुम्हाला माझ्या जीवनाचा अंत करू देईन."

त्याचे बोलणे संपते न संपते तोच आम्ही प्रत्यक्ष राक्षसी, भेसूर आणि किळसवाण्या अशा दृष्टी गेलेल्या त्या नरमांसभक्षक राक्षसाला, पॉलिफेमसला पाहिले. नित्याप्रमाणे समुद्राकडे हाकीत असलेल्या त्याच्या मेंढ्याच्या कळपासह तो पर्वताच्या उतरणीवरून येत होता. हातात टेकायला म्हणून व पावलांना

आधार म्हणून त्याने पाईनवृक्षाचे आखूड कापलेले खोड घेतले होते. त्याच्या बरोबर जाणाऱ्या केसाळ मेंढयाच काय तो त्याचा एकमेव आनंद होता, आणि आता त्याचा एकमेव दुःखपरिवार होता. आणि नंतर खोल पाण्यात पोहोचेपर्यंत तो समुद्रातून चालत गेला, विव्हळत आणि दात करकरत त्याने खोबणीतून काढलेला डोळा जिथे होता तिथून वाहणारे रक्त धुवून टाकले. किनाऱ्यापासून तो खूप दूर गेला होता, परंतु तरीही लाटांनी त्याच्या भल्या उंच मांडया कधीच भिजल्या नाहीत. घाबरून आम्ही त्या शरणागताला जहाजावर घेतले. त्याने हे जीवदान मिळविलेच होते. न बोलता आम्ही आमचे दोर कापले, आणि सायक्लोप्सच्या पल्ल्याच्या बाहेर पडण्याकरिता त्वरा केली. आम्ही वल्हयावर जोर धरला आणि एकमेकाशी स्पर्धा करीत आमच्या वल्हयानी समुद्र घुसळून काढला. सायक्लोप्सला कसला तरी संशय आला आणि त्याने आपली पावले आवाजाच्या अनुरोधाने वळविली. परंतु आमच्यावर शस्त्र फेकण्याकरिता दृष्टी नव्हती म्हणून म्हणा किंवा आयोनिअन समुद्राच्या लाटांमधून आमचा पाठलाग करण्याइतका तो उंचही नसल्यामुळे म्हणा, त्याने एक प्रचंड आरोळी ठोकली. त्या आरोळीने त्या महासागराची प्रत्येक लाट थरथरली, इटलीच्या दूर अंतरप्रदेशात घबराट उडाला,आणि त्याच्या भूगर्भातील खोल, वक्राकार गव्हरातून एटनानेसुद्धा डरकाळी फोडली. आणि आता सगळी सायक्लोप्स जमातच चवताळून उठली. अरण्यातून आणि उंच पर्वतावरून ते बंदराकडे धावले आणि किनाऱ्यावर मोठ्या संख्येने जमले. भयंकर डोळे आणि आकाशाला भिडलेली डोकी असूनही असहाय्यपणे किनाऱ्यावर उभे राहिलेल्या त्या एटनाच्या भाईबंदाना आम्ही पाहू शकत होतो. पर्वत शिखरावर आकाशात शिरे उंचविलेल्या ज्यूपिटरच्या अरण्यात वाढत असलेल्या ओक वृक्षांप्रमाणे, किंवा डायनाच्या भव्य उपवनातील सूचिपर्णी सायप्रस वृक्षांप्रमाणे तो भयंकर समुदाय होता. आमच्या आत्यंतिक भयाने आम्हाला आमची शिडे पार उलगडण्यास आणि पुढे प्रयाण करण्याकरिता दिशेचा विचार न करता पाठीवरच्या वाऱ्यावर ती ताणण्यास उद्युक्त केले. परंतु हेलेनसने आम्हाला वेगळा सल्ला दिला होता; सीला आणि कॅरिब्डीजमधून गलबते हाकारू नका! कारण त्यांच्यामधून जाणारा मार्ग दोन्ही बाजूंनी सर्वनाशापासून फार थोड्या अंतरामधे येत होता. म्हणून आम्ही आमची शिडे गुंडाळून परत फिरण्याचा निर्णय घेतला. परंतु त्याचवेळी अचानक पेलोरसच्या अरुंद प्रदेशावरून येणारा उत्तरेकडचा वारा वाहू लागला. आम्ही नैसर्गिक खडकाने बनलेले पॅन्टाजिआ नदीच्या मुखावरील बंदर, मेगाराचा उपसागर आणि खोल भागातील थॅस्पस यांच्यावरून काळजीपूर्वक पुढे गेलो.

"तर, तुझ्या इच्छेला प्रतिसाद म्हणून या एवढ्याच मार्गदर्शनपर सूचना तुला देण्याची माझ्या ओठांना अनुज्ञा आहे. म्हणून तू पुढे जा, आणि तुझ्या कृत्यांनी आपल्या ट्रॉयचे वैभव आकाशापार उंचव."

'त्याचे भविष्यकथन संपल्यानंतर त्या दयाळू द्रष्टयाने जड सुवर्णाच्या वस्तूंचे व हस्तीदंताच्या कलाकुसरीच्या वस्तूंचे नजराणे आमच्या गलबतांवर पाठविण्याविषयी आज्ञा दिल्या. त्याने चांदीचा मोठा संचय, डोडोनाच्या कढया, टोकदार साखळयांनी घडविलेले चिलखत व तीनपदरी सोन्याच्या पट्टयांनी आवळायचे एक ढोलदार टोक असलेले, लांब वर टोक असलेले, लांब केसाचा तुरा असलेले शिरस्त्राण-या दोन्ही वस्तु पूर्वी पायरसच्या होत्या-या सर्व वस्तु गलबताच्या गाळयात भरल्या. माझ्या वडिलांकरिता खास नजराणे होते. हेलेनसने आम्हाला घोडे आणि वाटाडेही पुरविले. त्याने माझ्या सैनिकांना नवीन शस्त्रे दिली व माझ्या खलाश्यांची संख्या पुरेशी करण्याकरिता त्याने अधिक वल्हेकरीही आम्हाला दिले. हेलेनस असा गुंतला असताना अँकायसिस अनुकूल वाऱ्याचा उपयोग करून घेण्यात आमच्याकडून दिरंगाई होणार नाही याची खात्री करण्याकरिता डोलकाठीवर शिडे चढविण्याची आम्हाला आज्ञा देत होते. आणि आता साक्षात् अॅपोलोचा उद्गाता हेलेनस अँकायसिसला उद्देशून अति आदराने बोलला : "हे साक्षात् व्हीनसशी दिव्य विवाहाने बद्ध होण्यास सुयोग्य मानलेल्या अँकायसीस, देवांनाही तुझी कदर करणे भाग पडले कारण दोन वेळा त्यांनी तुला पतन पावलेल्या ट्रॉयपासून वाचविले आहे हे पहा इटलीची भूमी तुमच्यासमोरच आहे. वेगाने गलबते हाकारून ती भूमी तुम्ही आपलीशी करा. सागरापलीकडे त्या तिथे असलेल्या इटलीच्या जवळच्या किनाऱ्याजवळून तुम्ही प्रथम पुढे जायला हवे. कारण अॅपोलोने तुमच्याकरिता खुली केलेली भूमी इटलीच्या पलिकडच्या बाजूला आहे. तुझ्या पुत्राच्या निष्ठेच्या सामर्थ्याच्या जोरावर पुढे जा. परंतु मी असे बोलतच काय राहिलो आहे ? वारे वाहू लागले आहेत. मी माझ्या बोलण्याने त्यांना तिष्ठत ठेवता कामा नये."

'आणि निघण्याचा क्षण समीप आला म्हणून खरेच दु:खी असलेली अँड्रोमॅकी काही कमी आतिथ्यशील नव्हती. तिच्या औदार्यात ती किंचितही मागे राहिली नाही. तिने अॅस्कॅनिअसकरिता सुवर्णाच्या धाग्यांनी विणलेली आणि चित्राकृती असलेली वस्त्रे आणि भरतकाम केलेला, ट्रॉयहून आणलेला झगा आणला. त्याच्या अंगावर ती विणलेली भेटवस्त्रे चढवीत असताना ती त्याला म्हणाली "लाडक्या

अॅस्कॅनिअस, याही भेटींचा तू स्वीकार कर. माझ्या भरतकामाच्या कौशल्याचे तुला स्मरण रहावे म्हणून आणि हेक्टरची अँड्रोमॅकी तुझ्यावर नित्य प्रेम करते त्याची खूण म्हणून त्या भेटी माझ्या म्हणून तुला देत आहे. तुझ्या संबंधितांकडून या तुला शेवटच्या भेटी आहेत त्या स्वीकार, कारण माझ्या अॅस्टिअॅनॅक्सचे जे काही माझ्या-जवळ उरले आहे ते म्हणजे तुझ्या आणि त्याच्यातील साम्य. त्याचे डोळे, त्याचे हात, त्याचे मुख आणि त्याच्या हालचाली अगदी तुझ्यासारख्याच होत्या, आणि तो आता असता तर तुझ्याच वयाचा झाला असता.

'अश्रु दाटून आलेल्या मी त्यांना सोडून जाताना म्हणालो : 'चिरायु व्हा! संपन्न व्हा! कारण तुमचे सर्व साहसी जीवन आता संपले आहे. आम्हाला एका नियतीकडून दुसऱ्या नियतीकडे सारखे पुढे जायला हवे. तुम्हाला मात्र आता आराम प्राप्त झाला आहे, विशाल सागर आता तुम्हाला नांगरून काढावयाचा नाही. दृष्टी पुढून सतत मागे हटत आहे असे भासणारी भूमी तुम्हाला शोधून काढावयाची नाही. झॅन्थस नदीच्या तुमच्या प्रतिकृतीकडे आणि तुमच्या स्वतःच्या हाताने बांधलेल्या तुमच्या ट्रॉयकडे उज्वलतर भवितव्याच्या आशेने–मला विश्वास आहे की ते भवितव्य उज्वलतर असेल–आणि ग्रीकांकडून संभाव्य धोक्याचे भय न बाळगता, तुम्ही पाहू शकता, आणि मी जर कधी टायबरच्या मुखापर्यंत पोहोचलो, तिच्या किनाऱ्यावरील तिच्या भूमीवर उभा राहिलो आणि माझ्या प्रजाजनांना आश्वासिलेल्या नगरभिंती तटबंदी पाहिल्या तर आपल्या परस्पर-विषयक स्नेहबंधाच्या आधारे एक दिवस इटलीतच आपण एपिरसशी जवळचे नाते सांगणारी समरूप नगरे निर्माण करू. त्या पश्चिमभूमीचा संस्थापक डार्डनस हाच असेल. एकाच इतिहासात आपण सहभागी होऊ. तुम्ही आणि आम्ही प्रत्येकी सारखेच एक नवीनच ट्रॉय होऊ. हेच एक कर्तव्य आपल्या वंशजांना वारसा-धिकाराने प्राप्त होवो."

जिथून इटलीकडे जाण्याचा सर्वात अधिक जवळचा जलमार्ग आहे त्या नजि-कच्या सेरॉनिअमच्या मुख्य भूमीजवळच्या समुद्राकडे आम्ही गलबते हाकारली. आम्ही जात असतानाच सूर्य बुडाला आणि पर्वत अंधारात झाकळून गेले. आम्ही जमिनीवर उतरलो, आणि वल्ह्याजवळ राखण करण्याकरिता चिठ्ठ्या टाकून पाळ्या ठरविल्या आणि समुद्राजवळील स्नेहशील भूमीवर कृतज्ञतेने अंग टाकले. कोरड्या किनाऱ्यावर आम्ही इतःस्ततः पसरली आणि स्वतःला ताजेतवाने केले. आमच्या शिणलेल्या गात्रांना शक्ति प्राप्त करून देण्याकरिता निद्रा आली. घटिकांनी सरणाऱ्या रात्रीने तिचा प्रदक्षणेतील मध्यबिंदुही अजून जवळ केला

नव्हता तेव्हाच नेहमी सावध असणारा पॅलिनरस आपला बिछाना सोडून वाऱ्याची हालचाल लक्षपूर्वक ऐकू लागला. तो कोणत्या बाजूने वाहतो आहे याची त्याला विशेष चिंता नव्हती; निःशब्द आकाशातून गंभीर संथपणे भ्रमण करणारा प्रत्येक नक्षत्रपुंज त्याने पडताळून पाहिला. स्वाती, पर्जन्यसूचक रोहिणी तारकापुंज, सप्तर्षी, ध्रुवमत्स आणि वृश्चिक आणि नंतर त्याने दृष्टी दूरवर फेकली तसे सुवर्णखड्गधारी मृगशीर्ष नक्षत्रही त्याने पाहिले. नंतर सर्व शांत आहे आणि आकाश निर्मल आहे असे पाहून आपल्या गलबताच्या वरामावर उभे राहून त्याने जोरात पुकारा केला. आम्ही तळ हलविला, आमच्या मार्गावर साहसाने निघालो, आणि आमच्या शिडांचे पंख पसरले. आणि आता जेव्हा उषेच्या लाल प्रभेने चांदण्या उधळून लावल्या तेव्हा पाण्यापलिकडे, खोल अशा किनाररेखेवरच्या टेकड्या दिसू लागल्या. 'इटली' अशी पहिली आरोळी ठोकणारा अॅकेटस होता. 'इटली' आनंदाने त्या दृश्याचे स्वागत करीत माझे सोबतीही ओरडले. मधल्या डोलकाठीजवळ वरच्या बाजूस उभ्या असलेल्या माझ्या वडिलांनी, अँकायसीसनी एक मोठा मद्याचा कटोरा घेतला, त्याला फुलांची माळ घातली. निर्जल मद्याने तो भरला, आणि त्यांनी आमच्या दैवतांना आवाहन केले, "हे भूदेवतांनो, समुद्र देवतांनो, वादळावर आधिपत्य असलेल्या देवतांनो आमच्या सफरीस सहाय्य करणारा वारा आम्हाला द्या, आणि तुमचे विश्वास आम्हाला सहाय्यभूत होऊ द्यात!"

'त्यांच्या प्रार्थनेला साद म्हणून वायू लहर त्वरित आली. अगदी जवळच आमच्यापुढे एक बंदर दिसू लागले आणि उंचावरील मिनर्व्हाचे मंदिर दृष्टीपथात आले. माझ्या सोबत्यांनी आपली शिडे गुंडाळली आणि आमच्या नाळी जमिनीकडे वळविल्या. पूर्वेकडून किनाऱ्यावर आदळणाऱ्या लाटांनी वाकविलेल्या धनुष्याचा आकार बंदराला आणला होता. क्षार तुषारांनी फेसाळलेल्या, पुढे आलेल्या खडकांनी ते झाकले होते. आणि अत्युच्च कड्यावरून त्याच्या दोन भिंती, बाहू खाली सोडल्यासारख्या, खोल खाली उतरल्या होत्या. मंदिर किनाऱ्यापासून आत होते. आणि येथेच मला आमचे पहिले भविष्यसूचक चिन्ह दिसले, मैदानात इकडेतिकडे दौडणारे आणि तेथील गवत कुरतडणारे, चार तेजस्वी हिमशुभ्र घोडे दिसले. माझे वडील अँकायसीस उद्गारले, "हे अज्ञात भूमी, तू जो संदेश आमच्याकरिता आणला आहेस तो युद्धाचा आहे, घोडे युद्धाकरिता सिद्ध करतात आणि हे प्राणी युद्धाचीच भयसूचना देत आहेत. तरीही काही प्रसंगी याच चतुष्पाद प्राण्यांना शिस्तीने एकत्र लगाम घालून एकोप्याने जूला जुंपण्याचे आणि समाधानाने लगामी राहण्याचे शिक्षण दिलेले असते." आणि ते पुढे म्हणाले, "म्हणून यामधे

शांतीचीही आशा आहे." नंतर आमच्या उल्हसित समुद्राचे प्रथम स्वागत करणाऱ्या शस्त्रांचा टणत्कार करणाऱ्या मिनर्व्हाच्या पवित्र शक्तीची आम्ही प्रार्थना केली. फ्रिजिअन वस्त्रांनी आमची मस्तके झाकून आम्ही वेदीपुढे उभे राहिलो, आणि सर्वाधिक महत्वाची आज्ञा म्हणून लक्षात ठेवण्यासाठी हेलेनसने आम्हाला ताकीद केली होती त्याप्रमाणे आम्ही अर्गाइव्ह जूनोप्रित्यर्थ विधिपूर्वक यज्ञाग्नी प्रज्वलित केला. नंतर आम्ही थांबलो नाही; आमचे व्रतविधी यथासांग पार पाडल्यानंतर लगेच आम्ही आमच्या परबाणाच्या काठ्या आणि शिडे वाऱ्याकडे फिरविली; ग्रीक लोक रहात असलेल्या कोणत्याही भागाचा भरवसा नसल्यामुळे आम्ही ती भूमी सोडली. आमचे पुढील उद्दिष्ट आखातावरील टॅरेन्टम होते. प्रचलित कथा खरी असेल तर हर्क्यूलीसने या नगराला भेट दिली होती; त्याच्या समोरच लॅसिनिअन जूनोचे उत्तुंग मंदिर उभे होते. होय, आणि तिथेच कॉलोनिआचा किल्ला खडा होता, आणि तिथे पलिकडे, जिथे गलबते बुडतात ते सीलॅशिअम होते. आणि आता फार दूर, सागरातून उंचावणारा सिसिलीतील एटना पर्वत दिसू लागला होता, आणि दूरवरून खडकावर कोसळणाऱ्या सागराच्या प्रमत्त लाटांचा ध्वनी कानी येत होता. सबंध किनाऱ्यावरून राहून राहून मोठे आवाज कानी येत होते. सागराचे पाणी खोलवरून उंच उसळत होते. आणि त्या उसळत्या भोवऱ्यात वाळू भिरभिरत होती. माझे वडील, अँकायसीस मोठ्याने ओरडले. "ही खचितच भयावह करिब्डिज असावी; हेलेनसने आपल्याला ज्याची सूचना दिली होती ते हेच कराल खडक आणि तेथे त्या कपारी आहेत. झटकन गलबते बाजूला खेचा. वल्ह्यावर जोर धरा. आणि एका लयीत वल्ही मारत रहा. त्यांनी आज्ञा केल्याप्रमाणे माझ्या सोबत्यांनी केले. प्रथम पॅलिनरसने आपली रोरावणारी नाळ खेचून मांडवीकडे वळवून खुल्या सागरात हाकारली; नंतर आमची सर्व मंडळी भरल्या शिडांनी, वल्ही मारीत त्याच्या पाठोपाठ गेली. उसळत्या लाटांवर आम्ही आभाळात वर उचलले जात होतो. परंतु पुनः लाटा ओसरल्यावर, आम्ही एकदम खोल खाली जात होतो आणि जणू हेडीझपर्यंत बुडत होतो. खडकांच्या कमानीमधून आम्ही रखडत असताना तीन वेळा सागराचा प्रतिध्वनी त्या कड्यावरून आमच्याकडे परत आला. तीनवेळा सागरानें फेकलेल्या फेसातून आणि तुषारांच्या पडद्यातून आम्ही आकाशाकडे पाहिले, परंतु वारा आणि सूर्यप्रकाश या दोघांनीही आम्हाला सोडले होते. आम्ही थकलो होतो. आपण कुठे चाललो आहो ते आम्हाला कळत नसल्यामुळे आम्ही शेवटी संथपणे तरंगत सायक्लोप्सच्या किनाऱ्याला लागलो.

दुर्दैवी युलिसीझचा सहप्रवासी म्हणून गलबतांतून भटकत असता अॅकॅमेनिडीस-या किनाऱ्यावरून गेला होता. त्या आठवणी उलट क्रमाने आठवून या स्थळांची माहिती त्यानेच मला दिली.

'पूर्वीचे लोक ज्याला ऑर्टिजिआ म्हणत असत ते रोरावणाऱ्या लाटांनी वेढलेले प्लेमिरिअम सिकॅनिअन उपसागरासमोरच पसरले आहे. एलिसची नदी आल्फिअसने आरिथसच्या प्रवाहाच्या मुखाजवळ सिसिलीच्या सागराच्या पाण्यात मिसळण्याकरिता समुद्राखालून अदृश्य मार्ग कसा काढला हे सांगणारी एक कथा आहे. आज्ञापालन करण्याच्या हेतूने तेथे आम्ही सर्वशक्तिमान देवांची पूजा केली. नंतर आम्ही त्या सुपीक प्रदेशातील दलदलीमधील हेलॉरस नगरी ओलांडून पुढे गेलो. नंतर आम्ही पॅकिनसचे पुढे आलेले खडक आणि खडकाळ किनारा यांच्या जवळून गेलो. नंतर देववाणीनुसार कधीही हलणार नाही ते कमारिना आमच्या दृष्टीपथात आले. नंतर हसणाऱ्या नदीच्या नावावरून नाव पडलेले गेलाचे पठार आणि ते क्रूर गेला नगर आले. नंतर एकेकाळी अत्यंत उच्च प्रतीच्या घोड्यांची जन्मभूमी असलेल्या उत्तुंग अॅक्रॅगासने आमच्यासमोर आपली बळकट तटबंदी उभी केली. वारा अनुकूल असल्यामुळे वनराई असलेले सेलिनस मागे टाकले आणि लिलीबिअमच्या अवघड उथळ समुद्रातून आणि लपलेल्या खडकातून माझा मार्ग आक्रमला. शेवटी ड्रेपॅनमजवळ मला बंदर सापडले. परंतु त्या किनाऱ्यावरही मला आनंद लाभायचा नव्हता. अरेरे दुर्दैवा! सागरावरील वादळांच्या सर्व छळानंतर येथे मी माझ्या वडिलांना अंतरलो. अॅन्कायसीझना, माझ्या सर्व साहसातील आणि सर्व चिंतातील माझ्या आधाराला मी मुकलो. होय येथे, माझ्या शिणलेल्या दैन्यावस्थेत, सर्व पित्याहून श्रेष्ठ पिताजी, मी तुम्हाला अनंत दारुण संकटातून येथवर व्यर्थ आणल्यानंतर मला टाकून तुम्ही गेलात. त्या द्रष्ट्या हेलेनसनेही त्याच्या अनेक भयसूचनांमधे या दुःखाची मला पूर्वसूचना कधीच दिली नव्हती. किंवा त्या घृणास्पद सेलिनोनेही दिली नाही. हा आघात हे माझे शेवटचे दुःख होते. कारण मी माझ्या सफरीच्या उद्दिष्टाला पोहोचलो होतो. आणि दैवाने मला तुझ्या किनाऱ्याला लावले तेव्हा मी सिसिलीहून निघालो होतो."

अशा तऱ्हेने ट्रॉयचा प्रमुख इनीआस याने त्याच्या दैवी दैवगतीची कहाणी आठवून सांगितली आणि त्याच्या सफरीचे त्याने कथन केले. त्यावेळी प्रत्येक मुख उत्कंठेने त्याच्याकडे वळले होते. शेवटी तो थांबला, तो निःशब्द झाला त्याचा वृत्तांत संपला.

## सर्ग चौथा

# डायडोची दुःखान्तिका

परंतु या मधल्या वेळात प्रीतीच्या अदृश्य ज्वालेने विव्हल झालेल्या डायडोला जीवनरस शोषणाऱ्या त्या खोल जखमेमुळे दीर्घ यातना भोगाव्या लागल्या होत्या. तिच्या प्रिय वीरपुरुषाचे शौर्य आणि उच्चकुलातील जन्मामुळे प्राप्त झालेली धीरोदात्तता याबद्दलचे विचार पुनःपुनः आवेगाने तिच्या मनात येत होते, आणि त्याची मुद्रा आणि त्याचे शब्द यांचा ठसा तिच्या मनावर उमटून राहिला होता; त्या मनोवेदनेने तिला शांती आणि स्वस्थताही लाभू दिली नाही. आणि आता दुसऱ्या दिवसाची उषा ॲपोलोच्या प्रकाशाने विश्व उजळीत होती आणि तिने उंच आकाशातील आर्द्र छाया दूर केल्या होत्या तेव्हा तिच्या हृदयाशी एकजीव असलेल्या तिच्या बहिणीला विचलित चित्ताने ती म्हणाली, "भगिनी ॲना, जागृती आणि अशांत निद्रा यांच्यामधे मी भयभीत होऊन का तिष्ठत आहे? आपल्या घरात येऊन आपल्या समवेत राहिलेल्या या नव्या अतिथीविषयी तुला काय वाटते? त्याचे व्यक्तिमत्व अनन्यसाधारण आहे. आणि त्याचे हृदय आणि शौर्य केवळ वीरश्रीपूर्ण आहे. त्याचा जन्म देवांशापासून आहे असा मला विश्वास वाटतो आणि तसे वाटण्याला मला आधार आहे. अधमवृत्ती नेहमीच भयातून प्रकट होते परंतु- त्याच्या वृत्तांतात अगदी दारुण अंतापर्यंत साहिलेला दैवच्छल आणि युद्धाची अघोरता कितीतरी होती! मृत्यूच्या कपटाने माझे पहिले प्रेम हिरावून घेतल्यामुळे विवाहविधीचा आणि पहिल्या मीलनाचा प्रत्येक विचार मला केवळ कंटाळवाणा झाला नसता तर, पुनरपि कुठल्याही पुरुषाशी विवाहबंधनाने संमीलित व्हायची कांक्षा करायची नाही असा मी अनिवार्य निश्चय केला नसता तर कदाचित हा एकच मोह मला असा झाला असता की त्याला मी फशी पडले असते. खरेच, ॲना, मी तुला माझे गुपित सांगते. माझे पती सायकिअस यांच्या, माझ्या स्वतःच्या भावाने केलेल्या रुधिराभिषेकाने आपले घर भ्रष्ट झाले तेव्हापासून या अनोळखी पुरुषाशिवाय दुसऱ्या कुणीही कधीही मला प्रभावित केले नाही किंवा विचलित

होण्याइतके हृदयमंथनही केले नाही. पूर्व परिचित ज्वाला पुन: समीप येत आहे असे मला जाणवते. परंतु मी माझे पावित्र्य भंग करून घेण्यापूर्वी किंवा त्याच्या धर्माचे उल्लंघन करण्यापूर्वी ही धरणी खोल दुभंगून तिने मला पोटात घ्यावे किंवा सर्वशक्तिमान देवपित्याने त्याच्या वज्राघाताने मला भूतविश्वात भिरकावून द्यावे, खोल खोल अंधाऱ्या एरबॅासमध्ये त्या निस्तेज भूतात्म्यांच्या संगतीत. कारण ज्याने प्रथम मला त्याच्याबरोबर संमिलीत केले त्याने माझ्या जीवनातील सर्व प्रेम शोषित केले, आणि म्हणून त्यानेच ते प्रेम त्याच्या हृदयासमीप जतन करावे आणि मृत्यूनंतर थडग्यातही जतन करावे ! तिने तिचे विचार व्यक्त केले, आणि तिच्या नेत्रात अश्रू दाटून आले, आणि तिने नेत्रांना लावलेल्या वस्त्राचे पदर भिजले.

ॲनाने तिला उत्तर दिले, " डायडो, माझे तुझ्यावर प्राणाहूनही अधिक प्रेम आहे. तू तुझे सर्व यौवन असे एकाकी शोक करीत झुरत व्यतीत करणार आहेस का ? आणि अपत्यप्रेम आणि व्हीनस देते त्या सर्वाला तू अनभिज्ञ राहणार आहेस काय ? राखेला, समाधिस्त मृतात्म्याला याची काही क्षिति असते असा तुझा खरेच विश्वास आहे काय ? पूर्वी कोणीही आफ्रिकन किंवा आपण येथे येण्यापूर्वी कोणीही विवाहेच्छु टायरिअन तुझ्या शोकातून तुला सोडवून मोहित करू शकला नाही हे मला मान्य आहे, कारण या विजयकीर्तीने संपन्न असलेल्या भूमीचे पुत्र आयरबस आणि इतर प्रमुख सरदार यांचा तू तिरस्कार करीत होतीस, पण म्हणून तू आता तुला प्रभावित करणाऱ्या प्रीतीला प्रतिकार केलाच पाहिजेस का ? शिवाय तुझे राज्य वसलेल्या भूमीचे धनी कोण आहेत याचें स्मरण तू केले पाहिजेस. तुझ्या राज्याच्या एका बाजूने तुला अजिक्य गेटूलिआच्या रहिवाश्यांच्या नगरांनी, ज्याना कसलाच धाक नाही त्या न्युमिडिआच्या लोकांनीं आणि पाय ठेवू न देणाऱ्या सार्टिसच्या दलदलींनी वेढिलें आहे, आणि दुसऱ्या बाजूने जलहीन वाळवंटाने आणि बाकीच्या क्रूर लुटारूंनी वेढिले आहे. आणि जिथून तुझा भाऊ तुला अजूनही धमकावीत आहे त्या टायरपासून संभावणाऱ्या युद्धाच्या संकटाविषयी मी बोलण्याची आवश्यकताच नाही. आणि आता माझी अशी श्रद्धा आहे की जेव्हा अनुकूल वाऱ्यासरशी ट्रोजनांची गलबते कार्थिजच्या मार्गाला लागली तेव्हाच देवांनी त्यांची अनुमती मुद्रांकित केली आणि साक्षात जुनोने सहाय्य केले. आणि डायडो, तू जर हा सर्वोत्तम विवाह केलास तर आपल्या राज्याच्या आणि नगरीच्या भवितव्यात किती थोर भाग्य आहे याची केवळ कल्पना कर ! ट्रोजन सेना आपल्याबरोबर आघाडीवर कूच करू लागली तर

पराक्रमाच्या महान कृतींनी कार्थिजची कीर्ती किती वृद्धिगत होईल याचा विचार कर. तू केवळ आशिर्वादाकरिता देवांची प्रार्थना कर आणि यज्ञयाग करून त्यांची कृपा संपादन कर; आणि मग तुझ्या अतिथीचे मनमुक्त आदरातिथ्य कर, त्यांची गलबते अजूनही नादुरुस्तच आहेत, आणि शिशिर आणि पर्जन्यदा रोहिणी क्रुद्ध नभाखाली महासागरावर त्यांचा राग काढीत आहेत; तेव्हा इथे ठेवून घेण्यासाठी काही ना काही निमित्ते गुंफीत रहा.

याप्रमाणे बोलून ॲनाने आधीच उद्दिप्त झालेल्या डायडोच्या हृदयाला प्रीतीच्या नव्या चाहूलीनें अधिकच चेतविले, तिच्या विचलित अंतःकरणाला मोहविण्याकरिता नवी आशा दिली आणि तिचे विकल्प भंगून टाकले. नंतर त्यांनी प्रथम मंदिरांना भेटी दिल्या आणि क्रमाक्रमाने प्रत्येक वेदीवर परमेश्वराचा अनुग्रह संपादन करण्याकरिता प्रार्थना केली, वृध्दीची देवता सिरिसला, सूर्यदेवतेला स्वातंत्र्यदाता पिता बॅकसला, आणि सर्वाधिक विवाहबंधन जूनोच्या अधिकारकक्षेत असल्यामुळे जूनोला त्यांनी निवडक मेंढ्या विधिपूर्वक बळी दिल्या. लावण्यवती डायडो स्वतःच उजव्या हाती चषक घेऊन स्वच्छ पांढऱ्या गाईच्या शिगामधून मध ओतीत असे; किंवा देवांच्या मूर्तीसमोरील रक्तस्नात वेदीजवळ यज्ञविधीतील नृत्यात पदन्यास करीत असे. प्रत्येक नूतन दिवसाचे धर्मविधी सुरू करताना ती अधिकाधिक बळी देत असे, आणि विलग ओठांनी ती मेंढ्यांच्या विछिन्न उरात अजूनही स्पंदन होत असलेल्या अवयवांकडून सूचित होणाऱ्या संदेशाकरिता डोकावून पाहत असे. परंतु द्रष्टयांचे भविष्यज्ञान किती कीव करण्याइतके अल्प असते! तिच्या अनिवार विकाराला मंदिरे किंवा प्रार्थना सहाय्यभूत होणार नव्हत्या. कारण ती ज्वाला तिच्या वितळत्या अंतःकरणाच्या अगदी गाभ्यात पोहोचली होती व तिच्या शरीरातील रेणुन् रेणु तिने पोखरून टाकला होता; आणि बिचारी डायडो पेटून उठली होती. तिच्या हृदयातील ती खोल जखम मूकपणे वहात होती. जिचा क्रेटन अरण्यात दूर अंतरावरून एखाद्या सशस्त्र मेंढपाळाने पाठलाग केला आहे आणि ती असावध असता जिच्या मासात पिसे असलेला बाण घुसवून नंतर तो तसाच राहू दिला आहे; व म्हणून ते प्राणघातक मांसात घट्ट रुतलेले टोक पाठीवर वागवीत जी अरण्ये आणि डिक्टी पर्वत प्रदेशातील वाटा झेपा टाकीत ओलांडीत आहे अशा एखाद्या हरिणीसारखी ती तिच्या सर्व नगरातून विकलावस्थेत भटकत होती. जिथे तिच्या नगरभिंतीचे बांधकाम चालू होते तिथे डायडो कधी-कधी इनीआसला घेऊन जात असे, त्याला फिनिशिआची विपुल साधनसंपत्ती आणि तिच्या नगररचनेची प्रगती दाखवीत असे. आणि ती तिच्या भावना व्यक्त

करण्यास प्रारंभ करीत असे परंतु नेहमीच अर्धवट बोलूनच स्वतःला आवरीत असे. दिवस ढळल्यानंतर तिला मेजवानी पूर्वीसारखीच सुरु व्हायला हवी असे, ट्रॉयच्या यातनांची कहाणी पुनः श्रवण करण्याचा तो अप्रासंगिक वाटणारा अनाकलनीय अट्टाहास करीत असे, आणि पुनः ती वक्त्याचे शब्द न् शब्द श्वास रोधून अत्युत्कण्ठेने ऐकत असे. नंतर अतिथी निघून गेल्यावर, चंद्र आपली द्युती नित्यक्रमानें अंधारात शमवीत असता आणि अस्तंगत होणाऱ्या तारकांनी निद्रेची सूचना केल्यावर, रित्या भोजनमंदिरात डायडो एकटीच शोक करीत बसे आणि तो ज्या आसनावरून उठून गेला होता त्यावर ती स्वतःला लोटीत असे. तो आता दूर गेलेला असे, श्रवणाच्या दृष्टीच्या पलिकडे गेलेला असे. परंतु तिला तो अजूनही दिसत असे, त्याचा आवाज अजूनही तिला ऐकू येत असे. ॲस्कॅनिअसचे त्याच्या पित्याशी असलेल्या साम्याच्या संमोहनाने ती कधीकधी त्याला हृदयाशी कवटाळीत असे आणि जी प्रीती शब्दांमधून व्यक्त करण्याचे तिला धैर्य नव्हते तिच्यापासून आपली सुटका करून घेण्याचा ती निकराचा प्रयत्न करीत असे. मध्यंतरीच्या काळात अर्धवट बांधलेल्या मनोऱ्यांचे बांधकाम वरती चढण्याचे थांबले होते. तरुण सैनिकांच्या शस्त्रांच्या कवायती होत नव्हत्या. बंदरांचे व अभेद्य बुरुजांचे बांधकाम थांबले होते. भव्य छातीत धडकी बसविणाऱ्या भिंतींचे बांधकाम खोळंबले होते. आणि आकाशाइतक्या उंच याऱ्या पडून राहिल्या होत्या.

डायडो आता प्रेमविकाराच्या पूर्ण आधीन झाली आहे आणि स्वतःच्या प्रतिष्ठेचा विचार तिच्या तीव्र वासनेला प्रतिकार करू शकत नाही हे पाहताच सॅटर्नची कन्या, ज्युपिटरची प्रिय पत्नी व्हीनसकडे एक सूचना करण्याकरिता गेली. "वा! तू आणि तुझ्या मुलाने खरेच विजयाची चांगली फळे मिळविली आहेत. आणि तू संपादिलेले यश मोठे आहे. आता तुम्ही दोन्ही देवतांनी एका स्त्रीला फशी पाडून पराजित केले आहे. हे तुझे कर्तृत्व श्रेष्ठ आहे आणि त्याची सुकीर्ती व्हायला हवी. माझ्या नगरीच्या संरक्षण योजनेचे तुला भय वाटते म्हणून उत्तुंग कार्थिजच्या शांततामय घराकडे तू केवळ संशयाने पाहतेस हे काही मला पूर्णपणे अज्ञात नाही. परंतु कुठल्या मर्यादेपर्यंत जायचे तुझ्या मनात आहे? इतकी तीव्र स्पर्धा चालू ठेवण्याची काही आवश्यकता आहे काय? विवाहबंधनाने दृढ होणाऱ्या चिरंतन शांततेप्रीत्यर्थ आपण सहकार्य करणे निश्चितच अधिक योग्य आहे. तुझ्या मनातील उद्दिष्ट तू साध्य केले आहेस. डायडोने रोमरोमात भिनणारे, वेड लावणारे ते विष प्राशन केले आहे. ती प्रेमविकाराने पेटली आहे. म्हणून या राष्ट्रात आपण दोघी सहभागी होऊ या. त्याच्या शासकीय व्यवस्थेत प्रत्येकीला समान अधिकार

ठेवू या. डायडोला त्या फ्रिजिअनची धर्मपत्नी–जन्माची दासी होऊ दे आणि हुंडा म्हणून तिची टायरिअन प्रजा तुझ्या आधिपत्याखाली येऊ दे."

परंतु जूनोच्या शब्दातून तिचा खरा हेतू व्यक्त होत नसून तिचा खरा उद्देश नियतीने ज्यांना इटलीत साम्राज्य करण्याकरिता नियोजित केले आहे त्यांना आफ्रिकेकडे वळविण्याचा आहे हे व्हीनसच्या लक्षात आले. म्हणून तिने पुढीलप्रमाणे उत्तर दिले : "युद्धात तुझ्याविरुद्ध उभे राहण्याचा धोका लक्षात घेतल्यावर तुझ्या सूचनेचा अव्हेर करण्याइतके वेडे खरेच कोण असेल?–अर्थात तू सांगत असलेली योजना कार्यान्वित केल्यानंतर तिच्यावर यशाचा मुकुट चढणार असेल तर! परंतु मी दैवाधीन आहे आणि नियती देवतांची योजना मला अगम्य आहे. टायरिअन आणि ट्रॉयहून आलेले निर्वासित यांचे एका नगरीवर सामाईक स्वामित्व असावे अशी ज्युपिटरची मनीषा असेल काय, आणि त्यांच्यामधील तहाला किंवा प्रजेच्या परस्पर संमिश्रणाला त्याची अनुमती असेल काय? तू त्याची पत्नी आहेस. त्याला सरळ विनंती करून त्याच्या हेतूचा तू अंदाज घेण्यात काही वावगे नाही. म्हणून तू या बाबतीत नेतृत्व कर. मी मागून येतेच आहे. सम्राज्ञी जूनोचे उत्तर तयारच होते. ती म्हणाली, " ते काम ही माझी जबाबदारी राहील. परंतु आपला तातडीचा उद्देश साध्य करण्याची योजना मला तुला थोडक्यात सांगू दे. ऐक उद्या सकाळी आपल्या किरणांनी पृथ्वीचे अवगुंठन दूर करण्याकरिता सूर्योदय होईल तेव्हा इनीआस आणि अभागी डायडोचा मृगयेकरिता अरण्यात बरोबर जाण्याचा मानस आहे. हाकेकरी पर्वतमार्गाभोवती त्याचा वेढा वाढविण्याच्या गडबडीत असतानाच मी एक पर्जन्य व गारांचा वर्षाव करणारा काळा मेघ त्यांच्यावर सोडीन; त्या राजयुगुलावर वर्षा कोसळेल आणि सारे आकाश मेघगर्जनेने दुमदुमून उठेल. त्यांच्या लवाजम्यातील मंडळी पांगतील आणि रात्रीसारख्या अंधारात दिसेनाशी होतील, आणि डायडो आणि ट्रॉयप्रमुख एकाच गुहेत आश्रय घेतील. मी तिथेच असेन, आणि तुझ्या वचनपूर्तीचे आश्वासन मला असेल तर मी तिला त्याची होण्याकरिता त्याच्या आधीन करीन. आणि दृढ विवाहबंधनात त्यांना मीलित करीन. हा त्यांचा विधियुक्त विवाह असेल." या योजनेला सिथरिअनने काही आक्षेप घेतला नाही. इतक्या चतुर मोहजालाचे मंदस्मिताने कौतुक करीत तिने मानेनेच त्याला अनुमती दिली.

त्याच सुमारास सागर सोडून उषादेवी वर आली. तिची किरणे दिसू लागताच निवडक माणसांचा एक समूह नगरवेशीतून बाहेर पडला. मोठ्या

चौकटींची जाळी, लहान चौकटींची जाळी बाहेर आली, आणि लोखंडाचे रुंद फाळ असलेले शिकारी भाले बाहेर आले; आणि मॅसिलिअन घोडेस्वार आणि तीक्ष्ण घ्राणेंद्रिय असलेले शिकारी कुत्रे बाहेर झेपावले. राज्ञी अजूनही तिच्या महालातच रेंगाळत होती, आणि कार्थिजमधील उच्च उमराव दाराजवळ तिची प्रतीक्षा करीत होते. तिचा तल्लख पंचकल्याणी घोडा जांभळ्या रंगाच्या आणि आणि सुवर्णाच्या इतमामात दिमाखाने खुरांनी माती उडवीत होता आणि तोंडातून फेस टाकीत लगामाचे टोक चघळीत होता. शेवटी मोठ्या परिवारासह डायडोने बाहेर पाऊल टाकले. भरतकामाची किनार असलेले सिडॉनिअन उत्तरीय तिने परिधान केले होते. तिचा भाता आणि केस एकत्र बांधलेला चापही सुवर्णाचाच होता, आणि सुवर्णाच्या चापाने तिने आपले जांभळे खमीस मानेजवळ बांधले होते. ट्रोजनांची तुकडीही पाठोपाठ आली; त्यांमधे उत्साहित आयुलसही होता. दोन्ही स्वाऱ्या एक झाल्यावर त्या सर्वांहून अधिक देखणा असलेला इनीआस पुढे होऊन डायडोच्या बाजूस गेला. तो शिबिरात लिसिया आणि झान्थस नदी सोडून त्याच्या आईचे बेट डेलॉसला पुन: नव्याने नृत्यास प्रारंभ करण्याकरिता जाणाऱ्या अॅपोलोसारखा दिसत होता. अॅपोलोच्या वेदीभोवती क्रेटन ड्रायोपिअन आणि गोंदलेले अगाथिरसन एकत्र जमतात आणि जयघोष करीत असतात, अॅपोलो स्वत: सिंथसच्या उतरणीवर पायचाल करीत असतो. त्याच्या खांद्यावर लटकविलेल्या धनुष्यबाणांचा नाद होत असतो, आणि त्याचे भुरभुरणारे केस पर्णांच्या मृदुल मालेने आणि सुवर्णबंधाने व्यवस्थित बसविलेले असतात. इनीआसही त्याच्या इतक्याच चापल्याने व सावधानतेने चालत होता; आणि अॅपोलोसारखेच लालित्यपूर्ण तेज त्याच्याही कुलीन धीरोदात्त मुखावर विलसत होते.

पायवाटही नसलेल्या उंच पर्वत प्रदेशावर पोहचल्यावर शिकाऱ्यांनी हुसकावून काढलेल्या रानमेंढ्यांचा एक कळप सरळ त्यांच्यापुढेच असलेल्या खड-काळ शिखराच्या उतरणीवरून उधळत खाली आला; आणखी पुढे वळणावर काळवीटांचा एक कळप धुळीच्या लोटात एकजूट झाला आणि डोंगरी भागातून, उघड्या रानातून दूर उधळत गेला, खालच्या खोल दरीत बाल अॅस्कॅनिअस अबलख पंचकल्याणी घोड्यावरील दौडीचा आनंद मनापासून लुटीत होता, भरवेगाने दौडत तो आता काही स्वारांना मागे टाकीत होता तर कधी दुसऱ्या स्वारांना; परंतु या सर्व निरुपद्रवी प्राण्यांपेक्षा एखादा तोंडाशी त्वेषाने फेस आलेला वराह किंवा सावजाच्या मागावर असलेला सोनेरी तपकिरी सिंह टेकडीवरून खाली येताना पाहण्याची त्याला किती उत्कंठा लागली होती !

लवकरच आकाशात संमिश्र गडगडाट सुरु झाला. आणि नंतर पावसाचे ढग जमले व गारा आणि पावसाचा मिश्र वर्षाव झाला. सर्व शिकारी टायरिअन परिवार आणि ट्रोजन तरुणांची तुकडी आणि व्हीनसचा नातू डार्डन किशोर घाबरून निवारा शोधण्याकरिता रानात जिकडेतिकडे पांगले. पर्वतांवरून पाणलोट प्रचंड ओघाने रोरावत आले. डायडो आणि ट्रोजन प्रमुखाने एकाच गुहेचा मार्ग अनुसरला पुरातन धरणीदेवता आणि जूनो, विवाहाची देवता, यांनी आपला खास इशारा केला, आकाशाने या मीलनाकडे दुर्लक्ष केले, वीज चमकली; पर्वत शिखरावर वनदेवतांनी आपला जयघोष उंचावला त्या दिवशी यातनांची आणि मृत्यूची बीजे पेरली गेली. त्या क्षणापासून डायडोला लोकप्रवादाची आणि तिच्या स्वतःच्या प्रतिष्ठेची क्षिती उरली नाही. आणि प्रणयाराधनेत गुप्तता राखण्याचा विचारही तिने सोडून दिला. तीं त्याला विवाहच म्हणू लागली. आपले पाप झाकण्याकरिता ती तो शब्द योजू लागली.

आफ्रिकेच्या मोठ्या नगरातून त्वरितच ही वदंताराक्षसी धावत सुटली. वदंता ही सर्व उपाधीत अधिक गतिमान आहे. तिचे सामर्थ्य तिच्या गतिस्वातंत्र्यात आहे, आणि तिच्या संचारातून तिला नवी शक्ती प्राप्त होत असते. एखाद्या लहान भित्र्या प्राण्यासारखी ती प्रारंभी असते परंतु नंतर ती वाढता वाढता आकाशात उंचावते आणि ती जरी भूमीवरून चालते तरी तिचे मस्तक ती ढगाआड लपविते. असे म्हणतात की सर्वभूतांची माता पृथ्वीदेवी हिने सर्व देवावरील संतापाने तिला जन्म दिला; ती तिचे शेवटचे अपत्य आहे. ती कोअस आणि एन्सेलॅडसची धाकटी बहीण आहे. वदंतेच्या पायात चापल्य आहे, आणि तिचे पंख गतिमान आहेत. ती एक प्रचंड भयावह राक्षसी आहे. तिच्या अंगावर उगवणाऱ्या प्रत्येक पिसाखाली एक चमत्कृतीपूर्ण कौशल्याने बसविलेला दक्ष डोळा असतो. आणि त्या प्रत्येक पिसागणिक एक मुख व त्या मुखात मोठ्याने बोलणारी एक जिव्हा असते. आणि एक नित्य सावध असलेला कान अवकाशात असतो. रात्री ती आकाश आणि पृथ्वी यांच्यामधील अंधारात फुत्कार करीत भ्रमण करते, आणि समाधानाच्या निद्रेत ती कधीही पापणी ढळू देत नाही. कधी घराच्या छपरावर, कधी प्रासादाच्या उंच मनोऱ्यावर बसून दिवसा ती लक्ष ठेवते. मोठमोठ्या नगरात ती घबराट उडविते, कारण ती जे सत्य आहे ते कथन करण्यास जशी सिद्ध असते तशीच ती जे असत्य आणि दुष्ट आहे तेही स्मरणात ठेवते.

आतासुद्धा तिने मोठ्या आनंदाने सत्याप्रमाणेच कल्पितांचाही पुनरुच्चार करीत आफ्रिकी जनात विविध अफवा पसरविल्या, ट्रोजनांच्या वंशातील इनीआस

तेथे कसा आला, लावण्यवती डायडोने त्याच्याशी मीलित होण्याचा अनुग्रह कसा केला. आणि आता लज्जाहीन विकाराच्या सापळ्यात अडकल्यामुळे ते हा दीर्घ हिवाळा कसा ऐषारामात आणि परस्परांच्या संमीलित सुखोपभोगात त्यांच्या राज्यकर्तव्यांचा विचार न करता व्यतीत करीत आहेत. अशा तऱ्हेचे विषय त्या अमंगल देवतेने माणसांच्या संभाषणात सर्वत्र प्रविष्ट केले होते. नंतर तिने आपली पावले द्रुतगतीने राजा आयरबसकडे वळविली, ती त्याच्याशी बोलली, तिने त्याचे विचार भडकाविले आणि त्याच्या क्रोधाग्नीवर इंधन रचले.

ज्युपिटर अॅमॉनने एका आफ्रिकी वनदेवतेवर बलात्कार केला होता आणि आयरबस तिच्यापासून झालेला त्याचा पुत्र होता. या ज्युपिटरची शंभर भव्य मंदिरे आणि शंभर वेदी त्याने आपल्या विस्तृत राज्यात बांधल्या होत्या. त्यामध्ये त्याने नित्य प्रज्वलित असलेले मंदिराग्नी विधीपूर्वक प्रतिष्ठित केले होते आणि देवांच्या अखंड आराधनेकरिता पुरोहितांची प्रणाली नियुक्त केली होती. मंदि-राच्या परिसरात नित्य बळींच्या रक्ताची दुर्गंधी असे, आणि मंदिराची प्रवेशद्वारे विविध रंगाच्या फुलांनी नेहमीच सुशोभित केलेली असत. असे म्हणतात की ऐकलेल्या वदंतेने अतिक्रुद्ध झालेला आणि असहाय्यतेने बेभान झालेला आयरबस, सभोवार दैवी अस्तित्व असलेल्या वेदीपुढे उभा राहिला, शरणागत होऊन त्याने आपले हात उंचावले, आणि ज्युपिटरची दीर्घकाल प्रार्थना केली. "हे सर्वशक्तिमान ज्युपिटर, तुला आता हे लोकांचे राष्ट्र मेजवानीप्रसंगी गडद रंगात विणलेली वस्त्रे अंथरलेल्या सुखासनावर बॅकसला प्रिय असा नैवेद्य समर्पण करीत आहे! काय घडत आहे हे तुला दिसत आहे काय? की तू जेव्हा तुझे गरगरते वज्र फेकतोस तेव्हा आम्हाला वाटणारे तुझे भय, प्रभो, व्यर्थच आहे काय? आम्हाला भिवविणारे मेघातील अग्नी केवळ निस्तेज अग्नीच आहेत काय, आणि त्यांच्या परस्परात मिसळणाऱ्या अस्फुट गडगडाटाला काहीच अर्थ नाही काय? कारण ज्या उनाड स्त्रीने माझ्या प्रदेशात एक लहान नगरी वसविली व मी घातलेल्या अटीच्या करारावर एक किनारपट्टी खंडाने कसण्याकरिता घेतली तिने माझी विवाहाची मागणी धुडकावून लावली आणि इनीआसचा स्वामी म्हणून, समाईक राज्याधिपती म्हणून स्वीकार केला आहे. आणि आता आपली हनुवटी बांधण्या-करिता आणि आपले तेलकट केस झाकण्याकरिता फ्रिजिअन शिरस्त्राण घालून, आणि बायकी पुरुषांचा परिवार समवेत घेऊन आलेला हा दुसरा पॅरिस माझ्या पासून त्याने जे चोरले त्याचा मालक होणार आहे, आणि तोवर इकडे ज्या श्रद्धेने मी वर्तन करतो ती पूर्णतया अस्थानी आहे असे दिसत असूनही, मी जी

तुम्ही आहेत असे मानतो त्या मंदिरांकडे समर्पण करण्यासाठी नाना द्रव्ये आणीत आहे.

त्याच्या प्रार्थनेतील शब्द असे होते, आणि प्रार्थना करीत असताना त्याने वेदीला स्पर्श केला. सर्व शक्तिमान प्रभूने प्रार्थना ऐकली, आणि त्याने राणीच्या नगरीकडे, आणि स्वतःच्या प्रतिष्ठेचे विस्मरण घडलेल्या त्या प्रेमिकांकडे आपली दृष्टी वळविली. नंतर तो मर्क्यूरीशी बोलला आणि त्याच्यावर पुढील कार्य सोपविले. "माझ्या पुत्रा उठ, तुझ्या मार्गाला लाग. पश्चिम वाऱ्यांना तुझ्याकडे पाचारण कर. तुझ्या पंखानी हळुहळु उड्डाण करायला लाग. नियतीने त्याचीच होणार असलेल्या त्या अन्य नगरींचा क्षणभरही विचार न करता टायरिअन कार्थिजमधे आता घोटाळणाऱ्या डार्डन राजपुत्राशी बोल. अवकाशातून द्रुतगतीने संचार करून माझा संदेश त्याला पोहोचव. त्या सर्वात सुंदर देवतेने, त्याच्या मातेने, त्याला दोन वेळा त्याच्या ग्रीक शत्रूंपासून वाचविले ते कांही याकरिता नव्हते. त्याच्याविषयी तिने आमच्या मनामध्ये ज्या अपेक्षा निर्माण केल्या होत्या त्या पुऱ्या करणारा हा पुरुष नव्हे. नाही! जी भूमी नेतृत्वाची जन्मभूमी होणार आहे आणि युद्धाच्या खणखणाटाने निनादणार आहे त्या इटलीचे तो नेतृत्व करणार होता, मानवंत ट्यूसर पासून निर्माण झालेल्या वंशाचा वारसा पुढे चालविणार होता, आणि सर्व त्रिखंड पृथ्वी न्यायदंडाच्या अधिपत्याखाली आणणार होता, आणि जरी या दिव्य भवितव्याचे वैभव त्याचा पुरुषार्थ चेतविण्यास असमर्थ असले, आणि स्वतःकरिता कीर्ती संपादन करण्याकरिता परिश्रम करण्याची त्याची इच्छा नसली तरी तो त्याचा पुत्र ॲस्कॅनिअस याला रोमच्या दुर्गापासून वंचित करणार आहे काय? काय करण्याचा त्याचा मानस आहे? त्याच्या स्वतःच्या पुत्रपौत्राची भविष्यातील इटलीतील जनांची, आणि भविष्यात लॅव्हिनिआचे नाम नियतीनुसार धारण करणाऱ्या भूमीची चिंता न करता त्याचे असलेल्या लोकात घोटाळून तो काय मिळवणार आहे? त्याने सागरसंचार करायला निघालेच पाहिजे. मला त्याला हेच सांगायचे आहे. आणि हाच माझा त्याला आदेश आहे.

त्यांचे बोलणे संपले, आणि मर्क्यूरीने आपल्या उच्चपदस्थ पित्याची आज्ञा पालन करण्याची सिद्धता केली. प्रथम त्याने त्याला भूमी प्रमाणेच सागरावरून झंजावाताच्या गतीने घेऊन जाण्याकरिता पंख असलेले सुवर्णाचे चढाव पायात चढविले. नंतर त्याने त्याचा दंड धारण केला. या दंडाने तो पाताळ लोकातून विरलरूप मृतात्मे बोलावितो आणि दुसऱ्या काही मृतात्म्यांना उग्र टार्टरसला* पाठवितो, निद्रा देतो, निद्रा हिरावून घेतो, आणि मृत्यूनंतर डोळे उघडे ठेवतो.

आपल्या दंडाने वारे पुढे हाकारीत त्याने काळ्या मेघातून भ्रमण सुरु केले. असे भ्रमण करीत असता, आकाशाला मस्तकावर तोलून धरणाऱ्या सहनशील ॲटलसचे शिर आणि खोल कुशी दिसल्या. त्याचे देवदारांनी आच्छादिलेले मस्तक नित्य काळ्याकुट्ट धुक्याने वेढलेले असते. आणि वाऱ्यांनी आणि पावसाने झोडपले जात असते. त्यांचे स्कंध हिमाच्या अवगुंठनात लपेटलेले असतात, त्याच्या स्थविर हनुवटीवरुन प्रपात कोसळत असतात, आणि त्याची स्वैर वाढलेली रुक्ष दाढी बर्फाने गोठून कडक झालेली असते. तोल सावरणाऱ्या पंखावर स्थिर होऊन सिलिनिअन मर्क्युरी प्रथम इथे थांबला आणि नंतर तिथून तो त्याच्या सर्व सामर्थ्यानिशी सागराच्या लाटांवर झेपावला, आणि समुद्रपक्षी ज्याप्रमाणे समुद्राच्या पृष्ठभागावर अगदी खालून किनाऱ्याभोवती आणि जिथे मासे सापडतात त्या खडकाभोवती भ्रमण करतात त्याप्रमाणे भ्रमण करीत त्याच्या आईचे वडील असलेल्या ॲटलास पर्वतावरून येणारा वारा कापीत, पृथ्वी आणि आकाश यांच्या मधून संचार करीत तो सिलिनिअन आफ्रिकेच्या वालुकामय किनाऱ्यावर याप्रमाणे उडत आला.

पंख असलेल्या पायांनी उडत तो झोपड्यांची खेडी असलेल्या आफ्रिकेत आल्याबरोबर किल्ल्याच्या पायाच्या व नव्या वस्तीच्या बांधकामाची पहाणी करीत असलेला इनीआस त्याला दिसला. त्याने सोनेरी पिंगट सूर्यकांत मण्यांनी अलंकृत केलेले खड्ग धारण केले होते, आणि एका संपन्न दात्रीने, स्वतः डायडोने नजर केलेले व तिने स्वतः सुवर्णाच्या उभ्या धाग्यांनी विणलेले टायरिअन लाल गडद जांभळे वस्त्र खांद्यावरुन परिधान केले होते. मर्क्यूरीने त्वरित आपला संदेश त्याला दिला. "काय तू या मानवंत कार्थिज नगरीच्या पायासाठी ठिकाण न्याहाळीत आहेस आणि एक भव्य नगरी येथे उभवीत आहेस काय? अहा! मोठा आदर्श पति आहेस! लाजिरवाणी गोष्ट आहे ही! तुला तुझ्या भवितव्याचा आणि तुझेंच होणार असलेल्या त्या दुसऱ्या राज्याचा विसर पडला आहे. जो सर्व देवावर आधिपत्य करतो आणि जो स्वेच्छेने पृथ्वी आणि आकाश याना झुलवीत असतो. साक्षात त्याने मला दैदिप्यमान ऑलिंपसवरुन तुझ्याकडे पाठविले आहे. त्यानेच हा संदेश अवकाशातून त्वरित तुझ्याकडे आणण्याची मला आज्ञा केली. काय करण्याचा तुझा मानस आहे? आफ्रिकन भूमीत ऐषारामात व्यर्थ वेळ घालवून तू काय मिळवू शकणार आहेस? आपल्या दिव्य भवितव्याचे वैभव जर तुझा पुरुषार्थ चेतविण्यास असमर्थ असेल, आणि तू स्वतःकरिता कीर्ती संपादन करण्याकरिता परिश्रम करणार नसलास तर निदान मोठा होत असलेल्या, इटलीवर

रोमच्या होणाऱ्या इटलीवर, राज्य करण्याचे भाग्यात असलेल्या, अॅस्कॅनिअसचा, आणि तुझा वारस म्हणून त्याच्याकडून तू करीत असलेल्या अपेक्षांचा तरी विचार कर" ही कडक समज देत असतानाच आणि तो बोलत असतानाच मर्क्युरी मानवी दृष्टीपुढून नाहीसा झाला आणि नजरेतून नाहीसा होत वातावरणात विरून गेला.

या साक्षात्काराने इनीआस स्तंभित आणि मुग्ध झाला. तो चक्रावला होता. भयाच्या शिरशिरीनें त्याचे केस ताठ झाले होते, आणि त्याचा आवाज कंठात घोटाळला होता. देवांच्या या निक्षून दिलेल्या आदेशाने त्याला इतका भयंकर धक्का बसला की लगेच तो त्याच्या प्रीतीचे अधिष्ठान असलेल्या भूमीतून पलायन करून निघून जाण्याचा उत्कटतेने विचार करू लागला परंतु तो काय करू शकत होता? विकारवश झालेल्या राज्ञीशी बोलून तिचे मन वळविण्याचे साहस तो कसे करू शकणार होता? सूतोवाच करण्याची कोणती उत्तम संधी त्याला निवडता आली असती? त्याने याबद्दलचे विचार चटकन मनात घोळविले; शक्याशक्यतेच्या सर्व विविध बाजूंचा घाईघाईने विचार करताना त्याच्या मनाचा कल एकदा एका योजनेच्या बाजूने तर पुन: दुसऱ्या योजनेस अनुकूल होत होता. असा विचारांचा खल तो करीत असता, एक धोरण त्याला इतर प्रत्येक धोरणाहून अधिक योग्य वाटले. त्याने नेस्थिअस सर्जिस्टस आणि शूर सेरेस्टस यांना जवळ बोलाविले. त्यांनी कोणतेही स्पष्टीकरण करण्याच्या भरीस न पडता व योजनेतील बदलाचे कारण गुप्त राखून आरमार समुद्रसंचारासाठीं तयार करायचे होते. त्यांची गल-बतावरील सर्व अवजारे यथायोग्य ठेवायची होती आणि किनाऱ्यावर सोबत्यांना एकत्र जमवायचे होते. तोवर तो डायडोला भेटणार होता कारण तिच्या निरागस आणि सत्प्रवृत्त मनाला इतकी दृढ प्रीती कधी भग्न होणे शक्य आहे अशी शंकाही शिवली नसेल म्हणून तो तिच्याशी कशा तऱ्हेने बोलणे करावे म्हणजे ते फलदायी होईल याचा विचार करीत होता, आणि कोणत्या वेळी गोष्ट काढली म्हणजे तिला कमीत कमी दुःख होईल हे शोधण्याचा प्रयत्न करीत होता, आणि याप्रमाणे उभ्या राहिलेल्या बिकट अवस्थेतून सुटण्याचा तो चातुर्याने मार्ग शोधून काढणार होता.

त्याच्या माणसांनी आनंदाने आणि तत्परतेने त्याचे आज्ञापालन आणि आपल्यावर सोपविलेलीं कामे पार पाडण्यास आरंभ केला. परंतु प्रेमिकाला कुणीही फसवू शकत नाही. हा संकल्पित कावा राज्ञीला पूर्वीच उमगला. कोणी सांगण्यापूर्वीच काय घडणार आहे हे तिच्या अंत:प्रेरणेला कळले आणि प्रत्येक सत्य किंवा कल्पित संभाव्य संकट तिच्या भयभीत हळूवार मनाला स्पष्ट दिसू

लागले. तिच्या अशा व्यग्र अवस्थेतच सफरीकरिता आरमार सुसज्ज करण्याचे चालू आहे हे वृत्त तिच्यापर्यंत आले– या वेळीही त्या अमंगल वदंतेनेच ते तिच्याकडे आणले. प्रक्षुब्ध झालेली आणि सत्यास सामोरे जाण्यास असमर्थ असलेली राज्ञी, जेव्हा प्रत्येक वर्षाआड उत्सवातील बेहोष उन्मादाचा अंकुश बॅक्कसच्या योगिनीला टोचतो आणि रात्रीच्या आरोळ्यांनी सिथेरॉन पर्वत तिला बोलावतो तेव्हा बॅक्कसच्या ध्वजापताका फडकू लागल्यावर आणि त्याचा जयघोष सुरू झाल्यावर ती योगिनी बेभान अवस्थेत जाते तशी सैरभैर होऊन धुमाकूळ घालीत कार्थेजमधून ती धावत सुटली. शेवटी डायडोने इनीआसला गाठले आणि त्याचा धि:कार करीत त्याला उद्देशून तीच प्रथम त्याच्याशी बोलू लागली.

"विद्रोही पुरुषा, हे कृष्णकृत्य लपवून, एका शब्दानेही मला न सांगता माझा देश सोडून तुला जाता येईल असे खरेच तुला वाटले होते काय? आपली प्रीति, आपण आणाशपथा घेऊन केलेले पाणीग्रहण, डायडोची प्रतीक्षा करणार असलेला निश्चित क्रूर मृत्यू यापैकी तुला काहीच रोखू शकत नाही काय? उत्तरेकडील वादळी वाऱ्यांना तोंड देत गडबडीने खवळलेला सागर ओलांडण्याकरिता हिवाळ्याच्या आभाळाखाली तुझ्या आरमाराची सिद्धता करण्याचे परिश्रम घेण्याइतका तू पाषाणहृदयी आहेस काय? तू कधीही न पाहिलेल्या वराचा अज्ञात भूमीत शोध घेणे तर जाऊ देच पण प्राचीन ट्रॉय नगरी अजूनही उभी असती तरी तेथे सुद्धा तू जाण्याकरिता वादळी सागरात जहाजे लोटण्याची योजना केली असतीस काय? माझ्यापासून दूर जाण्याचा का तू प्रयत्न करीत आहेस? मी ढाळीत असलेल्या आसवांकरिता, तू स्वतःच्या वचनदत्त हस्ताकरिता, आणि आपल्या मीलनाकरिता ज्यामुळे ते वैध ठरले असते त्या आपल्या विवाहाकरिता, मी जर तुला कधी ममता दाखवली असेल, माझ्या कोणत्याही गोष्टीने तुला कधी सुखी केले असेल तर दया कर, दया कर! मी मूर्ख ठरले आहे आणि माझ्याजवळ आता तुझे मन ज्यायोगे द्रवेल असे काही उरलेच नाही. तुझ्याजवळ याचना करण्याची वेळ निघून गेली नसेल तर माझे ऐक. एका घराच्या विध्वंसाची तरी क्षिती बाळग. आणि तुझा विचार बदल. तुझ्याकरिता मी आफ्रिकी जमातींचा आणि न्युमिडिअन उमरावांचा द्वेष पदरात घेतला आणि माझ्या स्वतःच्या टायरिअनांचेही वैर पत्करले, आणि अमरत्वाची माझी एकमेव आशा, पूर्वी माझीच असलेली सुकीर्ती, माझी प्रतिष्ठा मी तुझ्याकरिता कायमची नष्ट होऊ दिली. मृत्यूला सामोरे जाण्याकरिता तू मला कुणाच्या हाती सोडून जात आहेस, माझ्या—अभ्यागता? मी तुला नाथ म्हणत असे ते संबोधन आता 'अभ्यागतात'

संकोचले आहे. आता माझ्या भविष्यात काय आहे? माझ्या भिंती उखडून टाकण्याकरिता येणारा माझा भाऊ पिग्मॅलिअन, नाहीतर मला जिंकून घेऊन माझ्याशी विवाह लावणारा तो जेटुलिअन आयरबसच ना? तू जाण्यापूर्वी मला गर्भसंभव झाला असता तर तुझा मुलगा, छोटा इनिआस माझ्या महालात खेळण्याकरिता राहिला असता आणि निदान त्याच्या तुझ्याशी असलेल्या साम्याने तू माझ्याकडे जणू परत आला आहेस असे मला भासले असते. मग मला सर्वस्वी जाळ्यात फशी पडल्यासारखे आणि अनाथ झाल्यासारखे वाटले नसते.

तिचे बोलणे संपले. ज्युपिटरची सूचना स्मरून त्याने आपले नेत्र स्थिर ठेवले, आणि त्याच्या अंतरीच्या वेदनेवर स्वामित्व मिळविण्याची पराकाष्ठा केली. शेवटी तो मोजकेच बोलला. "राज्ञी, तू मला निर्वेध ऐकवू शकतेस अशा असंख्य दयेच्या कृतींकरिता मी तुझा ऋणी आहे हे मी कधीही नाकारणार नाही. आणि जोवर माझी जाणीव जागृत आहे आणि माझ्यातील चैतन्यांशाचे माझ्या चलनवलनावर नियंत्रण आहे तोवर, एलिसा मला तुझ्या आठवणींचा कधींच उबग येणार नाही. मी तुला आता थोडक्यात वस्तुस्थिती सांगतो. माझे आताचे जाणें कोणत्याही फसवणुकीखाली गुप्त ठेवण्याचा माझा विचार नव्हता. तू अशी कल्पनाही करू नकोस. कोणत्याही विवाहविधीचे मी कधी ढोंग केले नाही कारण तुझ्याशी माझा तसा करार कधीच नव्हता. माझ्या नियतीने माझ्या स्वतःच्या आवडीप्रमाणे माझे जीवन मला जगू दिले असते. आणि माझ्या समस्या माझ्या स्वतःच्या पसंतीप्रमाणे सोडवू दिल्या असत्या तर प्रायमचा उंच बालेकिल्ला अजून उभा असलेली ट्रॉय नगरीच, माझ्या जनांच्या प्रिय आठवणीसहित मी माझे आद्य कर्तृत्वस्थान केली असती, तिच्या पराभवानंतर मी अधिकच बलवान अशा ट्रायनगरीची आणखी एकदा पुनर्स्थापना केली असती परंतु साक्षात अॅपोलोने ग्रायनिअम येथून, जिथे लिसियामधे तो आपली भविष्यवचने चिठ्या टाकून देतो तिथे मला इटलीच्या उदात्त भूमीचा मार्ग आक्रमिण्याची आग्रहपूर्वक आज्ञा केली आहे. इटलीच आता माझे प्रीतीस्थान आणि स्वगृह व्हायला हवे. तू एक फिनीशिअन, जर तुझ्या कार्थिजच्या गढीशी एकनिष्ठ आहेस, दूर आफ्रिकेतील या नगरीशिवाय दुसऱ्या कोणत्याही नगरीकडे पाहून तुला संतोष होत नाही तर ट्रोजनांनी इटलीत वस्ती करण्यास काय प्रत्यवाय आहे? तुझ्याप्रमाणेच आम्हींही अज्ञातभूमीत राज्य स्थापू घातले तर ते काही पाप नाही. प्रत्येक वेळी जेव्हा रात्र पृथ्वीवर आर्द्र छायांचे अवगुंठन घालते, प्रत्येक वेळी जेव्हा तेजस्वी तारका उगवतात तेव्हा तेव्हा माझे वडील अँकायसीझ यांचा व्यग्र आत्मा मला

निद्रेत बजावीत असतो आणि मी भयभीत होतो. माझा पुत्र अॅस्कॅनिअसही मला जाणीव करून देत असतो, मी त्याचा, माझ्या लाडक्याचा, आणि जिथे त्याच्या दैवाने त्याला स्वतःच्या मालकीची भूमि दिली आहे त्या इटलीच्या राज्यापासून त्याला वंचित करून त्याच्यावर मी जो अन्याय करीत आहे त्याचा मी विचार करतो. आणि आता तर प्रत्यक्ष जोव्हने देवांच्या प्रवक्त्याला पाठविले आहे—हे तुला मी माझ्या मुलाच्या प्राणाची व माझ्या वडिलांची शपथ घेऊन सांगतो आहे—तो आकाशातून वेगाने उडत आला आणि त्यानेच मला तो आदेश सांगितला. अगदी स्वच्छ प्रकाशात मी माझ्या स्वतःच्या डोळ्यांनी तो देवदूत नगरवेशीतून प्रवेश करताना पाहिला, आणि माझ्या स्वतःच्या कानाने त्याचा आवाज ऐकला. म्हणून या धिःकारयुक्त वचनांनी तू अस्वस्थ होऊ नकोस आणि मलाहि अस्वस्थ करू नकोस, मी पुढे इटलीला सफरीवर जात आहे ते माझ्या स्वतःच्या इच्छेने नव्हे."

हे निर्णयात्मक बोलणे चालू असता डायडो इनीआसपासून मुख फिरवून परंतु आपल्या खांद्यावरून, त्याच्या सर्व शरीरावरून भिरभिरणाऱ्या डोळ्यांनी निःशब्दपणे रोषाने पहात उभीच राहिली होती. मग तिच्या क्षोभाचा स्फोट झाला! "विद्रोह्या, कोणतीही देवता कधीच तुझी आई नव्हती. आणि तुझ्या वंशवृक्षाचा आद्यपुरुष डार्डनसही नव्हता. छे, छे ! खडबडीत, खडकाळ आणि कठीण कॉकेशस पर्वत तुझा बाप होता. आणि हिर्कीनिआच्या वाघांनी तुला पोसले. कारण माझ्या भावना लपविण्याची मला आता काय गरज आहे? जणू काही याच्याहून अधिक वाईट दुसरे काही घडू शकणार आहे म्हणून मी स्वतःला का आवर घालू? त्याचा एक निश्वास तरी माझ्या वाट्यास आला आहे काय ? की माझ्या रडण्याची दाद म्हणून त्याने एक दृष्टीक्षेप तरी टाकलाय? की एकदा तरी त्याच्या हृदयाला पाझर फुटलाय ? त्याच्यावर प्रेम करणाऱ्या माझ्यासाठी दयेचा एक अश्रू तरी त्याने ढाळलाय का ? हा परमावधीचा दुष्टपणा आहे. सर्वश्रेष्ठ जूनो किंवा सटर्नचा पुत्र, सर्वांचा पितासुद्धा जे आता घडत आहे त्याकडे न्यायाच्या निःपक्षपाती दृष्टीने पाहू शकणार नाही. या विशाल पृथ्वीवर आता निष्ठा सुरक्षित राहिली नाही. याचे, फुटलेल्या गलबतावरील या भिकाऱ्याचे मी स्वागत केले. आणि मूर्खासारखे माझ्या प्रासादात माझ्या समवेत राहण्याची त्याला अनुमती दिली. मी त्याच्या सहकाऱ्यांना मृत्यूपासून वाचविले आणि हरपलेले त्याचे आरमार त्याला परत मिळवून दिले. चंडिका माझ्यावर आता प्रभुत्व करीत आहेत, त्या माझा दाह करीत आहेत. मला वेड लावीत

आहेत, म्हणजे आता साक्षात् अँपोलोच्या लिसिअन देववाणीकडून आदेश मिळाला आहे म्हणे ! आणि शिवाय देवांच्या प्रवक्त्याला साक्षात जोव्हने तोच भयंकर आदेश देण्याकरिता आकाशातून पाठविले आहे असे दिसते. म्हणजे देव या असल्या बाबतीत लक्ष घालतात आणि त्या विषयीच्या चिंतेने स्वतःची-शांती ढळू देतात हे मी मानले पाहिजे. नाही, तुला आता मी अडवीत नाही. तुझ्या शब्दांवरही वाद घालीत नाही. जा, अनुकूल वाऱ्यावर प्रवास करीत इटलीचा शोध कर, तुझ्या राज्याच्या शोधात लाटांवर संचार कर. परंतु मला अजूनही वाटते की स्वर्गात सच्छीलतेची कैवारी अशी काही सत्ता असेल तर सागराच्या खडकांमध्ये असताना प्रायश्चित्ताचा प्याला तुला काठोकाठ प्राशन करावा लागेल, आणि त्या यातना तू सहन करीत असताना पुनः पुनः 'डायडो' म्हणून तुला आक्रोश करावा लागेल. दूर असले तरी मी तुझ्याजवळच राहीन, व काळाकुट्ट ज्वालांनी तुला ग्रासीत असेन. आणि जेव्हा मृत्यूच्या थंड शिरशिरीने माझा आत्मा शरीरापासून अलग होईल तेव्हा तू जाशील तेथे माझे पिशाच्च तुझ्या नजीक असेल. हे खल पुरुषा तुला तुझे प्रायश्चित मिळेलच, आणि मी ते ऐकेन. ते वृत्त खोल पाताळ लोकात मृत्यूच्या नगरीत माझ्यापर्यंत येईल." तिचे बोलणे संपले नव्हते परंतु या शब्दांबरोबर ती अचानक थांबली. तिला पुढे बोलवेना. तिच्या दुःखातिशयात ती आवेगाने दूर गेली आणि दृष्टोआड झाली, आणि इनीआसला चिंतातूर आणि दोलायमान अवस्थेत, तिच्याशी आणखी काही बोलण्याची उत्कंठा असताना त्याला सोडून गेली. डायडोला मूर्छा आली आणि ती खाली पडली, आणि तिच्या दासींनी तिला उचलून घेतले, तिच्या संगमरवरी शयनागारात नेले आणि तिच्या मंचकावर निजविले.

मध्यंतरी सत्यशील इनीआसला तिचे दुःख शांत करण्याची आणि दयार्द्र शब्दांनी तिच्या यातना दूर करण्याची उत्कंठा लागली होती. तथापी तो दैवी आदेशाला एकनिष्ठ राहिला आणि त्याच्या प्रीतीच्या सामर्थ्याने खोलवर हादरला असल्यामुळे अनेकवार निश्वास टाकीत तो त्याच्या गलबतांकडे परतला. ट्रोजन मोठ्या जोमाने खरोखरीच कामाला लागले. लवकरच ते किनाऱ्याच्या सर्व बाजूंनी त्यांची उंच गलबते सागरात लोटू लागले आणि नुकताच सर्जरस लावलेले गलबतांचे तळ पुनः पाण्यात तरंगू लागले. तेथून निघून जाण्याची त्या माणसांना इतकी उत्सुकता होती की अजून वर पाने असलेली ओबडधोबड वल्ही आणि अरण्यातून आणलेली न तासलेली मजबूत लाकडे त्यांनी तशीच गलबतांवर नेली. पुढच्या हिवाळ्याची तरतूद करण्याकरिता सातुचा एखादा मोठा ढीग लुटून

स्वतःकरिता वारुळात संचय करणाऱ्या लांब काळ्या रांगेने मैदानावरून जाणाऱ्या गवतावरील अरूंद वाटेवरून त्यांची लूट वाहून नेणाऱ्या मुंग्यांसारखे ते भासत होते. कांही मुंग्या धान्याच्या एखाद्या मोठ्या दाण्याला खांद्याचा रेटा देऊन पुढे ढकलीत असतात तर काही रांगेच्या पिछाडीतून वर येत असतात. आणि मागे रेंगाळणाऱ्या मुंग्यांना शासन करतात आणि सबंध मार्गावर कामाची एकच गडबड उसळलेली असते. या मुंग्यांप्रमाणेच नगरीतील प्रत्येक भागातून चाललेली त्या सर्वांची धावपळ दिसत होती. ही सगळी हालचाल पाहून डायडोच्या मनात कोणते विचार आले असतील, आणि तिच्या उंच प्रासादातून पाहत असताना किनाऱ्यावरील उत्साहपूर्ण धावपळ आणि समुद्रावरील गदारोळ लक्षात घेऊन तिने किती विषण्णतेने निश्वास सोडले असतील? अरे निर्दय प्रेमा! मानवी हृदयाला तू कोणत्या थरापर्यन्त वेषीत नेशील याला काही सीमा आहे का? कारण प्रेमानेच आता डायडोला पुनः अश्रुपुरात लोटले आणि अजून एखादा मार्ग शोधून काढायचा राहिला असल्यास आणि ती अकारणच मृत्यूच्या आधीन होणार असेल तर स्वाभिमानाला शेवटच्या याचनेत विकाराधीन करून पुनः एकदा शेवटची याचना करून काही साधेल काय याचा प्रयत्न करून पाहण्यास तिला प्रवृत्त केले.

ती म्हणाली, "ॲना, किनाऱ्यावर सर्वत्र चाललेली गडबड तू पाहतेसच. सर्व बाजूंनी ते तिथे जमले आहेत. आताच त्यांची शिडे वाऱ्याला पाचारण करीत आहेत, आणि खलाशी आनंदाने त्यांच्या गलबतांच्या नाळींना हार घालीत आहेत या भयंकर दुःखाची मला कदाचित पूर्व जाणीव व्हायला हवी होती. कदाचित, ॲना, ते साहण्याचे सामर्थ्यही मला प्राप्त होईल. परंतु तरीही तुझ्या दीनवाण्या बहिणीकरिता हे एकच काम कर. कारण तो विद्रोही तुझ्याशिवाय इतर कुणालाही खरोखरी मानीत नव्हता. तूच त्याचा पूर्ण विश्वास संपादन केला होतास आणि या कठोर माणसाला कसे चातुर्याने वळवावे हे केवळ तुलाच माहीत होते. म्हणून प्रिय ॲना, तू आता जा आणि लीनतेने विनवणी करून आपल्या गर्वोद्धत शत्रूला सांग. म्हणावे ज्यांनी ऑलिस येथे ग्रीकांबरोबर ट्रोजनांचे हत्याकांड करण्याचा कट केला त्यात मी नव्हते—ट्रॉयच्या किल्ल्यावर मी आरमार पाठविले नव्हते. अँकायसीझची रक्षा आणि आत्मा चाळविण्याकरिता मी कधी त्याची समाधी उध्वस्त केली नाही. मग त्याचे निर्दय कान माझी विनंती ऐकून घेण्यास नकार का देतात? आणि अशा घाईगडबडीने तो कुठे जात आहे? त्याच्या अभागी प्रियेला शेवटची देणगी म्हणून तरी अनुकूल वाऱ्याची वाट पाहून निदान त्याचा स्वतःचा प्रवास तरी त्याने जास्त सुखकर करावा. त्याने भंग करण्यापूर्वी सन्मानित असलेले

आपले विवाहबंधन पुनर्जीवीत करावे अशी भीक मी आता त्याच्यापाशी मागत नाही, किंवा जिथे राज्य करण्याची त्याला आकांक्षा आहे त्या त्याच्या वैभवशाली लेशिअॅमचा त्याग करण्याविषयीही मी त्याला सांगत नाही. माझे दैव मला शरणागतीची आणि दुःख सहन करण्याची कला शिकवीपर्यंत माझ्या भ्रमिष्ट अवस्थेला उसासा घेण्याइतका आणि स्थिर होण्याइतका अवधी दे, तोवर काही करू नको, एवढेच माझे मागणे आहे. ही माझी कृपाप्रसादासाठी शेवटची याचना आहे; आणि माझी बहीण म्हणून मला तू सांभाळून घेतले पाहिजेस, आणि त्याने ही मागणी मान्य केल्यावर हे ऋण मी मृत्यूने सव्याज फेडीन."

डायडोची विनंती अशी होती आणि तिच्या गरीबबिचाऱ्या दुःखी बहिणीने त्यांचे साश्रु करुण निरोप परस्परांस पोहोचविले परंतु या सर्व विनवण्यांचा इनीआसवर किंचितही परिणाम झाला नाही. प्रत्येक याचनेप्रत त्याचे कान जणू बधीर झाले होते, कारण दैवगतीने त्यांचा मार्ग रोखला होता. आणि दैवी प्रभावाने सहृदयतेने ऐकून घेण्याला त्याच्या प्रवृत्तीला प्रतिबंध केला होता. तो एखाद्या वर्षामागूनवर्षे जास्तच मजबूत होत जाणाऱ्या ओक वृक्षाप्रमाणे अढळ उभा होता. त्या वृक्षाला जमिनीतून उखडून टाकण्याकरिता आल्पस्वरील उत्तरवारे अहमहमिकेने एकदा इकडून एकदा दुसरीकडून असे आघात वर्षानुवर्षे करीत रहातात. तो वृक्ष करकरतो, त्याचे खोड हादरते आणि पाने उंचावरून जमिनीवर गळतात तरीही तो वृक्ष मुळांतील खडकांमधे आपली पकड घट्ट ठेवतो कारण आकाशीच्या हवेत त्याचे शिर जितके उंच गेलेले असते तितकीच खोल, पृथ्वीच्या गर्भात, त्याची मुळे रुतलेली असतात. त्या वृक्षाप्रमाणेच त्या वीरपुरुषाला त्यांच्या आग्रही याचनांच्या आघातांनी एकदा इकडून तर एकदा दुसरीकडून झोडपून खिळखिळे करून टाकले होते. आणि त्याच्या धैर्यशाली हृदयाला अतीव दुःख झाले होते. परंतु त्याचा निश्चय अढळ राहिला. अश्रु ओघळत होते, परंतु हृदयावर परिणाम मात्र शून्यच होता.

हा शेवटचा निर्णय होता. डायडो हरली होती; भयभीत होऊन तिच्यापुढे दत्त म्हणून उभे राहिलेले तिचे दुर्धर भवितव्य तिने पाहिले. आता तिची एकमेव प्रार्थना केवळ मृत्यूकरिताच होती. आकाशाच्या घुमटाच्या दर्शनांचा तिला केवळ शीण होत होता. आणि जणू काही आपला संकल्प सिद्ध करण्याकरिता, सूर्यप्रकाशाचा कायमचा निरोप घेण्याकरिता, तिची इच्छाशक्ती कणखर करण्यासाठी गंधद्रव्ये जळत असलेल्या वेदीवर ती यज्ञकर्मविधी करीत असताना तिला एक भयानक दृश्य दिसले. पवित्र अभिषेकजल काळे पडले आणि काहीतरी अशुभ रुपांतराच्या

चमत्काराने अर्घ्यासाठी सोडलेल्या मद्याचे रक्त झाले. आपण काय पाहिले हे तिने कुणालाच सांगितले नाही. आपल्या बहिणीलाही सांगितले नाही. आणखी शिवाय तिच्या प्रासादात तिच्या पहिल्या पतीच्या नावाने बांधलेले एक संगमरवरी छोटे मंदिर होते; त्याच्याबद्दल तिला अत्यंत प्रेमयुक्त आदर वाटत असे. ती ते पांढऱ्याशुभ्र लोकरीने आणि उत्सवसूचक लतापल्लवांनी सुशोभित करीत असे. रात्रीच्या अंधाराने पृथ्वी ग्रासली असताना जणू तिचा पतीच तिला हाक घालीत आहे असा आवाज त्या मंदिरातून कानी आला असे तिला स्पष्ट जाणवले. अनेकवेळा एखाद्या घराच्या छपरावर एकटेच घुबड दीर्घ विव्हल सूर काढीत त्याचा मरणप्राय भयाण धुत्कार करीत असे. आणि वृद्ध द्रष्टयांच्या भविष्यवचनातील भयसूचनांनी धक्का बसून ती भयग्रस्त झाली. क्रुद्ध इनीआस तिचा पाठलाग करीत आहे आणि भयातिशयाने तिला वेड लावीत आहे, ती अगदी एकटी पडली आहे आणि निर्मनुष्य भूमीत सोबतीशिवाय टायरिअन मित्रांच्या शोधात लांबलचक वाटेवरून भटकत आहे—अशी भयानक दुःस्वप्ने तिला दिसत. चित्तभ्रमाच्या अवस्थेत पेन्थिअसला* चंडिका त्याच्यावर एकवटून चाल करून येत आहेत असे दिसले आणि आकाशात दोन सूर्य आणि दोन थीब्ज नगरे दिसली तशा अवस्थेत; किंवा अँगमेमनॉनचा संत्रस्त पुत्र, ऑरेस्टेस*, जळते पलिते आणि काळे सर्प हाती घेतलेल्या मातेपासून रंगमंचावरून पळून जाण्याचा प्रयत्न करीत असताना, सूडाकरिता आसुसलेली शापाची दैवते दारात त्याला गाठण्याकरिता उभी होती तेव्हा त्याची जशी अवस्था झाली होती तशा अवस्थेत डायडो होती.

यातना अशी प्रबळ झाली होती, आणि डायडोला दुष्ट शक्तींनी अंकित केले होते. मृत्यूचा निर्णय घेतल्यावर त्याच्या समयाची आणि साधनांची तिने एकट्या स्वतःशीच योजना केली. नंतर आपली योजना लपविण्याच्या उद्देशाने मुद्रेवर शांत आणि आशापूर्ण भाव धारण करून ती तिच्या शोकाकुल बहिणीला भेटली आणि तिला म्हणाली. "ॲना, अग तू माझे अभिनंदन कर! कारण मी एक असा मार्ग शोधला आहे की ज्यामुळे एक तर तो माझ्याकडे परत येईल किंवा त्याच्यावर प्रेम करण्यापासून मला परावृत्त केले जाईल. सागरकिनाऱ्याजवळ आणि सूर्य जिथे अस्तंगत होतो तिथे पृथ्वीच्या धारेवर जिथे महाकाय ॲटलस झळकणाऱ्या तारकांनी खचित अशा आकाशाचा कणा खांद्यावर पेलून फिरवीत उभा आहे, तिथे इथिओपिआची भूमी आहे. तिथे एक मॅसिलिअन योगिनी रहाते असे मला समजले आहे. ती हेस्पिरिडीजच्या मंदिराचे रक्षण करते, तीच मधुबिंदु आणि निद्रा प्रसृत करणाऱ्या पॉपीच्या बीजांचे सिंचन करून सपक्ष सर्पराक्षसाचे

पोषण करी आणि तीच त्या पवित्र वृक्षावरील फांद्यांवर लक्ष ठेवीत असे. ती ज्यांच्यावर कृपा करते त्यांच्या हृदयांना स्वतः मंत्र सामर्थ्याने मुक्ती प्राप्त करून देते. आणि इतरांवर मात्र निर्दय यातना पाखडते, असे ती प्रतिपादन करते. ती नदीचा प्रवाह रोखू शकते. आणि तारकांची गती उलटीकडे फिरवू शकते. ती रात्रीच्या समयी पिशाच्च्याना जागवू शकते. आणि हो! तू पाहशीलच, पायाखालील जमिनीला गर्जना करावयास लावते. व अॅशवृक्षांना त्यांच्या पर्वतांवरून खाली धावायला लावू शकते. प्रिय अॅना, मी तुला देवाची शपथ घेऊन सांगते, तुझी शपथ, तुझ्या प्रिय प्राणाशपथ सांगते की मी माझ्या इच्छेविरुद्ध मंत्र सामर्थ्याचा आश्रय घेत आहे. आता तू माझ्याकरिता एक मोठी चिता रच. ती तू आपल्या निवासस्थानाच्या मध्यभागी आकाशाखाली उघड्यावरच, परंतु नजरेआड अशी रच. त्या लबाड माणसाने आमच्या शयनमंदिरात एका भिंतीवर लटकत ठेवलेली त्याची शस्त्रे, शिवाय तो परिधान करीत असे ती वस्त्रे तिच्यावर शेजारी ठेव. आणि माझा सर्वनाश करणारा प्रणयमंचकही त्यावर ठेवला पाहिजेस. ज्याचे नाव कधीही उच्चारू नये त्याची मला आठवण करून देणारी प्रत्येक गोष्ट नष्ट करण्याचे मी ठरविले आहे. शिवाय त्या योगिनीनेही तसेच सांगितले आहे. " असे बोलून ती स्तब्ध झाली, आणि तिची मुद्रा एकदम निस्तेज झाली. तिची बहीण आपला स्वतःचा समीप आलेला संकल्पित मृत्यू छपविण्याकरिता हे विलक्षण विधिकर्म योजीत आहे हे अॅनाच्या कधीच मनात आले नाही. ती स्वतः अशा बेबंद बिकाराची कल्पनाच करू शकत नव्हती. आणि सायकिअसच्या मृत्यूने ओढविलेल्या आपत्तीहून आता अधिक दुर्दैवी असे काही घडेल असे भय तिला वाटत नव्हते. म्हणून डायडोने सांगितल्याप्रमाणे तिने सिद्धता केली.

लवकरच सदापर्णी ओक आणि देवदार लाकडाच्या ओंडक्यांची चिता रचण्यात आली. ती विस्तृत आणि बरीच उंच वर गेलेली, आणि प्रासादाच्या मध्यावर रचलेली होती. राज्ञीने तो महाल फुलांच्या माळांनी सुशोभित केला होता आणि चितेवर मृत्यूसूचक पर्णमाला घातल्या होत्या. तीवर तो मंचक होता, आणि पुढे काय घडणार आहे याची सतत जाणीव असल्यामुळे इनीआसचे राहिलेले खड्ग, त्याने पूर्वी परिधान केलेली वस्त्रे, आणि त्याचे चित्र तिने तिथे ठेवलो. चितेभोवती यज्ञवेदी होत्या. त्यावर केस उडत असणाऱ्या त्या योगिनीने मेघगर्जनेसारख्या आवाजात तिच्या तीनशे देवतांची नावे उच्चारली, इरिबॉस आणि व्हॉइड, आणि तीन रुपे असलेली असलेली हेकॅटी, जी तीन मुखे असलेली कुवार डायना आहे त्यांची नामे उच्चारली. अॅव्हर्नसच्या झऱ्याचे असे मानलेले उदक तिने शिपडले, चांदण्यात ब्रॉझच्या

विळ्याने कापून आणलेल्या आणि काळ्या विषारी रसाने ठिबकणाऱ्या वनस्पती तिथे जमविल्या होत्या, आणि त्यांच्या शेजारीच शिंगराच्या कपाळावरील प्रेममोहिनीचा तुरा त्याच्या आईने काढून घेण्यापूर्वीच खुडून आणलेला ठेवला होता. त्या उंच वेदीजवळच, उंचावलेल्या विशुद्ध हातात पवित्र नैवेद्य घेऊन, वस्त्रे पाठीमागे बांधलेली आणि एक पाऊल पादत्राणरहित असलेली डायडो उभी होती. आणि लवकरच मृत्यू पावणार असलेल्या तिने दैवगती जाणणाऱ्या देवतांची आणि तारकांची, तिची प्रार्थना श्रवण करण्याची विनवणी केली. ज्या प्रेमिकांची प्रीती प्रतिसाद न मिळाल्यामुळे असफल होते त्यांचा विचार करून चिंता वहाणारी जर कुणी न्यायी देवता असेल तर त्या देवतेकरिता तिने आणखी एक प्रार्थना म्हटली.

रात्रीची वेळ होती आणि अखिल सृष्टीवरील शिणलेले जीव दयावन निद्रेचे सुख घेत होते. आणि नक्षत्रपुंज आपली मध्यरात्रीची प्रदक्षणा करीत असता अरण्ये आणि क्रुद्ध सागर विसावले होते. प्रत्येक शेत, शेतीची सर्व जनावरे आणि विविधरंगी पक्षी स्तब्ध होते, आणि काचेसारख्या नितळ जलसंचयांच्या पलीकडे शेकडो योजने आणि निर्जन प्रदेशातील निबिड अरण्यात जगणारे जीव, अजूनही जीवनाचे व्याप विसरलेल्या हृदयातील सर्व चिंता हलक्या करणाऱ्या शांत रात्रीच्या निद्रेत निश्चल होते, परंतु फिनिशिअन राज्ञीची स्थिती मात्र तशी नव्हती. तिची शापित चित्तवृत्ती निद्रेत विसावू शकत नव्हती आणि तिचे डोळे किंवा मस्तक अंधारात सुखावू शकत नव्हते. त्याऐवजी उलट तिच्या यातना द्विगुणित झाल्या. तिची प्रीति पुनः पुनः तिच्या मनात उभी रहात होती आणि संतापाच्या लाटावर लाटा सागरभरतीप्रमाणे उफाळून येत होत्या आणि तिने पुनः एकदा स्वतःच्या हृदयात स्वतःशीच संवाद करीत आपल्या विचाराचे सूत्र पुन्हा गुंफण्यास सुरवात केली. "आता पहा! करण्यासारखे असे मला काय उरले आहे? माझ्या पूर्वीच्या विवाहेच्छूंकडे परतून त्यांच्या भावनांचा अंदाज घेऊन, आणि मी जरी पुनः पुनः त्यांच्यापैकी एकाचाही पती म्हणून विचार करण्याच्या कल्पनेचाही धिःकार केला असला तरी एखाद्या न्युमिडिअनची माझ्याशी विवाह करण्याविषयी विनवणी करून मी कुचेष्टेचा धोका पत्करावा काय? का मी ट्रोजनांच्या आरमाराबरोबर जावे आणि कितीही कठोर असल्या तरी त्यांच्या आज्ञा पाळाव्यात? मी त्यांना केलेली मदत आणि त्यांचे संकट-निवारण याने ट्रोजन खूष झाले आहेत; त्यांना त्याची आठवण आहे आणि त्यांच्याकरिता मी जे केले त्याविषयीची कृतज्ञता त्यांच्याठायी अजून जागृत

आहे याबद्दल तरी माझी इतकी खात्री आहे काय? आणि खरेच माझी तशी इच्छा आहे असे मानले तरी ते मला आपल्याबरोबर येऊ देतील आणि त्यांच्या जहाजावर ते माझे स्वागत करतील काय ? ते उन्मत्त आहेत आणि ते माझा द्वेष करतात. वंचित मूर्खे तुला दिसत नाही? लॅओमिडॉनचे राष्ट्र किती विश्वास-घातकी असू शकते हे तुला अजूनही उमगत नाही काय ? शिवाय जर मी या आपल्या निघण्याच्या क्षणी विजयोन्मत्त झालेल्या खलाशांबरोबर गेले तर मी एकटेच जायचे की मी ट्रोजनांत सामील होताना माझ्याभोवती माझ्या सर्व टायरिअन मित्रांना जमवून घेऊन जायचे? तसे असेल तर पुनः एकदा त्याची शिडे वाऱ्यावर पसरून त्यांना समुद्रसंचार करण्यास मी कशी आज्ञा देऊ? त्यांच्या पूर्वीच्या नगरातून, सिडॉनमधून त्यांची जणू मुळे उखडून त्यांना बाहेर काढण्यालाच मला किती प्रयास पडले. पुनः हे होणे नाही ! तुझी पात्रता मृत्यूचीच आहे. आणि तुला मेलेच पाहिजे. केवळ खड्गच तुला यातनापासून वाचवू शकेल. ॲना ग, मी वेडेपणा केला खरा! परंतु हे यातनांचे ओझे तूच माझ्यावर प्रथम लादलेस, कारण तू माझ्या अश्रूंनी द्रवलीस आणि मला माझ्या शत्रूच्या पूर्ण स्वाधीन केलेस! वन्य पशूंप्रमाणे मला लोकप्रवादापासून मुक्त, विवाहविरहित आणि मला आता होत असलेल्या मनस्तापाच्या धोक्यापासून मुक्त जीवन जगता आले असते तर..... आणि सायकिअसच्या रक्षेच्या साक्षीने मी घेतलेल्या आणाशपथाही भग्न झाल्या ना ! डायडोच्या हृदयातून फुटलेले, आत्यंतिक दुःखाचे करुण बोल हे असे होते.

या वेळेपावेतो आपल्या समुद्र प्रवासाची योजना निश्चित करून त्याची पूर्ण सिद्धता केलेला इनीआस त्याच्या गलबताच्या नाळेवर निद्रिस्त झाला होता. निद्रेत त्याला पुनः दैवी साक्षात्कार झाला. तोच देव त्याला पुनः पहिल्यासारखा प्रत्यक्ष दिसला. त्याची मुद्रा आणि चेहरामोहरा पूर्वीप्रमाणे मर्क्यूरीसारखाच होता. त्याचा आवाज आणि अंगकांती, त्याचे सोनेरी केस, आणि यौवनसहज लालित्यपूर्ण अवयव तसेच होते. इनीआस टक लावून पहात असता मर्क्यूरीने त्याच्या सूचनेचा पुनरुच्चार केला. "व्हीनसपुत्रा, एवढा प्रचंड उत्पात समीप आला असता तू झोपू शकतोस? जी संकटे तुझ्याभोवती कोसळण्याकरिता तिष्ठत आहेत त्याची तुला जाणीव होत नाही काय? मूर्खा ! अनुकूल पश्चिम वाऱ्यांचे निश्वास तुला ऐकू येत नाहीत काय ? एका भयानक आणि विश्वासघातकी दुष्ट कृत्याचा ती संकल्प करीत आहे. तिच्या मनात हिंसक क्रोधाच्या उर्मीवर उर्मी उसळत आहेत. आणि तिने आत्महत्या करण्याचा निर्णय घेतला आहे. गडबडीने निघून जाण्याची जोवर

वेळ गेली नाही तोवरच तू गडबडीनें दूर जाणार नाहीस काय ? तू जर पहाटेपर्यंत इथेच घोटाळलास तर सागरावर तुला लवकरच उध्वस्त जहाजांचा गदारोळ, ज्वालेने भडकलेल्या पलित्यांचा रखरखीत प्रकाश आणि सर्व समुद्रकिनारा पेटलेला दिसेल. चल, ऊठ, ही दिरंगाई पुरी झाली. स्त्रिया या नेहमीच विविध बदलत्या लहरीवृत्तीच्या असतात." असे म्हणून नंतर तो काळ्या अंधारात विरून गेला.

अचानक झालेल्या या दृष्टांताने इनीआसला धक्काच बसला. तो ताडकन उठला, आणि आपल्या सोबत्यांना धोक्याची सूचना देऊन त्याने सावध केले. "उठा त्वरा करा ! जागे व्हा ! मित्रानो, वल्ही मारण्याकरिता आपआपल्या जागांवर जा. चपळाई करा. शिडे उलगडा ! कारण लक्षात घ्या. देव पुनः उच्च स्वर्गातून अवतीर्ण झाला आणि त्याने पुनः त्वरा करण्याविषयी आपल्याला अरणी लावली आहे – आपले पिळवटलेले दोर तोडले पाहिजेत आणि पलायन केले पाहिजे. हे पवित्र देवते, तू कुणीही असलीस तरी आम्ही तुझ्या शब्दांप्रमाणे वागणार आहोत, आणि पूर्वीप्रमाणेच आनंदाने तुझ्या आज्ञा मानतो. तू आमची सोबत कर आणि कृपाळूपणे आम्हाला सहाय्य कर. आकाशीच्या तारकांपासून कृपाप्रसाद तू आमच्याकरिता आण." या शब्दांबरोबरच त्याने आपले खड्ग म्यानातून चटकन् उपसले आणि त्याच्या तळपत्या पात्याने गलबताचे दोरखंड कापले. एकाच उत्साहाने सर्वांना भारावून सोडले. त्यांनी अवजारांवर ताकद लावली आणि त्वरा केली. कोणीही किनाऱ्यावर राहिला नाही, सागराचे पाणी गलबतांखाली झाकून गेले. ते समुद्राच्या पाण्यावर झेपावले, वल्हयांनी समुद्रफेन घुसळला आणि सागराचा निळा पृष्ठभाग झपाटण्यास सुरवात केली.

आतापावेतो उगवत्या उषेने टिथोनसचा केशरी बिछाना सोडला होता आणि आता ती भूलोकावर तिच्या उल्हसित प्रकाशाचा शिडकावा करीत होती. तिच्या निरीक्षणाच्या मनोऱ्यावरून राज्ञीने उषेचा धवल प्रकाश पाहिला, आणि वारा पुरेपूर भरून पसरलेल्या शिडांनी पुढे झेपावणारे आरमार पाहिले. किनारा आणि बंदर सुने आहे हे तिच्या लक्षात आले, त्यावर एकही खलाशी नव्हता. हे दृश्य पाहताच तिने आपल्या सुंदर वक्षावर तीन प्रहार केले आणि एक चौथाही प्रहार केला; तिने आपले सोनेरी केस उपटले आणि तिने मोठ्याने आक्रोश केला : "हे ज्युपिटर ! हा अनाहुत माझ्या राज्याचा उपमर्द करून थंडपणे निघून जावा काय ? शस्त्रे आणा ! कार्थेजमधील प्रत्येक माणसाने बाहेर पडावे ! पाठलाग

करा ! तुम्ही गोदी धक्क्यावर जा आणि तुम्ही तुमची गलबते हाकारा ! त्वरा करा ! पेटते पलिते आणा, शस्त्रे वाटा, वल्ह्यावर तुमची ताकद लावा ! अरेरे, मी हे काय बोलत आहे ? मी कुठे आहे ? गरीब बिचाऱ्या डायडो ! कुठला वेडा अविचार तुझे मन विकृत करीत आहे ? त्याची दुष्ट कृत्ये तुझ्या आताच लक्षात येत आहेत काय ? तुझे सार्वभौमत्व त्याला अर्पण करण्यापूर्वीच तू का त्याचा विचार केला नाहीस ? त्याने दिलेल्या वचनावरील त्याची निष्ठा तर पहा ! तरीही लोक म्हणतात की तो त्याच्या पूर्वजांची कुलदैवते बरोबर घेऊन जात आहे आणि आपल्या वृद्ध आणि दुर्बल पित्याला वाहून नेण्याकरिता त्याने आपले खांदे वाकविले होते. मी त्याला पकडून त्याचा अवयव न् अवयव तोडून काढून ते तुकडे लाटांवर फेकून देऊ शकत नव्हते का ? त्याच्या सोबत्यांना खड्गाने कंठस्नान घालू शकत नव्हते काय ? होय, आणि ॲस्कॅनिअसची हत्या करुन त्याचे मांस त्याच्या बापाला खाऊ घालू शकले नसते का ? हो, परंतु अशा संघर्षाचा शेवट कधीच निश्चित नव्हता. तो तेव्हा अनिश्चितच होता. पण कुठल्याही परिस्थितीत जर मरायचेच होते तर मला भय तरी कुणाचे होते ? त्यांच्या छावणीत पेटते पलिते नेऊन त्यांच्या गलबतांच्या तक्तपोशी मी पेटवून देऊ शकले असते. मी त्या पुत्राचे, पित्याचे, आणि त्याच्या वंशातील सर्वांच्या प्राणज्योती विझवून टाकू शकले असते, आणि शेवटी सर्वावर कळस म्हणून मी स्वतःही मृत्यूकडे झेपावले असते. स्वतःच्या निर्मल करणाऱ्या किरणांनी सर्व पृथ्वी आणि तिचे सर्व व्यवहार पाहणाऱ्या सूर्या ! माझ्या यातनांचे रहस्य माझ्याप्रमाणेच विदित असलेल्या आणि त्यांतील सत्य स्थिती सांगू शकणाऱ्या जूनो ! प्रत्येक नगरीच्या तिकाट्यावर उसळणाऱ्या, कंपायमान जयघोषाने पूजिली जाणाऱ्या, हेकॅटी ! सूडाच्या व शापाच्या कराल देवतांनो ! एलिसाची प्रतिक्षा करणाऱ्या मृत्यूदूतांनो ! सर्वजण माझे शब्द ऐका ! येथील पापकर्मावर तुमच्या दैवीइच्छेची शक्ती सोडा, तुम्ही ती सोडायलाच हवी. आणि माझी प्रार्थना ऐका. साक्षात ज्युपिटरच्या आज्ञेप्रमाणे हा दुष्टात्मा भूमीकडे संचार करून निश्चितपणे बंदराला लागणे हा निश्चित आणि पूर्वनियोजित शेवट आवश्यक असला तरीही. नंतर एका साहसी शत्रूच्या प्रतापाने युद्धात त्याला यातना भोगाव्या लागू देत. त्याच्या स्वतःच्या भूमीतून त्याची हकालपट्टी होऊ दे. त्याचे निरपराध मित्र मरताना पाहून मदतीच्या याचना करीत असताना त्याचा पुत्र आयुलस याच्या बाहुपाशांतून तो खेचला जाऊ दे, आणि नंतर अपमानास्पद शांततेला शरण गेल्यानंतर सुखाच्या काळात राज्य भोगण्याकरिता तो जीवंत राहू नये. आणि अकालीच मृत होऊन अंत्यकर्माविना परक्या किनाऱ्यावर त्याला पडू दे.

ही माझी शेवटची प्रार्थना आणि माझ्या प्राणांतसमयी वाहणाऱ्या रक्ताबरोबर बाहेर पडलेला तो शेवटचा आक्रोश आहे. तेव्हा यानंतर पुढे, माझ्या फिनिशिअनांनो, तुम्ही त्याच्या सर्व वंशजांचा, त्याच्या कुलातील प्रत्येकाचा पाठपुरावा करणाऱ्या द्वेषाच्या कृत्यांनी छळ करा. माझ्या आत्म्याला तुमची हीच श्रद्धांजली असावी. दोन्ही देशात कसलाही स्नेह आणि संबंध राहाणार नाही. ज्या ज्या वेळी सामर्थ्य प्राप्त होईल त्यावेळी शस्त्रांनी आणि जाळपोळीने ट्रॉयहून आलेल्या या रहिवाश्यांना त्रस्त करून सूड घेणारा कोणीतरी माझ्या निर्जीव अस्थीतून आज उद्या निर्माण होऊ दे. तुमचा किनारा त्यांच्या किनाऱ्याविरुद्ध खडा राहू दे. तुमच्या लाटा त्यांच्या लाटांशी टक्करू देत, तुमची शस्त्रे त्यांच्या शस्त्रांना भिडू देत. हे माझे शापवचन आहे. ते आणि त्यांचे पुत्रपौत्र यांमधे सतत संघर्ष राहू दे.

असा तिचा शाप होता. आणि आता ती आपल्या प्रत्येक योजनेचा विचार करू लागली, कारण तिला जितक्या त्वरित शक्य होईल तितक्या त्वरित, दिवसाच्या तिरस्कृत प्रकाशात तिचे जीवन खंडित करायचे होते. सायकिअसची आणि तिचीही दाई असलेल्या—प्राचीन मायभूमीत राहिलेल्या आणि आता वार्धक्याने वठून कोळसा झालेल्या बार्सशी ती नंतर बोलली. "दाई, बये, माझ्या बहिणीला, ॲनाला इथे माझ्याकडे यायला सांग. आणि तिला त्वरेने नदीजल स्वतःवर शिंपडून घ्यायला आणि येताना बरोबर बळी देण्याचे पशु आणि मला करावयास सांगितलेल्या प्रायश्चित्त कर्मास लागणारे इतर साहित्य आणावयास सांग. अशा तऱ्हेने सिद्ध होऊन तिला येऊ दे आणि तूही तुझ्या मस्तकावर पवित्र बंध धारण कर. त्या ट्रोजनांचे जीवन सामावलेली ही चिता अग्नीला अर्पण करुन माझ्या दुःखाचा अंत करण्याचा आणि मी विधीपूर्वक सिद्ध केलेले आणि आरंभिलेले स्टायजिअन ज्युपिटरचे विशिष्ट धर्मकर्म पूर्ण करण्याचा माझा मानस आहे, असे ती म्हणाली. वृद्ध स्त्रीला स्वाभाविक अशा अतीव कळकळीने बार्सने भराभर पावले उचलली.

परंतु अधीरतेने थरथरणारी आणि आपल्या साहसी योजनेच्या विचाराने भांबावलेली डायडो दारातून अंतर्महालात धावतच गेली. तिचे डोळे लाल झाले होते आणि भिरभिरत होते. तिचे गाल लाल होऊन थरथरत होते आणि समीप आलेल्या मृत्यूच्या छायेने ती निस्तेज पडली होती. पिसाटासारखी धावत पळत ती त्या उंच चितेवर चढली आणि तिचा असा उपयोग केला जाईल अशी कल्पना नसलेली ती भेट–ते ट्रोजन खड्ग तिने म्यानातून उपसले. तिची दृष्टी

ट्रॉयहून आलेल्या त्या वस्त्रांवर आणि अनेक आठवणींशी निगडीत असलेल्या मंचकावर स्थिरावली. ती क्षणभर अश्रूंनी भावविकल होऊन व काही विचार मनात येऊन थांबली आणि तिने त्या मंचकावर अंग टाकले आणि तिथे शेवटचे शब्द उच्चारले. "मधुर स्मृत्यवशेषांनो, देवाच्या आणि दैवाच्या मनात होते तोवर मधुर राहिलेल्या स्मृत्यवशेषांनो, आता माझ्या पंचप्राणांचा स्वीकार करा आणि मला माझ्या यातनातून मुक्त करा. मी माझे जीवन जगले आहे आणि दैवाने माझ्यासाठी नियुक्त केलेले कार्य पूर्ण केले आहे. आता माझा आत्मा राजप्रतिष्ठेने पाताललोकात निर्गमन करील. मीं एका भव्य नगरीची स्थापना केली आहे. माझ्या नगरतटांचे बांधकाम माझ्या आयुष्यात पूर्ण झालेले मी पाहिले. मी माझ्या पतीच्या वधाचा सूड घेतला आहे आणि आमचा वैरी असलेल्या माझ्या भावाला शासन केले आहे. ही डार्डन जहाजे माझ्या किनाऱ्याला जर कधीच लागलीं नसती तर मी सुखी, सर्वार्थाने सुखी झाले असते" असे आक्रंदून तिने आपले मुख शय्येत खुपसले आणि ती पुढे म्हणाली. "मी मरणार आहे, बदला न घेता मरणार आहे. परंतु मी मरणार आहेच. होय, होय, असेच अज्ञातात विलीन होणे मला रुचेल. आणि दूर सागरावरील त्या निर्दय ट्रोजनाला माझ्या चितेच्या ज्वाला मनसोक्त पाहु दे. व माझ्या मृत्यूचा अशुभ शकुन त्याला बरोबर घेऊन जाऊ दे"

तिचे बोलणे संपले. आणि बोलत असतानाच तिने स्वतःला त्या खड्गाच्या पात्यावर झोकून दिले. त्या खड्गाच्या भोवती तिचे रक्त उसळत असताना आणि तिच्या हातावर रक्ताचे डाग पडलेले असताना तिच्या सेवकांनी तिला लगेचच पाहिले. त्यांचा आक्रोश प्रासादाच्या छतापर्यंत गेला. या धक्क्याने कार्थेज विद्ध झाले आणि वदंतेने नगरीत गोंधळ घातला. घराघरातून हुंदके व स्त्रियांचे आक्रोश घुमू लागले. आणि त्या उच्च आक्रंदनाच्या प्रतिध्वनीने वर आकाश दुमदुमले, जणू काही कुणी शत्रू फळी फोडून आत घुसला आहे. आणि सर्व कार्थेज किंवा प्राचीन टायर पादाक्रांत झाले आहे व माणसांच्या आणि देवांच्या वसती-स्थानावरून ज्वाला पिसाटासारख्या थयथयाट करीत आहेत असा भास होत होता. तिच्या बहिणीने ते वृत्त ऐकले आणि तिचा जीव गुदमरून गेला. बोटांच्या नखांनी आपले गाल ओरबाडीत आणि आवळलेल्या मुठींनी आपल्या वक्षावर ताडन करीत ती माणसांच्या गर्दीतून भयभीत होऊन गडबडीने धावत सुटली. मृत्यूच्या उंबरठ्यावरील डायडो तिला आढळली आणि ती तिला आक्रंदून म्हणाली. "डायडो, सत्य हे होते तर? मला फसविण्याकरिता तू हा डाव रचलास! ही तुझी चिता

तुझ्या वेदी आणि चेतविलेला अग्नी या साऱ्यांचा मतितार्थ माझ्या डोळ्यापुढे असा यायचा होता तर ! मला सोडून जाते आहेस म्हणून तुझी निंदा करण्यास मी कसा आरंभ करू ? तू तुझ्या स्वतःच्या बहिणीचा तिरस्कार करीत होतीस ? आणि म्हणून तुझी वाटेकरी व्हायला ती नको होती तुला ? तुझ्या दैवभोगात वाटेकरी होण्याकरिता तू मला बोलवायला हवे होतेस आणि मग एकाच क्षणी, खड्गाचा एकच वेदनामय घाव आपणा दोघींनाही घेऊन गेला असता. आणि मी माझ्या स्वतःच्या हातांनी की ग ही चिता रचली ! आणि आपल्या पूर्वजांच्या कुलदैवतांचा उच्च स्वराने धावा केला ते तुझ्या मृत्यूने तुझ्यापासून निष्ठुरपणे ताटातूट होण्याकरिता का ? डायडो, तू तुझ्याबरोबरच माझेही जीवन नष्ट केले आहेस. आणि आपल्या नगरजनांचे, सिडॉनच्या उच्चकुलीन अमीर उमरावांचे आणि तुझ्या संपूर्ण नगरीचेही, थांब, मला तुझ्या जखमा पाहू दे. मला त्या स्वच्छ पाण्याने धुतल्या पाहिजेत, आणि तुझे शेवटचे घोटाळणारे निश्वास माझ्या ओठांनी संचित केले पाहिजेत." असे बोलत असतानाच ती त्या उंच चितेच्या टोकावर चढली आणि तिने किंचित् स्पंदन असलेल्या आपल्या बहिणीला हृदयाशी कवटाळले आणि हुंदके देत तिला हळुवारपणे कुरवाळीत, आपल्या वस्त्रांनी तिचे वाहणारे काळसर रक्त थांबविण्याचा प्रयत्न करू लागली. डायडोने आपले जड झालेले डोळे उघडण्याचा पुनः प्रयत्न केला परंतु ती ते करू शकली नाही; आणि जिथे ते खड्ग रुतले होते तिथे झालेल्या तिच्या हृदयातील खोल जखमेतून मोठ्याने घरघर असा निश्वास बाहेर पडला. कोपराचा आधार घेऊन उठण्याचा तिने तीन वेळा प्रयत्न केला परंतु प्रत्येक वेळी ती मंचकावर कोसळली. भिरभिरत्या डोळ्यांनी तिने प्रकाशाचा शोध घेत उंच आकाशाकडे पाहिले. तिला तो गवसला. आणि तिने एक निश्वास सोडला.

परंतु सर्वशक्तिमान जूनोला तिच्या कष्टप्रद मृत्यूतील दीर्घ यातनांची दया आली आणि तिने तिच्या पिळवटलेल्या गात्रांतून सुटून जाण्याकरिता झगडणाऱ्या आत्म्याची सोडवणूक करण्याकरिता ऑलिंपसवरून आयरिसला* भूलोकावर पाठविले. तिचा हा मृत्यू नियतीने किंवा तिच्या कृत्याचे शासन म्हणून तिला प्राप्त झाला नव्हता. तर हा अकाली शोकान्त अचानक उद्भवलेल्या विकाराच्या अविचारी उद्रेकात घडून आल्यामुळे प्रॉझरपाईनने तिचे प्राण स्टायजिअन ऑरकसच्या स्वाधीन करण्याकरिता अजूनही तिच्या मस्तकावरील सोनेरी केसांची बट घेतली नव्हती. म्हणून दव-बिंदूप्रमाणे चमकणारी, केशरी पंख असलेली इरिस, सूर्य किरणात उजळून निघताच चमकणाऱ्या सहस्र रंगछटांचा झोत मागे टाकीत

आकाशातून भूतलावर अवतीर्ण झाली. ती डायडोच्या मस्तकावर भ्रमण करीत म्हणाली : "देवाज्ञेने मी हे कुंतल प्ल्युटोला अर्पण करण्याकरिता घेत आहे. आणि पूर्वी तुझे असलेल्या शरीरातून तुला मुक्त करीत आहे." असे म्हणून तिने एक हात पुढे केला आणि कुंतलाची एक बट कापली. त्याबरोबर सर्व ऊब एकदम निमाली आणि प्राण चंचल वायूत विलीन झाले.

## सर्ग पाचवा

# श्राद्ध विधी प्रीत्यर्थ क्रीडा समारोह

इनीआस आणि त्याचे आरमार सागरावर आतापर्यंत बरेच दूरवर गेले होते. त्याने निश्चयपूर्वक मार्ग आखला आणि उत्तर वाऱ्याने घुसळून काळचा पडलेल्या लाटांमधून त्याने गलबते नेटाने चालविली. आणि गलबते हाकारीत असता त्याने मागे तटबंदीने वेढलेल्या आणि आता शोकमयी डायडोने चेतवलेल्या ज्वालांनी उजळलेल्या कार्थेजकडे पाहिले. तो भयावह अग्नी कसा भडकला हे गूढच होते. परंतु उपमर्द झालेल्या आत्यंतिक प्रीतीच्या यातना किती दाहक असतात, आणि वेडीपिशी अगतिक झालेली स्त्री किती पराकोटीला जाते हे ट्रोज-नांना ज्ञात होते, आणि त्या जाणीवेने भयसूचनांनी झाकळलेल्या विचारांची एक साखळी त्यांच्या मनात सुरु झाली.

त्यांची गलबते उफाळणाऱ्या सागरावर बरीच पुढे गेली होती, दृष्टीपथात कोणतीही भूमी नव्हती परंतु सर्व बाजूंनी पाणी आणि आकाशच होते. इतक्यात इनीआसच्या डोक्यावर अंधारी आणि वादळ आणणारे काळेकुट्ट झंझावाती ढग जमले. आणि अंधारात लाटा थरथरू लागल्या. नाळीवरील त्याच्या उंच जागेवरून त्याचा सुकाण्या पॉलिनरससुद्धा ओरडला, "हे घन ढग आकाशाला का ग्रासीत आहेत ? हे पिता, नेपच्यून, तुझी काय योजना आहे?" असे म्हणून त्याने शिडे आखडण्याची, सर्व अवजारे घट्ट बांधण्याची आणि वल्हयांवर जोरकस ताकद लाव-ण्याची आज्ञा दिली, आणि त्याने शिडे वाऱ्याच्या दिशेला तिरकस बसवली. नंतर तो इनीआसला म्हणाला : "हे धीरोदात्त इनीआस, साक्षात ज्युपिटरने जरी आश्वासन आणि ग्वाही दिली तरीही या असल्या आकाशाखाली इटलीला पोहोच-ण्याची मी आशा करणार नाही. वारा वळला आहे आणि तो आपल्या गलबतांच्या कण्यावर आदळत आहे; तो पश्चिमेकडील अंधारातून गर्जना करीत उठत आहे आणि काळे ढग एकत्र येऊन घनीभूत होत आहेत. या वाऱ्याच्या उलट ताण लावण्याची आपल्यात ताकद नाही आणि आपल्या कोणत्याही प्रयत्नांचा उपयोग

होणार नाही. दैवाने आपल्यावर आता मात केली आहे म्हणून आपण त्याला शरण जाऊन आपला मार्ग बदलून त्याची इच्छा असेल तिकडे गलबते हाकारू या. आपल्या मार्गावर मी केलेले नक्षत्रांचे निरीक्षण जर अचूक असेल आणि त्या अनुसार मी जर आपला परतीचा मार्ग अचूक आखीत असेन तर कोणत्याही परिस्थितीत तुझा बंधु एरिकस याची आपल्याशी मित्रत्व असलेली किनारपट्टी आणि सिसिलीचा निवारा फार दूर नाही असे मला वाटते! सत्यशील इनीआस उत्तरला : "आपण तसेच करावे अशी वाऱ्यांचीही इच्छा आहे, असे माझ्याही बराच वेळ लक्षात आले आहे. आणि तू वाऱ्याच्या विरुद्ध व्यर्थ प्रयास करतो आहेस हेही मला दिसत आहे. मार्ग बदलण्याकरिता तुझी शिडे फिरव, डार्डन ॲसेस्टिसचे माझ्याकरिता रक्षण करणाऱ्या, आणि माझा पिता अँकायसीझ यांच्या अस्थी उरी कवळणाऱ्या या भूमीपेक्षा निश्चितच दुसरी कोणतीही भूमी मला अधिक प्रिय नाही किंवा माझ्या थकलेल्या गलबतांना आसरा म्हणून मी पसंत करणार नाही." त्याचे उत्तर हे असे होते. त्यानी बंदराकडे गलबते वळविली आणि पाठीवरच्या पश्चिम वाऱ्यावर आपली शिडे ताणली. ते आरमार सागरावरून वेगाने चालू लागले आणि यथावकाश शेवटी मोठ्या आनंदाने परिचित किनाऱ्याकडे आतल्या बाजूला वळले.

दूर पर्वत शिखरावरुन ॲसेस्टिसने त्यांचे आगमन आश्चर्याने पाहिले आणि ती गलबते मित्रांची आहेत हे ओळखले. तो त्यांच्या भेटीकरिता सामोरा गेला. आफ्रिकन अस्वलाच्या कातड्यात आणि तो बाळगीत असलेल्या त्याच्या भाल्यांच्या जुडीमुळे तो रानटी दिसत होता, ॲसेस्टिस एका ट्रोजन मातेपोटी क्रिमिसस या तिचा पति असलेल्या नदीदेवापासून जन्मला होता. आपली कुळी तो विसरला नव्हता. आणि त्याचे ट्रोजन बांधव परत आले आहेत हे पाहून त्याला आनंद झाला होता हे स्पष्ट दिसत होते. त्याने आपल्या रानटी सामुग्रीने त्यांचे मोठ्या आनंदोत्साहाने स्वागत केले, आणि औदार्ययुक्त स्नेहाने त्याने त्याच्या शिणलेल्या मित्रांना दिलासा दिला.

दुसऱ्या दिवशीच्या प्रभेने, भल्या पहाटे, तारकांना उधळून लावले तेव्हा इनीआसने सर्व किनाऱ्याभर फैलावलेल्या आपल्या सोबत्यांना एकत्र बैठकीसाठी बोलाविले. जमिनीच्या एका उंच बांधावरून तो त्यांच्याशी बोलला. "देवांच्या उच्च कुलात जन्म घेतलेल्या डार्डनच्या धीरोदात्त पुत्रांनो, वर्षाची एक प्रदक्षणा पूर्ण होत आहे. आता संतपदाला पावलेल्या माझ्या पित्याच्या स्मृत्यवशिष्ट अस्थी धरणीच्या स्वाधीन करून आणि आपल्या शोकाप्रित्यर्थ पवित्र वेदी उभ्या

करुन पुरे बारा महिने उलटले आहेत. खरेच माझ्याकडून चूक होत नसेल, आणि परमेश्वराची तशीच इच्छा आहे म्हणून ज्याची गणना मी नेहमी अत्यंत दुःखदायक आणि अत्यंत पवित्र म्हणून करीन तो दिवस अगदी समीप आला आहे. आफ्रिकेतील सर्टिसजवळ एक निर्वासित म्हणून जरी मी तो दिवस घालवीत असतो किंवा अगरिव्ह समुद्रावर मी संचार करीत असताना जरी ती तिथो येऊन ठेपली असती किंवा जरी मिसिनी नगरात मी असताना ती आली असती तरीही मी या वर्षश्राद्धाच्या दिवशी हे वार्षिक श्राद्धविधी यथासांग पार पाडले असते. आणि वेदीवर यथोचित आहुती अर्पण केल्या असत्या. परंतु आजच्या परिस्थितीत आपण अधिक सुदैवी ठरलो आहोत, आपण इथे माझ्या पित्याच्या अस्थींच्या रक्षेजवळच साक्षात उभे आहोत. आपण येथे किनाऱ्याला लागण्याकरिता आलो आहोत आणि मित्रत्वाचे संबंध असलेल्या बंदरात आपण प्रवेश केला आहे· आणि मला तर यामध्ये देवांचा उद्देश आणि त्याची इच्छाच दिसते. चला तर. आपण हे आनंददायी कर्तव्यकर्म साजरे करू या. आपण वाऱ्याची प्रार्थना करू या. आणि जेव्हा एक दिवस मी माझ्या नगराची आणि त्याच्या मंदिरांची प्रस्थापना केलेली असेल, तेव्हा माझ्या पित्याला मी त्यांचे श्राद्धपूजन प्रत्येक वर्षी करतो याचा संतोष वाटेल. स्वतः ट्रोजन भूमीचा पुत्र असलेला ॲसेस्टिस तुम्हाला, तुमच्या प्रत्येक गलबताला दोन या प्रमाणाने पशु देत आहे. या मेजवानीस आपण आपल्या स्वतःच्या व घराण्यांच्या दैवतांस पाचारण करू आणि आपला यजमान ॲसेस्टिस याला पूज्य असलेल्या देवतांनाही पाचारण करू. नंतर नवव्या उषेने आपल्या प्रकाश किरणांनी भूलोकावरील अवगुंठन दूर करून मर्त्य जीवांना जीवनशक्ती प्रदान करणारा दिवस वर उंचविल्यावर माझ्या ट्रोजनांकरिता त्यांच्या जहाजांची एक स्पर्धा मी आयोजित करणार आहे. नंतर कुणी वेगाने धावणारा असेल तर त्याने पुढे यावे., किंवा भालाफेकीचे व हलक्या बाणांच्या फेकीचे ज्याला कौशल्य असेल किंवा ज्याला मुष्टीयुद्धातील न कमावलेले कातडे चढवून द्वंद्व युद्धात भाग घेण्याचा आत्मविश्वास आहे अशा व्यक्तीने पुढे यावे. सर्वांनी उपस्थित रहावे आणि आपण मिळविलेल्या बक्षीसांच्या प्रदानाची प्रतीक्षा करावी. प्रत्येकाने पावित्र्योचित शांतता राखावी. आणि सर्वांनी मस्तकावर पर्णमाला धारण कराव्या.

असे बोलून इनीआसने आपल्या मातेची प्रिय मर्टलपर्णे आपल्या मस्तकावर शोभिवंतपणे धारण केली. हेलिमस वयोवृद्ध ॲसेस्टिस, आणि तरुण ॲस्केनिअसनेही तसेच केले. आणि बाकीच्या सर्व ट्रोजन पुरुषांनीही त्याचे अनुकरण केले.

इनीआसने सभास्थान सोडले आणि तो समाधीकडे गेला. सहस्त्रावधी लोकांसहित तो चालू लागला. त्याच्याबरोबर गेलेला जनसमुदाय प्रचंड होता, आणि तो त्यांच्यामधून जात होता. अभिषेकविधीत त्याने निर्जल मदिरेचे दोन चषक, ताज्या दुधाचे दोन प्याले, आणि पवित्र रक्ताची दोन पात्रे भूमीवर ओतली. नंतर त्याने गर्द रंगाची फुले उधळली, आणि तो म्हणाला :

"बाबा, माझ्या पूज्य बाबा, तुम्हाला पुन: एकवार वंदन करतो. अस्थिनो पवित्र रक्षे, तुला वंदन असो, कारण एवढ्याकरिताच मी तुमचे रक्षण केले. माझ्या पित्याच्या आत्म्या, पिशाच्च्या, छायारुपा तुला वंदन असो. जिथे दैवाने आपल्याला भूमी दिली आहे त्या इटलीच्या सीमांचा किंवा अॅसोनिअन टायबरचा–जिथे ती नदी असेल तिथे–शोध घेत असताना तुम्ही मजबरोबर असावे हे माझ्या नशिबांत लिहिले नव्हते."

त्याने बोलणे नुकतेच संपविले होते; एवढ्यात त्या समाधीला प्रेमाने आलिंगणारी आणि वेदीवर सळसळणारी सात मोठी वेटोळी आणि सात उभवलेल्या कमानी सरसावीत, गुळगुळीत शरीर असलेला एक प्रचंड सर्प समाधीच्या तळातून सरपटत आला. त्याची पाठ निळ्या ठिपक्यांनी व आकृतीनी व त्याचे खवले सुवर्णाच्या तेजाने चमकत होते. सूर्यकिरणात उजळून निघालेले इंद्रधनुष्य जसे सहस्त्र रंगछटा मेघावर उधळते तसे ते सारे चमकत होते; आणि ते दृश्य पाहून इनीआस चकित झाला. त्या सर्पाचे सर्व लांबलचक शरीर त्या चषकांमधून आणि गुळगुळीत चकचकीत पात्रांमधून सरपटत गेले. शेवटी त्याने नैवेद्य चाखला. आणि तो काही उपद्रव न देता शांतपणे समाधीच्या तळाशी परत गेला. त्याने उच्च वेदीवरील समर्पित नैवेद्य भक्षण केले होते. आणि नंतर तो निघून गेला होता.

या घटनेने इनीआसचा उत्साह अधिकच प्रभावित झाला आणि पुत्रकर्तव्य म्हणून आरंभिलेले श्राद्धविधीकर्म त्याने पुन: सुरू केले. तो सर्प त्या स्थळाची संरक्षक देवता मानावी की त्याच्या पित्याचा खास आत्मा मानावा याबाबतीत त्याचा निश्चय होत नव्हता. त्याने दोन वर्षांच्या दोन मेंढ्या, तितक्याच डुकरांचा आणि दोन काळ्या बैलांचा विधीपूर्वक बळी दिला. त्याने चषकांतून मदिरेचे अर्घ्य दिले. या विधीचें ग्रहण करण्याकरिता अॅकेरॉनहून सुटका झालेल्या थोर अँकायसिसच्या आत्म्याला आणि त्याच्या छायादेहाला आवाहन केले. त्याच्या सोबत्यांनीही प्रत्येकाच्या ऐपतींप्रमाणे अर्पण करण्याकरिता मोठ्या अगत्याने समर्पणद्रव्ये आणली होती. ती त्यांनी वेदींवर रचून ठेवली आणि बैल बळी दिले.

काहींनी काहिली ओळीने मांडल्या. त्यांनी निखारे आणून त्यावर चिमटयांनी टोचलेले मास, गवतावर आराम करीत, भाजले.

तो प्रतिक्षित दिवस उगवला. प्रसन्न वातावरणात फिथॉनचे घोडे नवव्या उषेचे आगमन घडवीत होते. आजूबाजूच्या लोकांनी हे वृत्त ऐकले होते, त्यामुळे आणि ॲसेस्टिसच्या कीर्तीमुळे त्यांची उत्सुकता जागृत झाली होती आणि म्हणून त्यांच्या उल्हसित जमावाने किनारा गजबजविला. सर्वांना इनीआसला आणि त्याच्या माणसांना पहावयाचे होते, आणि त्यांच्यापैकी काही त्या स्पर्धांमधे भाग घेण्यास सिद्ध होते. प्रथम क्रीडाक्षेत्राच्या मध्यावर बक्षिसाच्या वस्तू सर्वांना दिसतील अशा मांडून ठेवल्या होत्या. यज्ञयागात वापरावयाच्या तिवया, हरित पर्णमाला, विजयी वीरांना मिळणाऱ्या पामच्या फांद्या होत्या; शिवाय शस्त्रे, जांभळी रंगवलेली आणि सुवर्णांची व रुप्याची नाणी होती. नंतर क्रीडास्पर्धा सुरू झाल्याचा इषारा म्हणून एका टेकडीच्या माथ्यावरून तुतारी वाजविण्यात आली.

पहिल्या स्पर्धेकरिता अवजड वल्ही चढविलेली चार समान मगदुरीची गलबते सर्व आरमारातून निवडली होती. द्रुतगती प्रिस्टिसवर आणि त्यावरील बळकट खलाशावर नेस्थिअसचे आधिपत्य होते; हाच पुढे इटलीचा नेस्थिअस म्हणून प्रसिद्ध झाला. आणि त्याच्या नावापासूनच मेमिअस या वंशाचे नाव प्रथम उद्भूत झाले. प्रचंड आणि अजस्त्र 'किमीराचा' कप्तान गिआस होता; ते गलबत एखाद्या नगरीएवढे मोठे होते आणि एकावर एक तीन रांगात बसलेल्या डार्डन समर्थ पुरुषांकडून ते पुढे लोटले जात होते, त्याची वल्हीही एकावर एक तीन रांगात मारली जात होती. सेर्जी या घराण्याने ज्याच्यापासून आपले नामाभिधान उचलले तो सेर्जेस्टस बळकट 'सेन्टॉर'मधून समुद्रसंचार करीत होता; आणि तुझा, रोमन क्ल्यूएन्टीअसचा ज्याच्यापासून उगम झाला तो क्लोन्थस उज्ज्वल निळ्या 'सीला' मधून समुद्रसंचार करीत होता.

लाटांनी झोपडलेल्या किनाऱ्यापासून दूर समुद्रात काही अंतरावर एक खडक होता. हिवाळ्यातील वायव्य वारे जेव्हा चांदण्या लोपवून टाकतात, तेव्हा उसळत्या लाटांनी झोडपला जात असलेला तो खडक पाण्याखाली कधी कधी बुडत असे. पण शांत हवेत तिथे निःशब्दता असे. संथ सागराच्या पृष्टभागावर उंचावलेली सपाट जमीन त्या खडकावर होती. आणि समुद्रपक्ष्यांचे मुक्काम करण्याचे आणि ऊन खाण्याचे ते एक आवडते ठिकाण होते. याच खडकावर ट्रोजन प्रमुख इनीआसने सदापर्णी ओक वृक्षाचा एक खुंट, खलाशांना गलबते कुठे वळवायची आणि त्या

खडकाभोवती प्रदक्षिणाकार लांब वळसा कुठे घ्यायचा हे कळावे म्हणून खुणेसाठी रोवला होता नंतर कप्तानांनी स्पर्धेतील आपले स्थान कुठे असावे हे चिठ्ठ्या टाकून ठरविले. आता ते त्यांच्या गलबतांच्या कठड्यांवर उभे होते. आणि त्यांच्या जांभळ्या सोनेरी वस्त्रावरून परावर्तित झालेल्या प्रकाशाची झगमगती प्रभा दूरवर पसरली होती. खलाश्यानी पॉपलर वृक्षांच्या पर्णमाला मस्तकावर चढविल्या होत्या आणि आपल्या उघड्या खांद्यावर इतके तेल चोळले होते की ते चकाकत होते. त्यांनी गलबतावर आपल्या वल्हवण्याच्या जागा घेतल्या आणि पसरलेले बाहू वल्ह्यावर ठेवून व त्यावर नेट देऊन ते इशाऱ्याची वाट पहात थांबले, त्याच्या शिगेस पोहोचलेल्या उत्सुकतेच्या ताणामुळे आणि विजयाच्या तीव्र तृष्णे-मुळे त्यांच्या हृदयाचे ठोके जलद पडत होते. शेवटी तुतारीचा स्पष्ट आवाज घुमला. तत्क्षणी सर्वच सुरवातीच्या रेषेपासून एकदम पुढे झेपावले, हात मागे घेतांना खलाश्यांच्या आरोळ्या आकाशाला भिडल्या आणि घुसळून पाणी फेसाळले. एकवटून त्यांनी समुद्रावर खोल सऱ्या पाडल्या; वल्ह्यांनी खेचलेला आणि गलबताच्या त्रिधारांनी छेदलेला सागरपृष्ठ दुभंगला, दोन घोडे जुंपलेल्या रथाच्या शर्यतीत कधीही कोणताही रथ इतक्या पुढे झेपावणाऱ्या गतीने सुरवा-तीच्या पिंजऱ्यातून असा रोरावत बाहेर पडला नसेल आणि शर्यतीच्या क्षेत्रावरून असा पिसाट धावला नसेल! त्याचप्रमाणे कोणत्याही सारथ्याने बेफाम घोड्यांचे थरथरते कातडी लगाम इतके नाचवले नसतील किंवा चाबूक जोराने फटकारण्या-करिता तो इतका पुढे वाकला नसेल ! प्रेक्षकांच्या स्तुतीपूर्ण जयघोषणांनी आणि आपल्या आवडत्या स्पर्धकाला प्रोत्साहन देणाऱ्यांच्या आरोळ्यांनी तो अरण्य-परिसर गर्जून उठला. या आरोळ्या सभोवारच्या पर्वतराजीवर कोसळून प्रतिध्वनित होऊन परतल्या; जवळील सखोल प्रदेशात सभोवार फिरत, घुमत रहाणाऱ्या आरोळ्या उपसागराने आपल्यात सामावून घेतल्या. या गदारोळात आणि गोंधळात गिआस इतर सर्वांपुढे निसटला होता. आणि शांत जलात पुढे पुढे सरकत होता. नंतर क्लोॲन्थस त्याच्या पाठोपाठच होता. त्याचे वल्हे चांगले होते, परंतु वल्ह्यांची पाईनची लाकडे अवजड आणि मंदगती होती आणि त्याला मागे पाडीत होती. त्याच्या मागे सारखेच अंतर सोडून, प्रिस्टिस आणि सेन्टॉर पुढे जाण्याकरिता चुरशीची चढाओढ करीत होती. एकदा प्रिस्टिस पुढे जात होते तर दुसऱ्या क्षणी अजस्त्र सेन्टॉर त्याला मागे टाकून पुढे सरकत होते, पुनः दोन्ही बरोबरीने नाळीला नाळ लावून सागराच्या खाऱ्या पाण्यात आपल्या लांबलचक अंगाने सऱ्या पाडीत झेपावत होते.

ते त्या खडकाजवळ येऊन ठेपलेसुद्धा. आणि खुणेच्या वळण घेण्याच्या खांबाजवळ पोहोचतात तोच शर्यतीच्या मध्यबिंदूवर पुढे असलेला आणि त्या क्षणी तरी विजयी असलेला गिआस त्याचा सुकाण्या मेनोटिस याला ओरडून म्हणाला, " अरे तू मार्ग सोडून उजव्या बाजूला कुठे चालला आहेस? या दिशेने सरळ वळव. किनाऱ्याला चिकटून चल. बंदराच्या वाटेवर वल्हचांची पाती खडकांना घासून जाऊ देत. खुला समुद्र इतरांकरिता सोड" परंतु पाण्याखालच्या खडकांच्या भयाने मेनोटिसने आपले सुकाणू खुल्या समुद्राकडे फिरविले, पुनः आरोळी मारून मेनोटिसला परत फिरवण्याचा गिआसने प्रयत्न केला. "मेनोटिस, मार्ग पूर्णपणे सोडून तू कुठे चालला आहेस? त्या खडकाकडे गलबत वळव." नंतर त्याने मागे पाहिले आणि त्याला त्याच्या गलबताच्या पाठीवर भिडणारा आणि आपल्या किनाऱ्याच्या गलबताची बाजूची जागा पकडणारा क्लोन्थस दिसला. गायसच्या गलबताच्या आतल्या बाजूने गरजणाऱ्या खडकांना घासून बंदराकडे जाण्याचा धोक्याचा मार्ग क्लोन्थस अनुसरीत होता. तो अग्रस्थान घेतलेल्या गायसला मागे टाकून पुढे गेला, त्याने वळणावरचा खांब मागे टाकला आणि सुरक्षित पाण्यात मार्ग काढू लागला. त्या क्षणी गायसचा क्रोध जणू काही त्याच्या खोल हाडातून फुटावा तसा आवेशाने भडकून उफाळला. त्याच्या गालावर क्रोधाश्रू ओघळले. त्याच्या स्वतःच्या प्रतिष्ठेचा किंवा त्याच्या खलाशांच्या सुरक्षिततेचा विचार न करता त्याने फाजील सावधगिरी बाळगणाऱ्या मेनोटिसला उंच वरामावरून खाली समुद्रात एकदम ढकलले. नंतर तो सुकाणूकडे सरकला. तो स्वतः गलबत हाकारून त्यावर स्वतःचे पूर्ण नियंत्रण ठेवणार होता. म्हणून त्याने आपल्या खलाश्यांना प्रोत्साहन दिले. सुकाणू गरकन फिरविले आणि खडकांच्या अगदी जवळून मार्ग काढू लागला. तो पावेतो, वार्धक्याची छाया पडलेल्या आणि भिजून पाण्याने जड झालेल्या कपड्यांमुळे पोहण्याची गती मंद झालेल्या मेनोटिसने समुद्राच्या खोल पाण्यातून वर येण्यात शेवटी यश मिळवले. तो खडकावर चढला आणि कोरड्या जमिनीवर त्याने अंग टाकले. तो पाण्यात पडला तेव्हा आणि तो पोहत असतानाही ट्रोजन त्याला हसत होते आणि त्याने जेव्हा छातीतून खारे पाणी घुसमटत बाहेर टाकले तेव्हाही ते पुनः आणखी हसले.

गायसला हा अडथळा उत्पन्न झाल्यामुळे त्याला मागे टाकण्याची संधी मिळणार असे दिसल्यामुळे सर्जिस्टस आणि नेस्थिअस या शेवटच्या दोन स्पर्धकांच्या मनात पुनः आशा सहर्ष पालवली. सर्जिस्टसने नेस्थिअसच्या पुढे प्रथम खुल्या समुद्रात प्रवेश केला. आणि तो खडकाजवळ येऊन ठेपला, परंतु तो

थोडेच अंतर पुढे होता; गलबताच्या संपूर्ण लांबीने तो अजून पुढे गेला नव्हता, कारण चुरशीने त्याच्या बरोबरीने पुढे सरणारे प्रिस्टिस त्याच्या अगदी पाठीवर होते. त्याचवेळी नेस्थिअस त्याच्या गलबतावरील खलाशात मिसळून, इकडे तिकडे फिरत त्यांना प्रोत्साहन देत राहिला." वल्हयांना ताकद लावा ! आत ! बाहेर ! अरे एकेकाळी हेक्टरचे जोडीदार होता ना तुम्ही ? ट्रॉयच्या अखेरच्या दुर्दैवी घडीला मी माझी माणसे म्हणून निवडले तेच ना तुम्ही? पूर्वीच्या संकटात आफ्रिकन सर्टिसच्या आखातात, आयोनिअन समुद्रावर आणि मॅलिआच्या खुनशी लाटात तुम्ही दाखविलेले धैर्य आणि सामर्थ्य आम्हाला आता दाखवाना ! शर्यतीत पहिला क्रम मिळविण्याचा आता माझा हेतू नाही; मी नेस्थिअस पूर्ण विजयाकरिता धडपडत नाही. आणि तरीही मला इच्छा आहे परंतु हे नेपच्यून, तुझी मर्जी ज्यावर असेल ते कुणीही असले तरी त्याना जिंकू दे. परंतु सर्वात शेवटी येण्याच्या केवळ विचारानेच आम्हाला शरम वाटू दे ! गड्यांनो, हा एवढाच विजय संपादन करा आणि ती भयंकर मानखंडना मात्र टाळा" पराकाष्टेचा प्रयत्न करीत खलाश्यांनी वल्हयांवर ताकद लावली. त्याच्या सामर्थ्यशाली आघातांनी ते ब्रांझचे पत्रे बसविलेले गलबत थरथरत होते. समुद्र त्यांच्या खालून झरझर मागे सरकू लागला. जोराच्या धापांनी त्यांच्या शरीरांना आचके बसू लागले आणि त्यांची तोंडे कोरडी पडली. आणि सर्वांच्या अंगातून घामाचा पूर लोटला.

त्यांना ज्यांची उत्कट आकांक्षा होती तो मान त्या खलाशांना केवळ योगायोगाने प्राप्त करून दिला. कारण अति उत्साहाने बेभान झालेल्या सर्जिस्टसने आपली नाळ नेस्थिअसच्या गलबताच्या आतल्या बाजूने त्या खडकाच्या फार जवळ रेटली आणि समुद्राच्या अपुऱ्या पृष्ठभागावरून धडाडीने पुढे जात असता दुर्दैवाने पुढे आलेल्या एका कपारीवर आपटून तो गाळात रुतला. तो खडकाचा कडा त्या आघाताने हादरला. खडकाच्या धारेला लागलेली वल्हे काडकन् मोडली, गलबताचा वाळूत घुसलेला पुढचा भाग वर उचलला गेला होता. या जबरदस्त धक्क्याने खलाशी ताडकन वर उडाले आणि त्यांनी आरोळ्या ठोकल्या. नंतर त्यांनी लोखंडाच्या मायण्या बसवलेले खांब आणि टोकदार गळ गलबतावरून काढून मोडलेली वल्ही समुद्राच्या पाण्यातून वर काढली पण आपल्या परिस्थितीला अधिक अनुकूल करण्यासाठी नेस्थिअस खूपच आनंदून अधिकाधिक झटू लागला. जोराने तालात वल्ही मारीत आणि त्याच्या प्रार्थनेला प्रतिसाद म्हणून वाहू लागलेल्या पाठच्या वाऱ्यावर तो संथ पाण्यात शिरला, समुद्रातून किनाऱ्यावरील भूमीकडे वेगाने निघाला. मधाच्या पोळ्यासारख्या लाव्हा खडकात लपलेल्या आपल्या प्रिय

पिलांपासून व घरट्यापासून एखाद्या गुहेतून अचानक दचकून, भयभीत होऊन दूर कुणाकडे उडत जाणाऱ्या, पंखांचा फडफडाट करीत भीतीने घरटे सोडणाऱ्या परंतु लवकरच स्थिर वायुमंडलात विहरणाऱ्या, आपल्या पंखांची कोणतीही हालचाल न करता निरभ्र आकाशात मार्ग क्रमताना दिसणाऱ्या एखाद्या कपोती-सारखा तो भासला, मात्र त्या पाण्यावरुन सरकणाऱ्या गलबताला पुढे लोटीत असताना प्रिस्टिससह नेस्थिअसही शर्यतीतील शेवटच्या पल्ल्यातील पाणी कापू लागला. त्याने प्रथम पुढे आलेल्या खडकाशी झटापट करीत असलेल्या आणि नंतर उथळ पाण्यात धडपडणाऱ्या आणि मदतीकरिता व्यर्थ हाका मारीत असलेल्या मोडलेल्या वल्ह्यांनी गलबत कसे हाकारावे याच्या फिकिरीत पडलेल्या सेर्जिस्टसला मागे टाकले. नंतर तो सुकाणुधार तांडेल नाहीसा झाल्यामुळे मागे पडलेल्या गायसच्या आणि त्याच्या विस्तृत व प्रचंड किमिराच्या बरोबरीला आला.

आता शर्यतीच्या शेवटाजवळ गेलेला क्लोन्थसच केवळ राहिला होता. सर्व ताकद पणाला लावून नेस्थिअस त्याला रेटीत त्याच्या मागे वेगाने गेला. साहा-जिकच आता आरोळ्या दुप्पट जोराने उठल्या, उत्साहाचे उधाण आलेल्या सर्व प्रेक्षकांनी त्या पाठलाग करणाऱ्याला प्रोत्साहन दिले. आणि त्यांच्या मोकाट आरोळ्यांनी आकाश दुमदुमले. जणू काही आपण आताच जिकले आहे, यश आपलेच आहे अशी खात्री असलेल्या एका गलबतातील खलाशांना कदाचित् शेवटी आपल्याला विजयश्री मिळणारही नाही असे भयंकर भय वाटू लागले; आणि खरोखर आनंदाने प्राणाचेही मोल देऊन त्यांनी कीर्ती संपादन केली असती. यशाचे मधाचे बोट तोंडाला लागल्यामुळे दुसऱ्या गलबतातील खलाशांना जोर चढला होता आणि आत्मविश्वासाने त्यांना अधिकच शक्ती आली होती. खरोखर जर क्लोन्थसने दोन्ही हात सागराकडे पसरून देवाची उत्कट प्रार्थना करून त्याचे नवस स्वीकारण्याची याचना केली नसती तर नाळीला नाळ लावून, शर्यत जिकून दोन्ही गलबतांनी विजयश्री विभागून घेतली असती. 'सागरावर आधिपत्य अस-लेल्या देवांनो, ज्यांच्या समुद्र पृष्ठावर मी संचार करीत आहे त्या देवांनो, तुम्ही माझ्या प्रार्थनेने प्रसन्न झालात तर याच किनाऱ्यावरील वेदीवर एक तेजस्वी पांढरा बैल मी मोठ्या आनंदाने ठेवीन,' या क्षार समुद्राच्या लाटांवर त्याचा अंतर्भाग अर्पण करीन आणि शुद्ध मद्यार्घ्याचे पाट वाहवीन. त्याने अशी प्रार्थना केली, आणि खोल लाटांच्या तळाशी फॅकिसच्या नर्तकांच्या तापयानें, सर्व निरिअड्नी आणि कुमारी पॅनोपिआने ती ऐकली आणि वृद्ध पिता पार्ट्यूनसने स्वतः आपल्या विशाल बाहूंनी ते धावते गलबत पुढे लोटले. आणि म्हणून ते दक्षिण

वाऱ्याहून अधिक शीघ्रगतीने हवेतून भिरभिरत जाणाऱ्या बाणाहून अधिक गतीने किनाऱ्याकडे झेपावले आणि दृष्टीपथापलिकडे जाऊन प्रशस्त बंदरात प्रवेशले. नंतर प्रथेला अनुसरून अँकायसीझ-पुत्राने सर्वांना एकत्र बोलाविले. त्याच्या दूताने उच्चस्वरातील ललकारीने क्लोन्थसला विजेता म्हणून जाहीर केले. आणि इनीआसने त्यांच्या मस्तकाभोवती बे वृक्षाच्या हिरव्या पानांची माला माळली. नंतर त्याने खलाशांमधे वाटण्यासाठी त्यांच्या स्वतःच्या पसंतीची बक्षिसे दिली.

प्रत्येक गलबताला तीन बैल, मदिरा आणि रुप्याचे एक मोठे पदक भूषण म्हणून दिले. कप्तानांना खास पारितोषिके होती. विजेत्या कप्तानाला त्याने सोनेरी कलाबतूने भरतकाम केलेला आणि दुहेरी साखळीच्या नक्षीची किनार असलेला मिलीबिअन जांभळा झगा दिला त्यावर चपळ काळवीटांचा पाठलाग करणाऱ्या, आपले भाले फेकणाऱ्या आणि त्या आतुर पाठलागाने जणू धापा टाकीत असल्यासारख्या दिसणाऱ्या आणि त्याला पकडून आणण्याकरिता इडापर्वतावरून झेपावलेल्या ज्युपिटरच्या चिलखताचे रक्षण करणाऱ्या गरुडाने आपल्या वक्र नखात पकडून उंच नेलेल्या, पर्णाच्छादित इडापर्वताचा राजपुत्र गॅनिमीडीची चित्राकृती विणली होती; त्यावर आकाशाकडे अगतिकतेने हात उंचावलेले वृद्ध गुरु होते आणि त्या राजपुत्रामागे भुंकणारे आणि वाऱ्याशी चिडून भांडणारे रखवालीचे कुत्रेही चितारले होते. नंतर ज्याने स्वतःच्या हिमतीने दुसरे स्थान मिळविले होते त्याला इनीआसने सोन्याचे तीन पट्टे असलेले आणि सहजपणे एकमेकात गुंफलेले दुवे असलेल्या साखळ्यांचे पोटपाठ झाकणारे हे चिलखत, गतिमान प्रवाह असलेल्या सिमॉईस नदीच्या किनाऱ्यावर इलिअमच्या उंच नगरतटांजवळ, त्याने डेमॉलिऑसला पराजित केले तेव्हा त्याच्यापासून हिरावून घेतले होते आणि त्याने ते आता एका योद्ध्याला अभिमानाने परिधान करण्याकरिता व युद्धात त्याचे रक्षणकर्ते होण्याकरिता दिले. फिजिअस आणि सगॅरिस या त्याच्या दोन सेवकांनी महत् प्रयासाने ते अनेक पदरांचे चिलखत त्यांच्या अवघडलेल्या खांद्यावरून कसेबसे वाहून आणले होते. तथापी पूर्वी हेच चिलखत परिधान करून डेमॉलिऑस ट्रोजनवीर सैरावैरा पळत असता त्यांचा पाठलाग करीत धावत होता. तिसरे पारितोषिक म्हणून इनीआसने ब्राँझच्या दोन मोठ्या काहिली व उठावाचे नकशीकाम केलेली चांदीची दोन मोठी भांडी दिली.

त्या सर्वांना आपापली पारितोषिके मिळाली होती आणि मस्तकावर लालबंध परिधान केलेले, व त्यांना मिळालेल्या मूल्यवान पारितोषिकांनी आनंदित झालेले ते लोक आपल्या जागी जात होते, तेव्हा मोठ्या हिकमतीने स्वतःची त्या

कराल खडकांमधून नुकतीच सुटका करून घेतलेल्या सर्जिस्टसने काही वल्ही गमावून व एक संपूर्ण माळा निकामी झालेले आपले गलबत बंदरात आणले. त्यावेळी कुणीच जयघोष केला नाहीं परंतु केवळ थट्टा मात्र केली. ते गलबत, एखाद्या रस्त्याच्या कडेला पडलेल्या, ब्राँझच्या चाकाखाली चिरडलेल्या किंवा एखाद्या संतापी वाट-सरूने दगड मारून घायाळ केलेल्या आणि अर्धवट मेलेल्या, चेंदामेंदा करून टाकलेल्या, सुटका करून घेण्याची व्यर्थ धडपड करणाऱ्या एखाद्या सर्पासारखे भासले. तो सर्प आपल्या लांब शरीराला आचके देत तडफडत असतो, कारण त्याच्या शरीराच्या काही भागात अजून जीव असतो, दगडाने घायाळ झालेले त्याचे उरलेले शरीर मात्र असहाय्यतेने नुसते फरपटत रहाते. तो केवळ वेटोळ्यातच वळवळत असतो आणि सरपटत स्वतःकडेच उलटत असतो, त्याचे डोळे अजूनही क्रोधाने जळत असतात आणि फुत्कारणारी मान अद्यापही उंचावलेली असते. त्या गलबताच्या वल्हेकरांची ही अशी अवस्था होती आणि म्हणून गलबताची गती मंदावली होती. पण असे असूनही त्या गलबताने आपली शिडे पसरली होती: आणि सर्व शिडानिशी ते बंदराच्या मुखाकडे आले. सर्जिस्टसने आपले गलबत वाचविले व आपल्या खलाशांना सुखरूप घरी परत आणले म्हणून इनीआसने आनंदित होऊन त्याला आश्वासिलेले पारितोषिक दिले. त्याने त्याला फोली नावाची क्रिटन दासी दिली. मिनर्व्हाच्या कामगिरीत ती चतुर होती आणि आपल्या जुळ्या पुत्रांचे ती संगोपन करीत होती.

ही स्पर्धा संपवून सत्वशील इनीआस वक्राकार डोंगर उतरणीवरील झाडीने सर्व बाजूनी वेढलेल्या सपाट गवत जमीन असलेल्या अर्धचंद्राकार खुल्या जागेकडे खाली दरीत होणाऱ्या धावण्याच्या शर्यतीकरिता त्वरेने गेला. तो राजपुत्र सहस्त्रावधी लोकांसमवेत तिकडे चालत गेला. आणि त्या समुदायामध्ये उंच चबुतऱ्यावरील त्याच्या आसनावर विराजमान झाला. त्या उंच चबुतऱ्यावरून त्याने सर्व हिमतवान लोकांना धावण्याच्या शर्यतीत भाग घेण्याकरिता आवाहन केले व बक्षिसे जाहीर केली. मैदानाच्या प्रत्येक भागातून मोठ्या संख्येने ट्रोजन आणि त्यांच्याबरोबरच सिसिलीअनही पुढे आले. त्यामधे प्रथम आलेल्यांपैकीनायसस आणि युरिॲलस होते. युरिॲलस हा अगदी पोरवयाचा सतेज आणि असाधारण देखणा होता. आणि नायससची आपल्या मित्रावर निःस्वार्थी भक्ती होती. त्यांच्या नंतर डायोरेस पुढे आला. तो प्रायमच्या उच्च राजकुलामधे जन्मला होता. नंतर अँकॅरनॉनिआचा सॅलिअस आणि टेनिया वंशातील आर्केडिअन पॅट्रॉन पुढे आले. नंतर अरण्यवासी सिसिलिअन हेलिमस आणि पॅनोपीज हे वृद्ध अँसेस्टसचे दोन तरुण

मित्र पुढे आले. त्या शिवाय ज्यांची अप्रसिद्ध नावे आज स्मरणात नाहीत असे बरेच लोक पुढे आले. त्यांच्यामधे उभा राहून इनीआस त्यांना उद्देशून बोलू लागला. 'मी काय सांगतो ते लक्षपूर्वक ऐका, त्यामुळे तुम्हाला आनंद वाटेल आणि ओढही उत्पन्न होईल. तुम्हा सर्वांमधून कुणी एकही माझ्याकडून रिक्त हस्ताने परत जाणार नाही तुमच्यापैकी प्रत्येकास स्वतःचे म्हणून जपून ठेवायला मी पाणी दिलेल्या लोखंडाचे क्रिटमधील दोन बाण आणि चांदीचे कोरीव काम केलेली दुपाती कुऱ्हाड देईन. ही बक्षिसे सर्वांना सारखी वाटली जातील. या शिवाय पहिल्या तिघात येणाऱ्याच्या मस्तकावर ऑलिव्हची शुभ्रपर्णमाला गुंफली जाईल आणि त्यांना खास पारितोषिके दिली जातील जो सर्व प्रथम येईल त्याला विजेता म्हणून उत्कृष्ट आभरणांनी अलंकृत असा अश्व मिळेल. दुसरा क्रम मिळविणारास अमेझॉनांकडून जिंकलेला थ्रेशिअन बाणांनी भरलेला, सोन्याचा रुंद पट्टा असलेला व तो अडकविण्याकरिता असलेल्या लखलखीत रत्नाच्या चापासहित भाता मिळेल. आणि तिसरा विजेता आर्गाईव्हच्या या शिरस्त्राणाचा स्वामी होऊन आनंदाने जाईल."

त्याचे बोलणे संपल्यावर धावणाऱ्यांनी आपापल्या जागा घेतल्या. इशाऱ्याच्या आवाजाबरोबर सुरवातीची रेषा सोडून ते धावण्याच्या मार्गावरून वेगाने दौडू लागले. पुढे झेपावत असताना ते एखाद्या ढगासारखे दिसले. प्रत्येकाने आपले डोळे जिथे शर्यत संपणार होती त्या स्थानावर रोखले होते सुरवातीपासूनच नायससने वाऱ्यापेक्षाही अधिक गतीने विद्युत्‌घाताच्या पंखाहूनही अधिक गतीने सर्वांच्या पुढे दूरवर झेपावून आघाडीची जागा मिळविली. त्याच्यानंतर, परंतु बराच मागे, सॅलिअस त्याच्या पाठीवर होता. आणि त्याच्याही मागे मध्ये अंतर सोडून युरिॲलस तिसऱ्या क्रमांकावर धावत होता, युरिॲलस नंतर हेलीमस होता. आणि जवळच त्याच्या पाठीवर आपल्या पावलाने हेलिमसच्या टाचा घाशीत आणि आपले खांदे पुढे त्याच्याकडे वाकवीत डायोरस वेगाने धावत होता. जर त्याच्यापुढील धावपट्टीचा भाग अधिक लांब असता तर त्याच्यापुढे सरकून, तो हेलिमसला निश्चित वाटणारी विजयश्री त्याच्यापासून हिरावून त्याच्या पुढे गेला असता. आणि आता ते जवळ जवळ शर्यतीच्या शेवटाला आले होते आणि विजयस्तंभाच्या जवळ जवळ येत होते, आणि थकले भागलेले असे ते शेवट गाठणार होते तेवढ्यात— तेव्हा बळी दिलेल्या बैलांचे रक्त सांडून भिजलेल्या हिरव्या गवताने निसरड्या झालेल्या जमिनीवरून नायसस घसरला. इथे विजयाची खात्री वाटून हर्षनिर्भर झालेल्या त्या धावणाऱ्या युवकाने त्या फसव्या मातीत पाऊल

टाकले पण त्याला ते घट्ट रोवता आले नाही, तो डळमळला आणि धूळ, चिखल आणि पवित्र रक्ताच्या त्या गाऱ्यात तोंडघशी कोसळला.

परंतु या असल्या क्षणीही युरिॲलस आणि त्याची मैत्री यांना विसरणारा माणूस नायसस नव्हता. तो सॅलिअसच्या वाटेतच त्या निसरड्या भागातून उठून उभा राहिला. सॅलिअस कोलांटी उडी मारून कोसळला तो अर्धवट वाळून घट्ट झालेल्या वाळूवर पडला. युरिॲलस चटकन पुढे निघून गेला. त्याच्या मित्राच्या उपकारी कृतीमुळे तो आता आघाडीवर होता. आणि खरोखर विजयी ठरणार होता; कारण तो टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात आणि कौतुकाच्या आरोळ्यात शेवटाकडे झेपावला होता. त्याच्या पाठोपाठ हेलिमस येत होता आणि नंतर तिसऱ्या बक्षिसा-करिता डायोरस आला. त्याचवेळी सॅलिअसने आपला निषेध पुढच्या ओळीतील वृद्धांपुढे आणि त्या विशाल रंगायनात बसलेल्या सर्वांपुढे आपला बहुमान खोटे-पणाने हिरावून घेतला गेला आहे व तो आपल्याला परत मिळाला पाहिजे' असे ओरडून आग्रहाने प्रतिपादन करुन व्यक्त केला. परंतु आपल्या डोळ्यातील विनवणीच्या अश्रूंनी त्याने जागृत केलेल्या सहानुभूतीच्या आधाराने, व नुकतेच उमलत असलेल्या त्याच्या मर्दानी सामर्थ्याच्या आणि त्याहूनही त्याच्या मोहक देखणेपणाच्या आकर्षणाच्या आधाराने युरिॲलसचा हक्क सिद्ध झाला. स्वतःच्या वतीने जोराने विरुद्ध दावा करून डायोरसनेही त्याला सहाय्यच केले. कारण मात्र परिस्थितीत तो स्वतः बक्षिसास पात्र ठरला होता. परंतु जर पहिले मानाचे स्थान सॅलिअसला दिले गेले असते तर त्याचा विजेताक्रम गेला असता व विजेत्यांच्या यादीत त्याचे नाव शेवटी आले असते. म्हणून क्रीडास्पर्धाप्रमुख या नात्याने इनीआस त्यांना म्हणाला, "तरुण मित्रांनो, तुम्ही मिळविलेली पारितोषिके निर्विवाद तुमचीच रहातील. पारितोषिकांच्या यादीतील क्रम कुणीही बदलू शकणार नाही. परंतु काहीही चूक नसताना हे दुर्भाग्य वाट्याला आलेल्या माझ्या मित्राला माझी सहानुभूती दाखविण्याची मला अनुमती असावी. " असे बोलून त्याने सॅलिअसला एक विक्राळ आफ्रिकी सिंहाचे, केसाळ आयाळीने जड झालेले आणि सोन्याने मढविलेल्या नख्या असलेले चामडे दिले. यावेळी नायससने पृच्छा केली "जे खाली पडतात त्या धावणाऱ्यांविषयी तुला एवढी सहानुभुती वाटते आणि अयशस्वी स्पर्धकाला जर इतके चांगले बक्षिस मिळते तर माझ्या योग्यतेची यथार्थ जाणीव राखून तू मला काय देशील? कारण गुणवत्तेविषयी म्हणशील तर विजयमाला मीच मिळविली होती; केवळ सॅलिअससारख्याच दुर्दैवाच्या पंजात मीही अडकलो होतो." हे सांगत असतानाच त्याने चिखलाने मलीन झालेले

आपले मुख, पाय आणि बाहु त्यांना दाखविले. त्यांच्या भल्या व दयाळू प्रमुखाने स्मित केले आणि डायडिमॅऑनच्या कुशल कारागिरीने घडविलेली व पूर्वी ग्रीकानी नेप्च्यूनच्या पवित्र दारावरील चौकटीवरून काढून आणलेली ढाल आणावयास सांगितले. त्याने ते खास बक्षिस त्या उमद्या तरुण मल्लाला दिले.

शर्यती आता संपल्या होत्या. आणि पारितोषिक, प्रदानही पूर्ण झाले होते. नंतर इनीआस म्हणाला, "ज्याचे काळीज धीराचे आहे आणि ज्याच्या ठायी चपळ योजकता आहे अशा कोणीही पुढे यावे व चामड्याचे हातमोजे घालून मुष्टी-युद्ध करण्यास सिद्ध व्हावे." असे बोलत असतानाच त्याने मुष्टी युद्धाकरिता दोन बक्षिसे पुढे ठेवली. विजेत्याकरिता मस्तकबंधनानी शृंगारलेला आणि शिंगे सोन्याने मढविलेला बैल आणि पराजिताच्या सांत्वनाकरिता एक खड्ग आणि एक सुरेख शिरस्त्राण. वाट पहावीच लागली नाही. राक्षसासारख्या ताकदीच्या डॅरिजने चटकन वर पाहिले आणि सभोवती बरीच कुजबूज चालू असतां तो उठून खडा झाला. डॅरिजला आणि केवळ डॅरिजलाच मुष्टीयुद्धात पॅरिससमोर उभे ठाकण्याचे धैर्य होते आणि अद्वितीय हेक्टरच्या समाधीजवळच त्याने विजयी बेब्रिसिअन ॲमिक्सच्या कुलात जन्मल्याचा दावा सांगणाऱ्या विजयी राक्षसी ब्यूटेजची धूळधाण केली आणि त्या पिवळ्या वाळूत मरणोन्मुख असा त्याला आडवा केला. पहिल्या फेरीकरिता आपले गर्वोन्नत मस्तक उंचावून उभा राहिलेला डॅरिज असा होता. त्याने आपले विशाल स्कंध दाखविले आणि डावा आणि उजवा बाहू फिरवीत त्याने आपल्या मुठींनी जबरदस्त आघात केले. आता आवश्यकता होती केवळ प्रतिस्पर्ध्याची. परंतु त्या प्रचंड समुदायातील एकानेही मुष्टीयोध्याचे मोजे हातावर बांधून डॅरिजच्या तावडीत सापडण्याचे धाडस केले नाही. म्हणून या पारितोषिकाच्या स्पर्धेत उतरण्याचा कुणाचाच विचार नाही असे मानून डॅरिज इनीआसकडे डौलाने चालत गेला, त्या चबुतऱ्यापुढे उभा राहिला आणि अधिक वेळ न घालविता डाव्या हाताने त्या बैलाचे शिंग पकडून म्हणाला, "व्हीनसपुत्रा, कुणीही युद्धाचा धोका स्वीकारण्याचे साहस करीत नाही तर मग मला इथे किती वेळ तिष्ठत रहावे लागणार आहे? मला किती वेळ तिष्ठत ठेवणे सयुक्तिक आहे? तर मग हे बक्षिस घेऊन जाण्याविषयी तू मला अनुज्ञा दे." निश्चित केलेले पारितोषिक त्याला देण्याची मागणी सर्व डार्डनिडांनी मोठ्याने ओरडून केली. त्यावेळी गंभीर ॲसेस्टिस त्याच्या जवळच दाट हिरव्या गवताच्या बांधावर बसलेल्या एंटेलसला रोषाने म्हणाला, 'एंटेलस, एकेकाळी तू सर्वात अधिक शूर योद्धा होतास ते व्यर्थच काय? तू स्वस्थ बसून हे उमदे बक्षिस न

लढताच तुझ्या पकडीतून निसटू देणार आहेस काय? मग इरिक्सचे काय? तो आपला दैवी गुरु होता या आपल्या बढाईवर कुणी तरी विश्वास ठेवील काय? आणि सर्व सिसिलीत पसरलेल्या तुझ्या स्वतःच्या कीर्तीचे आणि तुझ्या घरात लटकविलेल्या बक्षिसांचे काय?" याला एंटेलसने तात्काळ उत्तर दिले. यशप्राप्ती-विषयीची माझी आसक्ती किंवा माझी प्रतिष्ठाही लोप पावलेली नाही. भयाने माझा स्वाभिमानही नष्ट केलेला नाही, माझी वाढती उमर हे खरे कारण आहे. वयोमानाने माझ्या हालचाली मंदावल्या आहेत. माझ्या रक्तात आता ती उष्ण सळसळ आणि जोम उरला नाही, आणि माझे शरीरसामर्थ्य सरून निस्तेज झाले आहे. एकदा माझेच असलेले तारुण्य, जे आता या तुझ्या निर्लज्ज बढाईखोराचेठायी अजून आहे, आणि ज्यावर तो इतक्या दिमाखात विसंबून आहे ते जर मला पुनः प्राप्त झाले असते तर पुढे येण्याकरिता या उमद्या बैलाच्या लाचेचीही गरज नव्हती—मला—नक्कीच नव्हती! मी बक्षिसांची पर्वा करीत नाही." या खुलाशाच्या शब्दांनी त्याने तात्काल मुष्टीयुद्धातील चामडी हातमोज्यांची एक भयंकर जड जोडी मैदानावर फेकली. ज्या वेळी एरिक्स मुष्टीयुद्धात उतरत असे त्यावेळी तो त्यांच्या कडक चामड्याने आपले हात आच्छादीत असे, कारण इरिक्स स्वतः ते नेहमी वापरीत असे. शिसे आणि लोखंड आत शिवून कडक केलेली ती सात बैलांची प्रचंड चामडी पाहून ते बैल किती विशालकाय असतील या विचाराने सर्व आश्चर्यचकित झाले. परंतु स्वतः डॅरिजवरच त्याचा सर्वात अधिक परिणाम झाला होता. भयभीत होऊन तो उभा राहिला आणि नंतर मागे अंग चोरून घेऊन त्याने युद्धाचे आव्हान नाकारले. अँकायसिसचा धीरोदात्त पुत्र त्या चामड्यांचे वजन त्यांची न संपणारी कातडीबंदांची वेटोळी सर्व बाजूंनी हाताळून अजमावीत होता. नंतर मोठ्या भावनावेगाने तो प्रौढ विजेता एन्टेलस इनीआसला म्हणाला. "अरे तू प्रत्यक्ष हर्क्यूलीजने वापरलेली चामडी पहात आहेस याचा विचार कर. आणि त्याने याच किनाऱ्यावर केलेले भयंकर युद्धही कल्पनेने आपल्यापुढे उभे कर. आणि अजूनही रक्ताचे आणि मेंदूच्या तुकड्याचे डाग पडलेली तू तुझ्यापुढे पाहत आहेस ती बैलांची चामडी तुझा भाऊ इरिक्स याने पूर्वी वापरली आहेत यांच्यासह एरिक्स शक्तिमान अॅलसायडीसपुढे उभा ठाकला आणि त्याने त्याला तोंड दिले. आणि आताहून अधिक दमदार असलेले माझे रक्त मला शक्ति देत होते तोवर, आणि वार्धक्याने मत्सराने माझ्या मस्तकाच्या दोन्ही बाजूंवर करड्या-रंगाचा शिडकावा करण्यापूर्वी माझ्या स्वतःच्या नित्य उपयोगात ही होती. ट्रॉयच्या डॅरिज, तू जर माझ्या या शस्त्रांशी सामना करू शकत नसशील आणि सत्यशील

इनीआसने माझ्या आधारदात्या ॲसेस्टिसच्या संमतीने जर तसे ठरविले तर आपल्या स्पर्धेच्या समतोल अशा अटीं आपण ठरवू या. इरिक्सने वापरलेल्या चामडीला तोंड देण्याची तुला गरज पडणार नाही. तुझे भय सोडून दे. आणि तू तुझ्या हातावरील ट्रोजन चामडी काढून टाक."

असे म्हणून त्याने आपल्या खांद्यावरचे दुहेरी उत्तरीय मागे भिरकावले, आणि आपल्या अवयवांचे मजबूत सांधे आणि जाड हाडे असलेले पाय आणि हात उघडे केले. महाकाय असलेल्या त्याने रिंगणामध्ये आपली जागा घेतली. यावेळी अध्यक्षस्थानी असलेल्या अँकायसीझपुत्राने दोन सारखीच असलेली मुष्टीयुद्धातील चामडी उंच धरली, आणि नंतर दोन्ही स्पर्धकांच्या हातावर ही सारखे वजन असलेली शस्त्रे बांधली. प्रत्येक स्पर्धकाने उत्सुकतेने चवड्यावर उभे राहून सावधपणें बेदरकार चित्तवृत्तीने आपआपल्या जागा तावडतोब घेतल्या, आणि हवेत हात उंचावले. मस्तके उन्नत करून आणि मुष्टीच्या आघातांच्या पल्ल्याबाहेर राहून युद्धाचा सराव करण्याकरिता त्यांनी परस्पर मुष्टीच्या आघाताचा खेळ सुरू केला. डॅरिज त्याच्या जवानीवर विसंबू शकत होता, आणि त्याच्या पायांची हालचाल अधिक चपळ होती. एंटेलसच्या धिप्पाड शरीरात आणि अवयवात ताकद होती, परंतु त्याचे गुडघे अस्थिर होते व त्यांची हालचाल मंद होती. तो थरथरत होता आणि त्याचा विशाल देह कष्टप्रद धापांनी हादरत होता. ते मुष्टीयोद्धे वरचेवर परस्परांवर घातक प्रहार करीत होते परंतु ते घाव चुकत होते, कधी कधी एखादा मुष्टीप्रहार बगलेच्या पोकळीवर किंवा छातीवर दाणकन् कोसळत असे. मस्तकाभोवती व कानांभोवती वरचेवर हात घुमत होते. भयंकर तडाख्याने जबड्याचा काडकन् आवाज येत होता. एंटेलस ठाम उभा होता; मुळीच न हलता आपला भार एकाच जागी रोवून होता; फक्त किंचित जागच्या जागी झुलून आघात चुकविण्याकरिता आपल्या सावध डोळ्यांचा उपयोग करीत होता. एखाद्या उत्तुंग नगरावर मोर्चे बांधून हल्ला करताना किंवा एखाद्या डोंगरी किल्ल्यावर मारा करण्याकरिता वेढा घालून शस्त्रसज्ज सेनापती ज्याप्रमाणे एका पाठोपाठ दुसऱ्या मार्गाचा जिंकण्यासाठी अवलंब करतो, सूज्ञतेने सर्व परिस्थितीचा शोध घेतो आणि हल्ल्याचे तंत्र सतत बदलीत पुढे घुसण्याचा प्रयत्न करतो परंतु कशाचाच उपयोग होत नाही. तशाच परिस्थितीत डॅरिज होता.

परंतु आता एंटेलसने प्रहार करण्याकरिता सिद्ध होऊन हात उंचावून जोराने पुढे आणला, चपळ असलेल्या डॅरिजने वरून येणारा आपल्यावरील धोका ओळखला तो द्रुतगतीने झुकला, चपळाईने बाजूला झाला आणि मुष्टीप्रहारापासून दूर गेला.

एंटेलसचा सर्व जोर हवेत फुकट गेला आणि त्याच्यावर आघात झालेला नसतानाच तो जमिनीवर आदळला. ज्याप्रमाणे कधी कधी एरिमॅन्थसवर किंवा उत्तुंग इडा पर्वतावर एखादा पोखरलेला, मुळापासून उखडलेला देवदार वृक्ष कोसळतो तसा हा अवजड माणूस स्वतःच्याच प्रचंड वजनाने धाडकन कोसळला. ट्रोजनांनी आणि सिसिलीच्या युवकांनी पण उत्साहाने उड्या मारल्या आणि त्यांच्या आरोळ्या आकाशापर्यंत गेल्या. अॅसेस्टिसच प्रथम पुढे झाला. तो त्वरेने पुढे गेला आणि स्वतः वयोवृद्ध असूनही त्याने आपल्या मित्राला सदयतेने जमिनीवरून उचलले. परंतु पडला तरी नेहमीसारखाच चपळ आणि निर्भय असलेल्या, क्रोधाने नवी शक्ति उद्दीपीत झालेल्या शूर एंटेलसने पुनः युद्धाचा अधिकच उग्र पवित्रा घेतला. स्वतःच्या शौर्याबरील विश्वास व पडल्याची शरम, यांनी त्याची शक्ती चेतविली होती. क्रोधाने भडकून त्या राक्षसाने एकदा उजव्या तर एकदा डाव्या मुष्टीने जोरजोराचे प्रहार करीत, डॅरिजचा, सबंध क्षेत्रावरून तो पळत असता पाठलाग केला. त्या आघातामध्ये खंड नव्हता, उसंत नव्हती. शूर एंटेलसने डॅरिजला अंग फुटेपर्यंत मारले आणि त्याला भेलकांडत लावले. वादळी ढग छपरावर गारांचा जसा ताडताड वर्षाव करतात तसे दोन्ही हातांनी त्याने प्रहारांचा वर्षाव केला. परंतु शेवटी त्यांचा प्रमुख इनीआस याने त्याच्या क्रोधाला आवर घातला. एंटेलसने आपल्या 'खुनशी रानटीपणाचे' हे प्रदर्शन थांबविले पाहिजे असा निर्णय घेऊन त्याने ते युद्ध बंद केले आणि मृदु शब्दांनी त्याचे सांत्वन करीत दमछाट झालेल्या डॅरिजची सुटका केली. "गरीब बिचाऱ्या डॅरिज, तुझ्यावर या वेडेपणाचा पगडा तू कसा पडू दिलास ? सत्ताधारी देव तुझ्याविरुद्ध फिरले आहेत आणि ही शक्ती काही वेगळ्याच जातीची आहे हे तुला समजू शकले नाही काय ? तू दैवी इच्छेपुढे मान वाकवावयास हवी होतीस." तो असे म्हणाला आणि त्याच्या आज्ञेने त्या योद्ध्यांना अलग करण्यात आले. वेदनेने गुडघे ओढीत चाललेला, डोके दोन्ही बाजूंनी लडबडत असताना, रक्ताने भरलेल्या तोंडातून रक्ताच्या गुठळ्या वरचेवर थुंकीत असलेल्या आणि दात रक्ताने भरलेल्या डॅरिसला त्याचे निष्ठावंत साथीदार गलबताकडे घेऊन गेले. त्याच्या जागी बोलविलेल्या दुसऱ्यांनी त्याच्यावतीने त्या खड्गाचा आणि शिरस्त्राणाचा स्वीकार केला आणि एंटेलसच्या वाट्याला ती पाम पर्णमाला आणि तो बैल राहिला.

"यावेळी तो पशु जिंकलेला तो विजेता अतिरिक्त गर्वोद्धततेने म्हणाला व्हीनस पुत्रा आणि इतर ट्रोजनहो, मी तरुण असताना माझ्या अंगी किती ताकद असली पाहिजे, आणि जो तुमच्यामधे आता सुरक्षित आहे त्या डॅरिजला तुम्ही

कसल्या प्रकारच्या मृत्यूपासून वाचविले आहे हे तुम्हाला आता उमगले असेल' असे म्हणून मुष्टीयुद्धाकरिता बक्षिस लावलेल्या, हाताशी जवळच तिष्ठत असलेल्या त्या बैलापुढेच तो उभा ठाकला. त्याने आपला उजवा हात मागे घेतला व मुष्टीयुद्धातील ती कठीण चामडीवर उंच पेलून धरली आणि त्या बैलाच्या शिंगांच्या बरोबर मध्यावर नेम धरला, नंतर जोर करून उंच होऊन कवटीवर चामड्याने आघात केला व मेंदू फोडून बाहेर काढला. थरथरत परंतु निष्प्राण होऊन तो बैल धरणीवर कोसळला. एंटेलसने अंतःकरणापासून एका अर्थगर्भ प्रार्थनेची आपल्या कृत्याला जोड दिली. "एरिक्स, मी डॅरिजच्या प्राणाऐवजी अधिक उमदा जीव तुला अर्पण करतो. या विजयानंतर मी ही चामडी खाली ठेवीत आहे आणि माझ्या कौशल्यालाही पूर्ण विराम देत आहे."

इनीआसने लगेच ज्यांना वेगाने बाण मारण्याच्या स्पर्धेत भाग घेण्याची इच्छा होती त्यांना आवाहन केले. त्याने पारितोषिके जाहीर केली, आणि नंतर त्याने सेरेस्टसच्या गलबतावरून मागून आणलेली डोलकाठी स्वतःच्या बाहूंच्या प्रचंड सामर्थ्याने रोवली आणि डोलकाठीच्या नाकातून दोरी घालून एक फडफडणारे कबूतर, बाणांच्या टोकांचे लक्ष्य म्हणून तिच्यावर बांधले. स्पर्धक एकत्र जमले आणि चिठ्ठ्या टाकण्याकरिता तयार ठेवलेल्या शिरस्त्राणात त्यांनी आपल्या नावाच्या चिठ्ठ्या टाकल्या. इतर कुणाच्या चिठ्ठ्या येण्यापूर्वी हिरटॅकसचा पुत्र हिपॉकूनची चिठ्ठी प्रथम पटकन आली. पसंतीच्या आरोळ्या उठल्या. गलबतांच्या शर्यतीत नुकताच विजयी झालेला आणि मस्तकावर अजून हिरवी ऑलिव्ह पर्णमाला धारण केलेला नेस्थिअस दुसरा आला. युरिटीऑन तिसरा आला. तो प्रथितयश पॅन्डॅरसचा भाऊ होता. कित्येक वर्षांपूर्वी त्या प्रसिद्ध शांती कराराचा भंग करण्याची आज्ञा झाल्यावर ग्रीक सैन्याच्या अगदी मध्यावर पहिला बाण सोडून प्रथम हल्ला चढविणारा तोच होता. युवकांनाच अधिक योग्य असलेल्या या कसोटीत गर्वपणे भाग घेण्याचे साहस करणारा ॲसेस्टिस शेवटी आला. कारण त्याची चिठ्ठी शिरस्त्राणाच्या तळाशी होती. नंतर मग प्रत्येक स्पर्धकाने स्वतःच्या ठायी असलेली सर्व ताकद लावून भात्यातून बाण घेऊन धनुष्य वाकवून त्याची कमान केली. तरुण हिपॉकूनच्या प्रत्यंचेचा कर्कश टणत्कार प्रथम झाला, आणि त्याचा बाण आकाशातून उडताना वेगाने हवा कापीत सरळ त्या डोलकाठीच्या दिशेने गेला, तीवर आपटला आणि लाकडात रुतून बसला. डोलकाठी थरथरली, ते पाखरू घाबरले आणि प्राणभयाने फडफडले, सर्व बाजूंनी मोठा जल्लोष झाला. हिपॉकून नंतर नेस्थिअसने उत्सुकतेने आपली जागा घेतली. धनुष्य मागे खेचून त्याने उंचावर

नेम धरला आणि डोळे आणि बाण एकाच रेषेत रोखले. परंतु दैवाने त्याला साथ दिली नाही. बाणाच्या लोखंडी फाळाने त्या पक्षाचा वेध घेण्यात तो यशस्वी झाला नाही. पण ज्या गाठी मारलेल्या कापडी पट्टयाने त्या पाखराचा पाय त्या डोलकाठीला बांधला होता तो पट्टा त्याने तोडला. आणि ते पाखरू, काळ्या मेघाकडे दक्षिण वायूच्या दिशेने चपळाईने दूर उडून गेले. परंतु आता बराच वेळ आपल्या सज्ज धनुष्याला बाण लावून उभ्या असलेल्या युरिटिऑनने आपल्याकडे लक्ष देण्याविषयी आपल्या भावाची प्रार्थना केली, आणि एका क्षणात आनंदाने मुक्त हवेत पंख फडफडावीत उडणाऱ्या कबूतरावर नेम धरला आणि काळ्या मेघांच्या पार्श्वभूमीवर ते उडत असतानाच त्याला घायाळ केले, तारकांच्या मध्ये उंच आकाशात त्याने प्राण सोडला आणि गतप्राण होऊन खाली पडताना त्याने त्याला घायाळ करून आरपार गेलेला बाणही परत आणला.

आता केवळ ॲसेस्टिसच तेवढा उरला होता आणि त्याची विजयमाला तर आताच हरपली होती. तरीही त्याने उंच आकाशात नेम धरून बाण मारून वृद्ध माणसाचे हाठायीही कौशल्य टिकून असते आणि बळकट धनुष्यातूनही तो टणत्कार काढू शकतो हे सिद्ध केले. नंतर एकाएकी जो पुढे भवितव्याची भयंकर भयसूचना ठरणार होता असा एक चमत्कार त्यांच्यापुढे प्रकट झाला. पुढे या शकुनाचा अत्यंत महत्वाचा परिणाम स्पष्ट झाला. पण जेव्हा भविष्यवेत्त्यांनी या शकुनाचा भयकारी अन्वयार्थ सांगितला तेव्हा त्यांची सूचना फारच उशिरा दिली गेली. कारण तरंगत्या ढगांमधून उडताना ॲसेस्टिसच्या बाणाच्या वेळूच्या दांड्याने पेट घेतला आणि जसा आकाशातून नित्य निखळणाऱ्या आणि झेपावत संचारणाऱ्या तारकांच्या मागे प्रकाशकिरणांचा केशसंभार जातो तसा त्या बाणाच्या मार्गावर मागे ज्वालांचा झोत उठला आणि पळत जाऊन तो बाण विरल वातावरणात दिसेनासा झाला. भयचकित होऊन सिसिलीची आणि ट्रॉयची माणसे जागच्याजागी खिळून उभी राहिली आणि त्यांनी पवित्र देवांची प्रार्थना केली. परंतु त्यांच्या श्रेष्ठ राजपुत्राने त्या प्रसादचिन्हाचा स्वीकार केला. त्याने या शकुनाने आनंदित झालेल्या ॲसेस्टिसला आलिंगन दिले आणि त्याच्यावर मूल्यवान भेटींचा वर्षाव केला. आणि तो म्हणाला, "तुम्ही मला पितृवत आहात. तुम्ही यांचा स्वीकार करा कारण ज्याअर्थी ऑलिंपसच्या देवेन्द्राने हे प्रभावी प्रसादचिन्ह दाखविले आहे त्याअर्थी तुमचा खास सन्मान व्हावा अशी त्याची योजना आहे. पूर्वी वृद्ध अँकायसीझचीच असलेली ही एक भेट तुमच्यासाठी आहे. मद्यमिश्रणाचा हा एक चषक आहे. त्यावर चित्राकृती कोरल्या आहेत. फार पूर्वी थ्रेसच्या सायसिअसने

मोठ्या औदार्याने त्याच्या स्नेहाचे प्रतीक म्हणून आणि त्याची आठवण म्हणून माझ्या वडिलांना घरी घेऊन जाण्यासाठी हा भेट म्हणून दिला होता." असे बोलत असतानाच त्याने ॲसेस्टिसच्या भालप्रदेशावर बे वृक्षाची हिरवी पर्णमाला चढविली आणि त्याची प्रथम पारितोषिक विजेता व इतर स्पर्धकांना जिंकणारा अशी घोषणा केली. जरी युरिटिऑन हा असा एकमेव स्पर्धक होता की ज्याने कबुतराचा भेद करून त्याला उंच आकाशातून खाली पाडले होते तरी दुसऱ्या व्यक्तीचा सन्मान करण्यात दाखविलेल्या पक्षपाताचे वैषम्य त्या सुस्वभावी युरिटिऑनला मुळीच वाटले नाही. नंतर बक्षिसाकरिता ज्याने पुढे पाऊल टाकले त्याने ती दोरी तोडली होती. आणि शेवटी बक्षीस घेणारा, डोलकाठीमधे ज्याने आपला पंखधारी बाण घुसविला तो होता.

या स्पर्धेनंतर लोक निघून जाण्यापूर्वी या स्पर्धांचा अध्यक्ष म्हणून इनीआसने एपिटायडीसला जवळ बोलविले. एपिटायडीस हा कुमार आयुलसचा शिक्षक होता आणि इनीआसचा परममित्र होता, इनीआस त्याच्या कानात कुजबुजला, 'तू आता कृपा करून जाऊन ॲस्कॅनिअस आणि त्याची बालसेना यांनी दौडीकरिता घोडे तयार केले असले तर त्याला, आपल्या आजोबांच्या सन्मानार्थ त्याने आपल्या अश्वारुढ तुकड्यांसह दौड करीत शस्त्रासहित आमच्यापुढे उपस्थित रहावयास हवे असे सांग!

नंतर त्याने बाहेर पडण्याकरिता रिंगणात गर्दी करीत असलेल्या सर्व प्रेक्षकांना मैदानातून बाहेर पडण्याची आज्ञा केली कारण सर्व मैदान आता मोकळे असावयास पाहिजे आहे असे त्यानी स्पष्टीकरण केले. नंतर आपल्या पित्यांच्या दृष्टीसमोरून ती मुले लगाम वगैरे साज घातलेल्या घोड्यावरून सरळ रांगातून चमकत पुढे दौडत आली. सिसिली आणि ट्रॉयच्या पुरुषांनी ती पुढे येताच उच्च स्तुतीस्वराने त्यांचे स्वागत केले. पारंपारिक प्रथेप्रमाणे सर्व मुलांनी आपले केस आखूड पर्णमालांनी बांधले होते. प्रत्येकाजवळ कॉर्नेलच्या लाकडाचे लांब दांडे असलेले लोखंडी टोकांचे दोन भाले होते. काहींच्या खांद्यावरून चकचकीत भाले लटकत होते. त्यांच्या मानेभोवती व छातीवर सोन्याचे पिळाचे लवचीक गोफ होते. घोडेस्वारांच्या तीन तुकड्या होत्या आणि त्यांच्या हालचालींचे मार्गदर्शन करणारे अधिकारी होते. आणि सहा कुमारांच्या दोन तुकड्या प्रत्येक अधिकाऱ्याच्या मागून जात होत्या, अशा तऱ्हेने बालसेनेतील अधिकारकक्षेची समान विभागणी केली होती. आणि

तिच्यातील सर्वचजण तेजाने चमकत होते. या कुमार अश्वदलाच्या एका तुकडीचे नेतृत्व पॉलायटिसचा प्रथितयश पुत्र छोटा प्रायम मोठ्या दिमाखाने करीत होता. त्याच्या नावामुळे त्याच्या आजोबांची स्मृती जागृत होत होती; आणि तो पुढे इटलीच्या वीरांना नवे सामर्थ्य प्राप्त करून देणार होता. तो छोटा प्रायम एका थ्रेशिअन शुभ्रकृष्ण घोड्यावर आरूढ झाला होता. घोडा चालत असताना त्याचे पुढले खूर पांढरे शुभ्र दिसत होते आणि त्याचे उन्नत शिर शुभ्र कपाळाने शोभत होते. दुसरा नेता एक लहान मुलगा, ॲटिस होता. लॅटिन ॲटी वंशाचा उगम त्याच्यापासूनच झाला. आयुलसचे त्याच्यावर कुमारसदृश प्रेम होते. आणि शेवटी सर्वाहून अधिक देखणा आयुलस स्वतः आला. तो डायडोने मधुर निरागसतेने आपली आठवण म्हणून आणि आपल्या प्रेमाची खूण म्हणून दिलेल्या सिडॉनच्या घोड्यावर आरुढ होऊन आला होता. इतर बाल-स्वार आपल्या प्रौढ मित्राच्या, सिसिलीच्या ॲसेस्टिसच्या मालकीच्या सिसिलिअन घोड्यांवर आरूढ झाले होते. टाळ्यांच्या गजरात ट्रोजनांनी कुमारांचे स्वागत केले. त्याचा त्यांनी बिचकतच स्वीकार केला; आणि ट्रोजनांना त्यांच्याकडे पाहून आणि त्यांच्या रुपात त्यांच्या पूर्वजांशी असलेले त्यांचे साम्य पाहून अति आनंद झाला.

ते घोडेस्वार बसलेल्या मंडळीसमोरून व त्यांच्या आप्तस्वकीयांच्या अगदी डोळ्यासमोरून मोठ्या डौलदार मिरवणुकीतून पुढे गेले. नंतर एपिटायडीसने दूरवर पोहोचणाऱ्या खड्या आवाजात मिरवणुकीला एक लांबलचक आज्ञा दिली. आणि आपला चाबूक फडकावला. ते तयारच होते. ते समान तुकड्या करून परस्परांपासून दूर दौडत गेले. नंतर तिघांच्या अर्ध्या अर्ध्या तुकड्या करून त्यांनी मूळ तुकड्यांची रचना बदलून टाकली आणि एखाद्या नृत्यातल्या हालचालीप्रमाणे त्यांनी आपली सबंध तुकडी विखरून टाकली आणि नंतर दुसऱ्या आज्ञेप्रमाणे ते मागे वळले आणि भाले खाली नेटके रोखून त्यांनी चढाई केली. नंतर त्यांनी वेगवेगळ्या रचना करून दाखविल्या, आणि पुनः पहिल्याच्या उलट रचना करून, मध्ये अंतर ठेवून रांगासमोर रांगा उभ्या राहिल्या, आणि उजवीकडून आणि डावीकडून परस्परांना गुंफणाऱ्या वर्तुळातून त्यांनी घोडे दौडवले नंतर त्यांनी अभिरूप सशस्त्र युद्धास आरंभ केला. कधी माघार घेताना ते पाठ दाखवीत होते तर कधी हल्ला करण्याकरिता भाल्यांची टोके रोखीत होते. नंतर त्यानी जणू समेट केला आणि समान रांगा करून ते बरोबरीने दौडले. असे म्हणतात की पूर्वी पर्वतराजीतील क्रेट येथे असलेल्या भूलभुलैयात, उंच भिंतींच्यामधून नागमोडीने जाणारी, त्या भिंतींमुळे पुढचे मागचे काहीं न दिसणारी, हजार प्रकारांनी फसविणारी

अनिश्चित वाट होती. त्या कुणालाही पूर्ण ज्ञात नसलेल्या गोंधळात टाकणाऱ्या व्यूहरचनेमुळे कोणताही खुणेचा भाग फसवा ठरत असे व कितीही मार्गदर्शक खुणा लक्षात ठेवल्या तरी कोणीही त्या वाटेने परत बाहेर येणे शक्य नसे. अशाच प्रकारांनी या ट्रोजन पुत्रांनी आपल्या वाटेवर घोडदौडीचे आणि युद्धकौशल्याच्या क्रीडांचे आक्रमणाचे व माघारीचे दर्शन घडवीत, क्षार समुद्राच्या पाण्यात विहार करणाऱ्या कारपॅथिअन किंवा आफ्रिकी सामुद्रधुनी कापीत जाणाऱ्या आणि लाटा पार करताना क्रीडा करणाऱ्या डॉलफिन माशांप्रमाणे मार्गावर नाना वळणे घेतली. नंतर पुष्कळ दिवसांनी आल्बा लाँगाभोवती तटबंदी बांधीत असता अॅस्कॅनिअसने या ट्रोजन घोडदौडीचे तिच्या अभिरूप युद्धासहित पुनरुज्जीवन केले आणि आपण ज्याप्रमाणे बालपणात इतर ट्रोजन युवकांबरोबर ही क्रीडा साजरी केली होती तशी ती साजरी करण्यास पहिल्या पिढीच्या लॅटिनांना शिकवले. आल्बनानी त्याच्या पुत्रांना शिकवले, त्यांच्यापासून परंपरेने ते रोमला वैभवाच्या काळात प्राप्त झाले. आणि त्या नगराने पूर्वजांच्या त्या प्रथेचे पालन केले. आजही त्या युवकांना 'ट्राय' म्हणतात व त्यांच्या सेनेला 'ट्रोजन' म्हणतात.

इनीआसच्या पूज्य पित्याच्या स्मरणार्थ झालेल्या क्रीडांचा इथे शेवट झाला.

याच क्षणी दैव प्रथम फिरले आणि विश्वासघाताने ट्रोजनांवर उलटले. ते निरनिराळ्या क्रीडा करून समाधीपुढे श्राद्धविधी करीत असता सॅटर्नची कन्या जूनो हिने *आयरिसला आकाशातून ट्रोजन आरमारांकडे पाठविले, तिचे जाणे सुलभ व्हावे म्हणून तिने तिला योग्य वाऱ्याची साथही दिली होती. कारण तिची जुनी नाराजी अजून शांत झाली नव्हती. आणि तिच्या पुढे अनेक योजना होत्या. ती कुमारी आयरिस आपल्या मार्गाने तिच्या सहस्त्र रंगशलाकांच्या इंद्रधनुष्यासह, अदृश्य स्वरूपात द्रुत गतीने उड्डाण करू लागली. तो तिथला प्रचंड जनसमुदाय पाहून, बंदर निर्मनुष्य असावे व आरमाराला कांही संरक्षण नसावे असा तर्क करून ती किनाऱ्याच्या बाजूला गेली. परंतु थोड्या दूर असलेल्या एकाकी किनाऱ्यावर ट्रोजन स्त्रिया एकीकडे बसून मृत अँकायसिससाठी शोक करीत होत्या, आणि साश्रुनयनांनी दूर समुद्राकडे पहात होत्या. त्या किती शिणल्या होत्या ! आणि त्या विशाल सागरावरच्या त्यांच्यापुढे वाढून ठेवलेल्या आणखी समुद्र-पर्यटनांचा विचार त्यांना फार भयंकर वाटत होता. सागराने त्यांना दिलेल्या दारुणतम यातनांनी त्या शिणल्या होत्या. आणि आपली स्वतःची नगरी प्राप्त व्हावी म्हणून एक हृदयाने प्रार्थना करीत होत्या. कळ लावण्यात अनुभवाने कुशल झालेली आयरिस त्यांच्याकडे गेली. देवतेचे रूप आणि वस्त्रे लुप्त करून तिने

एमारिअन डोरिक्लसची वृद्ध पत्नी, उच्च कीर्तिमान कुलातील आणि पूर्वी पुत्रवती असलेली आणि नावाला प्रतिष्ठा लाभलेली आशाबेरीचे रूप धारण केले आणि या रुपाने ती ट्रोजन मातांच्या समुदायात मिसळली आणि म्हणाली; "ग्रीकांच्या हातांनी तुम्हाला तुमच्या उच्च नगर तटा समीप लढताना मृत्यूच्या खाईत लोटले नाही हे तुमचे मोठे दुर्भाग्य म्हणायचे ! तुमचे राष्ट्र खरोखरीच अविरत अभागी ठरत आले आहे ! दैव तुमचा शेवटी कसा घात करणार आहे हे मला कळत नाही. ट्रॉयचा निःपात होऊन आता सात उन्हाळे गेले आणि या सर्व काळात आपला कधी न संपणारा प्रवास चालूच आहे. समुद्रावरून प्रत्येक घातक खडकाजवळून आणि प्रत्येक नक्षत्राखाली, विक्राळ लाटांच्या मर्जीवर हेलकावत सतत दूर जाणाऱ्या इटलीच्या शोधात आपण एका भूमीकडून दुसऱ्या भूमीकडे भरकटत आहोत. पण इथेतर इरिक्सचा प्रदेश आहे. आपल्या बंधूचीच भूमी आहे. आणि अॅसेस्टिस आपला यजमान आहे. मग प्रतीक्षा करीत असलेल्या नागरिकांना इथेंच पाया खोदून त्यांची नगरी का मिळवून देऊ नये ? हे पितृभूमी शत्रूंपासून व्यर्थच वाचविलेल्या गृहदेवतांनो, "ट्रॉयच्या भिंती" या शब्द प्रयोगाला यापुढे काहीच अर्थ उरणार नाही काय ? माझी हेक्टरची आठवण जागविणाऱ्या, झान्थस आणि सिमॉइस ही नावे असलेल्या नद्यांची नावे प्राप्त झालेल्या नद्या कुठल्याच भूमीत मला दिसणार नाहीत का? त्यापेक्षा, चला मग आपल्यावर दुर्भाग्य ओढवून आणणारी ही गलबते जाळण्यास मला हात द्या. कारण माझ्या स्वप्नात कॅसांड्राच्या पिशाच्चाने माझ्या हातात जळते पलिते दिले आणि ते म्हणाले, "इथेच तुझ्या ट्रॉयचा शोध घे; इथेच तुझे घर आहे." आताच काही तरी करण्याची वेळ आहे. कारण इतक्या महत्वाच्या भविष्यवाणीला विरोध करता येत नाही. त्या पहा ! नेप्च्यूनच्या चार वेदी ! नेप्च्यून स्वतःच आपल्याला अग्नी आणि धैर्यही देत आहे.' असे म्हणून तिने पुढाकार घेतला, त्वेषाने तिने एक भडकता पलिता उपसला आणि जोर लावून, उजवा हात पटकन् उंच करून तो पलिता गरगर फिरवला आणि फेकला.

त्या इलिअममधल्या स्त्रिया दचकल्या आणि भयभीत झाल्या. परंतु त्यांच्यातील सर्वांत वडील असलेली, प्रायमच्या सर्व मुलांची दाई पायरगो ओरडली "मातांनो, ही तुमच्यात उभी आहे ती बेरी नव्हे, हो ऱ्हीटिअमची कुणीही पुरंध्री नव्हे, ती डॉरिक्लसची विधवाही नव्हे. तिच्या स्वर्गीय रुपाची चिन्हे पहा. ते आग ओकणारे डोळे, तिचा अधिकारदर्शक आविर्भाव, तिची मुद्रा, तिची चाल, तिच्या आवाजाचा सूर पहा ! अहो ! आताच तर मी बेरीकडून आले, ती आजारी होती, आणि फक्त आपल्यालाच हा भव्यदिव्य महासमारोह पहाता आला नाही व

अँकायसीझला यथोचित श्रद्धांजली अर्पण करण्यात भाग घेता आला नाही म्हणून ती कष्टी झाली होती. पायरगो असे स्पष्ट म्हणाली. प्रथम त्या स्त्रियांच्या मनात काय करावे याबद्दल शंका उत्पन्न झाली आणि जिथे आहोत तिथेच, भूमीवर राहण्याच्या त्यांच्या केविलवाण्या मनिषेने आणि भावी साम्राज्याच्या तृष्णेने द्विधा मन झालेल्या त्या स्त्रिया त्या गलबतांकडे आकसाने व आशंकेने पहात असताना त्या देवतेने पंख तोलीत आकाशात उड्डाण केले आणि आकाशातून द्रुत गतीने जात असता काळचा मेघांवर तिने एक भव्य इंद्रधनुष्य निर्माण केले. तिच्या निर्गमनामुळे या गूढ घटनेने आधीच त्याना बसलेल्या धक्क्याच्या तीव्रतेत अधिकच भर पडली. त्यांच्यावर पिसाटपणाचा अंमल चढला. किंचाळत त्यांनी घरातील चुलींतून अग्नी आणला. काहींनी अग्नीकरिता वेदींवर धाड घातली व पाचोळा वाळलेली लाकडे आणि जळते पलिते त्या फेकू लागल्या. अग्नीदेवतेने मेजे, वल्ही बाके आणि फरच्या लाकडाच्या रंगविलेल्या वरामांमधे अनिर्बंध धुमाकूळ घातला.

गलबतांना आग लागलेली आहे हे वृत्त यूमिलसने अँकायसिसच्या समाधी-जवळ आणि खुल्या क्रीडांगणावर रांगा करून बसलेल्या प्रेक्षकांकडे आणले. तिथून सुद्धा त्यांना स्वतःला राखेचा आणि धुराचा तरंगणारा काळाकुट्ट ढग दिसत होता.

आपल्या दौडणाऱ्या घोडदळाचे मोठ्या दिमाखात नेतृत्व करणाऱ्या अँस्केनिअसने, आपल्या चक्रावलेल्या वडीलधाऱ्या मंडळींना त्याला अडविण्याची संधी न देता विकलचित्त होऊन ऐन गदारोळ उठलेल्या आरमाराच्या तळाकडे आपला घोडा फेकला. तो ओरडला, 'अरे, ही काय अकस्मात वेडेपणाची लहर आली? ट्रॉयच्या गरीब बिचाऱ्या मातांनो, काय करण्याचा तुमचा हेतू आहे? तुम्ही जाळीत आहात तो शत्रूचा, ग्रीक वैऱ्यांचा तळ नाही तर तुम्ही तुमच्या स्वतःच्या भवितव्याच्या आशा जाळीत आहात! इकडे माझ्याकडे पहा, मी तुमचा अँस्कॅ-निअस आहे!' असे म्हणून त्याने त्या अभिरूप युद्धात अभिनय करताना चढविलेले रिते शिरस्त्राण आपल्या पायाशी फेकले. त्याचवेळी इनीआसही त्याच्याबरोबर लगबगीने निघालेल्या ट्रोजनांसह तिथे त्वरेने आला. भयाने त्या स्त्रिया किनाऱ्या-वर इतःस्ततः विखुरल्या व लपत छपत अरण्याकडे आणि सापडतील त्या खडकातील गुहांकडे उधळल्या. त्यांच्या कृत्याची त्यांना आता घृणा वाटत होती. आणि खुल्या प्रकाशात पुढे येण्याची त्यांना लाज वाटत होती. त्या आता भानावर आल्या होत्या आणि त्यांच्या मनावरील जूनोचा प्रभाव नष्ट झाल्यामुळे आपले खरे मित्र कोण आहेत हे त्यांना कळू लागले होते.

परंतु त्यामुळे त्या भडकलेल्या अग्निप्रलयाने आपली दुर्दान्त संहारक शक्ति कमी केली नाही. दमट लाकडातील भेगांत भरलेले डांबरमिश्रण आता वितळून

पेटले आणि त्या भेगा दाट धूर बाहेर ओकू लागल्या. दवलेल्या अग्नीने गलबताचा खालचा भाग ग्रासला व गलबताच्या सांगाड्यात ते अरिष्ट धुमसत गेले. त्यांचे सर्व भगीरथ प्रयत्न आणि त्यांनी ओतलेल्या पाण्याच्या पाटांचा काही उपयोग झाला नाही. नंतर सत्यशील इनीआसने आपल्या खांद्यावरचे वस्त्र ओरबाडून काढले, आपल्या हाताचे तळवे पसरले आणि सहाय्याकरिता देवांचा धावा केला. 'हे सर्वशक्तिमान ज्युपिटर! तू जर अजूनही प्रत्येक ट्रोजनाकडे तिरस्काराने पाहत नसलास आणि तू पूर्वी दाखविलेल्या दयार्द्र ममतेला अजूनही माणसांच्या यातना दिसत असतील तर आता आमचे आरमार या अग्नी-प्रलयातून वाचू दे, आणि हे पित्या, ट्रॉयची ही क्षीण आशा मृत्यूपासून खेचून काढ, नाहीतर, माझी जर तशीच पात्रता असली तर आमच्यातील उरलेल्यांना तुझ्या क्रुद्ध वज्राघाताने मृत्यूच्या दाढेत लोट, तुझ्या स्वतःच्या हातानेच मला इथल्याइथे चिरडून टाक." त्याने ही प्रार्थना संपविलीही नसेल तेवढ्यात घोर दुर्दम्य काळेकुट्ट वादळ थैमान घालू लागले आणि पाऊस कोसळू लागला आणि त्याच्या गर्जनेने पृथ्वीतलावरील उंच पर्वत आणि सखल प्रदेशसुद्धा हादरू लागले. सबंध आकाशातून पाऊस कोसळला; दक्षिण वाऱ्यावरून काळे, दाट, थिजविणारे धुके उतरले. वरून कोसळणाऱ्या पाण्याने गलबते लवकरच भरून गेली आणि जळून कोळपलेली लाकडे भिजून त्यातली आग शमली, आणि चारच गलबतांची हानी होऊन बाकीची सर्व गलबते विध्वंसातून वाचली.

तरीही या घोर धक्क्याने हादरलेल्या ट्रॉयप्रमुख इनीआसने सर्व पर्याय मनात पडताळीत, त्यांचे सर्व बाजूंनी अवलोकन करून आपल्यावरील अवघड जबाबदारीचा खोलवर विचार केला. आपले विधिलिखित विसरून आपण सिसिलीच्या भूमीतच स्थाईक व्हावे की इटलीच्या किनाऱ्याकडे मोर्चा वळवावा असाही प्रश्न त्याला पडला. परंतु याच क्षणी वृद्ध नॉटीसने त्याला धीर दिला. ट्रॉयटोनिअन पॅलसने केवळ नॉटीसलाच भविष्यकथनाची विद्या शिकविली होती. आणि तिने त्याला त्याच्या परम कौशल्याबद्दल कीर्ती प्राप्त करून दिली होती, कारण जेव्हा जेव्हा घोर दैवी प्रकोपाची चिन्हे प्रकट होत तेव्हा तेव्हा त्याचे उत्तर तयार असे आणि त्यांचा अन्वयार्थ लावून तो नियतीने योजलेल्या भवितव्यातील घटनाक्रमांचा संगतवार खुलासा करीत असे. आता नॉटिस इनीआसशी बोलू लागला. "व्हीनसपुत्रा, आपण आता पुढे जायचे की नाही हे आपण नियतीने दाखविलेल्या दिशेने जाऊन ठरवू या. काहीही घडणार असो आपल्या स्वतःच्या सहनशक्तीनेच आपण आपल्या दैवगतीवर सतत प्रभुत्व प्राप्त करून घेतले पाहिजे. देवकुलात जन्म-

लेला डार्डन अॅसेस्टिस तुझ्या सान्निध्यात आहे. त्याला तू विश्वासात घे आणि त्याच्या सहकार्यानेच तू तुझी योजना आख, त्याची स्वतःचीही तशीच अपेक्षा असणार. आपल्यापैकी ज्यांची गलबते नष्ट झाली आहेत आणि आपल्या अंगीकृत थोर कार्याने आणि तुझ्या ध्येयाच्या मागे धावण्याच्या ताणाने जे अपार शिणून गेले आहेत व ज्यांचा थकवा उतरणे अशक्य दिसते त्या लोकांना अॅसेस्टिसच्या हवाली कर. वय झालेली सर्व माणसे, समुद्रपर्यटनाने थकलेल्या सर्व माता आणि तुझ्या गटातील जे दुबळे व धोक्याला भिणारे असे असतील ते सर्व लोक निवडून काढ. या सर्व थकल्या भागल्या जीवांना इथेच, सिसिलीत, तटबंदीने युक्त असलेली नगरी वसवू दे आणि त्याचे नाव वापरण्यास अॅसेस्टिसची अनुमती असेल तर ते या नगरीला 'अॅसेस्टा' हे नामाभिधान देतील."

त्याच्या वयोवृद्ध मित्राने असा सल्ला दिला. परंतु या सूचनांनी त्याचे विचार भडकले, आणि पूर्वी कधीही झाले नव्हते इतके ते सर्व प्रकारच्या चिंतांनी विचलित झाले. आणि आता कृष्णनिशा आपल्या रथातून उंच आकाशात संचारू लागली आणि तिने आकाशाच्या घुमटावर सत्ता प्रस्थापित केली. नंतर त्या आकाशातून इनीआसच्या साक्षात पित्याची आकृती सरळ खाली अवतीर्ण झाली. अचानक प्रकट झालेला अँकायसीझ इनीआसशी बोलत आहे असे भासले. 'माझ्या जीवात जीव होता तोवर प्रत्यक्ष माझ्या जीवाहूनही प्रिय असलेल्या मुला, ट्रॉयच्या भवितव्याचा जड भार वाहत असलेल्या पुत्रा, आरमारावरील अग्नीप्रलय शमविणाऱ्या आणि अखेर स्वर्गातून तुझ्यावर करुणेची पाखर घालणाऱ्या ज्युपिटरच्या आज्ञेवरून मी आलो आहे. वयोवृद्ध नॉटिसने तुला आताच दिलेला उत्कृष्ट सल्ला मान. तोच सर्वात श्रेष्ठ उदात्त सल्ला आहे. तुझ्या साथीदारातील सर्वात अत्यंत धैर्यशाली पुरुषांचीच एक निवडक तुकडी इटलीतील तुझ्या उद्दिष्टाकडे घेऊन जा तू लॅशिअमला पोहोचल्यानंतर एका रानटी अवस्थेतील प्रबल राष्ट्राचा तुला युद्धात पराभव करावा लागेल. परंतु त्यापूर्वी तू प्ल्यूटोच्या पाताल लोकाच्या मार्गाला लाग, खोल अॅव्हर्नस ओलांडून तिथे तू मला भेटण्याचा प्रयत्न कर, मी काही नरकाच्या भीषण गर्तेत अडकून पडलेलो नाही किंवा दुःखाच्या छायेतही नाही. परंतु मी तर एलिसियमध्ये सत्यशील आत्म्यांच्या सुखी मेळाव्यात आहे. बऱ्याच काळ्या पशूंचे रक्त यज्ञाहुतीत वहाल्यानंतर एक पूज्यभविष्यवादिनी तुला तेथे घेऊन जाईल, नंतर तुझ्या सर्व भावी वंशजांची तुला माहिती मिळेल आणि तुला कसली तटबंदीयुक्त नगरी प्राप्त होणार आहे ते कळेल. आता मी येतो. आपल्या कुंद धुक्यासह निशा आपल्या अर्ध्यामार्गाचे आक्रमण करून पुढे झेपावली आहे; सूर्य

वर येत आहे, आणि त्याच्या धापा टाकणाऱ्या घोड्यांच्या श्वासाचे चटके मला जाणवू लागले आहेत." त्याचे बोलणे संपले आणि धूर जसा वाहत्या वाऱ्यात विरून जातो तसा तो चटकन निघून गेला. इनीआसने आक्रोश केला. 'तुम्ही इतक्या गडबडीने इतक्या लवकर कुठे निघालात? कुठे एकदम नाहीसे झालात? तुम्ही कुणापासून गडबडीने पळून जात आहात? मला आलिंगन देण्यास तुम्हाला कोण प्रतिबंध करीत आहे? असे बोलत असताना त्याने ती सुप्तरक्षा चाळवून तिच्यातील दबलेला अग्नी जागृत केला, आणि ट्रॉयच्या दुर्गातील दैवतांची आणि अंतर्मंदिरातील शुभ्रकुंतल असलेल्या व्हेस्टाची सादर प्रार्थना करून भाविकपणे खारवलेले धान्य व शिगोशिग भरलेली धूपदाणी त्यांच्या सन्मुख ठेवली.

नंतर लगेच त्याने आपल्या मित्रांना बोलावून घेतले. प्रथम ॲसेस्टिसला बोलावणे गेले; त्याने त्यांना ज्युपिटरची आज्ञा, त्याच्या पूज्य पित्याच्या सूचना, आणि त्याने स्वत:च्या मनाशी घेतलेला निर्णय स्पष्ट करून सांगितला. या योजनेला कुणाचाच विरोध नव्हता, आणि इनीआसने दिलेले धुरीणत्व ॲसेस्टिसने स्वीकारले वृद्ध स्त्रियांना त्यांनी नव्या नगरीत हलविले आणि उच्च कीर्तीच्या अभिलाषा ज्यांच्या हृदयात नव्हती त्यांना त्यांच्या इच्छेनुसार नव्या नगरीत स्थाईक केले. उरलेल्या लोकांनी वल्हेकरांच्या बैठकी दुरुस्त केल्या. आगीत जळून काळ्या झालेल्या गलबतांच्या सांगाड्यांच्या फळ्या बदलल्या, आणि वल्ही आणि दोरखंडे नवी बसविली. ते संख्येने कमी होते तथापी त्यांचें शौर्य युद्धात मोठे उपयुक्त ठरणार होते. तोवर इनीआसने नगरीच्या वर्तुळाकार सीमा दाखविण्याकरिता नांगराने एक सरी पाडली आणि त्या सीमेच्या आत त्याने घरांची वाटणी करून दिली. नगरीमधील एका विभागात 'इलिअम' असावे व अन्य भागात 'ट्रॉय' असावे असा त्याने दंडक घातला. ट्रोजन ॲसेस्टिसने या नगरराज्याच्या कल्पनेचे स्वागत केले. त्याने नगरसभेकरिता जागा नियोजित केली. आपले सल्लागार मंडळ नेमले आणि त्यांची आचारसंहिता मुक्रर केली. नंतर त्यांनी एरिक्सच्या शिखरावर उंच तारकांसमीप इडॅलिअन व्हीनसच्या मंदिराची उभारणी केली. त्यालाच जोडून एक वृक्षवाटिका– एक विस्तृत भूभाग– योजली. आणि ॲंकायसीझच्या समाधीकरिता एका पुरोहिताची नियुक्ती केली.

अशा तऱ्हेने समग्र स्नेही संयुक्त मंडळींची नऊ दिवस प्रयोजने झाल्यावर आणि सर्व वेदीवर पूजन झाल्यानंतर, अनुकुल वाऱ्यांनी समुद्र शांत झाला होता. असे दिसले, त्यांना पुन: एकदा खुल्या समुद्राकडे बोलावीत दक्षिणेकडील वेगवान

वायूलहरी वाहू लागल्या. त्या वळणावळणाच्या पुढच्यातल्या किनाऱ्यावर मग मोठा आक्रोश सुरू झाला. सबंध रात्र आणि दिवस ते एकमेकांना बिलगून राहिले होते; त्यांचा पाय निघत नव्हता आणि ते परस्परांना आलिंगने देत होते; त्या माता आणि ज्यांना आतापर्यंत समुद्राचे विचारही भयंकर वेडेपणाचे वाटत होते आणि त्याच्या प्रतापाला तोंड देण्याची हिंमत होत नव्हती त्या पुरूषांनाही आता समुद्र पर्यटनास जाऊन परदेशभ्रमणाच्या मार्गावरील सर्व बिकट दिव्यांशी सामना करण्याची इच्छा निर्माण झाली. इनीआसने त्यांच्याशी ममतेने आणि स्नेहार्द्रतेने बोलून त्यांची समजूत काढली, व साश्रू नयनांनी त्यांना त्यांच्या बांधवावर, अॅसेस्टिसवर भरवसा ठेवण्यास सांगितले. नंतर त्याने एरिक्सला तीन वासरे व वादळांच्या देवाना एक कोकरू बळी देण्याची आज्ञा केली, आणि आता निघण्याचा समय झाला होता म्हणून त्याने नांगर उचलण्याचा आदेश दिला. तो त्याच्या गलबताच्या नाळीवर, उच्च स्थानी, सर्वांच्या समोर उभा राहिला. त्याच्या मस्तकावर ऑलिव्हपर्णांची माळ होती. आणि हातात आहुतीपात्र होते; आणि त्याने क्षारसागराच्या लाटांवर ते मांसखंड सोडले आणि स्वच्छ निर्मल मदिरा ओतली. गलबताच्या पाठीवरून वारा वाहू लागला आणि तो त्यांच्या मार्गावर त्यांच्याबरोबर अनुकुल असा सदैव राहिला. परस्परांशी स्पर्धा करीत त्याच्या सोबत्यांनी वल्ही मारीत सागरपृष्ठ ढवळून काढला. परंतु त्याच सुमारास चिंतेने व्यग्र झालेली व्हीनस नेप्च्यूनपुढे तक्रारींचा पाढा अंतःकरणपूर्वक वाचीत होती. "हे नेप्च्यून! जूनोचा जुलमी द्वेष आणि तिची कधीही समाधान न पावणारी महत्वाकांक्षा या मला माझ्या सर्व युक्त्यांचा अवलंब करण्यास भाग पाडीत आहेत. आणि मला अति क्षुद्र अशा प्रकारची याचना करावी लागत आहे. कितीही काळ लोटला आणि तिची कितीही यथायोग्य आराधना केली तरी तिचा रोष कमी होत नाही. भाग्यदेवता आणि साक्षात ज्युपिटरची आज्ञाही तिचा विरोध मोडून काढू शकत नाहीत. ती कधी उसंत घेतच नाही. तिच्या दुष्ट द्वेषाच्या कृतीनी तिने फ्रिजियाच्या जणू काळजातल्या अशा ट्रॉयचा स्वाहाकार केला आणि त्याला एकापाठोपाठ सर्व प्रकारच्या दिव्यातून फरपटवले पण एवढेही तिला पुरेसे झाले नाही. छे! नाही! कारण ट्रॉयच्या सर्वनाशानंतरच्या शेषावशेषांचाही, ट्रॉयची प्रत्यक्ष रक्षा आणि त्याच्या अस्थींचाही ती छळ करीत आहे. तिचा क्रोध इतका पिसाट का बनला आहे, ते तिचे तिला माहित. परंतु तिने नुकतेच आफ्रिकी सागरात जे भयंकर वादळ अकस्मात उठवले त्या बाबतीत तू माझा साक्षीदार आहेस. तिचा इओलसच्या वायुमंडलावरील भरवसा जरी व्यर्थच ठरला तरी समग्र आकाशात आणि साऱ्या सागरात एकच गदारोळ उठवून तुझ्या अर्धराज्यातही

हस्तक्षेप करण्याचे तिने धाडस केले आहे. आणि आता तर तिने ट्रोजन मातांना बंड करण्यास प्रवृत्त केले आहे व गहर्यपणे आमची गलबते जाळली आहेत. त्यामुळे ज्यांची गलबते नष्ट झाली अशा आमच्या साथीदारांना आम्हाला परक्या मुलखात सोडून जावे लागत आहे. परंतु मी तुझी प्रार्थना करते की, आम्हाला तटबंदीयुक्त नगर प्राप्त होण्यास भाग्यदेवतांचा नकार नसेल आणि तशी विनंती करण्यात मी मर्यादांचे उल्लंघन करीत नसेन तर उरलेल्या ट्रोजनांना तुझ्या लाटांवरून उर्वरित यात्रा सुरक्षितपणे पार पाडून लॉरेन्टाईन टायबरला पोहचू देण्यास तुझी अनुज्ञा असू दे."

नंतर सागराधिपति सॅटर्न-पुत्राने तिला उत्तर दिले, 'हे सिथरिअन' ज्या सागरातून तुझी उत्पत्ती झाली त्या माझ्या सागरी अधिसत्तेवर तू विसंबून असावेस हे योग्यच आहे. सागरावरील आणि आकाशातील पिसाट, बेफाम उद्रेकांना वारंवार आवर घालून मीही तुझा विश्वास संपादन केला आहे, तुझ्या इनीआसवरचे माझे लक्ष तो भूमीवर असतानाही काही कमी झाले नव्हते. झान्थस आणि सिमॉईस ह्या या बाबतीत माझ्या साक्षीदार आहेत. जेव्हा ॲकिलीज धापा टाकीत पळणाऱ्या ट्रोजनांच्या सेवेच्या फळांचांवर फळयांचा पाठलाग करीत होता, त्यांच्याच नगरतटाजवळ त्यांना रेटीत होता आणि हजारोंच्या संख्येने त्याना मृत्युमुखात भिरकावित होता, इतक्या मोठ्या प्रमाणात की तेथील नद्या तुंबून गेल्या होत्या आणि त्या भाराने त्या विव्हळत होत्या आणि झान्थसला तर सागराकडे जाण्यालाही मार्गच उरला नव्हता– त्यावेळी पीलिअसच्या शूर पुत्राशी लढत असलेल्या परंतु शक्तीने आणि दैवी सहाय्याने त्याच्यापेक्षा कमी पडत असलेल्या इनीआसला धुक्याच्या अवगुंठनात गुरफटून ठेवून मी वाचविले; ती नगरी पूर्वशापित होती आणि माझ्या स्वतःच्या हातांनी उभविलेले ते नगरतट पायांसकट उखडून टाकावेत असे मला स्वतःला वाटत असूनही मी त्याची सुटका केली. माझी त्याच्या विषयीची आस्था अजूनही तशीच दृढ आहे आणि माझे विचारही अविचल आहेत. म्हणून तू आपले भय सोडून दे. त्याचे अंतिम उद्दिष्ट म्हणून तूच निवडलेल्या ॲव्हर्नसजवळ इनीआस बंदराला लागेल. आणि तुला सागरावर गमावलेल्या एकाच ट्रोजन जीवाबद्दल शोक करावा लागणार आहे, असंख्य जीव वाचविण्याकरिता सागराला द्यावा लागणार केवळ एकच जीव.' या आश्वासनांनी त्याने त्या देवतेच्या विचारांची खळबळ थांबविली व तिला प्रसन्न केले. नंतर पिता नेप्च्यूनने आपले तेज घोडे सुवर्णाचा साज चढवून रथाला जुंपले, त्यांच्या फेस आलेल्या तोंडात लगाम दिले आणि स्वतःच्या हातात सगळे लगाम सैल रुळत

ठेवले. सागराच्या पृष्ठावरून त्यांच्या पाण्यासारख्या निळ्या रथातून अलगद पण वेगाने तो दौडू लागला. लाटा लीन झाल्या, खवळलेला विस्तृत जलनिधी त्या रोरावणाऱ्या रथाच्या कण्याखाली शांत झाला. आणि वादळी ढगांनी आकाशाच्या ओसाडीतून पलायन केले; आणि विविध रुपातील त्याचा लवाजमा,– राक्षसी सागरी प्राणी, ग्लॉकसचा वृद्ध मेळावा, इनोचा पुत्र पॅलिमॉन चपळ ट्रायटनजन, आणि फॉरकसचे बहुसंख्य अनुयायी, डाव्या बाजूस थेटीस, आणि मिलाईट, कुमारी पॅनोपिआ, नेसिआ, स्पायो, थॅलिया, आणि सायमॉडोसी हे सर्व दिसत होते.

म्हणून आता सेना प्रमुख इनीआसच्या मनात संदेह राहिला नव्हता, त्याचे हृदय मधुर आनंदाने थरारले होते. त्याने सर्व डोलकाठ्या लगेच उभारण्याची व आडव्या काठ्यांवर लगेच शिडे पसरण्याची आज्ञा केली. सर्वांनी शिडे आवळली, एकजुटीने शिडे एकदा गलबतांच्या डाव्या आणि एकदा उजव्या बाजूला ते पसरीत गेले, आणि डोलकाठीवरची आडवी लाकडे उंचावर इकडून तिकडे ते झुलवीत होते आणि अति अनुकुल वाऱ्यांनी त्यांचे आरमार पुढे लोटले जात होते.

सर्वांच्या पुढे पॅलिनरसने या गलबतांच्या संघटित ताफ्याचे नेतृत्व केले आणि त्याला मार्गदर्शन केले, कारण इतरांना त्याच्या सूचनेप्रमाणे गलबते हाकारण्याची आज्ञा होती. आता हवेतील आर्द्रतेसह रात्र जवळजवळ आपल्या वळण्याच्या बिंदूजवळ आकाशात पोहोचली होती, आणि बोटीवरील खलाशी वल्हयांच्या खाली आपल्या कठीण बैठकीवर आडवे होऊन सुखद आरामात विसावले होते; तेव्हा निद्रादेवाने आकाशीच्या चांदण्यांमधून हलकेच खाली उतरुन अंधाराचे धुके आणि छाया दूर केल्या, आणि पॉलिनरस, तू जरी निष्पाप होतास तरी तो तुझ्याकडे आला, आणि येताना त्याने तुझ्याकरिता एक उदासवाणे स्वप्न आणले. फोरबॅसच्या रुपाने तो नाळीवर उच्चस्थानी बसला. आणि त्याच्या मुखांतून मृदु शब्द येऊ लागले :– "इआससपुत्रा पॅलिनरस, तुझ्या सहाय्याशिवाय सागर तुझे आरमार पुढे नेत आहे. वायूलहरी परिपूर्ण गतीने वहात आहेत आणि आता आराम करण्याची वेळ आली आहे. तुझे मस्तक खाली टेक, या शिणलेल्या नेत्रांना त्यांच्या कष्टदायक कर्तव्यापासून हळूच दूर कर. अगदी थोडा वेळ तुझी जबाबदारी माझ्यावर सोपव." किंचितही डोळा वर करुन न पहाता पॅलिनरसने त्याला उत्तर दिले. 'क्षार समुद्राच्या या शांत रूपाने आणि विश्रांत लाटांच्या दर्शनाने फशी पडायला तू, सगळ्यांना सोडून मला सांगत आहेस की काय? हे बघ निरभ्र आकाशाने अनेक वेळा ज्या माझा विश्वासघात केला आहे

त्या मी इनीआसला फसव्या वाऱ्याच्या तोंडी देऊ काय?" तो असे म्हणाला आणि सुकाणूच्या दांडीला अगदी चिकटून राहून त्याने क्षणभरही आपली पकड ढिली पडू दिली नाही, आणि आकाशातील तारकांवर आपली नजर अगदी दृढ ठेवली. परंतु निद्रादेवाने अचानक तीर्थाच्या दवबिंदूनी ठिबकणारी आणि कालनदीच्या तेज प्रवाहाच्या गुंगीने ग्रासलेली एक डहाळी घेतली आणि पॅलिनरसच्या कानशिलांच्या दोन्ही बाजूंवर झाडली, आणि त्याने कितीही प्रतिकार केला तरी त्याने त्याचे गरगरणारे डोळे थांबविले. ही अनाहूत शिथिलता त्याच्या गात्रांवरून पसरत त्यांना निष्क्रिय करू लागल्याबरोबर निद्रादेव त्याच्यावर ओणावला आणि त्याने अजूनही सुकाणूचा दांडा व त्याच्याबरोबर निखळून आलेला मागचा भाग हातात धरलेल्या पॅलिनरसला गलबतावरुन सागराच्या निर्मळ लाटांवर फेकून दिले; आणि आपल्या मित्रांना पुनः पुनः व्यर्थ हाका मारीत तो सरळ तोंडघशी पडला. निद्रादेव आपले पंख पसरून अलगद आकाशात उडाला. आणि नेप्चूनने अभिवचन दिल्याप्रमाणे ते आरमार पूर्वीसारखेच निर्भयपणे सुरक्षित पुढचा मार्ग आक्रमू लागले. लवकरच ते इतके पुढे गेले की एकेकाळी ज्या जवळून जाणे कठीण होते, आणि असंख्य माणसांच्या हाडांनी जे पांढरे झाले होते त्या सायरीनच्या खडकांजवळ ते येऊ लागले. दूरवरून ज्यावर क्षार समुद्राच्या उफाळणाऱ्या लाटा अविश्रांत फुटत होत्या त्या खडकांच्या गर्जना आणि गुरगुरणे कानी येत होते. इथे प्रमुखाच्या लक्षात आले की गलबताच्या सुकाण्या हरपल्यामुळे गलबत लाटांवर भरकटत आहे. म्हणून त्याच्या मित्राच्या अपघाती मृत्यूच्या भयंकर धक्क्यामुळे अनेक उसासे टाकीत त्याने स्वतः ते गलबत मध्यरात्रीच्या लाटांमधून हाकलले 'अरेरे; पॅलिनरस, शांत आकाश आणि सागर यांवर तू वाजवीपेक्षा जास्त भरवसा टाकलास! त्यामुळे तू आता अज्ञात किनाऱ्यावर कफनाशिवाय पडून राहशील."

## सर्ग सहावा

# इनीआसची पाताळलोकांस भेट

अश्रू गाळीत इनीआस असे म्हणाला. नंतर त्याने आपल्या आरमाराला पूर्ण स्वैर सोडले आणि सरतेशेवटी सुखरूपपणे तो युबिअन क्यूमीच्या किनाऱ्याला लागला. त्यांनी आपल्या गलबतांच्या नाळी समुद्राकडे वळविल्या. नांगरांच्या दातांच्या कैचीने लवकरच गलबते स्थिर झाली आणि गोलाकार वरामांनी किनाऱ्याची कड धरली. ट्रोजन युवकांची एक तुकडी उत्सुकतेने पश्चिम भूमीच्या किनाऱ्यावर धावली, काहीनी गारगोटीच्या शिरांमध्ये खोल असलेल्या अग्निबीजाचा शोध केला. आणखी दुसरे खोल अरण्यात घुसले. आणि त्यांनी वन्य पशूंच्या वसतीच्या दाट जाळ्यावर धाड घातली. त्यांना जेव्हा पाण्याचा झरा आढळे तेव्हा ते इशारा करीत, परंतु सत्यशील इनीआस जिथे अपोलो उच्चासनावर अधिष्ठित होऊन आधिपत्य गाजवतो, त्या दुर्गावर मार्ग काढीत गेला. तसेच त्या पलिकडील विस्तृत गुहेकडे गेला, तिथे भयंकर भविष्यवादिनीचे (सिबिलचे) स्वत.चे एकांतातील वसतीस्थान आहे. इथेच तो भविष्यज्ञाता डेलॉसचा देव भविष्यात घडणाऱ्या घटना तिच्यापुढे उघड करून, दैवी भविष्यसाक्षी शक्ती तिच्यात ओततो. ते लवकरच डायनाच्या वनाजवळ आणि तेथील सुवर्ण मंदिराजवळ येऊ लागले.

त्याबद्दलची कथा अशी आहे की मिनासच्या जुलमाला कंटाळून डिडॅलसने जेव्हा गतीमान पंखाच्या सहाय्याने आकाशमार्गे साहसाने पलायन केले तेव्हा तो अज्ञात वाटांनी उत्तरेकडील थंड प्रदेशात उडत गेला. अखेर त्याने युबिआच्या दुर्गावरून अलगद भ्रमण केले. या भूमीत त्याला प्रथम आश्रय मिळाला. आणि त्याने तात्काल आपले वल्हचांसारखे पंख फिबस अॅपोलोला अर्पण केले आणि त्याने अॅपोलोकरिता एक अतिभव्य मंदिर बांधले. या मंदिराच्या प्रवेशद्वारावर त्याने अॅण्ड्रोजिअसच्या मृत्यूचा प्रसंग चित्रित केला, आणि त्याखाली आपले सात धिप्पाड पुत्र प्रतिवर्षी नुकसान भरपाई म्हणून देण्याच्या हिडीस आज्ञेचे पालन करणारे अॅथीनिअन दाखविलें होते. ज्या कलशामधून नुकत्याच चिठ्ठ्या काढण्यात आल्या होत्या तो कलशही तेथेच दाखविला होता. प्रवेशद्वाराच्या दुसऱ्या झडपेवरच्या

देखाव्याशी समतोल असे समुद्रावर उंच उठून दिसणारे, ज्यावर नूसॉस उभे होते, ते बेट चित्रित केले होते. त्या दुसऱ्या झडपेवर त्याने त्या वृषभाची पाशवी वासना आणि पॅसिफिचे त्याच्याशी झालेले गुप्त मीलन दाखविले होते. आणि त्या सर्वांच्या मध्यभागी विकृत वासनेविषयी भयसूचना म्हणून दोन भिन्न प्राण्यातील संकराचे फळ, त्यांचे अपत्य मायनटॉर दाखविला होता. इथे सर्व बारकाव्यांसहित तिच्या अनाकलनीय वळणावळणाच्या मार्गासहित, फेटाची ती वास्तू दाखविली होती. परंतु राजकन्या ॲरिएड्नीची प्रेमभावना प्रबळ होती म्हणून डीडॅलसला तिची दया आली आणि त्याने तिच्या अंध पावलांना दोऱ्यांच्या साहाय्याने मार्ग दाखविला आणि तिच्याकरिता त्या वळणावळणाच्या फसव्या वाटा खुल्या केल्या होत्या आणि हे आयकॅरस या शानदार शिल्पात तुलाही महत्वपूर्ण स्थान प्राप्त झाले असते, तुझ्या दुर्भाग्याची कहाणी सुवर्णात कोरण्याचा त्याने दोन वेळा प्रयत्न केला,परंतु प्रत्येक वेळी त्याचे हात–एका पित्याचे हात, दुःखावेगाने गळले. त्याचवेळी पुढे पाठविलेला ॲकेटीझ परतला नसता, आणि त्याच्याबरोबर ग्लॉकसची कन्या आणि फिबस आणि डायनाची पुरोहिता डायफिबी आली नसती तर ट्रोजन ते शिल्प पहात आणि त्यांच्यातील प्रत्येक संदेशाचा अन्वयार्थ लावीत राहिले असते. डायफिबी इनीआसला म्हणाली, "मजेत स्थळे पहाण्याची ही वेळ नव्हे. जोखडाला कधीही न जुंपलेल्या कळपातील सात बैल आणि दोन वर्षांच्या सात निवडक मेंढ्या आताच बळी दिल्यास उत्तम होईल." असे ती इनीआसला उद्देशून म्हणाली. ट्रोज-नांनी त्वरितच तिने आज्ञापिलेले बलीदान केले. त्या भविष्यवादिनीने फिबसच्या मंदिराची पुरोहिता या नात्याने पर्वतावरील मंदिरात येण्याविषयी त्यांना पाचारण केले.

युबिअन खडकाच्या कुशीतील एका भेगेमुळे एक प्रचंड गुहा तयार झाली आहे. सहस्त्र मुखे आणि सहस्त्र रुंद गव्हरे यांमधून तिच्यात जाण्यास वाटा आहेत. आणि सिबिलचे उत्तर त्यामधून शंभर गतिमान ध्वनी प्रवाहातून येते. ते उंबरठ्या-जवळ आले तेव्हा ती कुमारी ओरडली. "तुझ्या दैवगतीबद्दल विचारण्याची वेळ आता आली आहे. तो पहा देव! देव प्रकट झाला आहे!" हे शब्द ती तेथे उच्चारीत असता, त्या दुहेरी दरवाजापुढे, अचानक तिची मुद्रा आणि कांती बदलली. तिचे केस सुटून विस्कळित झाले, तिचे वक्ष उसासू लागले आणि फुटू पाहणारे तिचे हृदय अनावर आणि बेभान झाले; ती अधिक उंच उंच भासली आणि ती बोलत होती ते मानवी स्वरात नव्हते, कारण देव तिच्यासमीप होता. आणि त्याच्या सामर्थ्याचे निश्वास तिच्यावरून फिरत होते. "इनीआस, हे ट्रोजन

पुरूषा" ती म्हणाली, तू अजूनही तुझ्या प्रार्थना आणि तुझी व्रते पूर्ण करण्यास आळशीपणाने विलंब करीत आहेस काय? कारण तू जोवर प्रार्थना करीत नाहीस तोवर या गुहेच्या प्रचंड दारांना धक्का बसून ती जबडा उघडणार नाहीत." ती असे म्हणाली आणि नंतर गप्प झाली. ट्रोजनांच्या कणखर पाठीवरून एक थंड शिरशिरी खाली सरकली, आणि त्याच्या राजाने मनापासून उत्कटपणे प्रार्थना केली "हे फिबस, ट्रॉयच्या दुःखदायक यातनांची तुला सतत दया वाटत आली आहे. इॲसिड ॲकिलीझवर आपला डार्डन बाण रोखताना तूच पॅरिसच्या हातांना योग्य दिशा दाखविलीस. तूच मला या प्रचंड भूखंडावर आदळणाऱ्या सागरावर संचार करण्यास आणि दूरच्या मॅसिलिअनांच्या राष्ट्रांना व सर्टिसने झाकलेल्या देशांना जाणारा मार्ग आक्रमिण्यास प्रवृत्त केलेस. आता अखेर इटलीच्या फसव्या किनाऱ्यावर आम्हाला पाय रोवण्यास जागा मिळाली आहे. ट्रायच्या पुरातन दुर्दैवाला आमचा यापुढे पाठपुरावा करू देऊ नको. आणि इलियमचे व डार्डन भूमीच्या अति दैदिप्यमान वैभवाचे वैषम्य वाटणाऱ्या देवांनो आणि देवतांनो, तुम्हीही दैवी न्यायाचा अधिक्षेप न करता, ट्रॉयच्या दुर्गावर पूर्वी आधिपत्य असलेल्या राष्ट्रावर दया करा. आणि तू भवितव्य आधीच जाणणाऱ्या परमपूज्य भविष्यवादिनी ! माझ्या दैवाचा ज्यावर न्याय्य अधिकार नाही असे साम्राज्य मी मागत नाही. परंतु माझ्या ट्रोजनांना आणि त्याच्या भ्रमंती करणाऱ्या देवतांना आमच्या बरोबर वादळात भिरकावल्या गेलेल्या सत्ताधारी व संरक्षक ट्रॉयच्या दैवतांना लॅशिअममध्ये स्थाईक होण्यांची अनुज्ञा दे. तिथे मी अपोलो आणि ट्रायव्हिया यांच्याकरिता एक संपूर्ण संगमरवराचे मंदिर उभवीन आणि अपोलोच्या नावाने महोत्सवाचे दिवस नियुक्त करीन. आणि हे दयार्द्र योगिनी, माझ्या राज्यात तुझ्या करिताही एक सुंदर भव्य मंदीर असेल. तुझी भविष्य भाषिते, माझ्या लोकांना तू कथन केलेल्या भवितव्याच्या रहस्यासह तेथे जतन केली जातील; आणि तुझ्या सेवेकरिता मी पुरोहितांची निवड करीन व त्यांच्यावर ते पवित्र कार्य सोपवीन. परंतु कृपा करून तुझी भाषिते पर्णांच्या सहाय्याने सूचवू नकोस कारण लगट करणाऱ्या वाऱ्यांची खेळणी होऊन ती उडून, विखरून जातील. मी अशी याचना करतो की तू तुझ्या शब्दात ती उद्घोषित कर." त्यांच्या मुखातून येणाऱ्या शब्दांचा त्याने शेवट केला.

त्यावेळी अजून अपोलोच्या पूर्ण आधीन न झालेल्या त्या भविष्यवादिनीने तिच्या विचार शक्तीवरील दैवी शक्तीचा प्रभाव झुगारून देण्याच्या आशेने त्या गुहेत भयंकर गोंधळ माजविला. तिच्या भयभीत मुद्रेवर त्याचा छळ अधिकाधिक

उमटू लागला. तिच्या सैरभैर विचारावर त्याने काबू केला. तिचा चोळामोळा करून स्वतःच्या इच्छाशक्तीनुसार तिच्या चित्तवृत्ती घडविल्या. शेवटी त्या मंदिराची शंभर अति विशाल गव्हरे आपणहून उघडली. आणि वायुलहरीवर त्यांनी त्या भविष्यवादिनीने दिलेले उत्तर वाहून आणले. "तू सागरावरील सर्व संकटातून सुरक्षितपणे पार झाला आहेस. तथापी भूमीवर तुला अधिक उग्र संकटांना तोंड द्यावे लागणार आहे. तुझे डार्डन अनुयायी लॅव्हिनिअमचे राज्य प्रस्थापित करतील त्याविषयी तू कसलेही भय बाळगू नकोस– परंतु त्या राज्यप्राप्तीपासून पुढे त्यांना पश्चात्ताप पावावे लागेल. मला युद्ध आणि त्यांचे सर्व भयाण फलित दिसत आहे. रक्ताने फेसाळून दुथडी भरून वाहणारी टायबर मला दिसत आहे. तुला तेथे अन्य सिमॉईस आणि अन्य झान्थस आणि ग्रीकांचा अन्य तळही आढळेल. लॅशिअममध्ये श्वसनाद्वारे प्राणवायू अंतरी घेणारा देवीपुत्र ॲकिलिझ निर्माण झालाच आहे. ट्रोजनांच्या दुर्दैवाचे मूळ असलेली जूनोही कधीही फार दूर असणार नाही. आणि मध्यंतरी तू असहाय्य दुर्दशेने ग्रस्त होऊन इटलीच्या प्रत्येक राष्ट्रांत आणि नगरीत मदतीची दीनवाणी याचना करीत फिरशील. पूर्वीप्रमाणेच त्यावेळीही यजमान कुलातील परदेशी स्त्रीशी होणाऱ्या विवाहातूनच ट्रोजनावरील दारुण संकटाचे मूळ कारण उद्‌भवणार आहे. तरीही तू संकटाला शरण जाता कामा नये. परंतु त्याचा प्रतिकार अधिक साहसाने दैवाने अनुज्ञापिलेल्या मार्गावर पुढे सरसावून तू करायला हवास. तुझ्यापुढे उघडणारा स्थिरस्थावर होण्याचा पहिला मार्ग तुला कल्पनाही नसेल अशा ठिकाणातून, एका ग्रीक नगरीतूनच सुरु होईल."

क्युमिअन सिबिलने आपल्या मंदिरातून उच्चारलेली वाणी ही अशी गुढ आणि भयकारी होती. तिने ते गूढाच्या आवरणातील सत्य उच्चारले तेव्हा त्या गुहेत तिचा स्वर गर्जनेसारखा घुमला. अपोलो आपले लगाम जसजसे खेची तसतशी ती बरळे व तिच्या विचारशक्तीला त्याने लावलेला अंकुश पिळवटू लागे पण त्याचा तिच्यावर संपूर्ण ताबा होता. तिला आलेल्या झटक्याचा आवेश जेव्हा ओसरला व तिची बेभानता सरली व पिसाट वाणी शांत झाली तेव्हा इनीआस शूरास शोभेल अशा शब्दांत बोलू लागला "हे कुमारी, मला नवीन असलेले किंवा अज्ञात असलेल्या असे यातनेचे कोणतेही स्वरुप माझ्या पुढे उभे रहाणार नाही कारण माझ्या अंतरमनाच्या कल्पनेत सर्व संभाव्य संकटातून मी माझा मार्ग क्रमिला आहे. परंतु मी तुला एकच प्रार्थना करतो. पातालपतीच्या राज्याचे प्रवेशद्वार येथेच आहे आणि ज्या इथल्या जवळच्याच अंधारातून ॲकेरॉनचा प्रवाह वळण घेतो तो दलदलीचा प्रदेशही इथून जवळच आहे असे म्हणतात म्हणून मला एक

वरदान दे. माझ्या प्रिय पित्याचे जवळून दर्शन घेण्याची मला अनुमती मिळू दे. ही पवित्र प्रवेशद्वारे सताड उघड आणि तो मार्ग मला उकलून सांग. माझ्या या खांद्यावरून त्यांना मी अग्नीज्वालातून आणि पाठलाग करणाऱ्या सहस्त्र भाल्यांच्या-वर्षावातून सोडवून आणले. शत्रूच्या ऐन फळीतून त्यांना मी बाहेर काढले व वाचविले. माझ्याबरोबर त्यांनी अनंत सागरावरील जगप्रवासातील धोकादायक वादळवारे सोसले; त्यांच्या दुर्बल शरीरातील शक्तीच्या बाहेरचे ते प्रयास होते. आणि वार्धवयातील माणसाला ते सर्वथा अयोग्य होते. त्यांनीच मला तुझी भेट घेऊन, तुझ्या दाराशी नतमस्तक व्हायला सांगून विनवणी केली. हे परमदयाळू योगिनी, तू आम्हा पितापुत्रांवर दया कर असे मी तुला विनवितो. कारण हे सर्व तुझ्या सामर्थ्याच्या कक्षेतील आहे टेकॅरीने या ॲव्हर्नसच्या वनातील सर्व सत्ताधारी म्हणून तुझी नियुक्ती काही उगीच नाही केली! ऑर्फियसला जर आपल्या वधूचा सूक्ष्म देह आपल्या थ्रेशिअन वीणेच्या तारांवर झंकारणाऱ्या स्वरालापांच्या सहाय्याने परत मिळविता आला. पॉलक्स जर आपल्या भावाबरोबर आळीपाळीने मरून मृत्यूच्या मार्गावर वारंवार ये-जा करू शकत होता. आणि जर महान थिसिअस आणि हर्क्यूलिस– परंतु त्याचा उल्लेख करण्याची गरजच काय? मी सुद्धा सर्व श्रेष्ठ जोव्हच्या कुलातच जन्मलो आहे."

वेदीवर हात ठेवून त्याने अशी प्रार्थना केली. तो प्रार्थना करीत असतानाच त्या भविष्यवादिनीने उत्तर देण्यास प्रारंभ केला. "दैवी रक्तबीजा, हे ट्रायच्या पुरुषा, अँकायसीझ पुत्रा. ॲव्हर्नसमधे अवतरण करणे अवघड नाही. सर्व रात्री आणि सर्व दिवस तमोमय प्लूटोचे दरवाजे सताड उघडे असतात; परंतु तिथून गेल्या वाटेने परत फिरणे व पुन्हा पृथ्वीवरील वातावरणांत निसटून येणे हे कर्म कठीण व महाप्रयासाचे आहे· काही थोड्या देवपुत्रांना ते सामर्थ्य प्रदान करण्यात आले होते. कारण एक तर ते ज्युपिटरला प्रिय होते आणि त्याने त्यांच्यावर अनुग्रह केला होता किंवा त्यांनी स्वतःच्याच दैदिप्यमान पराक्रमाने मृत्यू लोकांतील मानवांच्यापेक्षा उच्चतर स्थान प्राप्त करून घेतले होते. सर्व मार्गांच्या बाजूंनी घनदाट अरण्ये आहेत आणि काळाकुट्ट कोसायटसचा प्रवाह नाना वळणे घेत सतत वहात रहातो. जर स्टीक्स सरोवरावरून दोन वेळा तरंगण्याची व पाताळ लोकीचा अंधार दोन वेळा पहाण्याची तुझी इच्छा इतकी उत्कट आणि प्रबळ असेल तर, आणि जर या वेड्या साहसात स्वतःला पूर्णपणे गुंतवून घेण्याची तुझी तयारी असेल तर प्रथम कोणती कठीण कर्मे पूर्ण केली पाहिजेत ते ऐक. एका वृक्षाच्या घनदाट छायेत एक खांदी लपलेली आहे. ती सुवर्णाची असून तिची पाने

आणि देठ दोन्हीही लवचिक सुवर्णाचीच आहेत. पाताललोकीच्या जूनोला ती समर्पित झालेली आहे, सर्व अरण्य तिचे रक्षण करते. आणि अंधाऱ्या दरीतील घन छायांनी तिला वेष्टिले आहे. या वृक्षापासून उद्भवलेली ही सुवर्ण लव असलेली खांदी प्रथम प्राप्त केल्याशिवाय पृथ्वीस अज्ञात अशा या पाताललोकात प्रवेश करण्याची अनुमती कुणासही मिळत नाही, कारण रूपवती प्रॉझरपाइनने अशी आज्ञा केली आहे की ही खांदी खास समर्पणीय वस्तु म्हणून तिच्यासाठी आणलीच पाहिजे. ही खांदी वृक्षापासून तोडली तर प्रत्येक वेळी पहिल्या खांदीसारखीच दुसरी सुवर्णाची खांदी तेथे फुटते आणि तिच्या देठावर सुवर्णाचीच पाने येतात. म्हणून तू डोळे वर उचलून ही खांदी शोधली पाहिजेस, स्वतःस आवश्यक म्हणून तू ती मिळविली पाहिजेस आणि धैर्याने तोडून घेतली पाहिजेस आणि भाग्यदेवतांनी जर खरोखरी तुलाच तेथे पाचारण केले असेल तर ती स्वेच्छेने आणि सहजतेने तुझ्या हाती येईल, परंतु तसे नसेल तर, कोणतीही शक्ती तिच्यावर प्रभुत्व मिळवू शकणार नाही, पोलादाच्या धारदार शस्त्रानेही ती तोडून काढता येणार नाही. परंतु आणखी एक सांगते– 'आता तू इथे माझ्या दारात दैवी भाकितांकरिता घोटाळत असताना, तुझ्या मित्राचा देह निष्प्राण होऊन पडला आहे हे दुर्दैवानें तुला माहित नाही, आणि मृत्युच्या घाणेरड्या संसर्गाने तुझे सर्व आरमार दूषित झाले आहे. त्याला प्रथम घरी आणून उचित संस्कार करून त्याला त्याच्या समाधीत चिरनिद्रेच्या स्वाधीन कर. तुझे प्रायश्चित्तार्थ पहिले बळी म्हणून काळ्या मेंढ्या घेऊन चल. हे सर्व केलेस तर जिवंत माणसाला दुर्गम असलेल्या स्टीक्स वरील अरण्याचे तुला दर्शन घडेल " तिचे कथन संपले, तिने आपले ओठ घट्ट मिटले आणि ती स्तब्ध झाली.

इनीआसने ती गुहा सोडली आणि कष्टी मुद्रेने दृष्टी खाली वळवून तो अनिश्चित भवितव्याचा विचार करीत चालू लागला. सहानुभूतीने त्याच्या पावलाबरोबर पावले टाकीत सदैव एकनिष्ठ असा अॅकेटीझ त्याच्याबरोबर चालू लागला. परस्परांशी बोलत त्या भविष्यवादिनीने सांगितल्याप्रमाणे कोणत्या मित्राचे त्यांना दफन करावे लागणार होते याबद्दल तर्क लढविण्याचा प्रयत्न करीत त्यांनी आपले अंदाज एकमेकाला सांगितले आणि नंतर अचानक ते एका ठिकाणी आले आणि ज्या ठिकाणी सागर हटून किनारा कोरडा पडला होता तिथे त्याना अकाली आणि निष्कारण मृत्यू प्राप्तझालेला निष्प्राण इओलिड मिसिनस दिसला आपल्या ब्रॉंझच्या तुतारीने हृदये हेलावून सोडण्यात आणि आपल्या वाद्यवादनाने रणांगणावर वीरश्री चेतविण्यात तो सर्वात अधिक कुशल होता. किर्तीमान हेक्टरचा तो सखा होता आणि हेक्टरच्या

खांद्यास खांदा लावून ती युद्धास तोंड देत असे. त्याच्या तुतारीने आणि भाल्याने तो सर्वत्र परिचित होता. ॲकिलिझने हेक्टरचे प्राणहरण केल्यानंतर हा वीरोत्तम योद्धा डार्डन इनीआसला मिळाला. आणि तितक्याच उदात्त ध्येयप्राप्तीसाठी प्रयत्नांत त्याचा साथीदार झाला. परंतु पुढे त्याच्या हातून एक शुद्ध मुर्खपणा घडला. त्याने एका पोकळ शंखाचे शिंग वाजविले आणि तो ध्वनी सागरलाटांवर प्रतिध्वनीत झाला, आणि त्याने प्रत्यक्ष देवांना संगीतात त्याच्याशी स्पर्धा करण्यासाठी आव्हान केले परंतु ट्रायटनने मत्सराने आपल्या मर्त्य प्रतिस्पर्ध्याला जिथे पाणी खडकात फेसाळते तिथे फशी पाडले आणि बुडविले. पहा बसतो कां विश्वास अशा कृत्यावर! याप्रमाणे सर्व ट्रोजन जमले आणि मोठ्या तारस्वरात त्यांनी शोक केला. सत्यशील इनीआसचा स्वर सर्वात अधिक उंच होता. शोक करीत असतानाच, क्षणाचाही विलंब न लावता त्या सिबिलने आज्ञा केल्याप्रमाणे सर्व क्रियाकर्म उरकण्याची त्यांनी त्वरा केली. आकाशापर्यंत उंचविलेल्या वेदीवरील चितेकरता झाडांची खोडे रचणे हे त्यांचे काम होते, जिथे केवळ वन्यपशुच वसती करून होते अशा एका उंच झाडे असलेल्या पुरातन अरण्यात ते आतवर घुसले; आणि लवकरच फर वृक्ष कोसळू लागले. कुऱ्हाडींच्या घावाखाली सदापर्णी ओक दणकून निघू लागले. फोडण्यास चांगले असलेले ॲशचे आणि कठीण ओकचे ओंडके त्यांनी पाचर मारून फोडले. आणि विशाल रोवन वृक्ष त्यांनी डोंगर उतरणीवरून गडगडत खाली लोटले.

हे सर्व चालू असता इतराप्रमाणेच शस्त्रे घेतलेल्या इनीआसने आपल्या मित्रांना प्रोत्साहन देण्यात पुढाकार घेतला. परंतु तो सतत त्या अफाट अरण्यात दूरवर पहात आपल्या अडचणींवर स्वतःशी विचार करीत स्वतःच्या निराश मनाशी संवाद करीत होता. तो असा विचार करीत असतानाच त्याने सहजच एक प्रार्थना केली." "खरेच, या प्रचंड अरण्यात ती 'सुवर्णाची खांदी' मला कुठे तरी दिसली तर! मिसिनस, तुझ्या बाबतीत त्या सिबिलचे भाषित खरे ठरले—, पुरेपुर खरे ठरले!" त्याचे हे शब्द पूर्ण झालेही नसतील एवढ्यात एक कपोत युग्म आकाशातून विहरत सरळ त्यांच्या नजरेपुढे आले आणि हिरवळीवर विसावले. नंतर आपल्या प्रत्यक्ष मातेचे ते प्रतीकात्मक पक्षी त्या थोर वीर पुरुषाने, इनीआसने, ओळखले आणि मोठ्या आनंदाने त्याने प्रार्थना केली." हे पक्ष्यांनो खरोखरच जर काही मार्ग सापडण्याजोगा असेल तर तुम्ही माझे मार्गदर्शक व्हा! जिथे ही वरदानरूपी डहाळी खालच्या संपन्न भूमीवर सावली करीत असते त्या दरीकडे आकाशातून तुमचा मार्ग आक्रमा. आणि माझ्या स्वर्गीय माते, या बिकट समयी

मला फशी पाडू नकोस !" तो असे म्हणाला आणि कबुतरांचा संदेश काय आहे व ती आता कुठे उडून जात आहेत हे निरखीत त्याने आपली पावले रोखली. कधी भक्षण करीत. कधी उड्डाण करीत ते युग्म जे कुणी त्याच्या मागून येत होते त्याच्या दृष्टीपंथात राहील इतकेच पुढे जात होते. ते उग्र अॅव्हर्नसच्या प्रवेशद्वाराच्या जबड्यापर्यंत उडाले. इथे ते वेगाने भराऱ्या मारून निरभ्र आकाशात विहरू लागले, आणि भ्रमण करता करता त्याना हवी असलेली बैठक सापडली आणि ते तेथे जवळ जवळच्या दोन झाडांच्या शेंड्यावर उतरले; आणि तेथ त्या हरितपर्ण संभारातून दैदिप्यमान असे निराळे उठून दिसणारे सुवर्ण तेज फाकले. ज्याप्रमाणे एखादे बांडगूळ ज्या झाडावर पोसते त्या झाडातून रूजलेले नसते तरी त्या झाडाच्या गोल खोडाला केशरी रंगाच्या फळांचा विळखा घालते, आणि हिवाळ्याच्या थंडीतही अरण्यात नव्या पालवीने हिरवे असते, याप्रमाणेच त्या सदापर्णी ओकच्या धन छायेत ती सुवर्ण पर्णराशी दिसत होती, आणि मंद वायुलहरीवर धातूच्या वर्खासारखी ती पाने किणकिणत होती. इनीआसने तात्काळ ती खाली खेचली तिने थोडा प्रतिकार केला. परंतु इनीआसने अत्युत्सुकतेने ती खांदी मोडली आणि ती घेऊन तो त्या भविष्यवादिनी सिबिलच्या निवासस्थानी गेला.

तोवर किनाऱ्यावर ट्रोजन मिसिनसच्या अस्थीवर शेवटचे संस्कार करीत दुःखातिशयाने सारखे शोक करीत होते. आपली कृतज्ञता व्यक्त करण्याचे सामर्थ्य त्या अस्थीत आता नव्हते. प्रथम त्यांनी कापलेल्या टणक ओंडक्यांची भली मोठी चिता रचली. ती त्वरीत पेटण्याकरिता पाईन लाकडाच्या ढलप्या वर घातल्या, चितेच्या बाजू काळसर हिरव्या पानांनी आच्छादिल्या, आणि तिच्यापुढे मृत्युसूचक सायप्रसच्या डहाळ्या उभ्या केल्या. तिच्यावर–त्यांनी लखलखती शस्त्रे ठेवून–त्यांच्या तेजाने तिला सुशोभित केले. काहींनी ज्वालांच्या धगीवर उकळणाऱ्या कढयांतून पाणी तापविले आणि आपल्या मित्राच्या थंड शवाला स्नान घातले. व त्यास सुगंधी द्रव्याचे मार्जन केले. उच्च स्वराने शोक सुरु झाला. शोकाश्रू ओसरू लागल्यावर त्यांनी ते शव चितारूपी शय्येवर ठेवले आणि त्यावर गर्द रंगाची त्याची आवडती वस्त्रे घातली. ताटी उचलण्याच्या अखेरच्या दुःखगंभीर सेवेसाठी काही ट्रोजन वाकले. नंतर पारंपारिक विधीनुसार मुखे फिरवून त्यांनी चितेच्या तळाला पलिता लावला आणि तो तिथे तसाच धरून ठेवला. चितेत समर्पण केलेल्या धूप, नैवेद्य आणि कमंडलूतून ओतलेल्या ऑलिव्ह तेलाच्या धारांसह ती प्रचंड राशी भडकली व पेटत गेली. शेवटी जेव्हा जळलेले ओंडके खचले आणि ज्वाला शांत झाली तेव्हा त्यांनी त्या शवाची धगधगणारी तान्हेली रक्षा मदिरा

संतर्पणाने मार्जन केली. कॉरिनिअसने अस्थी वेचल्या आणि ब्रॉंझच्या रक्षाकलशात बंद केल्या. नंतर स्वच्छ जलकुंभ घेऊन त्याने आपल्या मित्राच्या भोवती तीन प्रदक्षणा घातल्या व बहरलेल्या ऑलिव्हच्या डहाळीने त्या जलबिंदूचे त्याच्यावर सिंचन करून त्याने त्यांना शुद्ध केले. आणि नंतर त्याने शेवटचे मंत्र उच्चारले आणि जिथे ती चिता रचली होती, तिथे इनीआसने एक भव्य समाधी बांधली आणि तिच्यावर मिसिनसने वापरलेल्या वस्तू, त्याची वल्ही आणि तुतारी ठेवली. आकाशात उंच गेलेल्या पर्वताच्या पायथ्याशी ही समाधी आहे. अजूनही त्या पर्वताला त्याच्या नावावरून 'मिसिनस पर्वत' असे म्हणतात. आणि शतकांमागून शतके जात आहेत तरी त्याची स्मृती तो पर्वत चिरंतन राखीत आहे.

हे कर्म पार पाडून इनीआस सिबिलच्या आज्ञा पालन करण्याकरिता त्वरेने निघाला. काळ्याशार पाण्याच्या सरोवराने व उदास अरण्याने रक्षिलेली विशाल-मुख असलेली एक खोल खडबडीत प्रचंड गुहा तिथे आहे. त्या सरोवराच्या काळ्या जबड्यातून वर निघणाऱ्या आणि उंच आकाशाच्या घुमटात पसरणारा वायु इतका विखारी होता की कुणीही पक्षी आपल्या पंखांनी निर्वेधपणे या सरो-वरावरून सरळ उड्डाण करू शकत नव्हता म्हणून ग्रीकांनी त्याला पक्षी विरहित असे "ऑर्नास" हे नाव दिले होते. इथे योगिनीने चार काळे बैल यथाविधी खडे केले होते. तिने प्रथम हे काम केले. नंतर तिने त्याच्या भालप्रदेशांवर मदिरेचा अभिषेक केला. त्याच्या शिंगामध्ये वाढलेले केसाचे खुंट कापले, आणि बळीचा पहिला नमुना म्हणून ते वेदीवरच्या यज्ञीय अग्नीवर ठेवले, आणि हे करीत अस-ताना तिने स्वर्गात आणि पातालातही आपल्या शक्तीचा प्रभाव गाजवीत असलेल्या हेकटीला उच्च स्वराने साद घातली. इतरांनी बलीपशूंच्या कंठांना सुऱ्या लावल्या आणि पात्रामध्ये उष्ण रक्त धरले. इनीआसने आपले खड्ग हाती घेतले. आणि काजळी सारखी काळी लोकर असलेल्या कोकरावर एकच वार करून ते युमि-नाइडसच्या मातेला आणि तिच्या थोर बहिणीला बळी दिले आणि एक वांझ गाय त्याने स्वत: प्रॉसरपाईनला बळी दिली. त्याने आता स्टीक्सच्या अधिपतीकरिता करावयाच्या रात्रीच्या यज्ञविधीला प्रारंभ केला. त्याने बैलांची अखंडित शवे अग्नी ज्वालावर ठेवली. आणि त्यांच्या पेटलेल्या अंतर्भागांवर दाट ऑलिव्ह तेल ओतले. आणि काय चमत्कार! उगवत्या सूर्याचे पहिले किरण फाकण्यापूर्वीच, त्यांच्या पायाखालची भूमी गरजली. वनराईने आच्छादिलेल्या पर्वतांच्या उतरणी हलू लागल्या, आणि छायामधून अस्पष्ट दिसणाऱ्या भुंकणाऱ्या शिकारी कुत्र्यांच्या आकृती दिसल्या, देवतेचे आगमन होत होते. आणि ती अगदी समीप आली होती

"दूर व्हा" ती योगिनी ओरडली, "जे अपवित्र आहेत ते सर्व दूर व्हा– या कुंजातून पार बाहेर निघून जा. परंतु तू, इनीआस म्यानातून खड्ग उपसून तुझ्या मार्गावर पुढे चल. आताच तुला शौर्याची आणि निर्भय अंत:करणाची गरज आहे." अधिक न बोलता बेभान आवेगाने ती त्या खुल्या झालेल्या गुहेत झेपावली आणि पुढे चालू लागली, बेदरकारपणे पावले टाकीत इनीआस तिच्या पाठोपाठ गेला, आत्म्यांवर अधिसत्ता असलेल्या देवांनो, निःशब्द छायादेहांनो; हे अवकाशा! आणि हे ज्वलंत सरिते! आणि रात्रीच्या अंधःकारात बुडालेल्या नीरव विस्तीर्ण प्रदेशांनो! मला जे कथन करण्यात आले आहे त्याचे निवेदन करण्यात मला दूषण लागू नये; आपल्या दैवी अनुमतीने मी पृथ्वीच्या गर्भात व अंधारात खोल रूतलेले सत्य कथन करतो.

ज्युपिटरने आकाश छायेत बुडविले असताना व अंधाऱ्या रात्रीने विश्वातील रंगभांडार लुटले असताना जशी माणसे चंचल चंद्राच्या कृपण प्रकाशातून अरण्यातून चालतात त्याप्रमाणे ते प्लूटोच्या छायाविश्वातून आणि जीवन नसलेल्या घरावरून अंधारातून चालले होते; त्यांच्याभोवती छाया होत्या आणि वर रात्रीचे एकाकीपण होते प्रवेशमहालाच्या अगदी समोरच, आणि प्रत्यक्ष हेडीझच्या (पाताळ लोकांच्या) जबड्यात 'दुःख 'आणि' त्रासिक चिंता' यांनी आपली बिछायत मांडली होती, भयावह रुप असलेल्या आकृतींची तिथे वसती होती, – 'निस्तेज व्याधी' व 'एकाकी वार्धक्य' भय, दुष्ट प्रवृत्तींचा सल्लागार भूक, कुरुप, दारिद्र्य, मृत्यू यातना, पुढे मृत्यूचीं जवळची संबंधित निद्रा आणि पाप कर्मातील आनंद; पुढील उंबरठ्याजवळ मृत्यूचा दूत. युद्ध होते. दुष्ट चंडिकांच्या पोलादी कोठड्या तेथे होत्या; व पिसाट संघर्ष राक्षसी– जिचे सर्पासारखे केस रक्ताळ शिरोबंधनाने बांधले होते, ती होती.

मध्यस्थानी घन छायेचा एक पुरातन राक्षसी कल्पवृक्ष आहे. बाहूप्रमाणे त्याच्या फांद्या पसरल्या आहेत. असे म्हणतात की 'खोटी स्वप्ने' त्या वृक्षामध्ये आसरा घेतात आणि त्यांच्या पानांखाली सर्वत्र लटकून रहातात. त्या शिवाय असंख्य संकरित राक्षसी पशु आहेत. प्रवेशद्वाराशी ठाणबंद केलेले सेन्टॉर्स आहेत, अर्धमानवी सीला, शंभर हात असलेली ब्रायरिअस, भयंकर फुत्कार करणारा लर्नाचा पशु, अग्नीज्वालांचे शस्त्र धारण केलेले किमेश्‍रा राक्षस, नंतर गॉरगॉन, हार्पिज् आणि छायारूप आकृतीची त्रिदेही गेरिअन त्यांच्या दर्शनाने अकस्मात भयभीत झालेल्या इनीआसने आपले खड्ग उपसले आणि जवळ येणाऱ्या प्रत्येक पशुपुढे त्याने त्याची नग्न धार धरली. त्याच्या मार्गदर्शिकेने ही सर्व रूपे अशरीरी

आहेत, वायुरूप रिक्त आकृतींच्या मागे तरळणारे जीव आहेत असे. तिच्या विशेष ज्ञानाने सांगून त्याला सावध केले नसते तर तो त्यांच्यावर पुढे चाल करून गेला असता, आणि केवळ छायांमध्ये आपल्या खड्गाचे व्यर्थ वार करीत राहिला असता.

याच जागेपासून टार्टारिअन ॲकेरॉनकडे जाणारा मार्ग सुरु होतो. तिथे कर्दमामध्ये आणि अंधारी धुक्यामध्ये अति विस्तृत आणि सर्वग्रासी, आपला सर्व कर्दम कोसायटसमध्ये ओकणारे प्रक्षुब्ध पाताळविवर पसरले आहे. इथे कोसायटस आणि ॲकेरॉन नद्या परस्परांना उल्लंघून जातात. तिथे एक रखवालदार आहे तो नद्यांच्या प्रवाहावर लक्ष ठेवतो तो भयावह केरॉन होय, ओबडधोबड आकृतीचा, बाणेरडा, घृणास्पद भरपूर परंतु जटा असलेल्या पांढऱ्या केसांनी हनुवटी झाकलेल्या, इंगळीसारखे रखरखीत लाल डोळे असलेला, आणि खांद्यावरून गाठी मारलेले मलीन वस्त्र खाली सोडलेला केरॉन आपली नाव बांबूंच्या सहाय्याने चालवितो किंवा शिडे ताणतो, आणि अशा तऱ्हेने आपल्या भुरकट टोकरीतून प्रत्येक आत्म्याला पार करतो, कारण तो जरी वृद्ध असला तरी तो देव आहे आणि देवांचे वार्धक्य बळकट आणि हिरवट असते. इथे आत्म्यांचा समग्र लोंढा तीरावर घाईने येत होता. माता आणि बलवान पुरुष ऐहिक जीवनातील इतिकर्तव्यता पार पाडलेले उदात्तहृदयी वीरपुरूष, मुले, अपरिणीत युवती, आणि आपल्या मातापित्यांच्या डोळ्यादेखत चितेवर ठेवलेले युवापुत्र तेथे होते. शरदाच्या पहिल्या थंड शिरशिरीने गळून वाऱ्यावर उडत जाणाऱ्या अरण्यातील पानांप्रमाणे किंवा ऋतुचक्रातील थंडी ज्या पक्ष्यांच्या थव्यांना महासागरांवरून गदारोळाने हुसकावून किनाऱ्याकडे वळविते व सूर्यप्रकाशात उजळलेल्या भूमीकडे प्रयाण करण्यास मुक्त करते त्या पक्ष्यांप्रमाणे ते आत्मे अगणित होते सर्वांच्या आधी आपल्याला पैलतीरावर नेण्याकरता आत्मे तिथे विनवणी करीत उभे होते आणि दूर पैलतीरावर जाण्याच्या उत्कंठेने आपले बाहू पुढेपर्यंत पसरत होते. परंतु तो खाष्ट नावाडी कधी यांना तर कधी त्यांना स्वीकारीत असे आणि बाकीच्यांना मागे रेटीत असे व नदीच्या काठाजवळही फिरकू देत नसे.

या सर्व कोलाहलाने कष्टी होऊन इनीआस खरोखर गोंधळून गेला होता. "हे कुमारी, मला सांग.' तो म्हणाला, "नदीवर एवढा जमाव जमला आहे याचा अर्थ काय? या आत्म्यांना काय हवे आहे? कुणी किनाऱ्यावरून मागे फिरायचे आणि या जड मार्गावरून वल्हयाच्या फटकाऱ्याच्या सहाय्याने कुणाला पैलतीरी न्यायचे हे कसे ठरवायचे?" त्या दीर्घायुषी योगिनीने थोडक्यात उत्तर दिले. सुनिश्चित दैवी कुलात जन्मलेल्या अँकायसीझ पुत्रा तू जे पुढे पहात आहेस ते

कोसायटसचे खोल डोह आणि स्टीक्सची पाणथळ आहे. या स्टीक्स नदीच्या धाक बसविणाऱ्या सत्तेच्या नावाने देव शपथ घेतात आणि ती मोडण्याचे त्यांनाही धैर्य होत नाही. तुला जो हा प्रचंड समुदाय दिसतो आहे तो ज्यांच्यावर अंत्यविधी झालेले नाहीत अशा असहाय्य आत्म्यांचा आहे. तो तिथे जो रखवालदार आहे तो केरॉन आणि ज्यांना नावांतून पैलतीरी नेले जात आहे त्यांच्यावर अंत्यसंस्कार झालेले आहेत. ज्यांच्या अस्थींना यथोचित समाधीस्थानात विसावा मिळालेला नाही त्यांना या भयंकर किनाऱ्यावरून आणि या क्रुद्ध गुरकावणाऱ्या प्रवाहावरून पलिकडे वाहून नेण्यास प्रतिबंध आहे. त्याऐवजी त्यांना नदीच्या या किनाऱ्यावर शंभर वर्षे इतस्ततः भटकत राहिले पाहिजे; तोवर त्यांचा स्वीकार केला जात नाही आणि ज्यांची आत्यंतिक उत्कण्ठा त्यांना लागलेली आहे त्या स्वगृहीच्या डोहांकडे जाणारा मार्ग त्यांना मोकळा होणार नाही, ॲकायसीझ पुत्राने आपली पावले रोखली आणि गंभीर विचार करीत, त्यांच्या दुःखद अवस्थेची अंतःकरणपूर्वक कीव करीत तो थबकला; त्या संदर्भात त्याला ल्यूकॅस्पिस आणि ऑरोंटीस–त्याच्या लायसिअन गलबतांचे अधिपती– दिसले. त्यांना मृतावर विधीपूर्वक करण्याचे अंत्यसंस्कार प्राप्त न झाल्यामुळे ते दोघेही दुःखी होते. कारण इनीआसबरोबर ट्रॉयभूमीकडून वादळी सागरांवरून प्रवास करताना दक्षिण वाऱ्याने गलबत आणि खलाशी यांना पाण्याच्या कफनात गुरफटून जलसमाधी दिली होती.

आफ्रिकेहून केलेल्या सफरीत नक्षत्रपुंज न्याहाळीत असता आपल्या गलबतांच्या वरामांवरून कांही दिवसापूर्वी पडलेला व गलबतांवरून लाटांवर फेकला गेलेला कर्णधार पॅलिनरसही तिथेच भटकत होता. छाया इतक्या घनदाट होत्या की इनीआसला प्रथम त्याची दुःखी आकृती ओळखताच आली नाही. नंतर त्याला ओळखून प्रथम इनीआसच त्याच्याशी बोलला. 'पॅलिनरस, कोणत्या देवाने तुला आमच्यातून ओढून नेले आणि खुल्या सागरात बुडविले हे मला सांग. कारण जे फसवे आहे असे पूर्वी कधीही माझ्या अनुभवास आले नाही अशा अपोलोच्या भाषिताने मला पहिल्याच खेपेला चुकीचे मार्गदर्शन केले आहे. कारण तू सागरप्रवासातून सुखरूप पार पडशील आणि इटलीच्या सीमेत पोहोचशील असे भविष्य त्याने मला सांगितले होते आणि तरीही त्याने अशा तऱ्हेने आपली वचनपूर्ती केली काय?" परंतु पॅलिनरसने उत्तर दिले "ॲकायसीझ पुत्रा, माझ्या नेत्या, अपोलोच्या मंदिरातील भविष्यवाणीने तुला फसविले नाही, किंवा कुणी देवानेही मला सागरात बुडविले नाही. मी आखलेल्या मार्गावरून गलबत चालवीत असता, जे सुकाणू संभाळण्याची माझी नियुक्त कामगिरी होती, व ज्या सुकाणूच्या दांडीला मी घट्ट धरून होतो, ती दांडी अपघाताने

जोराने माझ्याकडून मुळापासून उखडली गेली, आणि मी पुढे तोंडघशी पाण्यात पडलो, आणि मी ती माझ्याबरोबर खेचून नेली. त्या कठोर सागराची शपथ घेऊन मी सांगतो की मला स्वतःविषयीच्या ज्या भयाने त्रासले होते ते भय दुसऱ्या भयाइतके- की तुझे सुकाणूयंत्र निखळून गेलेले, आणि कर्णधाराच्या हातून निसटलेले गलबत बुडून जाईल.कारण- लाटा उंच उसळत होत्या- त्या भयाइतके प्रबळ नव्हते. अमर्याद सागरावर खवळलेल्या लाटांचे तडाखे खात तीन वादळी रात्री दक्षिण वाऱ्याने मला वाहून नेले. चौथ्या दिवशी लाटेच्या माथ्यावर हलकेच उचलले गेल्यावर मला इटलीचा किनारा अंधुकसा दिसू लागला आणि मी भूमीच्या दिशेने सावकाश पोहत जाण्यास सुरवात केली मी किनाऱ्यावर पोहचण्यात जवळजवळ यशस्वी झालो होतो आणि माझ्या भिजलेल्या वस्त्रांनी भारावलो होतो. तरीही वळविलेली बोटे रोवून एका खडकाचें धारदार टोक पकडण्याचा प्रयत्न करीत असताना दुर्दैवाने काही रानटी माणसांनी त्यांच्या अज्ञानाने मला मोठी मोलाची शिकार समजून आपल्या सुऱ्यांनी माझ्यावर हल्ला केला. आता मी लाटांच्या आधीन आहे आणि वारे किनाऱ्याकिनाऱ्यांनी मला मागे पुढे लोटीत असतात. म्हणून हे अपराजित इनीआस, मी स्वर्गीच्या आनंददायी प्रकाशाच्या, आणि तू श्वसन करतोस त्या हवेच्या नावाने, तुझ्या पित्याच्या नावाने, आता प्रौढ होत असलेल्या आयुलस विषयीच्या तुझ्या आकांक्षांच्या नावाने तुझी विनवणी करतो की माझ्या या कठीण परिस्थितीतून माझी मुक्तता कर. एकतर तू स्वतःच माझ्यावर माती लोट, कारण व्हेलिआच्या बंदरास जाणारा मार्ग तुला सापडला तर तू ते करू शकशील; किंवा दुसरा काही मार्ग सुचविला तर- कारण मला माहीत आहे की स्वर्गीय अनुमती शिवाय काही आता या प्रमत्त नद्या ओलांडून, स्टिजिअन पाणथळावरून पार होण्याची तू सिद्धता करीत नाहीस. तुझ्या असहाय्य मित्राला हात दे आणि या लाटा ओलांडताना मला तुझ्याबरोबर घेऊन जा, म्हणजे निदान मृत्यूनंतर तरी मला शांत स्थानी राहता येईल." जेव्हा त्या भविष्यवादिनीने त्याला उत्तर देण्यास सुरवात केली तेव्हा त्याचे बोलणे संपले होते. "पॉलिनरस, ही अशी उद्धट इच्छा बाळगण्याचे धाडस तरी तुला कसे होते? अंत्यसंस्कार होण्यापूर्वीच कराल दैवतांच्या अदृय नदीच्या, व स्टीक्सच्या जलाचे दर्शन घेण्याची अपेक्षा करतोस? तुझी वेळ येण्यापूर्वी तुला किनाऱ्याजवळ जायचे आहे काय? दैवी आदेश प्रार्थनेने बदलता येतो असे मानण्याचे सोडून दे परंतु मी काय म्हणते ते ऐक, आणि लक्षात ठेव; तुझ्या या कठीण परिस्थितीत तुला त्या योगे दिलासा मिळेल, कारण जवळपासच्या नगरातील सर्व रहिवाशांना स्वर्गीय

संकेताने अशी आश्चर्यकारक चिन्हे दिसतील की तुझ्या शवाच्या झालेल्या अव-मानाची त्यांना भरपाई करावी लागेल; ते तुझ्याकरिता समाधी बांधतील आणि त्या समाधीवर दरवर्षी श्राद्धविधी केला जाईल, आणि त्या स्थानाला पॉलिनरसचे नांव चिरंतन प्राप्त होईल." तिच्या शब्दांनी त्याच्या चिंता पळाल्या आणि थोड्याच वेळात त्याच्या कष्टी हृदयातील यातनाही दूर झाली. त्या स्थळाला आपले नाव देण्याच्या कल्पनेने त्याला आनंद झाला.

म्हणून नंतर पूर्वीप्रमाणे ते आपल्या प्रवासास पुढे जाऊ लागले, आणि जसे नदीच्या जवळ आले तसे अजूनही स्टीक्सवर नावेत तरंगणाऱ्या त्या नावाड्याने त्याना त्या निःशब्द अरण्यातून दुरून चालत येताना आणि त्याची पावले किनाऱ्याकडे वळवताना पाहिले; तो प्रथम बोलला, आणि त्यांना दोष देत म्हणाला. शस्त्र सज्ज होऊन माझ्या नदीकडे धीटपणे येणारे तुम्ही आहात तरी कोण? चला, चटकन बोला, तुम्ही का आलात ते सांगा. पुढे येऊ नका, तिथेच थांबा आणि आहात तेथूनच बोला. ही भूमी छायांची, निद्रेची आणि सुस्त रात्रीची आहे. जे अजून जिवंत आहेत अशांना स्टीक्सवरील नावेतून पैलतिरी नेणे हे पाप आहे. हर्क्यूलीस इथे आला तेव्हा त्याला मी सरोवरात प्रवेश दिला त्याचाही मला पश्चात्ताप झाला आहे; आणि थिसिअस आणि पिरिथस हे जरी देवांचे पुत्र होते आणि पराजीत वीर होते तरी त्यांना प्रवेश दिल्याचाही मला पश्चात्ताप झाला आहे. हर्क्यूलीस, साक्षात पाताळलोकाच्या रखवालीचा कुत्रा पातालपतीच्या प्रत्यक्ष सिंहासनाखालून बळजबरीने चोरून नेण्याकरिता आणि त्याला साखळबंद करण्याकरिता आला होता. त्याने त्याला खेचून काढलेसुद्धा. तेव्हा तो कुत्रा थरथर कापत होता. थिसिअस आणि पिरिथस प्लूटोच्या राज्ञीला अगदी तिच्या वधुमंदिरातूनच पळवून नेण्याच्या कामगिरीवर आले होते" ॲपोलोच्या भविष्यवादिनीने यावर थोडक्यात उत्तर दिले. "आमचा असा विश्वासघातकी उद्देश नाही. ही शस्त्रे कसल्याही संहाराचे भय निर्माण करण्यासाठी नाहीत. अगदी धास्ती भय बाळगू नको. तुझ्या प्रवेशद्वारावरील राक्षसी रखवालदार त्याच्या गुहेतून पिशाच्चे भितीने पांढरीफटक पडेपर्यंत अनंत काळपर्यंत भुंकत राहू दे. तिच्या काकाच्या दाराआड प्रॉझरपाईनही एकनिष्ठ नांदू दे. आपल्या एकनिष्ठ सदाचाराने आणि पराक्रमी कृत्यांनी सुकीर्ती प्राप्त झालेला ट्रोजन इनीआस एरिबॉसच्या या खालील छायामय देशाकडे त्याच्या पित्याच्या शोधासाठी आला आहे. परंतु इतक्या उत्कट निष्ठेच्या दर्शनाने तुझे अंतःकरण जर द्रवत नसेल तर निदान ही खांदी तुला ओळखली पाहिजे" आणि तिने आपल्या वस्त्रात लपविलेली ती

खांदी त्याला दाखवली. केरॉनच्या अंत:करणातील क्रोधाचे वादळ शमले आणि तो त्यांना अधिक काही बोलला नाही. त्याने दीर्घकाळापूर्वी पाहिलेल्या त्या पवित्र समर्पितेकडे, त्या भाग्यदेवतेच्या कांडीकडे सादर भयाने पाहिले. त्याने आपल्या नावेचा निळा वराम त्यांच्याकडे वळविला आणि तो किनाऱ्याच्या जवळ आला. नंतर लांब बाकावर शेजारी शेजारी बसलेल्या आत्म्यांना मागे रेटले, नौकेवर येण्याच्या अरूंद मार्गाचे दार उघडले, आणि त्याच्या सर्व लवाजम्यानिशी इनीआसला नौकेच्या आत घेतले. ओझ्याखाली कुरकुरत टाके घातलेल्या त्या नावेच्या चामड्याच्या फटीतून बरेच गढूळ पाणी आत आले. त्यांनी नदी ओलांडली, आणि केरॉनने त्या भविष्यवादिनीला आणि इनीआसला, यथावकाश सुखरूपपणे करड्या वेळूमधील घाणेरड्या चिखलात उतरविले.

पाताळ राज्याच्या त्या भागातून आपल्या तीन कंठातून सर्बेरस प्रतिध्वनीत होणारे विव्हल सूर काढीत असतो. त्यांच्या पुढेच आपल्या गुहेत तो राक्षस पडला होता. परंतु त्याच्या आयाळीतील सर्प फुत्कार करू लागलेले पाहून त्या भविष्यवादिनीने त्याच्यापुढे मध आणि मादक मक्याने माखलेला गुंगी आणणारा तुकडा फेकला. भुकेने वेडावलेल्या त्या कुत्र्याने आपले तीन कंठ उघडले आणि पुढे टाकलेल्या अन्नावर झडप घातली. आणि तो आपली अजस्त्र पाठ सैल सोडून त्या गुहेच्या जमिनीवर आपल्या लांबलचक देहानिशी आडवा झाला. आता रखवालदारच बेशुद्ध पडल्यावर गुहेच्या दाराकडे इनीआस झेपावला व किनारा आणि ज्यांच्यापासून सुटका करून घेता येत नाही त्या लाटांपासून त्वरेने सरळ दूर निसटला.

लगेचच आक्रोश ऐकू आले. हे प्रवेशद्वाराशीच मोठ्याने रडणाऱ्या बाल आत्म्यांचे रडणे होते. जीवनातील माधुर्याचा त्यांचा वाटा त्यांना कधीच मिळाला नव्हता, कारण त्या काळदिवसाने त्यांना त्यांच्या मातांच्या स्तनापासून हिरावून घेतले होते आणि अकालीच मृत्यूच्या खाईत लोटले होते. त्यांच्यानंतर ज्यांना खोट्या आरोपावरून देहदंडाची शिक्षा झाली होती ते होते. परंतु इथे त्यांच्या जागा पंचमंडळाने न्यायाने चिठ्ठ्या टाकून नियुक्त केलेल्या असतात. कारण या न्यायमंदिराचा अध्यक्ष म्हणून मिनॉस पात्र हलवितो, मुग्ध आत्म्यांची बैठक बोलवितो, आणि जगलेल्या जीवनांचे वृत्तांत आणि केलेले आरोप ऐकून घेतो. या आत्म्यांच्या पलिकडे शेजारच्या जागांत, ज्यांनी निरपराध असूनही प्रकाशमय जगताविषयीच्या आत्यंतिक घृणेने जीवन झुगारून देऊन आपल्या स्वतःच्या हाताने मृत्यू स्वीकारलेला असतो ते दुःखी आत्मे असतात. आता मात्र त्यांनी

वरच्या सूर्यप्रकाशाच्या जगात संपूर्ण दारिद्र्य आणि नाना प्रकारच्या हालअपेष्टा किती आनंदाने सोसल्या असत्या! परंतु दैवी दंडकानुसार त्यांचा परतीचा मार्ग रोखला गेला आहे. ती किळसवाणी दलदल त्यांना आपल्या उदास पाण्यामागे जखडून टाकते. आणि स्टीक्सचे नऊ वेढे त्यांना बंदिवान करतात. तिथून जवळच ज्यांना ते 'शोक क्षेत्रे' असे म्हणतात ती दिसतात, आणि ती सर्व दिशांना विस्तारलेली आहेत. इथे एकाकी वाटा आणि जे प्रीतीच्या कठोर क्रौर्याने झुरतात आणि कोमेजून जातात त्यांना आसरा देणारे मर्टलवन सभोवार आहे, मृत्यूनंतरही त्यांची दु:खे त्यांना कधीही सोडत नाहीत. याच प्रदेशात इनीआसला फीड्रा आणि प्रोक्रिस दिसल्या आणि शोक करणारी आणि तिच्या पशुतुल्य पुत्राने तिच्यावर केलेल्या वारांच्या जखमा दाखविणारी एरिफिली आणि एवॅड्नी व पॅसिफी; आणि त्यांच्या बरोबरच लेओडॅमिआ आणि जी यौवनात थोडाकाल पुरुष होती परंतु आता दैवीयोजनेने तिला पुन्हा मूळ रूप प्राप्त करून देण्याचे ठरवल्यामुळ स्त्री झालेली सिनिअस होती.

त्यांच्यामध्ये फिनिशिअन डायडो होती. ती त्या विस्तृत वनात भटकत होती. तिच्या शरीरावरील जखम अजूनही ताजी होती. ट्रॉयच्या वीरपुरुषाला आपण तिच्या जवळच असल्याचे आढळले आणि ज्याप्रमाणे मासाच्या प्रारंभी एखाद्या मनुष्याला ढगातून उगवणारा चंद्र दिसतो किंवा दिसल्यासारखा वाटतो त्याप्रमाणे त्याने तिला छायांतून पुसटपणे ओळखल्याबरोबर त्याच्या नेत्रातून अश्रू ओघळले. आणि प्रीतीच्या मधुर स्वरात तो तिच्याशी बोलला "डायडो, दु:खी डायडो, म्हणजे मला कळलेले,–तू मृत्यू पावलीस, स्वत:ला खड्गावर लोटून दिलेस; आणि जीवनाच्या वाटेच्या अंतापर्यंत गेलीस–हे वृत्त तर मग खरेच होते काय? अरेरे मीच तुझ्या मृत्यूचे कारण होतो की काय? हे राज्ञी! या तारकांशपथ, उच्चपदस्थ देवांशपथ पृथ्वीच्या अवकाशात असलेल्या सत्याची शपथ घेऊन सांगतो की मी तुझा किनारा सोडून गेलो तें माझ्या स्वत:च्या इच्छेने नव्हे. परंतु ज्या दैवी आज्ञेने मी या छायांतून, घनदाट अंधाऱ्या रात्रीतून, या कोसळणाऱ्या नाशाच्या जगातून जात आहे त्याच दैवीआज्ञेने मला अनिवार्यपणे तसे करण्यास भाग पाडले म्हणून; आणि माझ्या जाण्याने तुला एवढे भयंकर दु:ख होईल हे मला कळणेही शक्य नव्हते. जरा थांब आणि माझ्या दृष्टीपासून दूर जाऊ नकोस, तू कुणापासून दूर जात आहेस? आताचे हे माझे तुझ्याशी बोलणे ही दैव माझ्यावर करू शकणारी शेवटचीच कृपा आहे," अशा शब्दांनी इनीआसने तिच्या कठोरपणात मार्दव आणण्याचा प्रयत्न केला,

आणि तिच्या अश्रूंना पाचारण केले. परंतु तिच्या ठायी क्रोधच उद्दीप्त झाला, तिने कठोरपणे त्याच्याकडे टवकारून पाहिले; नंतर नजर फिरवून ती जमिनीवर स्थिर केली. ती जर एखादी कठीण गारगोटी पाषाण असती किंवा पॅरिअन संगमरवराची उभी शिला असती तर तिच्यावर जो परिणाम झाला असता त्याहून काही अधिक परिणाम इनीआसने जे बोलण्यास प्रारंभ केला होता त्याचा तिच्यावर झाला नाही. शेवटी ती ताडकन दूर जाण्यास निघाली, आणि अजूनही तिरस्काराने पूर्ण अशी, वनाने पसरलेल्या छायत, जिथे तिच्या पूर्वीच्या पतीला, सायकिअसला तिच्या दु:खाविषयी सहानुभूती होती आणि तिच्या प्रीतीइतकीच त्याचीही प्रीती होती, तिकडे ती धावत गेली. अन्यायाने तिच्या नशिबी आलेल्या दुर्दैवाने इनीआसला धक्का बसला होता. आणि ती दूर जात असताना तो तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे साश्रुनयनांनी आणि तिच्याबद्दलच्या करुणेने भारावलेल्या हृदयाने पहात होता.

या नंतर त्याने आपले सर्व सामर्थ्य त्याच्याकरिता नियोजित केलेल्या प्रवासाच्या कारणी लावले. आता ते ज्यांनी युद्धामधे उत्तम यश प्राप्त करून घेतले होते त्यांनी गजबजलेल्या, अति दूर, एकीकडे असलेल्या क्षेत्रांच्या जवळ येत होते. इथे टायडिअस युद्धांत कीर्ती मिळवलेला पार्थेनोपिअस, आणि अॅड्रॅस्टसचा निस्तेज छायादेह हे सर्व त्याला भेटले, आणि शिवाय जो युद्धात पडला आणि ज्याच्याकरिता वरच्या मर्त्य जगात दारूण शोक केला गेला, तो डार्डानिडसही भेटला. या सर्वांची ती लांबलचक रांग पाहून त्याने अतिदु:खाने निश्वास सोडले. ग्लॉक्स, मेडॉन, थेर्सिलॉकस अॅन्टेनॉरचे तीन पुत्र आणि सिरीझला समर्पित झालेला पॉलीवीटीज्, अजूनही आपला रथ, आपली शस्त्रे यांना धरून राहिलेला आयडिअस हेही दिसले. इनीआसच्या उजव्या व डाव्या बाजूंना या आत्म्यांनी गर्दी केली, त्याच्या केवळ एका दर्शनाने त्यांचे समाधान झाले नाही. त्यांना त्याच्याशी बोलत राहण्याची, त्याच्याबरोबर जवळून चालण्याची आणि तो तेथे का आला आहे हे त्याच्याकडून ऐकण्याची इच्छा होती. परंतु ग्रीक सेनानी आणि अॅगमेमनॉनने नेतृत्व केलेली प्रचंड सेना मात्र छायांमध्ये आपल्या चिलखतात तळपणाऱ्या आपल्या शत्रूच्या दर्शनाने भयंकर भयाने चळचळ कापू लागली, पूर्वी जसे ते आपल्या गलबतांकडे पळून गेले होते तसे काही आताही पळण्यासाठी वळले; व इतरांनी कुजबुजणारे आवाज उठवले; परंतु रणगर्जना करण्याच्या त्यांच्या प्रयत्नाने त्यांची तोंडे मात्र नुसतीच वासली गेली.

आणि आता इनीआसला सर्व शरीर छिन्नविछिन्न झालेला प्रायमपुत्र डाया-फॉबस दिसला. त्याचा चेहरा आणि दोन्ही हात निर्दयपणे ठेचून काढलेले होते; जिथून त्याचे कान छाटले होते तिथे दोन्ही बाजूला त्याचे मस्तक अगदी घायाळ झाले होते. आणि नाकपुड्या मुळापर्यंत कापल्या गेल्यामुळे तिथ हिडीस जखम झाली होती. त्याला झालेल्या भयानक शासनाचे स्वरूप लपविण्याकरिता तो लपून छपून मागे रहात होता, त्यामुळे इनीआस त्याला प्रथम ओळखू शकला नाही तरी इनीआस डॉयाफॉबसशी त्याला परिचित असलेल्या आवाजात बोलला, "महाप्रतापी शस्त्र धारण करणाऱ्या ट्यूसरच्या उच्च कुलात जन्म झालेल्या डायाफॉबस, तुझ्यावर असा अमानुष सूड उगविण्याची इच्छा कुणाला झाली? तुझ्यावर मात करण्याचे सामर्थ्य कुणाला प्राप्त झाले होते ? मी असे ऐकले होते की त्या शेवटच्या गदारोळात तू मृतांच्या राशीवर कोसळलास. कारण ग्रीकांचा अखंड संहार करून तू थकून गेला होतास. नंतर मी माझे कर्तव्य म्हणून -हीटिअन किनाऱ्यावर तुझ्या नावाने स्मारक उभारले आणि तीन वेळा तुझ्या छायादेहाला मोठ्याने पाचारण केले. तुझे नाव आणि तुझी शस्त्रे तुझ्या समाधीस्थानावर तुझ्या खुणा म्हणून आहेत. परंतु माझ्या मित्रा, मी निघून जाताना तुझ्या देहाचे मातृभूमीत दफन करण्याकरता तू स्वतः मात्र माझ्या दृष्टीस सापडला नाहीस"

प्रायमपुत्राने त्याला उत्तर दिले. मित्रा तू काही करायचे ठेवले नाहीस, डायाफॉबसचे स्वतःचे म्हणून तू जे काही करावयास हवे होते ते सर्व तू केले आहेसच आणि त्याच्या मृतदेहाच्या छायेचेही सर्व काही केले आहेस, माझी.स्वतःची दैवगती आणि खुनशी स्पार्टन हेलनचा दुष्टपणा यामुळेच मी या यातनांच्या खोल गर्तेत बुडालो आहे. तिनेच ही तिची स्मृतीचिन्हे माझ्या शरीरावर ठेवली आहेत. आपण ती शेवटची रात्र आनंदाच्या भ्रमात कशी घालविली हे तुला माहीत आहेच, आपण हे अगदी पक्के स्मरणात ठेवल्याशिवाय सुटकाच नाही. जेव्हा तो नियती-स्वरूप अश्व आपल्या उदरात सशस्त्र पायदळाचे भले मोठे ओझे वागवीत आपल्या संरक्षण दुर्गाच्या उंच भिंतीवरून उड्डाण करून आला तेव्हा धार्मिक विधीनृत्याच्या मिषाने ट्रोजन स्त्रियांच्या एका मेळाव्याचे सर्व नगरीभोवताली पिसाट आरोळ्या मारीत बॅकसचा उत्सव साजरा करीत, ती नेतृत्व करीत होती. त्यांच्या मध्ये असतानाच तिने स्वतः एक भला मोठा पलिता उंच धरला आणि आमच्याच बाले किल्ल्याच्या एका मनोऱ्यावरून तिने ग्रीकांना येण्याचा इशारा केला. त्यावेळी मी आमच्या अरिष्टकारी शयनमंदिरात, चिंतांनी शिणून गेल्यामुळे निद्रेने जड होऊन पडलो होतो. यातनारहित मृत्यूने लाभणाऱ्या शांततेसारखाच गाढ, गोड निद्रेने

मी भारावलो होतो. तोवर त्या स्पृहणीय पत्नीने आमच्या घरातील प्रत्येक शस्त्र नाहीसे केले, माझ्या उशीखालील माझे भरवशाचे खड्गही तिने प्रथमच काढून घेतले होते. नंतर तिने दरवाजे सताड उघडले आणि मेनिलेलॉसला घरात बोलविले. आपण आपल्या पूर्वीच्या प्रियकरावर मोठे उपकार करीत आहोत आणि त्यामुळे आपल्या पूर्वीच्या पापांची स्मृतीही पूर्णतः पुसून जाईल, असे तिला खचित वाटले, असावे. परंतु ही कहाणी अधिक लांबविण्याचे प्रयोजन काय? ते आमच्या शयन मंदिरात घुसले आणि त्यांच्याबरोबर दुष्टकृत्यास नेहमीच चेतावणी देणारा इऑलिड युलिसीझ होता. हे देवानो! सूडाची प्रार्थना करणारे हे ओठ जितके निश्चितपणे निष्पाप आहेत तितक्याच निश्चितपणे अशाच भयंकर यातनांनी ग्रीकांनासुद्धा कृत-कर्माचे फळ मिळू दे. पण जाऊ दे! आता बोलायची तुझी पाळी. अजून जीवंत जीव असता कुठल्या साहस कृत्यांनी तुला या ठिकाणी आणले ते तू मला सांग. सागरावर मार्ग चुकून तुला इथे यावे लागले का? की देवांच्या काही सुचनेने तुला इथे पाठविले? तसे नसेल तर असे कोणते दैव तुझ्या पाठीशी लागले होते की तुला या कृष्ण अरा-जकाच्या भूमीतील उदासीनतेच्या असूर्यपश्च वसतीस्थानांना भेट द्यावी लागली?

हे असे परस्पर भाषण चालू असता उषा आपल्या गुलाबी रथातून तिच्या भ्रमण मार्गाने आकाशमध्यावरून निघून गेली. त्याच्याबरोबर अद्यापि असलेल्या सिबिलने तुटकपणे बोलून इनीआसला सूचना केली नसती तर त्यांनी कदाचित त्यांना दिलेला सर्व वेळ या अशाच बोलण्यात घालविला असता. ती म्हणाली "इनीआस, रात्र पडू लागली आहे, तरीही आपण आपला वेळ रडण्यातच व्यर्थ घालवीत आहोत! मार्ग इथेच दोन दिशांना दुभंगतो; एक वाट,– उजवीकडील,– सरळ सामर्थ्यशाली प्लूटोच्या दुर्गतटबंदीकडे जाते आणि आपण याच मार्गाने आपला ईलिसिअमचा प्रवास करणार आहोत. आणि डावीकडील दुसरी वाट पापी माणसांना देवांचे वास्तव्य नसलेल्या टार्टरसकडे नेते आणि अविरतपणे त्यांना पुरेपूर शासन करते, "डायाफोबस उत्तरला. "परमपूज्य योगिनी, रागवू नकोस. मी जातो आणि पुन्हा एकदा आत्म्यांमध्ये माझी जागा घेतो व उदासीनतेच्या स्वाधीन होतो. ट्रॉयच्या वैभवा! तू तुझ्या मार्गाने जा, माझ्यापेक्षा अधिक सुखी दैवगती तुझ्या वाट्यास येऊ दे." तो अधिक काही बोलला नाही, परंतु हे बोलत असतानाच त्याने पाऊल मागे घेतले.

इनीआसने वळून पाहिले आणि त्याला एका खडकाच्या पायथ्याशी तीन गोल भिंतीनी वेढलेली विस्तीर्ण दुर्गतटबंदी आणि त्यांच्याभोवती प्रवाहात तप्तशुभ्र ज्वाला आणि गडगडणारे व भिरभिरणारे शिलाखंड असलेली मोठ्या वेगाने

वाहणारी नदी डाव्या बाजूला अचानक दिसली; ही टार्टरिअन फ्लेगेथान, 'पाताळातील जळती नदी' होती. समोरच जाडजूड वज्राचे स्तंभ असलेले प्रचंड प्रवेशद्वार होते. ते इतके मजबूत होते की कोणतीही मानवी शक्ती, फार काय, हल्ला करणारे स्वर्गातील देवही ते उखडू शकले नसते. एक लोहाचा मनोराही आकाशात उंच गेला होता, तेथे रक्ताळलेल्या वस्त्रात गुरफटलेली, रात्रंदिवस कधीही न झोपणारी प्रवेश प्रांगणाची रक्षिका टायसिफॉनी बसलेली होती. आतून विव्हळणी स्पष्टपणे ऐकू येत होती. क्रूरपणे फटके मारल्याचे व खणखणणारे साखळदंड ओढीत नेल्याचे आवाज येत होते. हा गोंगाट आणि आरोळ्या भयभीत होऊन ऐकत इनीआस थांबला आणि म्हणाला. "कुमारी, इथे दुष्टपणाचे कसले प्रकार चालतात हे मला स्पष्टपणे सांग. आणि कसल्या छळानी हे पापी लोक गांजले जात आहेत? इतका भयंकर आक्रोश वातावरणात का उठत आहे?"

मग ती भविष्यवादिनी पुढीलप्रमाणे सांगू लागली. "ट्रोजनांच्या प्रथितयश नायका, कुणीही मनुष्य जो हृदयाचा शुद्ध आहे त्याने या पापनगरीच्या उंबरठ्यावर पाऊल ठेवणे हे निषिद्ध आहे. परंतु जेव्हा हेकॅटीने मला ॲव्हर्नसच्या वनावर अधिसत्ता प्रदान केली तेव्हा तिने मला सर्व पाताळ लोक फिरवून दाखविला आणि दैवी शासनपद्धती स्पष्ट करून सांगितली. नॉसॉसच्या ऱ्हॅडमॅन्थसची सत्ता इथे चालते आणि त्याची सत्ता पूर्णतया निर्दय आहे. फसविण्याच्या प्रत्येक प्रकाराची तो सुनावणी घेतो, आणि प्रत्येक अपराधाची निर्भत्सना करतो. प्रत्येक पाप्याला त्याने वरच्या जगात प्राप्त केलेल्या, परंतु गुप्ततेच्या काल्पनिक आनंदात मरणकालापर्यंत, जेव्हा फार उशीर झालेला असतो– ज्यांची अंमलबजावणी त्याने पुढे ढकललेली असते, त्या संकल्पित प्रायश्चित्ताच्या प्रत्येक कृत्याची कबुली त्याला द्यावयास लावतो. नंतर ताबडतोब सूड उगवण्यास टपलेली टायसिफॉनी तिच्या छळयंत्रानिशी अपराध्यांवर झडप घालते आणि आपल्या समक्ष त्यांना फटके मारते. त्यांच्या माथ्यावर उंच केलेला तिचा डावा हात त्यांना भयानक सर्पांचा धाक दाखवीत असतो. आणि मध्यंतरी ती आपल्या हिंस्त्र बहिणींना जमावाने येण्यास पाचारण करते. पहा, ती पवित्र दारे आता उघडत आहेत. त्यांच्या बिजागऱ्या कुरकुरत आहेत. तो ध्वनी भयंकर आहे, कसले विक्राळ रूप दारावर रखवाली करीत असते, कुठल्या प्रकारच्या रक्षिकेचे आसन प्रवेश प्रांगणात आहे ते तुला आता दिसत आहे काय? आत याहूनही उग्र, पन्नास काळी मुखे वासलेल्या राक्षसी सर्पाचे अधिष्ठान आहे. आणि शेवटी, वर स्वर्गाच्या अवकाशातील ऑलिम्पसकडे पाहण्याकरिता जितके दूरवर पहावे लागते त्याच्या दुप्पट खाली

खोल अंधारात जबडा उघडलेला टार्टरस पसरला आहे. इथे पृथ्वीदेवीचे पुरातन पुत्र, वज्राघाताने खोलवर फेकलेले, यौवनातील जोम असलेले टायटन अतिखोल गर्तेत वळवळत आहेत. इथेच मला अॅलोइसचे महाकाय पुत्र दिसले. त्यांनी विशाल स्वर्ग आपल्या हातांनी खाली खेचून ज्युपिटरला त्याच्या स्वर्गीय साम्राज्यावरून हाकून देण्याच्या प्रयत्नात स्वर्गावर हल्ला केला होता. इथेच मला सॅलमोनिअस दिसला. त्याने ऑलिम्पसवरून कोसळणाऱ्या ज्युपिटरच्या विद्युत्‌घाताची नक्कल केली होती आणि आता त्याची क्रूर शिक्षा भोगत होता. चार घोडयांच्या रथातून पलिता परजीत तो एलिसच्या नगरीतून दिमाखात दौडला. त्याच्या अवतीभोवती ग्रीकजन होते; आणि जे मानसन्मान केवळ देवांच्याच वाटयाचे आहेत ते त्याला मिळाले पाहिजेत अशी त्याने वल्गना केली. ब्राँझचा खणखणाट आणि घोडयांच्या शिंगासारख्या टणक टापांच्या खाडखाड आवाजाने वादळी मेघांची आणि वज्रघाताची कुणीही करू नये अशी नक्कल करणारा तो एक वेडा मूर्खच होता. मग सर्व शक्तिमान पित्याने आपले स्वतःचे शस्त्र घनमेघातून भिरकावले. त्याने काही कुठला पलिता नाही वापरला– किंवा जळत्या पाईनच्या खांदीच्या धुरकट प्रकाशाचाही वापर केला नाही–त्याने प्रचंड झंझावाताच्या कडकडाटाने सॅलमोनिअसला कोलांटया खात खोल पाताळात लोटले होय, आणि टिटिअसही दिसला. तो सर्व भूतांची माता असलेल्या पृथ्वीचा दत्तकपुत्र होता, त्याचा देह संपूर्ण नऊ एकरभर पसरला आहे आणि एक राक्षसी गिधाड आपल्या वाकडया टोकदार चोचीने त्याचे कधीही नष्ट न होणारे यकृत कुरतडीत असते, त्याची, वेदनांचे अतितीव्र उद्रेक होत असलेली आतडी फाडून आतील अन्न शोधीत असते. त्याच्या उरातील खोल जखमही ते कधी सोडीत नाही. त्या जखमेतील पापुद्रे पुनः पुनः वाढत असतात. तिला यातनांतून कधी उसंत मिळत नाही. लॅपिथी, इक्झीऑन, आणि पिरिथस यांच्याविषयी बोलण्याची आवश्यकता आहे का? आणि ज्याच्यावर एक काळा गारगोटीचा पाषाण कुठल्याही क्षणी कोसळण्याच्या अवस्थेत असतो आणि प्रत्येक क्षणाला घसरून कोसळत आहेच, असे वाटते त्या फ्लेगायसविषयी तरी सांगितलेच पाहिजे काय? टॅटॅलसकरिता भोजनाच्या उंच बैठकीचे सुवर्णाचे खूर लकाकत असतात, व त्या पाप्याच्या समोरच शाही मेजवानीचा भरगच्च थाट मांडलेला असतो, परंतु जवळच एक सर्पचंडिकांत भयंकर अशी चंडिका पहुडलेली असते, ती पदार्थांना मुळीच हात लावू देत नाही, हातात जळता पलिता उंच धरून ती झडप घालते आणि ढगांच्या गडगडाटासारखी ओरडते. जे जिवंत असताना आपल्या भावांचा द्वेष करीत होते, किंवा ज्याने पित्याला ताडन केले किंवा आश्रिताला फसवणुकीत गुंतविले, किंवा द्रव्यलाभ झाल्यावर लोभीपणाने

एकट्यानेच त्याचा डौल मिरवला आणि संबंधितांकरिता थोडा भागसुद्धा काढून ठेवला नाही,-असे अगणित आत्मे तिथे होते; नंतर ज्यांची व्यभिचाराकरिता हत्या झाली होती, किंवा ज्यांनी निर्लज्जपणे आपल्या स्वामीचा विद्रोह करून अधर्म युद्धात भाग घेतला होता, अशा सर्वांना आत त्यांच्या शिक्षेची वाट पाहत बंदिवान करून ठेवले होते. त्यांची शिक्षा काय आहे किंवा ते कसल्या कष्टप्रद परिस्थितीत बुडाले आहेत ते जाणून घेण्याचा प्रयत्न करू नकोस. काही प्रचंड शिलाखंड लोटीत रहातात, दुसऱ्यांना चाकाच्या आऱ्यांवर ताणून, बांधून, टांगलेले असते. थिसिअस अगतिकपणे बसलेला असतो आणि तो तसाच कालांतापर्यंत बसणार आहे; अंधारातून फ्लेगायस दारूण दुःखाने ग्रस्त होऊन अखिल मानव जातीला मोठ्याने ओरडून सूचना देत असतो, "सावध व्हा, सदाचरण शिका, आणि देवांचा उपहास करण्यास शिकू नका." आणि इथे एक आत्मा असा आहे ज्याने सुवर्णाकरिता आपली मातृभूमी विकली. आणि जुलूमशाहीचा भार तिच्या-वर लादला, दुसऱ्याने लाच खाऊन नवे दंडक लागू केले आणि ते पुनः रद्द केले, दुसऱ्या एकाने आपल्या कन्येच्या शयनमंदिरातच तिच्याशीच निषिद्ध राक्षस-विवाह केला. त्या सर्वांनी महाभयंकर पातक करण्याचे धाडस केले आणि ज्या करिता साहस केले ते पापकर्म सिद्धीस नेले. मला शंभर जिव्हा, आणि शंभर मुखे असती आणि लोहाचा आवाज असता तरी सुद्धा प्रत्येक प्रकारच्या पापाचा मला माझ्या भाषणात समावेश करता आला नसता किंवा प्रत्येक शिक्षेचे नावही यादीत घालता आले नसते.

असे बोलून अ‍ॅपोलोची ती पुराणकालीन भविष्यवादिनी पुढे म्हणाली, "परंतु ते जाऊ दे! चल आता. तुझे अंगीकृत कर्तव्य पूर्ण करण्याकरिता त्वरेने चालू लाग. आपण अधिक जलदीने जाऊ या. सायक्लोप्सच्या भट्ट्यांत घडवलेले तटा-वरील बुरुज मला दिसत आहेत, आणि आपल्या समोरच कमानदार वेशीतील दाराजवळच आणलेले पूजासाहित्य अर्पण करण्याची आपणास उच्चाधिकाऱ्यांची आज्ञा आहे." भविष्यवादिनीचे बोलणे संपल्यावर त्या अंधुक प्रकाश असलेल्या मार्गावरून ते त्वरेने बरोबर चालले. मधले अंतर त्यांनी त्वरित ओलांडले आणि त्या दाराजवळ आले. इनीआसने लगेच दारात प्रवेश केला, स्वतःच्या अंगावर ताजे पाणी शिंपडले, आणि त्याच्या समोरील उंबरठ्यावर त्याने ती फांदी उभी ठेवली.

हे केल्यानंतर त्यांचे देवीबद्दलचे कर्तव्य पूर्ण झाले होते. आणि आता ते जिथे देवांची वरदाने प्राप्त झालेल्या आत्म्यांची 'भाग्यशाली वनातील' रम्य हिरवळीवर

निवासस्थाने आहेत त्या 'आनंदभूमीत' आले होते. येथे जास्त विपुल अशी हवा या प्रदेशाना तेजस्वी प्रकाशाने नटवीत असते, आणि त्या लोकीचा स्वतःचा सूर्य आणि स्वतःच्या तारका तिथे नित्य प्रकाशत असतात. या तेजस्वी आत्म्यातील काही एकत्र क्रीडेत क्रीडांगणावरील हिरवळीवर व्यायाम घेत होते,किंवा पिवळ्या वाळूवर कुस्त्या करीत होते. दुसरे काही तालबद्ध नृत्य करीत होते. आणि नर्तन करताना गात होते. तिथे थ्रेसचा द्रष्टा, पायघोळ झगा घातलेला ऑर्फिअसही होता, तो सप्तसुरात त्यांना साथ करीत होता, कधी बोटांनी तर कधी हस्तीदंताच्या शलाकेने तो पुन्हा पुन्हा सूर काढीत होता. इथे टयुसरचा प्राचीन वंश होता,–खानदानी सौंदर्याचा वंश,– अधिक सुखासीन कालात जन्मलेले धीरोदात्त वीरपुरूष होते,– आयलस, ॲसॅरॅकस, आणि ट्रॉयचा संस्थापक डार्डानस हे होते. आश्चर्यमुग्ध होऊन इनीआसने त्यांच्या समोरच पडून असलेले त्यांचे रथ व त्यांची शस्त्रे पाहिली. त्यांचे भाले जमिनीत रोवून उभे केलेले होते; त्यांचे घोडे त्या मैदानावर मुक्तपणे चरत होते. कारण जीवनात त्यांना रथ आणि शस्त्रे यापासून जो आनंद प्राप्त होत असे आणि तुळतुळीत अश्वांची सरबराई करण्यात जो पूर्वापार रस असे तोच आता पृथ्वीच्या पोटांत चिरनिद्रा घेतल्यानंतरही त्यांच्या ठायी होता; आणि ओऽहोऽ! इनीआसला आणखी काही आत्मे त्याच्या उजव्या आणि डाव्या बाजूला हिरवळीवर भोजन करताना आणि एकत्र सूर मिळवून हर्षभरित स्तुतीस्तोत्रे गाताना दिसले; ते बे वृक्षांनी सुगंधीत झालेल्या बनात बसले होते. तिथूनच दुथडी भरून वाहणारी एरिडॅनस नदी वनराईतून उसळ्या घेत वरच्या जगात येते. इथे जे मातृभूमीकरिता लढताना जखमी झाले, आणि जे जीवनात निष्पाप देवोपासक होते, किंवा ज्यांच्या भविष्यवचनांनी ॲपोलोची कधीही अप्रतिष्ठा झाली नाही असे निष्ठावंत द्रष्टे होते, ज्यांनी आपल्या नवनव्या कौशल्याने जीवनात अधिक लालित्य निर्माण केले आणि ज्यांनी आपल्या कनवाळूपणे इतरांच्या हृदयात आपली स्मृती जागृत ठेवली असे अनेक लोक रहात होते. त्या सर्वांनी आपल्या भालप्रदेशांवर हिमधवल शिरोबंध बांधले होते. ते सर्व भोवती जमले आणि सिबिल त्यांच्याशी, विशेषतः मोठ्या जनसमुदायाच्या मध्यभागी असलेल्या आणि इतरांहून आपल्या भव्य उंचीने उठून दिसणाऱ्या (बाकीचे जेमतेम त्याच्या खांद्याला लागत होते,) आणि इतर सर्व ज्याच्याकडे पाहत होते त्या म्युझिअसशी बोलली, "हे दैवी वरदान प्राप्त झालेल्या आत्म्यांनो, आम्हाला सांगा, विशेषतः तू अतिसौम्य कवीराज आम्हाला सांग. ॲकायसीझ कोणत्या विभागात असतो, आणि तेथें नेमका तो आम्हाला कोठे भेटेल? कारण त्याला भेटण्याकरिताच आम्ही एरिबसच्या प्रचंड नद्या ओलांडून आलो आहोत." त्या वीरपुरूषाने तिला तात्काळ

आणि मोजक्या शब्दात उत्तर दिले. "इथे कुणालाही निश्चित असे निवासस्थान नाही. आम्ही वनराईच्या छायेत राहतो आणि या मृदुल नदीकिनाऱ्यावर विसावतो, किंवा झऱ्यांनी सतत हिरवी ठेवलेल्या कुरणात वास करतो. परंतु तुमच्या अंत:करणातील कल तसा असेल तर ही उतरण चढा आणि मी तुम्हाला जवळची सोपी वाट दाखवितो" असे म्हणून त्याने पुढे पाऊल टाकले, आणि ते ज्या उंचवटयावर उभे होते तेथून त्याने त्यांना तळातील दैदिप्यमान भूमी दाखविली. मग ते त्या उंचवटयावरून खाली उतरले.

त्यावेळी इनीआसचा पिता, अँकायसीझ एका खोल हिरव्या दरीत जमा झालेल्या परंतु दैवी योजनेने कालांतराने वरच्या सूर्यप्रकाशाच्या जगात आरोहण करणाऱ्या, काही आत्म्यांची विचारपूर्वक व लक्ष लावून पहाणी करीत होता. कारण दैववशात् असे घडले की तो आपल्याच सर्व वंशवृक्षाचे–त्याचे लाडके भावी नातू, त्याचे भावी भाग्य आणि दैवगती, त्यांचे शील आणि कर्तृत्व–यांचे परिक्षण करीत होता. परंतु इनीआसला हिरवळीवरून त्वरेने त्याच्याकडेच येताना पाहून त्याने त्याच्याकडे आनंदाने आपले दोन्ही बाहू पसरले. त्याच्या नेत्रातून अश्रू ओघळू लागले, आणि त्याच्या कंठातून आवाज फुटला. 'शेवटी एकदाचा तू आलास! तू माझ्याशी सत्यवचनी राहशील हे या तुझ्या पित्याला माहीत होतेच. म्हणजे तुझ्या निष्ठेने या दुर्धर प्रवासावर मात केली तर? मुला, मी तुझे मुख खरेच पाहू शकतो? आणि मला सुपरिचित असलेला तुझा आवाज खरेच ऐकतो? आणि तुझ्याशी बोलू पण शकतो? माझ्या अंदाजाप्रमाणे हे असे घडेल. अशी माझी अपेक्षा होतीच कारण या प्रवासाला लागणाऱ्या वेळाचा मी हिशोब केला होता आणि माझा हिशोब काही चुकला नाही. परंतु शेवटी इथे माझे स्वागत तू स्वीकारण्यापूर्वी, तुला ओलांडावे लागलेले देश आणि विशाल सागर व तुझ्या प्रवासातील वादळग्रस्त संकटे यांचा विचारच करवत नाही. आफ्रिकेतील राजसत्ता तुला काहीतरी अपाय करील असे मला किती भय वाटत होते;" इनीआस उत्तरला, "बाबा, वारंवार मला होणाऱ्या तुमच्या कारुण्यपूर्ण मुद्रेच्या दृष्टांतानेच मला या विश्वाच्या उंबरठ्याचा मार्ग आक्रमिण्यास प्रवृत्त केले. माझे आरमार एट्रस्कन सागरात नांगरून पडले आहे. बाबा, मला तुमचा हात हाती घेऊ द्या! माझ्या आलिंगनातून सुटून जाऊ नका!" तो बोलत असताना त्याचे मुख अश्रूंच्या लोटाने भिजून गेले. तीन वेळा त्याने आपले बाहू पित्याच्या गळ्याभोवती टाकण्याचा प्रयत्न केला. परंतु तीनही वेळी त्याचे आलिंगन व्यर्थ ठरले, कारण वहाणाऱ्या वायूप्रमाणे किंवा विरून जाणाऱ्या स्वप्नाप्रमाणे तो छाया देह त्याच्या करपाशातून निसटून जाई.

आणि आता त्या दरीच्या दूरवरच्या टोकाला एकीकडे इनीआसला झुडुपांचे बन दिसले. वनातील नेहमीची झाडांची सळसळ तिथे मोठ्याने ऐकू येत होती. आणि 'शांतीच्या निवासावरून' वाहणारी लीथी नदीही त्यांनी तेथे पाहिली. वसंतातील निरभ्र दिनी कुरणातील विविध फुलांवर मधमाशा बसाव्यात, शुभ्र चमकती कमळे सर्वत्र विखुरलेली असावीत आणि सर्व कुरण भ्रमरांच्या गुंजारवाने निनादत असावे– त्याप्रमाणे या नदीच्या सभोवार असंख्य राष्ट्रांचे व वंशांचे आत्मे विहरत होते. या अचानक दिसलेल्या दृश्याने इनीआस चमकला आणि त्याच्या बावरलेल्या अवस्थेत समोर दिसणारी ही नदी कोणती असावी, आणि तिच्या किनाऱ्यावर मोठ्या संख्येने गर्दी करणारे हे विविध लोक कोण आहेत, या त्याच्या शंकांचा खुलासा व्हावा असे त्याला वाटले. अँकायसीझने त्याला उत्तर दिले. "पुनः एकदा देहात प्रविष्ट होऊन जगणे दैवगतीने प्राप्त झालेले ते आत्मे आहेत, आणि लीथीच्या प्रवाहातील, चिंता दूर करणारे आणि स्मृतीपासून चिरंतन मुक्ती देणारे जल ते प्राशन करीत आहेत. तुला त्यांच्याविषयी सांगण्याची व ते प्रत्यक्ष व्यक्तिशः तुला दाखविण्याची माझी दीर्घकालची इच्छा होती. माझ्या कुलातील या वंशजांची सविस्तर माहिती तुला देण्याची माझी मनीषा होती ! हेतू हा की इटली प्राप्त होण्याचा, माझ्या बरोबरच तुलाही अधिकच आनंद व्हावा." "बाबा, यातील काही आत्मे इथून निर्गमन करून, आमच्या आकाशाखालील लोकात उड्डाण करून पुनः एकदा कंटाळवाणे आधिभौतिक जीवन-जगतात असे मी मानू काय ? या बिचाऱ्या आत्म्यांना आमच्या सूर्यप्रकाशाविषयी अशी विकृत आसक्ती का असावी ?" "मुला, मी तुला सांगतोच; व तुला मी गोंधळातही राहू देत नाही" अँकायसीझने आपले कथन सुरू केले आणि प्रत्येक सत्य क्रमवार स्पष्ट केले.

"प्रथमतः हे पहा; आकाश आणि भूमी, जलसागर, चन्द्राचे द्युतिमान बिंब टायटॅनिक सूर्य आणि तारे, यांना त्यांच्या ठायी कार्यरत असलेल्या ब्रम्हतत्वापासून आणि अखिल प्रचंड विश्व व्यापून राहिलेल्या आणि सर्वाठायी वसत असलेल्या व सर्व जडतत्वांना चैतन्य देणाऱ्या मानसापासून शक्ती प्राप्त होते. आत्मतत्व आणि मानस यांपासून मानव आणि पशू निर्माण झाले; आणि आत्मतत्व आणि मानस यांच्यापासून उडणारे पक्षी, आणि महासागर आपल्या संगमरवरी पृष्ठाखाली निर्माण करतो ते विलक्षण जीवही निर्माण झाले; या सर्वांना त्यांचे जीवन असते. त्यांच्या बीजांतील प्रेरणा ही अग्नीची प्रेरणा असते आणि जोवर शारीरिक व्याधींनी ते कुंठीत होत नाहीत, किंवा मृत्यूने लिप्त झालेल्या अंशानी व मृत्ति-

केव्या जड गात्रांनी त्यांची जाणीव स्तंभित होत नाही तोवर त्यांची उत्पत्ती स्वर्गीय असते. शरीर हे भयाचे आणि वासनांचे, दुःख आणि आनंदाचे मूळ असते, आणि या गवाक्षरहित बंदीशालेच्या अंधारात कैद झाल्यावर विस्फारीत डोळ्यांनी मुक्त वातावरण पाहता येत नाही त्याचेही कारण हे शरीरच आहे. आणि खरोखर शेवटच्या दिवशी जेव्हा जीवनज्योत मालवते तेव्हा शरीरव्याधी आणि सर्व दुरित कष्टी आत्म्याला पूर्णतः सोडून जात नाहीत, कारण असेही असेल की अनेक बाहेरून चिकटलेले दोष शरीरात दीर्घकाल गूढपणे पोसले व रुजले जात असतात आणि कायमचे रहिवासी होऊन बसतात. म्हणून शिक्षेच्या सहाय्याने आत्म्यांना नित्य प्रशिक्षण दिले जात असते, आणि ते त्यांच्या जुन्या पापांची किंमत शिक्षा सोसून मोजीत असतात. काहींना वाहत्या वाऱ्याच्या झोतावर असहायपणे ताणून, टांगून ठेवलेले असते. दुसऱ्यांच्या ठायीची खोल भिनलेली दुष्टवृत्ती अथांग विस्तृत आखातात धुवून टाकली जाते, किंवा ती अग्नीने त्यांच्यामधून जाळून काढली जाते. प्रत्येकाचे मृत्यूचे जग त्याच्या पात्रतेवर बेतलेले असते. नंतर आम्हाला विस्तृत एलिसिअममधे मुक्त संचार करण्याकरिता सोडले जाते; पुष्कळ दिवसांनी, कालचक्र पूर्ण होऊन आमच्यातील हट्टी अवगुण नाहीसे होऊन, जाणीव निष्कलंक शुद्ध आणि अग्नीस्फुल्लिंगाप्रमाणे तेजस्वी होईपर्यन्तचा काळ हे 'आनंदवन' आमच्यापैकी थोड्यांचे वसतीस्थान होते. या आत्म्यांनी आता पूर्ण सहस्त्रवर्षांचे चक्र आक्रमिल्यानंतर जेव्हा ते पुनः आकाशाच्या घुमटाखाली नांदायला परत येतात तेव्हा त्यांना पूर्वस्मृति असू नये व पुनः कायाप्रवेश करून जगण्याची इच्छा त्यांच्यामध्ये उदय पावावी म्हणून देवाधिदेव या सर्वांना लीथी नदीवर मोठ्या जमावांनी बोलावतो."

अँकायसीझचे बोलणे संपले आणि त्याने आपल्या पुत्राला आणि त्या भविष्यवादिनी सिबिलला परस्पर संभाषणांत मग्न असलेल्या त्या आत्म्यांच्या मोठ्या समुदायात आपल्याबरोबर नेले. नंतर त्याने उंचावरची एक जागा शोधून काढली. तिथून समोरची लांब रांग तो सरळ पाहू शकत होता, प्रत्येकाकडे लक्षपूर्वक पाहू शकत होता, आणि ते जसजसे येतील तसे त्यांचे चेहरे ओळखू शकत होता. " ये, मी तुला आता तुझे सर्व भवितव्य स्पष्ट करून सांगतो. डार्डानसच्या पुत्रपौत्रांना पुढे कोणते वैभव प्राप्त होणार आहे, इटलीत जन्म घेणारे तुझे वंशज कशा प्रकारची माणसे असतील, आपल्या बिरुदावलीचे वारस होणारे, पुनर्जन्माची प्रतिक्षा करणारे हे सुकीर्ती आत्मे कोण आहेत हे मी तुला माझ्या शब्दांनी स्पष्ट करून सांगतो. तो तिथे न रोखलेल्या भाल्यावर रेलून

उभा राहिलेला तरुण योद्धा आहे, तो नेमून दिलेल्या क्रमाप्रमाणे जगताच्या प्रकाशाच्या अगदी जवळ उभा आहे, तोच वरच्या जगाच्या वातावरणात जन्म घेणारा इटॅलिअन रक्ताच्या अंशाचा प्रथम पुरुष असेल. तो तुझा पुत्र असून त्याचे आल्बन नाव सिल्व्हिअस असेल, तू येथून गेल्यानंतर त्याचा जन्म होणार आहे, तुझी राणी लॅव्हिनिआ त्याला अरण्यात वाढवील; तो राजा होईल; राजांचा जन्मदाता होईल आणि आल्बालँगा येथून राज्य करणाऱ्या आपल्या राजवंशाचा तो मूळ पुरुष होईल. त्याच्या शेजारीच ट्रोजन लोकांचा, अभिमान वाटावा असा कुलदीप असलेला प्रोकॅस आहे, पुढे कॅपिस आणि न्युमिटर, आणि तुझ्या नामाला पुनर्जीवन देणारा, आणि जर तो खरोखरीच आल्बाच्या सिंहासनावर कधी काळी आलाच तर सत्वशील आणि महाप्रतापी राजा म्हणून सुकीर्ती प्राप्त करणारा इनीआस सिल्व्हिअस हे आहेत. काय श्रेष्ठ माणसे आहेत ही! त्यांच्या ठायी केवढे सामर्थ्य दिसून येत आहे आणि त्यांनी आपले भालप्रदेश आच्छादणारे ओकपर्ण–मालांचे नागरी किरीट कसे चढविले आहेत पहा! उंच पर्वतराजीवर ते नॉमेन्टम, गॅबी, फिडेनीची नगरी आणि कोलॅटिआची गढी आणि पॉमेटीसुद्धा, त्याचप्रमाणे इनुसचे संरक्षक ठाणे बोला व कोरा– आता अनामिक असलेली ही सर्व स्थळे ते वसवतील व एक दिवस ती प्रसिद्धी पावतील.

होय! आणि मार्सचा पुत्र रोम्युलस आपल्या आजोबाला येऊन मिळेल आणि त्याच्याबरोबर वाटचाल करील. त्याच्या धमन्यात ॲसॅरॅकसचे रक्त असेल; इलिआ त्याला वाढविणारी त्याची माता असेल. त्याच्या मस्तकावरील दोन शिरपेच तुला दिसतात काय? आणि त्याचा पिता स्वतःच्या प्रसादचिन्हाने, वरच्या जगातील तेजस्वी जीवनाकरिता त्याची नियुक्ती आधीच कशी करीत आहे हे तुला दिसते ना ? हे बघ मुला, त्याने केलेल्या शुभारंभातूनच रोम प्रथितयश होणार आहे, आणि त्याची अधिसत्ता साऱ्या पृथ्वीभर विस्तारणार आहे, व त्याची अस्मिता ऑलिम्पसपर्यन्त पोहोचणार आहे. त्या नगराची एक भिंत सात बालेकिल्ल्याभोवती बांधली जाणार आहे, आणि आपल्या रथातून फ्रिजिअन नगरांमध्ये संचार करणाऱ्या, उंच मनोऱ्यासारखा मुकुट धारण करणाऱ्या, तिने जन्म दिलेल्या स्वर्गीय कुटुंबात सुखी असलेल्या, स्वर्गात उंचावर निवासस्थाने असलेल्या आपल्या शंभर पौत्रांना प्रेमाने कुरवाळणाऱ्या बेरिसिन्टसच्या मातेप्रमाणे, अगणित वीरांनी कुसवा उजवल्यामुळे ती सुखावणार आहे. आता तुझी दृष्टी इकडे वळव आणि त्या कुटुंबाकडे पहा. ते तुझेच एकनिष्ठ रोमन आहेत कारण त्या तिथे सीझर आहे आणि आयुलसचा सर्व राजवंश आहे. त्यांचे अधिराज्य दिव्य स्वर्गा– इतके उंचावणार आहे; आणि ज्याच्या विषयीचे भविष्यभाषित तू अनेक वेळा ऐकले आहेस तो देवत्व पावलेल्या पित्याचा पुत्र, पूर्वी जिथे सॅटर्नचे साम्राज्य होते तिथे पुनः एकदा सुवर्णयुग निर्माण करणारा ऑगस्टस सीझरही खरेच तिथे आहे,

पहा; तो आपल्या साम्राज्याचा विस्तार गॅरॅमॅन्टिअन व हिन्दवासीयांच्या पलिकडे आणि नक्षत्रपुजांच्या आकाशमार्गापलिकडील प्रदेशात व ऋतुचक्राच्या आणि सूर्याच्या मार्गकक्षेपलीकडील प्रदेशातही जिथे स्वर्ग उचलून धरणारा ॲटलस झगमगत्या तारकांमध्ये जडविलेला, भ्रमण करणारा हा गोल आपल्या खांद्यावर धारण करतो तेथपर्यंत करणार आहे. आतापासूनच, त्याचा जन्म होण्यापूर्वीच, कॅस्पिअन राज्य आणि मिओटीस सरोवराभोवतालचा प्रदेश त्याच्या आगमनाच्या भाकितांनी थरथर कापत असतो, आणि नाईलची सप्तमुखे भय आणि गोंधळ यांनी व्याप्त झाली आहेत. खरेच ब्राँझचे खुर असलेल्या मृगाची शिकार जेव्हा हर्क्यू-लीझने केली व एरिमॅन्थसच्या वनात शांतता प्रस्थापित केली, आणि त्याच्या धनुष्याच्या टणत्काराने लर्नाचा थरकाप उडाला तेव्हा साक्षात् हर्क्युलीझनेही एवढा मोठा भूप्रदेश पायाखाली घातला नव्हता; किंवा बॅक्कसनेसुद्धा, जेव्हा आपले व्याघ्र नायसाच्या उत्तुंग शिखरावरून पिटाळले आणि द्राक्षवेलीच्या लगामाने आपल्या रथाचे विजयी सारथ्य केले तेव्हा एवढा मोठा भूप्रदेश ओलांडला नव्हता. आपले शौर्य आता पराक्रमाने सिद्ध करण्यास काही प्रत्यवाय आहे काय? कोणतेही भय आता आपण इटलीच्या भूमीवर पाय ठेवण्यास प्रतिरोध करु शकते काय?"

"परंतु तो दूर एकीकडे उभा असलेला, ऑलिव्हची मंजिरी प्रतीक म्हणून मस्तकी धारण केलेला आणि पूजेची उपकरणी हाती घेतलेला तो कोण आहे? त्याचे केस आणि शुभ्र दाढी असलेली हनुवटी ओळखीची दिसते. आपल्या रोमला न्यायाचे पहिलेच अधिष्ठान प्राप्त करून देणारा तो रोमचा राजा न्यूमा आहे. छोटचा क्युरेसहून आणि त्या मरूभूमितून त्याला एका महासाम्राज्यात पाचारण केले जाईल. त्याच्या नंतर तुलुस सत्तेवर येईल. तो पितृभूमीतील शांतता उधळून लावणार आहे. ऐषारामात सुखासीन होऊन, शिस्तबद्ध दलांतून विजयश्री-कडे दौडण्याचा सराव मोडलेल्या वीरांना तो शस्त्र धारण करून पुन: उठाव करण्यास लावणार आहे. त्याच्या पाठोपाठच ॲन्कस येणार आहे, तो आपली छाप दुसऱ्यांवर पाडणारा असून आतापासूनच लोकप्रियतेच्या लहरीत अतिरिक्त सुखावतो आहे. तुला टार्क्विनचा राजवंश आणि सूडबुद्धी ब्रूटसचा गर्वोद्धत आत्मा आणि परत जिंकून घेतलेले अधिसत्तादंड पहायचे आहेत काय? लोकायुक्ताचे अधिकार आणि न्यायनिष्ठुर परशु प्रथम ब्रूटसलाच प्रदान केले जातील; आणि पुन: युद्ध सुरू केल्याबद्दल, स्वातंत्र्याच्या प्रतापी नावाखाली ब्रूटस, – प्रत्यक्ष त्यांचा पिता–आपल्या पुत्रांना वधस्तंभावर चढविण्याची आज्ञा देईल. कीव येते त्याची! परंतु पुढील पिढया त्याच्या कृत्याचा गौरव करतील. सुकीर्तीची अमर्याद अभिलाषा

आणि देशभक्ती यांचाच अंतीम विजय होतो. परंतु दूर अंतरावरील ढेसी आणि ड्रुसीकडेही पहा, क्रूरपणे परशू चालविणारा टॉरक्वॅटस पहा, आणि ध्वज सोडवून परत आणणारा कॅमिलसही पहा."

'एकमेकाच्या तोडीच्या चिलखतांच्या झगमगाटांतले पलीकडचे जे आत्मे तुला दिसत आहेत ते आता एकजुटीने आहेत आणि ते जोवर या तमोमय जगाच्या दडपणाखाली आहेत तोवर एकजुटीनेच राहतील; परंतु ते जर कधी जगत्या जीवांच्या जगाच्या प्रकाशात प्रविष्ट झाले तर परस्परांच्या संघर्षातून ते जे भयंकर युद्ध, लढयांतील कटुता, आणि संहार सुरू करतील त्याचा विचारही करवत नाही. त्यापैकी एक, वधुपिता सीझर, मेनीकसच्या किल्ल्यावरून, आल्प्स् पर्वताच्या उतरणीवरून चाल करून जाईल आणि तिचा पती पॉम्पी पौर्वात्य सेनाबळाने त्याला तोंड देण्यास उभा ठाकेल. अरे माझ्या पुत्रांनो, तुमच्या आत्म्यांना दुष्ट युध्दाचे इतके अंगवळण पडू देऊ नका. तुमच्या मातृभूमीचे हे मजबूत सामर्थ्य तिच्याच मर्मावर उलटू देऊ नका. आणि माझ्याच रक्तामासाच्या असलेल्या, ऑलिम्पस कुलोत्पन्न असलेल्या तू सदयतेत पुढे असावयास हवेस, तुझ्या हातातील शस्त्रे तू प्रथम दूर झुगारली पाहिजेस.

"त्या तिथे तो ममिअस आहे. तो कोरिन्थवर विजय मिळवील आणि ग्रीकांची हत्या करून जेत्याच्या दिमाखात भव्य ज्युपिटर मंदिराकडे आपला रथ दौडत नेईल. तो दुसरा इमिलिअस पॉलस, आरगॉस आणि प्रत्यक्ष ॲगमेंमनॉनची नगरी मिसिनी यांचा उत्पात घडवून आणील, आणि महाप्रतापी ॲकिलीझचा वंशज इसिड पर्सिअस याचा वध करून आपल्या ट्रोजन पूर्वजांवर आणि भ्रष्ट केलेल्या ट्रोजन मिनर्व्हाच्या मंदिरावर झालेल्या जुलुमाचा सूड उगवील. आणि हे श्रेष्ठ कॅटो, तुझा किंवा कॉसस, तुझा उल्लेख केल्याशिवाय कुणाला कसे राहवेल? किंवा ग्रॅकस आणि त्याच्या कुटुंबाचा, किंवा आफ्रिकेचा काळ असलेल्या रणभूमी-वर वज्रद्वयासारखे असलेल्या गरजणाऱ्या स्कायपिओच्या कुलातील त्या दोघां-चाही? किंवा त्याच्या दैन्यातच त्याचे सामर्थ्य असलेल्या फॅब्रिसिअसचा? किंवा तुझ्या नांगरफाळाने खोदलेल्या फटीतून बीज पेरणाऱ्या रेगलस सिरॅनस, तुझा? मी शिणलो असता, हे फॅबी, तू मला त्वरेने कोठे जावयास लावशील? होय, मॅक्झिमस, फॅबिअसांमधील तू सर्वश्रेष्ठ आहेस- निष्क्रियतेने आम्हाला परत विजय मिळवून देऊ शकणारा तूच एकमात्र रोमन आहेस. माझी चांगलीच खात्री आहे की इतर ब्राँझमधून जास्त नाजुकपणे जिवंतपणाचा भास करणारे पुतळे हातोडीने

घडवतील, संगमरवरातून जिवंत चेहरे हळूहळू आकारांत आणतील, अधिक कौशल्याने युक्तिवाद करतील, त्यांच्या मापकांनी ताराग्रहांच्या भ्रमणाचे आराखडे तयार करतील, आणि नक्षत्रपुंजांच्या उदयाच्या वेळा सांगतील. परंतु तू, हे रोमन, लक्षात ठेव की तुला तुझ्या अधिकाराने राष्ट्रांचे नेतृत्व करायचे आहे, शांततेच्या परंपरा प्रस्थापित करणे, पराभूतांना दया दाखविणे, आणि प्रमत्तांचे गर्वहरण होईपर्यंत युद्धरत राहणे हेच तुझ्या कौशल्याचे क्षेत्र असणार आहे."

त्याचा पिता अँकायसीझ असे बोलला. ते अजूनही उत्सुकच असलेले पाहून तो पुन: म्हणाला, "तो पहा, दिव्य सर्वोच्च विजयचिन्हे परिधान करून, बाकी सर्व वीरांहून उंच असलेला तो विजेता मार्सेलस कसा दिमाखात पावले टाकीत असतांना उठून दिसत आहे. प्रचंड उठावाने विस्कळीत झालेले रोमचे सामर्थ्य तो पुन्हा पुनरुज्जीवीत करील आणि घोडदळाने चढाई करून पुन्हा पेटलेल्या युद्धांत तो कार्थेजिनिअनांचा आणि गाल्सचा पराभव करील; आणि पिताश्री क्विरिनसला तिसऱ्या वेळी जित शस्त्रे अर्पण करील."

परंतु याचवेळी त्याच्या बाजूने चालत असलेला देखणा आणि चकचकीत चिलखत परिधान केलेला परंतु अधोवदन, अधोनयन आणि मुद्रेवर उदासीनता असलेला युवक पाहून इनीआसने विचारले, 'बाबा, मार्सेलसबरोबर त्याच्या बाजूने चालणारा तो कोण आहे? तो त्याचा पुत्र आहे की त्याच्या उदंड वंशातील दुसरा कोणी वंशज आहे? त्याचे व्यक्तित्व किती उठावदार आहे आणि त्याच्या बरोबरचा परिवार त्याची किती प्रशंसा करीत आहे! परंतु जणू रात्रीचा अंधार त्याच्या मस्तकाभोवती काजळी धरीत आहे आणि त्याला विषण्णतेने झाकळीत आहे आणि त्याला ग्रासीत आहे." इनीआसचा पिता अँकायसीझ याने अश्रूंनी डबरलेल्या नेत्रांनी उत्तर देण्यास प्रारंभ केला. "मुला, तुझ्या कुलाच्या वाट्याला येणारे भयंकर दुःख जाणून घेण्याचा प्रयत्न करू नकोस. दैवगती जगताला त्याचे केवळ दर्शनच घडू देणार आहे, त्याहून अधिक काही नाही, आणि त्यानंतर त्याला भूलोकावर अस्तित्व रहाणार नाही हे स्वर्गस्थ सत्ताधीश देवानो, तुम्ही दिलेले वरदान जर फक्त त्यांच्याकडेच राहील तर रोमन लोक अतिरिक्त सामर्थ्यशाली होतील असे तुम्ही मानले. मार्सच्या रणभूमीवर, मार्सच्या रम्य नगरीजवळच वीरानी केलेला शोक खरोखरच अतिदारूण असेल. नव्याने उभारलेल्या समाधीजवळून वाहताना, हे टायबर तुला केवढी मोठी प्रेतयात्रा दिसेल! आपल्या इलिअन कुलातील दुसरा कोणताही युवक आपल्या लॅटिन पूर्वजांच्या आशा इतक्या उचावणार नाही, आणि रोमलसच्या भावी भूमीला तिच्या दुसऱ्या कोणत्याही

पुत्राविषयी एवढा गर्व वाटणार नाही, आणि हे सत्वशीलते, पुरातन एकनिष्ठते, हे युद्धात अजिंक्य असलेल्या बाहो! पायउतार होऊन शत्रूवर चाल करून जात असताना असो किंवा अश्वारुढ होऊन, तोंडास फेस आलेल्या अश्वाच्या कुशीत टाच मारतांना असो कुणीही त्याच्याशी शस्त्रबलाने मुकाबला करू शकला नसता. हे दयेस पात्र असलेल्या युवका, तू तुझ्या दुर्धर दैवगतीला काही तरी करून शह देऊ शकलास तर तू सुद्धा दुसरा मार्सिलस होऊ शकशील------ मुला, तू लिलीपुष्पांनी भरलेली ओंजळ अर्पण कर! मीही लाल फुलें उधळीन. निदान या पुष्पांजलीच्या भेटीने तरी माझ्या नातवाच्या आत्म्याला मला ममता देता यावी आणि एक परिणामशून्य कर्तव्य पार पाडता यावे."

याप्रमाणे त्यांनी त्या भूमीत, त्या अत्यंत उजळलेल्या विस्तृत प्रदेशात, सर्व काही निरीक्षण करीत फेरफटका केला, आणि आता अँकायसीझने आपल्या पुत्राला सर्वत्र फिरवून सर्व दृश्ये दाखविली व भविष्यातील वैभवाविषयी त्याच्या कल्पना-विश्वात आकांक्षा प्रज्ज्वलित केली. नंतर नजीकच्या भविष्यात त्याला कराव्या लागणाऱ्या युद्धांची त्याने पूर्वसूचना दिली. लॉरेन्टाईन राष्ट्रांचा आणि लॅटिनसच्या नगरीचा वृत्तांत कथन केला आणि प्रत्येक संकट कसे टाळावे किंवा सहन करावे हे त्याला दाखविले.

निद्रेची दोन जुळी दारे आहेत, त्यापैकी एक शिंगाचे आहे असे म्हणतात. आणि त्यातून खरी होणारी स्वप्ने सहजगत्या बाहेर पडू शकतात. दुसरे उत्कृष्ट कारागिरीचे चमकदार शुभ्र हस्तिदंताचे आहे; परंतु आत्मे तिथे दिवसाच्या प्रकाशात खोटी ठरणारी स्वप्ने पाठवितात. आणि त्याला सांगावयाचे होते ते सांगून झाल्यावर अँकायसीझ आपला पुत्र आणि सिबिल यांना त्यांच्या मार्गावर घेऊन गेला आणि त्यांना हस्तीदंताच्या दारातून त्याने बाहेर जाऊ दिले. किनाऱ्या-वरून सरळ मार्गाने थेट जाऊन इनीआस आपल्या गलबतांकडे गेला व आपल्या सोबत्यांत पुन्हा येऊन मिसळला. नंतर किनाऱ्याजवळून प्रवास करीत तो काएटा बंदराला गेला. नाळीवरून नांगर टाकण्यात आले. समुद्रकिनाऱ्याच्या बाजूने वराम खडे राहिले.

## सर्ग सातवा

# लॅशियममधील युद्ध

इनीआसच्या दाई, काईटा, तुझ्या मृत्यूने तू इटलीचा समुद्रकिनारा दुसऱ्या एका चिरंतन कथेने समृद्ध केला आहेस. आजही आमची तुजवरील श्रध्दा तुझ्या विश्रांतीधामाचे रक्षण करते. आणि त्यामध्ये जर काही मोठेपण असेल, तर आमच्या थोर पश्चिमेकडील मातृभूमीत तुझ्या नावाने तुझ्या समाधिस्थ अस्थींचे स्थान ओळखले जात आहे. म्हणून सत्यशील इनीआसने तिचे अंत्यकर्म यथासांग पूर्ण केले व तिची समाधी पक्की बांधली. नंतर समुद्रगर्भ शांत झाल्यावर त्याने बंदर सोडले आणि नेटाने आपला मार्ग क्रमिला. रात्री अनुकुल वारे पुढेपर्यंत वहात होते. व तेजस्वी चंद्रप्रकाशाने त्यांची सफर सुखद झाली होती, तरल चंद्र किरणात सागर चमचमत होता. नंतर ते संपन्न सूर्यकन्या सिर्सि हिच्या प्रदेशावरून, अगदी किनाऱ्या जवळून पुढे गेले. ती तिच्या एकांतातील कुंजातील तिच्या संगीताचे निनाद खंडित होऊ देत नाही आणि तिच्या मागावरील घुमणारी नाडीचीर उभ्या तलम विणीतून तळपत फिरत असता, रात्रीचा अंधार उजळण्याकरिता ती तिच्या भव्य प्रासादात देवदाराची सुगंधित काष्ठे जाळीत असते. त्या प्रासादातून बंदीवासामुळे चिडलेल्या क्रुध्द सिंहानी मध्यरात्रीच्या प्रहरी केलेल्या गर्जनांचे गुरकावणे, मेंढ्यांप्रमाणे कोंडवाड्यात कोंडलेल्या राठ केस असलेल्या रानडुकरांची व अस्वलांची रागीट गुरगुर आणि सावल्यांसारखे काळे देह असलेल्या मोठ्या लांडग्यांच्या आरोळ्याही कानी स्पष्टपणे येत होत्या. ते सर्व त्या अदय देवतेच्या प्रभावी वनस्पतीद्रव्याने मानवी देहातून रुपांतरित झालेले आणि आता श्वापदांचे देह आणि रूप धारण करणारे मानवी जीव होते, परंतु सत्वशील ट्रोजनांना या बंदरात प्रवेश करण्यापासून व या मंत्रप्रभावाच्या रूपांतरापासून वाचविण्याकरिता, इतकेच काय पण त्या विचित्र किनाऱ्याजवळपासही जाण्याचे टाळण्याकरिता म्हणून नेपच्यूनने त्यांची शिडे अनुकूल वाऱ्याने फुगविली. त्यांना खळखळणाऱ्या उथळ पाण्यातून पार केले आणि त्वरित त्यांची सुटका केली.

आणि आता प्रकाशकिरण सागरावर लाली चढविण्यास प्रारंभ करीत होते, गुलाबी रथातून केशरी उषा उंच आकाशातून प्रकाशमान होऊ लागली होती. त्यावेळी वारा पडला; जणू वाऱ्याने एकाएकी प्रत्येक निश्वास रोखून धरला. त्यामुळे संथ चकचकत्या पाण्यावर वल्ही प्रयासपूर्वक पडू लागली. त्याचवेळी अजूनही भूमीपासून बराच दूर असलेल्या इनीआसला एक घनदाट अरण्य दिसले. त्यामधून विपुल वाळूने पिवळी झालेली, गतिमान भोवऱ्यांनी युक्त व सुखेन वाहणारी टायबर समुद्रात उडी घेण्यासाठी झेपावत होती. नदीच्या पात्रात आणि किनाऱ्यावर घरटी असलेले नानाविध पक्षी अरण्यात विहार करीत असता सभोवारची हवा आपल्या गीतांनी कुरवाळीत होते. इनीआसने आपल्या सोबत्यांना मार्ग बदलून गलबताच्या नाळी भूमीकडे वळविण्याचा इशारा केला. आणि सहजपणे छायाघन नदीच्या मुखात प्रवेश केला.

इरॅटो, तू मला आता दर्शन दे, कारण मी आता प्राचीन लॅशिअॅमच्या राजांची नावे, त्याच्या भूतकाळातील नाना अवस्था आणि या परक्या सैन्याने इटलीच्या किनाऱ्यावर प्रथम गलबते लावली त्या वेळेची त्या देशाची स्थिती सांगणार आहे; आणि पहिले युद्ध कसे सुरु झाले तेही आठवून कथन करणार आहे. हे देवते, तू मला स्फुर्ती दे कारण मी तुझा कवी आहे. मी एका भीषण युद्धाचे आणि तुंबळ रणकंदनाचे कथन करीन; आपल्या प्रमत्ततेने मृत्यूकडे लोटलेल्या राजपुरुषांचे इट्रुरियाच्या सैन्याचे आणि शस्त्रसज्ज होऊन एकत्र उभ्या ठाकलेल्या इटलीचे मी कथन करीन; गंभीरतर घटनांची साखळी माझ्यापुढे उलगडत आहे आणि मी आता एका अधिक भव्योदात्त कार्याला प्रारंभ करीत आहे.

राजा लॅटिनस नगरांवर व शेतवाड्यावर सुखासमाधानाने अनेक शांततामय वर्षे राज्य करीत होता, आणि आता तो वृद्ध झाला होता. आम्हास असे विदित आहे की तो फॉनस आणि एक लॉरेन्टाईन वनदेवता मॅरिका यांचा पुत्र होता. पायकस हा फॉनसचा पिता होता आणि प्रत्यक्ष सॅटर्न हा त्याचा पितामह होता, असा तो दावा करू शकत होता. अशा तऱ्हेने सॅटर्न हाच त्या राजवंशाचा मूळ संस्थापक होता. परंतु इश्वरेच्छेने लॅटिनसला पुत्र नव्हता व त्याला कोणी पुरुष वारसही नव्हता, कारण त्याचा पुत्र कोवळ्या यौवनाच्या उषःकालीच त्याच्यापासून हिरावून घेतला गेला होता. त्याच्या प्रासादात त्याची एकुलती एक कन्याच काय ती उरली होती आणि त्या रम्य प्रासादाचे सर्व भवितव्य तिच्यावरच अवलंबून होते. वाढत्या वयाबरोबर ती आता विवाहयोग्य व उपवर झाली होती. विशाल लॅशिअॅममधील आणि उर्वरित इटलीमधील अनेक युवक तिची अभिलाषा करीत

होते. त्यामधे सर्वात अधिक देखणा टर्नस होता. त्याचे पितामह आणि त्यांचेही पूर्वज आणि यांचे खानदानी कुल आणि राणीची त्याच्यावरील जीवापाड माया आणि तीमुळे राजकन्येचा त्याच्याशी विवाह करून देण्याची राणीला झालेली घाई या सर्वामुळे टर्नसच्या राजकन्येवरील हक्काला अधिक जोर प्राप्त झाला होता. परंतु काही विशिष्ट नाना प्रकारच्या भयसूचक भाकितांमुळे त्या विवाहाचा मार्ग रोखला गेला होता.

त्या प्रासादाच्या मध्यभागी, उंच छपरांच्या अगदी आतील, अंतर्भागात एक पल्लवांनी डवरलेला पवित्र आणि भीतीयुक्त आदराने अनेक वर्षे रक्षिलेला लॉरस वृक्ष होता. असे म्हणतात की प्रमुख लॅटिनस त्याच्या दुर्गाचे बांधकाम सुरू करीत असता त्याला तो वृक्ष आढळला. त्याने तो फीबसला विधीपूर्वक अर्पण केला, आणि आपल्या रहिवाशांना लॉरेन्टाईन हे नामाभिधान त्या वृक्षावरून दिले. अचानक मधमाशांचा एक प्रचंड ढग मोठ्याने गुणगुणत निरभ्र हवेतून भ्रमण करीत आला आणि त्या लॉरस वृक्षाच्या शेंड्यावर अचानक गर्दी करून बसला. त्या माशांनी आपले पाय एकमेकात गुंफले आणि एका हिरव्या पानाच्या फांदीवरून त्या एका समूहाने लटकल्या. सर्व आश्चर्यचकित झाले. तात्काल एका द्रष्टयाने घोषित केले. 'मला असे स्पष्ट दिसते की एक परदेशी योद्धा लवकरच येणार आहे; ज्या दिशेने या मधमाशा आल्या त्याच दिशेने येत असलेली त्याची सेना मला दिसत आहे. जिथे या मधमाशा बसल्या आहेत आणि आपल्या दुर्गाच्या शिखरावरून स्वामीत्व गाजवीत आहेत, तिथेच ती सेना येणार आहे. शिवाय राजकुमारी लॅव्हिनिआ आपल्या पित्याशेजारी उभी असताना जेव्हा लॅटिनसने पाईन वृक्षाच्या पवित्र समिधा टाकून वेदाग्नी पेटविला, त्यावेळी एक भयंकर प्रकार घडला. लॅव्हिनिआचे लांबसडक केस पेटले आणि तिचे वस्त्रालंकार तडतडणाऱ्या ज्वालात जळून जाताना दिसले. तिचे राजशाही थाटाने गुंफलेले सुंदर कुंतल आणि तिचा शानदार रत्नजडीत मुकुट पेटला होता; आणि गडद लाल ज्वालांमधून येणाऱ्या धुराने वेष्टिलेल्या तिच्या देहातून साऱ्या प्रासादात अग्नी स्फुलिंग, जणू व्हल्कनच्या भट्टीतून, विखुरले. हे भयंकर धक्कादायक दृश्य खरेच एक दृश्य चमत्कार मानले गेले. द्रष्टयानी घोषणा केली की तिच्या दिव्य भवितव्याने ती राजकन्या सुकीर्ती पावेल. परंतु या चिन्हावरून राष्ट्राला मात्र भयंकर युद्धाचा धोका संभवतो.

या चमत्कारांनी भयभीत होऊन लॅटिनसने आपल्या पित्याच्या, दैवाची भविष्यभाषिते करणाऱ्या फॉनसच्या मंदिराला भेट दिली. त्याने अल्बुनिआच्या झऱ्याखालील

अरण्याला कौल लावला. सर्व अरण्यात श्रेष्ठ असलेल्या अल्बुनिआच्या अरण्यात एका पवित्र झऱ्याचा नाद प्रतिध्वनित होत असतो. आणि छायातून गंधकाच्या वायूचे घातक भपकारे उठत असतात. या दैवी वाणीतूनच इटली आणि इनोट्रिआ ही राष्ट्रे आपल्या समस्यांची सोडवणूक करून घेण्याचा प्रयत्न करतात. तिथे प्रथम एक पुरोहित आपली यज्ञीय द्रव्ये आणतो. आणि नंतर जमिनीवर पसरलेल्या बळी दिलेल्या मेंढयांच्या चामडयांवर निजून रात्रीच्या नीरव शांततेत निद्रेला पाचारण करतो. त्या निद्रेत त्याला अनेक गूढ तरल दृष्टांत दिसतात, आणि विविध प्रकारचे आवाज ऐकू येतात; देवांशी संवाद करून त्याला ज्ञान प्राप्त होते. आणि तो खोलवर असलेल्या ॲव्हर्नसमधील आत्म्यांशी बोलू शकतो. पिता लॅटिनस स्वतः जातीने या स्थळी कौल लावण्याकरिता गेला. त्याने भरपूर लोकर असलेली दोन वर्षांची शंभर मेंढरे विधिपूर्वक बळी देण्याची व्यवस्था केली. आणि त्यांच्या चामडयांच्या राशीच्या लोकरीवर तो पडून राहिला. खोल अरण्यातून एकाएकी उच्चस्वरात उत्तर आले; "माझ्या मुला! लॅटिन कुलात तुझ्या कन्येचा विवाहसंबंध जुळविण्याचा यत्न करू नको. अगदी हाताशी असलेल्या कोणत्याही विवाहसंबंधाचा भरवसा धरू नको. इथे आता परकी माणसे येतील, विवाहाने तुझे ते संबंधित होतील, आणि हे परकीय आपल्या रक्तात त्याचे रक्त मिसळून आपल्या नावाची कीर्ती तारकांइतकी उचावतील : त्यांच्या घराण्यातील वंशजांना, त्यांच्या सत्तेवर व इच्छेनुसार चालणारे, जिथे जिथे सूर्य आपल्या प्रदक्षिणा मार्गावर भ्रमण करतो तेथील पूर्वेपासून पश्चिमेकडील सागरांनी मर्यादित असे सर्व जग त्यांच्या पायाशी लीन झालेले दिसेल." रात्रीच्या निःशब्द शांततेत आपला पिता फॉनस याजकडून मिळालेले हे उत्तर आणि सावधानतेच्या सूचना लॅटिनसला कुणालाही न सांगता, स्वतःपुरत्या गुप्त राखता आल्या नाहीत कारण जेव्हा ट्रॉयच्या योद्ध्यांनी आपले आरमार नदीच्या तृणाच्छादित किनाऱ्याला लावले तेव्हा इटलीतील नगरातून दूरवर ते वृत्त आणि ती अफवा आधीच पसरली होती.

इनीआसने आपल्या प्रमुख कप्तानांसमवेत आणि देखण्या आयुलससह एका उंच झाडाच्या फांद्यांच्या छायेखाली तळ टाकला. त्यांनी भोजनाची सिद्धता केली आणि स्वर्गीच्या ज्युपिटरने त्यांना तशी प्रेरणा दिल्यामुळे, मेजे आणि अन्नाकरिता पात्रांच्या ऐवजी गवतावर त्यानी पिठाच्या रोटया ठेवल्या. आणि सिरीझने पुरविलेल्या त्या बिछायतीवर त्या प्रदेशातील फळांची रास रचली. प्रकार असा घडला की सर्व अन्न संपल्यावर अजूनही भूक शमली नसल्यामुळे व खाण्यास दुसरे काहीच न उरल्यामुळे त्यांना जेवण वाढलेल्या पिठाच्या पातळ थाळ्यांकडे वळणे

भाग पडले; त्यांनी त्या आपल्या बोटांनी व जबडयांनी काडकन मोडल्या, आणि भवितव्याचा हा वाटोळा टणक घास दाताखाली धरला; रोटयांच्या त्या चतकोरांना त्यांनी मुळीसुद्धा दयामाया दाखविली नाही. आयुलस थट्टेने म्हणाला. "अरे! आपण तर आपली मेजेच चघळतो आहोत!" तो सारे एवढेच म्हणाला त्याचे हे विधान कानी पडल्याबरोबर, ते त्यांच्या हालअपेष्टा संपत आल्याचे पहिले चिन्ह होते असे वाटले. त्याच्या पित्याने, त्याने उच्चारलेल्या त्या शब्दांमधील सूचक दैवी अर्थाने भयचकीत होऊन, आयुलसला पुढे बोलू दिले नाही. त्याने तत्काल ते शब्द उचलून धरले. व लगेच प्रार्थना केली. 'हे आमच्याकरिता दैवाने राखून ठेवलेल्या भूमी, तुला अभिवादन असो! हे आम्हाला कधीही अपयश न देणाऱ्या ट्रोजनांच्या कुलदैवतांनो, तुम्हाला अभिवादन असो! आता इथेच तुमचे निवासस्थान असणार आहे. हीच तुमची पितृभूमी आहे. कारण माझ्या आठवणीप्रमाणे, माझ्या पित्याने अगदी हेच दैवगतीचे रहस्य माझ्या अंतरंगात बिंबविले होते; 'मुला, जेव्हा तू अज्ञात किनाऱ्याला लागशील, तुझे अन्न संपलेले असेल आणि भूक तुमची मेजे खाण्यास तुम्हाला भाग पाडील, तेव्हा लक्षात ठेव की तू कितीही शिणला असलास तरी शेवटी आसरा मिळण्याची अपेक्षा उत्पन्न झाली आहे. म्हणून तुझी पहिली वास्तु बांधण्याकरिता जागा शोधण्यास आणि तिच्या संरक्षण-योजनेवर श्रम करण्यास प्रारंभ करण्यास विलंब लावू नकोस, त्यांना अभिप्रेत असलेली ती भूक हीच असावी. आम्हाला अगदी अखेरीस लागणारी व आमच्या आपत्तींना सीमित करणार होती ती भूक हीच असावी. चला तर मग, सूर्याच्या पहिल्या किरणाबरोबर ही भूमी कोणती आहे, तिचे रहिवासी कोण आहेत, त्यांचे रक्षण केलेले नगर कोणते आहे हे आपण सुस्वस्थ चित्ताने सगळीकडे फिरून शोधू. या बंदरापासून वेगवेगळया वाटांनी आपण जायला हवे. तोवर ज्युपिटरला मद्याचे अर्घ्य चषकातून अर्पण करा, तुमच्या प्रार्थनेतून अँकायसीझची आळवणी करा, आणि मेजांवर अधिक मदिरा येऊ द्या." असे म्हणून त्याने स्वतःच्या मस्तकावर पर्णमंजिरी धारण केली आणि तेथील स्थलदेवतेची प्रार्थना केली. सर्व देवतांमध्ये अग्रभागी असलेल्या पृथ्वीदेवतेची, नंतर वनदेवतांची व त्यांना अजून अज्ञात असलेल्या नद्यांची प्रार्थना केली; नंतर त्याने निशा आणि आता उगवत असलेल्या निशेच्या तारकांना पाचारण केले, इडाचा ज्युपिटर, व माता फ्रिजिअनची यथाक्रम प्रार्थना केली, त्याच्या स्वर्गात असलेल्या मातेचे व खाली पाताललोकात असलेल्या पित्याचे त्याने स्मरण केले. तात्काल सर्वशक्तीमान पित्याने वरील निरभ्र आकाशातून तीन वेळा गर्जना केली, आणि उंच आकाशात सुवर्णकिरणांनी तळपणारा मेघ दृश्यमान झाला; त्या पित्याच्या हस्तस्पर्शाने तो थरथरत होता. आश्वासित

नगराच्या भिंतीचा पाया भरण्याचा दिवस प्राप्त झाला आहे अशी वदंता ट्रोजन तळामध्ये आता वेगाने पसरली. एकजुटीने, चढाओढीने पुनः भोजनसिद्धता करण्याकरिता त्यांनी गडबड सुरू केली. या प्रभावी सुचिन्हाने आनंदित होऊन त्यांनी पाकसिद्धीची पात्रे पुढे मांडली आणि मदिरापात्रांना पुष्पहारांनी शृंगारले.

दुसऱ्या दिवशी आपल्या दिप्तीच्या प्रथम स्पर्शाने भूमंडल संमार्जित उषा आल्यानंतर ट्रोजन त्या नगराच्या, त्या प्रदेशाच्या, आणि त्या लोकांच्या वापरा–तील समुद्रकिनाऱ्याच्या शोधार्थ विखुरले. इथे त्यांना न्यूमिकसच्या झऱ्याचे डोह सापडले, इथेच टायबर नदी आणि शूर लॅटिन पुरुषांची वसतीस्थाने आढळली. अँकायसीझ पुत्राने आपल्या सर्व दर्जाच्या अनुयायांतून एक शंभर दूत निवडले त्यांना मिनर्व्हाच्या ऑलिव्ह डहाळचा धारण करून, नजराणे घेऊन राजाच्या भव्य दुर्ग तटांकडे जाऊन, ट्रोजनांकरिता मैत्रीची मागणी करण्यास आज्ञा केली. अशी आज्ञा झाल्यावर ती पालन करण्याकरिता ते त्वरित आपल्या मार्गाला लागले. इनीआसने मध्यंतरी नगराभोवती बांधावयाच्या भिंतींच्या जागेची खूण म्हणून एक खोल चर खणून घेतला, आणि त्या स्थानावर झटपट कामाला आरंभ केला, व समुद्र-किनाऱ्याजवळच एक, भोवती मातीचा तट व कोट असलेले, लष्करी तळासारखे आपले पहिले घर बांधले.

तरुण ट्रोजनांनी आपला प्रवास आता संपविला होता, आणि त्यांना वरच्या बाजूस दृष्टीक्षेप करता लॅटिन लोक रहात असलेली अनेक घरे आणि उंच मनोरे दिसले. ते तटभिंतींजवळ गेले ·नगराच्या पुढे, किशोर आणि तारुण्याच्या नव्हाळीतील युवक घोडदौडीची तालीम करीत होते, धुळीचें लोट उडवीत रथांचे सारथ्य करण्यास शिकत होते, बळकट धनुष्ये वाकवीत होते. टणक दांडे असलेले भाले खांद्यापासून भिरभिरवीत फेकत होते. किंवा धावण्याच्या शर्यतीचे किंवा मुष्टीयुद्धाचे आव्हान एकमेकांना देत होते; त्याचवेळी दौडत पुढे आलेल्या एका दूताने अपरिचित वेषातील उंच परदेशीयांच्या आगमनाची वार्ता वृद्ध राजाच्या कानावर घातली. त्यांना प्रासादात बोलावून घेण्याची आज्ञा राजाने दिली, आणि तो मध्य-भागी आपल्या पूर्वजांच्या सिंहासनावर स्थानापन्न झाला. नगरातील सर्वोच्च भूमीवर असलेली, शंभर स्तंभांनी जिचा उंच डोलारा तोलून धरला आहे अशी लॉरेन्टाईन पायकसच्या प्रासादाची ही वास्तु अतिभव्य होती. दाट वृक्षराईत असलेले हे स्थान पारंपारिक आदराने भारावलेलें होते व त्याचा भीतियुक्त दरारा वाटत होता. वैभवशाली रियासत हवी असलेल्या प्रत्येक राजाला गादीवर आल्या-वर राज्यारोहणाच्या वेळी याच वास्तु राजदंड ग्रहण करून राजकर्तव्याची धुरा

धारण करावी लागत असे. तो प्रासाद म्हणजे एक मंदिर होते आणि लॅटिन लोक त्याचा विधिमंडळ सभागृह म्हणून उपयोग करीत असत. ज्यावेळी नगरश्रेष्ठी रुढी-नुसार मेंढा बळी देत असत आणि अखंड लांब रांगांनी मेजाशी बसत असत तेव्हा त्या धार्मिक प्रसादग्रहण प्रसंगी भोजनगृह म्हणूनही तो वापरला जाई.

तिथेंही, प्रवेशप्रांगणाजवळ, पुरातन देवद्वार काष्ठात कोरलेले पूर्वजाचे पुतळे क्रमवार उभे होते. इटॅलस, द्राक्षांची लागवड करणारा पिता सॅबिनस, त्याच्या काष्ठप्रतिमेत त्याने वाकडा विळा धारण केला होता. वृद्ध सॅटर्न, दोन मुखे असलेला जेनस, आणि प्रारंभापासूनचे इतर राजे, आणि मातृभूमीकरिता लढताना युद्धात घायाळ झालेले वीरही होते. तेथील पवित्र स्तंभावर अनेक शस्त्रेही लटकविली होती; त्याचप्रमाणे शत्रूकडून जिंकलेले रथ, वक्रधारा असलेले परशु, शिरस्त्राणा-वरचे तुरे, दरवाजांचे प्रचंड गज, भाल्यांचे फाळ, ढाली आणि गलबतांवरून उखडून आणलेल्या नाळीच्या चोचीही ठेवल्या होत्या. आखूड दरबारी उत्तरीय परिधान केलेल्या, क्विराईन भविष्यवेत्त्याचा दंड उजव्या हातात आणि डाव्या हातात पवित्र ढाल धारण केलेल्या अश्वविद्या पारंगत अशा स्वत: पायकसची प्रतिमाही तिथे होती. सुवर्णमयी सिर्सिचा त्याच्याशी विवाह झाला होता, आणि कामातूर होऊन तिने आपल्या दंडाने त्यांच्यावर मोहिनी करून औषधीने त्याचे रंगीत टिपक्यांचे पंख असलेल्या पक्ष्यात रुपांतर केले होते.

ज्या देवांच्या मंदिरात आता आपल्या पूर्वजांच्या सिंहासनावर लॅटिनस विराजमान झाला होता ते असे होते. आणि त्याने ट्रोजनांना आपल्या दरबार दालनात येण्याची आज्ञा दिली. त्यांनी प्रवेश केला; तोच प्रथम बोलला आणि त्याने त्यांच्याशी प्रसन्न स्वराने भाषण केले.

"डार्डन हो, तुम्ही सागरावर तुमचे सुकाणु इकडे वळविण्यापूर्वीपासूनच आम्ही तुमच्या विषयी ऐकत आहोत, आणि तुमचे राष्ट्र व तुमची नगरी याविषयी आम्हाला माहितो आहे. मग तुमचा उद्देश काय आहे ते मला सांगा. कोणत्या हेतूने किंवा कोणत्या गरजेने तुम्हाला इतक्या दूरच्या निळ्या सागरी मार्गाने इटलीच्या किनाऱ्याला आणले आहे? तुमचा मार्ग चुकला म्हणून असो किंवा खलाशांना ज्या आपत्तींना सागरावर नेहमीच तोंड द्यावे लागते त्या वादळांनी पिटाळल्यामुळे असो, तुम्ही आमच्या नदीच्या पात्रात प्रवेश केला आहात आणि आता बंदराला लागला आहात तेव्हा आमचे आतिथ्य स्वीकारण्यास आणि लॅटिन लोक कोण आहेत हे समजून घेण्यास अनमान करु नका. कारण ते सॅटर्नचे

संबंधित आहेत आणि न्याय्यवर्तनाकरिता त्यांना दंडकांच्या बंधनांची आवश्यकता नसते; परंतु ते त्यांच्या स्वतःच्या सहजवृत्तीनेच न्यायप्रिय असून ते त्यांच्या पुरातन देवांच्या प्रथेची प्रतिष्ठा राखतात शिवाय ऑरनकॅन वृद्धमंडळी एक कथा सांगत असत ती मला स्मरते काल प्रवाहाबरोबर ती कदाचित पुसट झाली असली तरी त्या कथेनुसार डार्डनसने, जेव्हा ज्याला आता सॅमॉथ्रेस म्हणतात त्या थ्रेशिअन सॅमॉसची आणि फ्रिजिअन इडाच्या छायेतील नगरीची दूरची सफर केली तेव्हा त्या सफरीस तो त्याचे घर असलेल्या इट्रुस्कनमधील कॉरिथस येथून इटलीच्या किनाऱ्यावरूनच निघाला होता. आता त्यांचे तारकांनी चमकणाऱ्या नगरीतील आकाशाखाली स्वागत झाले असून तो तेथील सुवर्णप्रासादात आसनाधिष्ठित झाला आहे आणि त्याच्या वेदीमुळे देवतांच्या नामावलीत भर पडली आहे."

त्याचे बोलणे संपले आणि उत्तरादाखल त्याच्या पाठोपाठ इलिओनिअस असे म्हणाला, "हे राजा अतुल्य फॉनसपुत्रा, आम्ही तुझ्या भूमीकडे आलो ते लाटांनी लोटले म्हणून किंवा काळचा वादळाने इकडे येणे भाग पाडले म्हणून नव्हे; कुणाही तारकेने किंवा किनाऱ्याने आम्हाला चुकीच्या मार्गाला लावले नाही. सूर्याने आपल्या प्रदक्षिणेत आकाशीच्या दूरतम सीमेवरून आजवर पाहिलेल्या सर्व साम्राज्यांपेक्षा एकेकाळी बलिष्ठ असलेल्या साम्राज्यांतून, गृहहीन झालेल्या आमच्या मंडळींनी स्वेच्छेने आणि हेतुपुरःसर या नगरीकडे प्रवास केला आहे. आमच्या कुलाची प्रस्थापना ज्युपिटरने केली आहे तो आमचा पूर्वज असून आम्हा डार्डन पुरुषांना त्याचा अभिमान आहे. आमचा राजा हा स्वतः ज्युपिटरच्या श्रेष्ठ आप्तांपैकी एक आहे, त्यानेच ट्रॉयच्या इनीआसनेच आम्हाला तुझ्या द्वारी पाठविले आहे. निष्ठुर मिसींनीतून उठलेले आणि ज्याने इडाच्या सखल प्रदेशावरून सोसाटयाने आक्रमण केले ते वादळ किती भयंकर होते आणि दैवगतीने युरोप आणि आशिया या खंडाना एकत्र झुंजण्यास कसे भाग पाडले हे सर्वश्रुतच आहे. आमच्यापासून अतिदूर, पृथ्वीच्या दुसऱ्या टोकाला जिथे सागराचे प्रवाह पृथ्वीला वळसा घालून परत एकत्र मिळतात तिथे रहाणाऱ्या लोकांना आणि तप्त सूर्याखाली पसरलेल्या पंचखंडातील मधल्या, दूरवर पसरलेल्या प्रदेशातील लोकांनाही ते माहीत आहे. त्या सर्वंकष प्रलयानंतर उदंड महासागरांवर संचार केलेले आम्ही आमच्या कुलदैवतांकरिता एका लहानशा स्थानाचीच केवळ मागणी करीत आहोत; जिचा कुणालाही उपद्रव होणार नाही अशी एक किनारपट्टी, आणि सर्वांना उपभोगासाठी मुक्तद्वार असलेली हवा आणि पाणी एवढीच आमची नम्र मागणी आहे. आम्ही तुझ्या राज्याला अप्रतिष्ठा आणणार

नाही. वस्तुतः तुझ्या लॅटिन कीर्तीत अधिक भरच पडेल. या इतक्या दयार्द्र कृती-विषयी आमची कृतज्ञता कधीही लुप्त होणार नाही. आणि ट्रोजनांचे खुल्या दिल्याने स्वागत केल्याचा इटॅलिअनांना कधीही पश्चात्ताप वाटणार नाही. हे मी इनीआसच्या दैवगतीची व ज्याच्या सामर्थ्याची प्रचिती स्नेहात किंवा शस्त्र युद्धात त्याची कसोटी घेतलेल्या सर्वांना आली आहे, त्या त्याच्या प्रबळ दक्षिण बाहूची शपथ घेऊन सांगतो. अनेक राष्ट्रांनी व अनेक वंशानी आमच्याशी स्नेह-संबंध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे. व आमच्याशी एक होण्याची मनीषा बाळगली आहे. आम्ही स्वतःहून स्वेच्छेने आमच्या हातांनी, शांततेची विनंती करणारी, लोकरीने बांधलेली शिरोबंधने पुढे करीत आहोत, व आम्ही विनंतीचे शब्द उच्चारीत तुझ्याकडे आलेलो आहोत म्हणून तू आमचा उपहास करू नकोस. देवांच्या भविष्यवाणीनेच आम्हाला दुसऱ्या कोणत्याही नव्हे, तर तुझ्याच भूमीचा शोध घेण्याची आज्ञा केली व ती पाळावयास भाग पाडले; कारण याच भूमीत डार्डनस जन्मला होता. आणि अॅपोलोने आपल्या अनिवार्य आज्ञेने एट्रस्कन टायबर आणि न्युमिकसच्या पवित्र निर्झर जलाकडे व याच भूमीकडे आम्हाला पुन्हा परत बोलावून घेतले आहे. शिवाय इनीआसने त्याच्या पूर्वीच्या द्रव्य भांडारातून काही छोटे नजराणे पाठविले आहेत. जळत्या ट्रॉयमधून वाचविलेले ते स्मृत्यवशेष आहेत. वेदीवर मद्यार्घ्य प्रदान करण्याचे त्याच्या पित्याने अँकायसीझने, वापरलेले हे एक सुवर्णपात्र आहे, हा एक राजदंड आणि हा पवित्र किरीट आहे, आणि ही सर्व ट्रोजन गृहिणींनी कलाकुसरीने तयार केलेली, आणि जेव्हा प्रायम प्रथेनुसार आपल्या एकत्र जमलेल्या राष्ट्रसमूहासाठी कायदे करीत असे तेव्हा परिधान करीत असलेली ती वस्त्रे आहेत."

इलिओनिअसचे हे भाषण ऐकत असताना लॅटिनस, स्थिरपणे भूमीकडे पाहात होता आणि त्याच्या डोळ्यांच्या विचारग्रस्त हालचाली सोडल्या तर तो आपल्या आसनावर निश्चल होता. तो स्वतः राजा असल्यामुळे त्या जांभळ्या कलाकुसरीच्या वस्त्रांचा आणि प्रायमच्या राजदंडाचाही त्याच्या मनावर त्याच्या कन्येच्या विवाहाविषयीच्या आणि विवाहसंबंधाच्या व्यग्रतेइतका परिणाम झाला नाही. त्याच्या खोल अंतरंगात तो वृद्ध फॉनसच्या भविष्यभाषिताचा विचार करीत होता, दैवाच्या अभिवचनानुसार परदेशीय कुलातून येणारा वर म्हणजे खरोखर इनीआसच असला पाहिजे; त्याच्याबरोबर सत्तेमधे समाधिकारी होण्या-करिता ज्याला राज्यपदावर पाचारण करावे लागणार होते तो तोच असला पाहिजे; ज्याचे पुत्रपौत्र परमप्रतापी होणार होते आणि सर्वभूमंडल जिंकून आपल्या अंकित

करणार होते, तो हाच राजपुरुष असला पाहिजे. आनंदाने त्याने लवकरच उत्तर दिले; "देवाच्या भविष्यवाणीची प्रत्यक्ष प्रचीती पटून आपल्यापुढे हे नवीन कार्य-क्षेत्र खुले होत आहे; त्यातील कार्य देवानेच तडीस न्यावे! ट्रोजनहो, तुमची मनीषा पूर्ण केली जाईल. तुमच्या नजराण्यांचा स्वीकार, मी तत्परतेने करीत आहे. जोवर लॅटिनस राजा आहे तोवर या संपन्न भूमीच्या उत्पन्नाच्या बाबतीत तुमच्यापैकी कुणालाही काही कमी पडणार नाही; एवढेच नव्हे तर ट्रॉयच्या वैभवाची उणीवही तुम्हाला भासणार नाही. आमची एकच इच्छा आहे, आमच्या मैत्रीची इनीआसला इतकी प्रबल इच्छा असेल, आणि अतिथिमित्र म्हणून आमच्याशी एकजीव होण्याची आणि आमचे मित्र म्हणवून घेण्याची इतकी घाई झाली असेल तर त्यानें स्वत: जातीने यावे, आपण आताच मित्र झालो आहोत आणि म्हणून आम्हाला समोरासमोर भेटण्याचे त्याला भय वाटू नये. माझ्यापुरते म्हणाल तर, तुमच्या राजपुत्राबरोबर हस्तांदोलन केल्याशिवाय हा व्यवहार पूर्ण होणार नाही. तुम्ही माझे उत्तर म्हणून आता माझा परतीचा निरोप घेऊन त्याच्याकडे जा. माझी एक कन्या आहे. जिचा विवाह माझ्या वंशाच्या कोणत्याही पुरुषाशी लावण्यास मला अनुमती नाही, माझ्या पित्याच्या अनेक भविष्यवचनानी आणि अनेक दैवी चिन्हांनीच त्याला प्रतिबंध केला आहे. या सर्वांनी असे वर्तविले आहे की विवाहाने तिचा ज्यांच्याशी संबंध जोडला जाणार आहे ते लोक परदेशातून येणार आहेत. लॅशिअमच्या भवितव्यात हे असे विहित केलेले आहे. हे नवीन आप्त त्यांच्या बीजाचा आमच्या बीजाशी संकर करणार आहेत आणि आमच्या कुलाची कीर्ती तारकांपार उंचविणार आहेत. माझी अंत:प्रेरणा सत्याचा अंदाज जवळ-जवळ अचूक करीत असेल तर, माझ्या इच्छेप्रमाणेही दैव इनीआसकडेच बोट दाखवीत आहे असा मला विश्वास वाटतो."

या मनमोकळ्या भाषणानंतर लॅटिनप्रमुखाने उत्तम निगा राखलेल्या तीनशे घोड्यांच्या उंच छप्पर असलेल्या शाही अश्वशाळेतून काही घोडे निवडले, आणि मानाप्रमाणे प्रत्येक ट्रोजनाकडे, जांभळे भरजरी खोगीर घातलेला आणि छातीवरून सुवर्णाचे उरस्त्राण रुळणारा, अंगावरसुद्धा सोन्याचे चिलखत असलेला, आणि एकंदर सुवर्णाच्या साजाच्या तोडीची, दातांमधे ते रगडीत असलेली लगामाची कडीही अस्सल सुवर्णाची असलेला एकेक वेगवान घोडा त्वरित पाठविण्याची त्याने आज्ञा केली. इनीआस तिथे उपस्थित नसल्यामुळे, लॅटिनसने त्याच्याकडे पाठविण्याकरिता एक रथाची व त्याला जोडण्यासाठी घोड्यांच्या एका जोडीची निवड केली. ते घोडे स्वर्गीय बीजाचे होते, आणि त्यांच्या नाकपुड्यातून येणाऱ्या

श्वासातून ज्वाला बाहेर पडत असत; धूर्त सिर्सीने लबाडीने एका अनगड घोडीचा, आपला पिता सूर्य याच्या चोरलेल्या अश्वाशी केलेल्या संकरापासून झालेल्या मिश्र अवलादीपासून जन्माला आलेली ही जोडी होती. इनीआसच्या माणसांनी घोड्यांवर स्वार होऊन, उन्नत मस्तकाने परतताना बरोबर नेलेले नजराणे आणि संदेश हे सर्व असे होते; तळावर परतताना शांततेचा करारच ते घेऊन चालले होते.

पण, पुढे पहा! ज्युपिटरची हिंस्त्र राणी, इनॅकसचे नगर, आरगॉस, येथून अंतरिक्ष मार्गाने परतत असताना, व आकाशातून दूर अंतरावर खाली पहात असताना तिला सिसिलीमधील पॅकिनसपासून पुढेच आता आनंदित झालेला इनी-आस त्याच्या डार्डन आरमारासहित दिसला. ट्रोजन आतापासूनच त्यांच्या इमा-रतीच्या बांधकामाला लागलेले आहेत, त्यानी आपली गलबते सोडली आहेत आणि ते विश्वस्तपणे भूमीवर वसाहत करीत आहेत असे तिला दिसले. तीव्र वेदनेने विद्ध होऊन ती ताठरली आणि मान उडवून, अंतःकरणातून फुटलेल्या शब्दांच्या पुराच्या उमाळ्याला तिने वाट दिली. "हे तिरस्कृत, अति तिरस्कृत ट्रोजन कुल आणि माझ्या स्वतःच्या इच्छेला विरोध करणारी त्यांची ही फ्रिजिअन नियती! सायजिअनच्या मैदानांवर ते मृत्युमुखी पडण्याची काही आशा होती काय? त्यांना पकडणारा सापळा मिटला तेव्हा ते आतच राहू शकले असते तर? अग्नीज्वालांनी ग्रासलेले ट्रॉयसुद्धा ट्रोजनांना जाळू शकले असते काय? पण नाही! रणधुमाळीतून, अग्नीप्रलयातून सरळ त्यांनी मार्ग काढला. मग अखेर माझी दैवी शक्ती संपली, आणि अगदी जमीनदोस्त झाली, किंवा माझी द्वेषलालसा मनसोक्त पुरी झाली आणि मी शांत झाले आहे असे मी मानायला हवे का? ट्रोजन घराबाहेर फेकले गेले, तेव्हा तर सागराच्या लाटांवर माझ्या क्रोधासह त्यांचा पाठपुरावा मी माझा अभिमान सोडून केला; या क्षुद्र भूमीहीनांना त्यांच्या सागर भ्रमंतीत पदोपदी ठोकर द्यायला मी होतेच! आकाश आणि सागराची सर्व शक्ती या ट्रोजनांवर खर्च केली होती! परंतु सिर्टिस किंवा सीला किंवा गव्हरे असलेल्या कॅरिब्डिजचा मला काय उपयोग झाला? आता माझी मुळीही क्षिती न बाळगणाऱ्या, व साग-राच्या भयाच्याही पार झालेल्या या ट्रोजनांची मात्र इच्छापूर्ती होत आहे! आणि त्यांना टायबरच्या किनाऱ्यावर आसरा मिळत आहे. मार्सला मात्र लॅपिथ्सांचा राक्षसी वंश नष्ट करण्याची सत्ता होती. साक्षात देवपित्याने डायनाच्या क्रोधाला प्राचीन कॉलिडॉनही बळी दिले. लॅपिथ्सांनी किंवा कॉलिडॉनने असे कोणते महा-पाप केले होते की ज्यामुळे त्याना हे घोर दुर्दैव भोगावे लागले? पण इकडे मी, ज्युपिटरची महाराज्ञी, माझ्या अपयशात कोणत्याही मानखंडनेपासून माघार न

घेण्यास स्वतःला भाग पाडूनही, कोणताही मार्ग अवलंबिण्याचे न सोडताही, मी पराजित व्हावे आणि तेही इनीआसकडून! ठीक आहे! माझी स्वतःची दैवीशक्ती जर इतकी क्षुद्र असेल तर दुसऱ्या कोणत्याही, कुठल्याही शक्तीचे सहाय्य मागण्यास अनमान करणारी मी नाही, देवांची इच्छा मी बदलू शकत नसेन तर मी नरकाच्या शक्ती मोकळ्या सोडीन. अनिवार्य दैवगतीमुळे मी इनीआसला त्याच्या लॅशिअॅम-मधील सिंहासनापासून, आणि लॅव्हिनियाशी विवाह करण्यापासून रोखू शकणार नाही हे मला मान्य आहे. तरीही मी त्या कार्यगतीला विलंब करू शकते आणि या इतक्या महत्वाच्या घटना पुढे ढकलू शकते; हो! दोन्ही राजांच्या राष्ट्रांची मुळे उखडून टाकू शकते. वधुपिता आणि तिचा स्वामी एक होण्यापूर्वी ही किंमत त्यांना त्यांच्या प्रजाजनांच्या रक्तात द्यावी लागेल. मुली, रक्त हाच तुझा हुंडा होणार आहे,–रक्त, ट्रोजन आणि रूटुलिअन रक्त. तुझी विवाहस्वामिनी होण्याकरिता युद्धदेवता तुझी प्रतीक्षा करीत आहे. एकट्या हेक्यूबाच्या स्वप्नात काही तिच्या पोटी अग्नीगोल आला, आणि तिने पुढे विवाह विध्वंसाची आग पेटविणाऱ्या पुत्राला जन्म दिला, असे नाही. नाही! व्हीनसचा स्वतःचा पुत्रसंभवही असाच आहे. तिने दुसऱ्या पॅरिसला आणि पुनः प्रकटत असलेल्या ट्रॉयच्या संरक्षण सामर्थ्याच्या मृत्यूच्या दुसऱ्या रुपाला जन्म दिला आहे."

असे बोलून ती भयावह देवता खाली भूलोकावर झेपावली. जिथे त्या कराल भगिनींचा वास आहे त्या नरकाच्या अंधःकारातून तिने दुःखनिर्माती अॅलेक्टोला पाचारण केले. अॅलेक्टोला युद्धातील भीषण कृत्ये, उफाळून येणारा क्रोध विश्वास-घात आणि त्याच्या सर्व अपायांसहित कलह, या विषयी अपार प्रीती आहे. ती एक राक्षसी असून, ती धारण करीत असलेल्या मुद्रा इतक्या विविध आहेत, तिची रूपे इतकी भयंकारी आहेत, आति तिच्या डोक्यापासून इतके अगणित कृष्णसर्प उगवतात की प्रत्यक्ष तिचा स्वतःचा पिता आणि तिच्या टार्टरिअन बहिणीसुद्धा तिचा तिरस्कार करतात, जूनो आता अॅलेक्टोशी बोलली आणि आपल्या शब्दांनी तिने आपला द्वेष अधिकच तीव्र केला.

"मुली! अंधःकाराच्या कन्ये, माझे एक काम कर, आणि तुला मनापासून आवडणाऱ्या कार्यात तुझे सहाय्य देऊन, माझी आराधना आणि माझी कीर्ती यांना होणाऱ्या हानीपासून आणि अप्रतिष्ठेपासून वाचविण्याकरिता आणि इनीआसच्या माणसांना लॅटिनसला आंतरविवाहाला प्रवृत्त करणे अशक्य व्हावे, किंवा इटलीच्या प्रदेशाला उपद्रव देणे अशक्य व्हावे याकरिता तुझे प्रयत्न कारणी लाव. प्रेमाने एकजीव झालेल्या भावांनाही शस्त्रे उपसून एकमेकाविरूद्ध कसे उठवावे हे तुला

चांगलेच माहीत आहे. तू द्वेषाच्यायोगे घरे उध्वस्त करू शकतेस, अरिष्टे आणि मृत्यूचा अग्नीप्रलय त्यांच्या चार भिंतीत आणतेस. उपद्रवाचे सहस्त्रावधी प्रकार, सहस्त्रावधी हानी करण्याचे कपटी मार्ग तुला अवगत आहेत. तुझ्या सुपीक मेंदूला चालना दे. त्यांनी केलेला शांतता-करार उध्वस्त कर आणि परस्पर कलहाच्याद्वारा युद्धाची बीजे पेर. एकाच निश्वासासरशी त्यांच्या पुरुषांना शस्त्राची गरज भासू दे. शस्त्राची मागणी करू दे आणि शस्त्रे परजू दे."

आपली गॉरगॉन विषे घेऊन अॅलेक्टो सरळ लॅशिअॅममधील लॉरेन्टाईन सत्ताधिशाच्या उत्तुंग प्रासादाकडे गेली. आणि तिथे राणी आमाताच्या महालाच्या प्रवेशद्वारात निःशब्दपणे दबा धरून बसली. ट्रोजनांच्या आगमनामुळे स्त्रीसहज व्यग्रतेने आणि टर्नसच्या नियोजित विवाहाविषयीच्या संतापाने आमाता आधीच कमालीची अस्वस्थ झाली होती. आपल्या पोलादी निळ्या केसातून एक सर्प उपसून त्या दुष्ट देवतेने आमाताकडे भिरकाविला. आणि त्याच्या मंत्रप्रभावाने तीं अनावर पिसाट व्हावी आणि तिने उभ्या प्रासादात गोंधळ उडवावा म्हणून त्या सर्पाला तिच्या उरात व नंतर हृदयाच्या तळात प्रविष्ट केले. तो सर्प तिच्या वस्त्रातून आणि तिच्या नितळ वक्षांमधून आत सरकला, त्याने तिच्याभोवती विळखा घातला पण तिला त्याचा स्पर्श जाणवला नाही, आणि तिला नकळत त्याने तिच्यामधे विषारी निश्वास सोडले आणि तिला पिसाट बनविले. तो राक्षसी सर्प तिच्या गळ्यातील सुवर्णाचा पिळदार गोफ झाला; तिच्या लांब शिरोबंधाची टोके झाला, तिच्या केसात गुंफला गेला, आणि तिच्या अवयवांवरून सळसळत गेला. नंतर त्या विषद्रव्याचा प्रभाव तिच्या त्वचेखाली झिरपू लागला आणि तिच्या जाणीवेमधे सावकाश पसरला आणि तिच्या अस्थीभोवती अग्नीचे पेड गुंफू लागला; परंतु तिच्या उरातील काळजाने तो दाह पुरा प्राशन करण्यापूर्वी ती अगदी मृदुल आवाजात, एखादी आई बोलते तशी, आपल्या कन्येकरिता व तिच्या नियोजित फ्रिजिअन विवाहाकरिता अश्रू ढाळीत बोलली.

'नाथ ! लॅव्हिनियाला वधु म्हणून ट्रोजनांना, त्या गृहहीनांना खरेच द्यायची आहे काय ? तुमच्या मुलीविषयी किंवा तुमच्या स्वतःविषयी तुम्हाला मुळीच दया नाही काय? आणि तिच्या आईबद्दलही तुम्हाला काहीच वाटत नाही काय? पहिल्या उत्तर वाऱ्याबरोबरच हा दगलबाज सागरी लुटारू माझ्या मुलीला माझ्यापासून हिरावून घेऊन खुल्या समुद्रावर घेऊन जाईल आणि मला दुःखात लोटेल. पूर्वीसुद्धा फ्रिजियाच्या मेंढपाळाने लॅसिडिमॉनची मर्जी संपादन करून लेडाच्या हेलनला ट्रॉय भूमीच्या नगरांत असेच काढून नेले नाही काय ? आणि तुम्ही जे

वचन दिले होते त्याचे काय? तुमच्या स्वकीय प्रजाजनांविषयीच्या तुमच्या पूर्वीच्या अगत्याचे आणि तुमच्याच आप्ताला, टर्नसला तुम्ही वारंवार दिलेल्या वचनांचे काय झाले ? लॅटिन समाजात विवाह करणारा हा वर जर कुठून परदेशातूनच येणारा आहे, हे जर अनिवार्य असेल आणि तुमचे पिता फॉनस यांच्या आज्ञेमुळे तुम्हाला त्यात काही पर्याय उरत नसेल तर माझ्यापुरते तरी जो माझा देश नाही, जो आपल्या सत्तेखाली नाही त्याला मी परका मानते, आणि मला वाटते या संकेताचा स्वतः देवांना अभिप्रेत असलेला अर्थही हा असाच असावा. त्याशिवाय टर्नसच्या कुळाचे मूळ अगदी मागेपासून शोधायचे झाले तर इनॅकस आणि ॲक्रि-सिअस हे त्याचे पूर्वज आहेत आणि मिसिनी हीच त्याची मातृनगरी आहे.

अशा तऱ्हेने विनवणी करून लॅटिनसचे मन वळविण्याचा तिने प्रयत्न केला, परंतु व्यर्थ. त्याच्या विरोधामधे तो दृढ आहे हे तिला उमगले. आणि त्या सर्पाचे विष जसजसे तिच्या खोल अंतरात झिरपले आणि त्याच्या भ्रम लावणाऱ्या शक्ती-निशी तिच्या सर्व शरीरात संचारले तसे त्या भयंकर विषप्रभावाची अरणी लागलेल्या त्या अभागी स्त्रीचा स्वतःवरील ताबा सुटला. आणि आपल्या खेळात रमलेल्या मुलांनी आपल्या दोरीच्या वेटोळयाच्या फटकाऱ्याने फिरायला लावलेला भोवरा जसा एखाद्या मोठ्या रित्या महालात विस्तीर्ण वर्तुळांतून फिरत राहतो, आणि नंतर ती मुले बालिश आश्चर्याने त्या बॉक्स वृक्षाच्या लाकडाच्या फिरत्या भोवऱ्यावर ओणावतात आणि रंगून जाऊन एकटक पाहतात, आणि आपल्या फटकाऱ्यांनी त्याला नवनवीन गती देतात, तशी त्या भोवऱ्यासारखी बेभान होऊन अंधपणे ती सर्व नगरातून धावली. पिसाट झालेली ती राणीही तशीच, एखाद्या बेभान भोवऱ्यासारखीच, नगरवासीयांच्या अवहेलनायुक्त नजरांपुढून नगरीच्या रस्त्यातून धावत सुटली. बॅक्कसचा प्रभाव आपल्यावर आहे असे भासवीत ती बाहेरील अरण्यातही धावत धावत गेली, आणि अधिक गंभीर, अधिक पिसाट पापकर्म करण्याचे तिने साहस केले. आणि तो विवाहविधी टाळण्याकरिता व ट्रोजनांना त्या विवाहापासून वंचित करण्याकरिता तिने आपल्या कन्येला पर्णा-च्छादित पर्वतराजीत लपविले. "हे बॅक्कस" तिने मोठ्याने धावा केला, आणि ती किंचाळली. "ही कुमारी मिळविण्याची पात्रता तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणाचीही नाही. कारण तिने तुझ्या सन्मानार्थ मृदुल पर्णांची डहाळी धारण केली आहे, आणि तुझ्याभोवती ती नाचत आहे, आणि तिच्या वाढणाऱ्या कुंतलाची एक बट तुला अर्पण करीत आहे." हे वृत्त वेगाने पसरले, आणि प्रत्येक मातेचे हृदय नवे वसतिस्थान शोधण्याच्या पिसाट ईर्षेने पेटले. उघड्या माना आणि वाऱ्यावर

सोडलेल्या केसानी त्यानी तात्काल आपली घरे सोडली. हरिणाची कातडी परिधान केलेल्या आणि द्राक्षवेलीच्या भाल्यासारख्या टोकदार काठचा घेतलेल्या इतर स्त्रियांनी कंपित जयघोषांनी आकाश भरून टाकले. त्यांच्यामधे आमाता होती; तिने पाईन लाकडाचा जळता पलिता क्षुब्धपणे उंच धरला होता आणि आपले लाल डोळे चौफेर फिरवीत ती तिची कन्या आणि टर्नस यांच्याकरिता विवाह–गीते गात होती. अचानक तिने एखाद्या पशूप्रमाणे गर्जना केली, "लॅशिअॅममधील मातांनो; ऐका! तुम्ही कुठेही असलात तरी प्रत्येकीने माझे म्हणणे ऐकून घ्यावे. गरीब बिचाऱ्या आमाताविषयी तुमच्या एकनिष्ठ हृदयात अजूनही काही सहानुभूती असेल किंवा मातेच्या हक्काविषयी तुम्हाला अजून सदसद्विवेकबुध्दीची बोचणी असेल तर तुमच्या केसांभोवतालचे बंध सोडा आणि माझ्याबरोबर या बेफाम विधीत सामील व्हा!"

अॅलेक्टोने तिला प्रेरित केल्याप्रमाणे राणी एकदा एका तऱ्हेने तर नंतर दुसऱ्या तऱ्हेने वागू लागली, आणि बॅक्कसच्या प्रभावाने तिने तिला जिथे फक्त पशूंच्या गुहा असतात त्या अरण्यात आणि ओसाड स्थानांत पिटाळले. पिसाटपणा बोकाळला आहे व तिने त्याला दिलेली धार पुरेशी आहे असे पाहून; लॅटिनसचे घर आणि योजना उधळून लावण्याचे कारस्थान आतापावेतो पूर्ण केलेल्या त्या कठोर देवतेने भडक माथ्याच्या रूटलिअन, टर्नसच्या तटबंदीयुक्त नगरीकडे आपल्या धुरकट पंखावरून प्रयाण केले. ही नगरी डॅनीने, तिला प्रमत्त दक्षिण वाऱ्याने किनाऱ्यावर लोटल्यानंतर, आरगॉसहून आलेल्यांना वसती करण्याकरिता बांधली असे म्हणतात. आपल्या पूर्वजांनी फार पूर्वी त्या नगरीला आर्डिया हे नामाभिधान दिले आणि ती अजूनही ते थोर नाव धारण करते, परंतु तिचे पूर्वीचे वैभव मात्र उरले नाही. या क्षणी इथे अंधारलेल्या मध्यरात्रीच्या समयी टर्नस उत्तुंग प्रासादात गाढ झोपलेला होता. अॅलेक्टोने आपले क्रुद्धरूप आणि आपल्या अवयवांचा पिसाट अवतार टाकला. तिने आपले रूप बदलले आणि एका वृध्द स्त्रीचे रूप धारण केले; आपल्या मुखावर तिने विरूप सुरकुत्या पाडल्या, शुभ्र केस धारण केले, त्याभोवती शिरोबंध बांधला, आणि नंतर ऑलिव्हची मंजिरी आपल्या केसात गुंफली. ती आता जूनोच्या मंदिराचे रक्षण करणारी जूनोची वृध्द सेविका कॅलिबी झाली होती. आणि याच रूपात ती त्या तरूण राजपुत्रासमोर आली आणि म्हणाली; "टर्नस, तुझे सर्व प्रयत्न व्यर्थ आणि शून्य झालेले, आणि जो राजदंड हक्काने तुझाच आहे तो या बाहेरून इथे रहावयास आलेल्या डार्डन अनाहुतांच्या स्वाधीन केलेला तू निष्क्रियपणेच पाहणार आहेस काय? राजा, तुझी वधू तुला देण्याचे

नाकारतो आहे. जो हुंडा तू आपल्या रक्तसंबंधाने मिळविला आहेस तो त्याने दुस-ऱ्याला दिला आहे, आणि सिंहासनाला वारस म्हणून एक परदेशी माणूस आणला आहे. ठीक आहे, तू तुझ्या मार्गाने जात रहा आणि विनाकारण प्रत्येक आपत्तीला सामोरा हो आणि तू घेतलेल्या यातनाकरिता कुचेष्टेचा विषय हो! ऊठ इट्रुरिआच्या सेनेचा भेद कर आणि तू जिंकलेल्या शांततेने लॅटिनांचे संरक्षण कर! सॅटर्नची कन्या सर्व शक्तिमान जुनो हिने स्वतः तू रात्रीच्या सदय शांततेत निद्रिस्त असताना तुला हे स्पष्टपणे सांगण्याची मला आज्ञा केली आहे. म्हणून ऊठ हिंमत धर! तुझी माणसे युध्दाला सिध्द कर आणि युध्दाकरिता वेशीतून बाहेर पड. तू त्यांची रंगविलेली गलबते जाळून टाक आणि त्यांबरोबरच आपल्या थोर नदीच्या बंदरात असलेल्या त्या फ्रिजिअन प्रमुखांचाही नाश कर. स्वर्गस्थ देवांची ही अत्यंत निकडीची आज्ञा आहे. आणि जर राजा लॅटिनस स्वतः या विवाहाला मान्यता देत नसेल आणि तुझ्या मागण्या मान्य करीत नसेल तर त्यालाही याची काय किंमत द्यावी लागेल ते कळू दे! आणि परिणामी त्यालाही टर्नसच्या शस्त्र सामर्थ्याची प्रचिती येऊ दे!"

यावर आपल्यापरीने बोलण्याकरिता आणि तिच्या भाकिताची टवाळी करण्याकरिता त्या तरुण राजपुत्राने आपले तोंड उघडले : 'तू समजतेस तसे ते आरमार टायबरच्या जलात आले हे वृत्त माझ्या कानावर आले नाही असे नाही. मला घाबरविण्याकरिता गंभीर भयकथा रचू नकोस आणि शिवाय जूनोही राज-घराण्यातील आहे आणि ती मला विसरणार नाही. परंतु तुझे सत्यधारणेच. काळ उलटून गेलेले जीर्णशीर्ण वार्धक्य तुला अकारण अस्वस्थ आणि चिंताग्रस्त करीत आहे, आणि तू युद्धात गुंतणाऱ्या राजांची भाकिते करतेस तेव्हा काल्पनिक भयाने तुला चकविलेले असते. देवांची मंदिरे आणि त्यांच्या मूर्ती यांचे रक्षण करणे ही तुझी जबाबदारी आहे. युध्द पुकारणे आणि शांतता प्रस्थापित करणे हे पुरुषाकरिता आहे कारण ते त्यांचे काम आहे.

हे उत्तर झोंबल्यामुळे ॲलेक्टो भडकल्या क्रोधाने पेटली. त्या रणचंडिकेचा फुत्कार अगणित सर्पांच्या मुखांतून बाहेर पडत होता आणि त्याच्यापुढे प्रकट झालेले तिचे भूतासारखे रूप इतके भयावह होते की ती बोलत असताच त्या तरूण राजपुत्राच्या शरीराला कंप सुटला, आणि त्याचे डोळे एकटक होऊन ताठरले. नंतर तिने आपली ज्वालांचे किरण असलेली नजर त्याच्यावर रोखली, आणि तो अजूनही दोलायमान अवस्थेत असताना, व पुढे बोलण्याचा प्रयत्न करीत असताना

तिने त्याला मागे रेटले, आपल्या केसातील दोन सर्प तिने ताठ केले, त्यांचा चाबूक फटकावला आणि संतप्त ओठांनी ती पुन: म्हणाली. "मी कोण आहे ते पहा! सत्यधारणा करण्याच्या काळापलीकडे गेलेले माझे जीर्णशीर्ण वार्धक्य युध्दरत असलेल्या राजांची भाकिते वर्तविताना काल्पनिक भयाने मला चकवीत असते काय! आता हे पहा. मी भयावह चंडिकांच्या स्थानाकडून आले आहे. आणि माझ्या हाती युध्द आणि मृत्यु मी धारण करीत असते." या वचनानी तिने त्या तरूण राजपुत्रावर एक जळता पलिता फेकला, आणि तिने तो त्याच्या छातीवर रोवला. तिथे तो धुरकट ज्वालांनी धुमसत राहिला.

प्रबल भयाने टर्नसची निद्रा भंग झाली होती. त्याच्या सर्वांगातून घाम फुटला आणि त्या धारानी त्याने त्याचे अवयव जणु हाडापर्यंत भिजून गेले. भ्रमिष्ट होऊन त्याने शस्त्रांकरिता आरोळी ठोकली आणि त्याच्या बिछान्याजवळ आणि सर्व घरभर शस्त्रे शोधण्यासाठी तो भटकला. शस्त्राच्या रक्तपिपासू तृष्णेने आणि युद्धाच्या शापित वेडाने त्याच्या मनात गदारोळ उठविला होता; त्याहूनही, ज्याप्रमाणे खदखदणाऱ्या काहिलीखाली रचलेल्या वाळलेला लाकडांचा ढीग जळताना जेव्हा मोठ्याने तडतडतो, तेव्हा उकळणारे पाणी वर उसळते, उकळी अनावर होते, त्या पाण्याच्या अंतरंगातील उद्रेक वाफेतून फुटतो, काळी वाफ हवेत वरपर्यंत चढते आणि पाणीही फेसाळून वर येते आणि ओसंडू लागते तसा त्याचा क्रोध अनावर झाला होता.

म्हणून टर्नसने आपल्या तरूण शिलेदारांना शांततेचा भंग केला म्हणून राजा लॅटिनसवर चाल करून जाण्याची आज्ञा केली. त्यांने शस्त्रास्त्रांची सिद्धता करण्याची आज्ञा केली व तो म्हणाला की आपण इटलीचे रक्षण केले पाहिजे आणि शत्रूला सीमेवरून मागे हाकलले पाहिजे आणि त्याने असेही निक्षून सांगितले की ज्यावेळी तो युद्धात सामील होईल तेव्हा ट्रोजन आणि लॅटिन या दोघांनाही तुल्यबल असेल, अशा आज्ञा दिल्यानंतर त्याने देवांना त्याची प्रतिज्ञा ऐकण्याकरिता पाचारण केले. आणि आता त्याचे रूटुलिअन अनुयायी युद्धात परस्परांना उत्तेजन देण्याची स्पर्धा करू लागले. टर्नसने त्यांना केलेले आव्हान प्रभावी होते. कारण काही लोक त्याच्या आकर्षक व्यक्तिमत्वाने आणि त्याच्या यौवनाच्या जोमाने जिंकले गेले होते तर काही त्याच्या राजघराण्यातील पूर्वजांनी, आणि इतर त्याच्या शौर्यशाली दक्षिण बाहूच्या महाप्रतापाने प्रभावित झाले होते.

टर्नस अशा तऱ्हेने आपल्या रूटुलिअनांचे शूर साहसाला उद्युक्त करीत असता अॅलेक्टो आपल्या स्टिजिअन पंखांनी ट्रोजनांचा समाचार घेण्याकरिता द्रुत-

गतीने उड्डाण करू लागली. आता तिने एक नवीन युक्ति योजली. तिने जिथे किनाऱ्यावर देखणा आयुलस हिंस्त्र श्वापदे सापळ्यात पकडीत होता आणि शिकारही करीत होता, त्या जागेची तिने टेहळणी केली. नरकलोकातील त्या चंडिकेने त्याच्या शिकारी कुत्र्यांना एकदम पिसळाविले. एका काळविटाच्या तुफान पाठलागावर पिटाळण्याकरिता तिने त्यांच्या नाकपुडयांना एक परिचित वास लावला. व त्यांना एका काळविटाच्या मागावर चटपटत्या पायांनी पिटाळले. ग्रामीण भागातील लोकांना युध्दाकरिता भडकवून पुढच्या आपत्तींना आवाहन देणारे हे एक मुख्य कारण ठरले. कारण ते ज्याचा पाठलाग करीत होते तो काळवीट मोठी शिंगे असलेला एक अतिदेखणा प्राणी होता, आईच्या आचळांपासून सुटण्यापूर्वीच त्याला कळपातून काढून घेतले होते आणि आता टायरस आणि त्याच्या तरूण पुत्रांनी त्याला लाडाने पाळले होते. टायरस हा एक मुख्य अधिकारी होता आणि राजाचे कळप त्याच्यामागून जात असत आणि राजाच्या विस्तृत शेतजमिनींचा तो विश्वासू राखणदार होता. त्यांच्या बहिणीने,सिल्व्हिआने,त्याला आपल्या आज्ञा पाळण्यास शिकविले होते,ती त्याची उत्कृष्ट निगा राखीत असे. त्याच्या शिंगात पुष्पमाला गुंफून ती त्याला सजवीत असे. आणि तो वन्यपशु असूनही ती त्याचे अंग चोळून-मोळून त्याला स्वच्छ पाण्याने स्नान घालीत असे. तो पशु जरी इतका माणसाळला होता की तो तिला कुरवाळू देत असे आणि धन्याच्या मेजाजवळ नित्य हजेरी लावीत असे तरी तो अरण्यात मुक्त संचार करीत असे आणि रात्री कितीही उशीर झाला तरी त्याला परिचित असलेल्या दाराचा मार्ग तो अचूक शोधून आपण होऊन परत येत असे.

या समयी आयुलस शिकार करीत असताना ताज्या मागावर असलेल्या त्याच्या शिकारी कुत्र्यांनी एकटेच भटकत असताना, नदीच्या प्रवाहाबरोबर तरणाऱ्या आणि तप्त उन्हापासून किनाऱ्यावरील हिरवळीतील सावलीत आराम करणाऱ्या त्या काळविटाचाच पाठलाग सुरू केला. या खास यशदायी ठरणाऱ्या शिकारीने उत्तेजित झालेला आयुलसही त्या पाठलागात सामील झाला. आपले धनुष्य वाकवून त्याने एक अणकुचीदार बाण त्याच्यावर रोखला. कुणा देवतेच्या प्रेरणेने त्याच्या हातांचा नेम चुकला नाही आणि मोठा फुत्कार करून तो बाण वेगाने त्या काळविटाच्या पोटातून आणि कुशीतून आरपार गेला. विध्द झालेला तो चतुष्पाद त्याच्या परिचित घराकडे त्वरित धावत सुटला आणि खुरडत विव्हळत त्याच्या गोठ्यात शिरला. रक्ताने त्याचे सर्वांग डागळले होते; आणि जणूकाही सहाय्याची याचना करीत त्याने आपल्या आक्रोशाने, विनवणीने सबंध

घर दुमदुमवून टाकले. त्या मुलांची बहीण सिल्व्हिआच प्रथम मदत मिळवण्याच्या कामाला लागली. हात दंडावर आपटीत तिने मदतीकरिता ओरड केली व काटक ग्रामस्थांना एकत्र केले, ते आश्चर्यकारक त्वरेने आले कारण ती अतिक्रुद्ध चंडिका तेथे वनातच गुपचूप लपून बसली होती. त्यांच्यापैकी एकाजवळ लाकडाची कोळप-लेली टोकदार मेख होती, दुसऱ्याच्या हातात जाड गाठी असलेला दंडुका होता, कारण क्रोधाने सरसावलेल्या हातात सापडणारी पहिली वस्तू शस्त्र बनत होती. आणि टायरसने आपल्या सरंजामी नोकरांना बाहेर काढले. तो त्यावेळी एक ओक वृक्ष फोडून त्याचे चार भाग करीत होता; आणि त्याने नुकत्याच पाचरी ठोकल्या होत्या. अनावर क्रोधाने जोरजोराने श्वास घेत एक कुऱ्हाड उचलली.

हे एवढे साधल्यानंतर, तिच्या मोक्याच्या जागेवरुन अधिक अपाय करण्याचा क्षण हेरून त्या निर्दय चंडिकेनें तबेल्याच्या वरच्या टोकाला उडत जाऊन खिल्लारे राखणाराना बोलावण्याचे शिंग वाजविले. तिने आपल्या वक्र शिंगावर आपला नरकलोकीचा घोर आवाज लावला; तात्काल सर्व वन त्या दणक्याने थरथरले आणि अरण्यभाग खोलवर पुनः पुनः दुमदुमला. अति दूर डायनाच्या सरोवराने तो आवाज ऐकला; गंधकाच्या पाण्याने पांढरी झालेल्या नार नदीने आणि व्हेलाईन सरोवराच्या झऱ्यांनी तो आवाज ऐकला; आणि भयकंपित झालेल्या मातांनी आपल्या पुत्रांना वक्षाशी कवळले, त्या इशाऱ्याने त्या, चिकाटीने कार्याचा पाठपुरावा करणाऱ्या ग्रामजनांना दचकून भराभर हालचाल करायला लावले.त्या अरिष्टसूचक रणशिंगाच्या जरबेच्या इशाऱ्याबरोबर येता येता शस्त्रे उपसून ते लोक सगळीकडून एकदम गोळा झाले. दुसरीकडे ट्रोजनांनी आपला तळ खुला केला आणि योद्धयांचा एक लोंढाच ॲस्कॅनिअसच्या सहाय्याकरिता बाहेर काढला. सर्वांनी युद्धाकरिता आपल्या सेनेची रचना केली. आता ही शेतकऱ्यांच्या संघर्षातील कठीण दंडुके किंवा जाळून टोकदार केलेल्या मेखांची बाब राहिली नव्हती. आता ते निर्णय मागत होते, दुधारी खड्गाच्या सहाय्याने युद्धाचे जणू उभे पीक फार दूरवर पसरले होते आणि परजलेल्या लवलवत्या पोलादाने ते लोखंडासारखे करडे दिसत होते. ज्याप्रमाणे वाऱ्याच्या पहिल्या झुळकीने लाटा चमकतात, आणि हळूहळू सागर उफाळून उंच लाटा उठवीत, त्याच्या सर्व खोल गर्भातून उसळया मारीत आकाशापर्यंत झेपावतो त्याप्रमाणे ब्रॉंझच्या चिलखतांवरून सूर्यप्रकाश परावर्तित होऊन काळ्या मेघांच्या पार्श्वभूमीवर उंच उंच चमकत चमकत जात होता.

थोड्याच वेळात पुढच्या रांगेत खडा असलेला तरूण आल्मो, टायरसचा ज्येष्ठ पुत्र, घोंघावत आलेल्या एका बाणाने भूमीवर कोसळला. भेद करणारा बाण त्याच्या कंठाखाली रुतून बसला, त्याच्या आवाजाचा आणि श्वसनाचा निरुंद आर्द्र

मार्ग रक्ताच्या प्रवाहाने घुसमटून गेला. त्याच्या भोवती अनेक योद्धे पडले, त्यामध्ये शांततेकरिता मध्यस्थी करण्याचा प्रयत्न करीत असताना मारला गेलेला वयस्कर गॅलिससही होता, जुन्या काळी तो सर्व इटॅलिअनांमध्ये सर्वाधिक काटेकोर सात्त्विकवृत्तीचा होता आणि त्यांच्यातील सर्वात संपन्न जमीनदार होता. कारण त्याच्या घराकडे रोज परत हाकून आणण्यात येणारे केकाटणाऱ्या मेंढरांचे पाच कळप होते आणि खिलारांचेही पाच कळप होते, आणि त्यांची भूमी नांगरणारे शंभर नांगर होते.

त्या प्रदेशात घडत असलेल्या घटना या अशा होत्या, आणि मार्सला कोणत्याच बाजूविषयी अगत्य नव्हते. मध्यंतरी जिच्या हाती तिने जूनोला आश्वासिलेले यश होते,–कारण या युद्धात तिनेच प्रथम प्रहाराने पहिले रक्त सांडले होते. आणि युद्धाच्या पहिल्याच चकमकीत बरेच मृत्यु घडवीत आणले होते,–त्या चंडिका ॲलेक्टोने पश्चिम भूमीचा त्याग केला. आणि तिने आकाशीच्या हवेतून भ्रमण केले आणि ती विजयाच्या दर्पाने जूनोला म्हणाली, "पहा, तुला घडायला हवा असलेला कलह पेटला आहे, आणि युद्धामधील भीषण कृत्यांनी त्यावर पक्के शिक्कामोर्तब केले आहे. तुला आता त्यांना मैत्रीने एकत्र आणून, शांततेला अनुकूल करता येईल का पहा! आताच मी ट्रोजनांवर इटॅलिअन रुधिराचा अभिषेक केला आहे. परंतु मला जर तुझ्या संमतीचे अभिवचन असेल तर मी याहूनही पुष्कळच अधिक काहीतरी साध्य करीन; मी वदंता पसरवीन आणि अशा तऱ्हेने आजूबाजूच्या नगरांनासुद्धा, मार्सच्या माथेफिरू युद्धलालसेने त्यांचे अंतःकरण भडकवून युद्धात गुंतवीन आणि या प्रदेशातील प्रत्येक भागातून कुमक घेऊन त्याना चाल करून यावयास लावीन. आणि याप्रमाणे या सर्व प्रदेशावर रणधुमाळी पसरवीन." नंतर जूनोने आपले उत्तर दिले : "घबराट आणि विश्वासघात पुरेसे आहेत. युद्धहेतु प्रस्थापित झाले आहेत आणि हातघाईचा सशस्त्र संघर्ष चालू आहे. योगायोगाने त्यानी प्रथम शस्त्रे हाती घेतली आणि आता नवीन सांडलेल्या रक्ताने त्यांची शस्त्रे डागाळली आहेत. व्हीनसचा प्रशंसनीय पुत्र आणि राजा लॅटिनस हे जो विवाह साजरा करणार आहेत त्यातील विवाहविधी व विवाह–समारंभ असेच रक्तलांछित असू देत. परंतु उच्चतम ऑलिम्पसवर अधिसत्ता असलेल्या, सर्वश्रेष्ठ पित्याला तुझ्यासारखीने आकाशाखालील उच्च वातावरणात अतिस्वैरपणे संचार करणे मंजूर असणार नाही. तू आता परत फिर. अधिक हानी करण्याचा योग आलाच तर मी स्वतःच सर्व काही पार पाडीन." सॅटर्नच्या कन्येने तिला उद्देशून योजलेले शब्द असे होते. तिच्या सर्पांच्या फुत्काराने घोंघा-

वणारे आपले पंख त्या चंडिकेने पसरले आणि उंच आकाश मागे टाकून ती कोकायटसजवळील आपल्या निवासाच्या मार्गाला लागली. इटलीच्या मध्यावर उंच पर्वतांच्या पायथ्याशी एक सुपरिचित आणि अनेक प्रदेशांतील कथांमध्ये उल्लेखिलेले एक स्थळ आहे. ते स्थळ म्हणजे ॲम्पसॅन्कटसची खिंड. ती घनदाट पल्लवांनी अंधारलेली असून वनराई असलेले कडे तिच्या दोन्ही बाजूंना अगदी लागून आहेत; मध्यभागी एक कोसळणारा प्रपात गरगरणाऱ्या फेसाचा तुरा धारण करून खडकांमधे गर्जत असतो. तिथे एक भयावह गव्हर दिसते; त्यातून बाहेर पडण्याच्या वाटा निर्दय प्ल्युटोच्या निश्वासमार्गासारख्या आहेत. तसेच तेथे एक विक्राळ पोकळी आहे; तिच्या दुर्गंधी जबड्यातून ॲकटॉन बाहेर पडते. त्या जबड्यात त्या चंडिकेने आपल्या गर्हणीय सामर्थ्यासह उडी घेतली, आणि पृथ्वी आणि आकाशाला आपल्या अस्तित्वापासून मुक्त केले.

त्या सुमारास सॅटर्नच्या कन्येने राज्ञीच्या अधिकारात युद्धावरून शेवटचा हात फिरवला. ते सर्व खिल्लारे राखणारे मृतांना-किशोर आल्मो आणि चेहरा विद्रूप झालेला गॅलिसस यांची प्रेते घेऊन, युद्धभूमी सोडून मोठ्या संख्येने नगरीत गर्दी करून आले; ते देवांची प्रार्थना करीत होते. आणि लॅटिनसला गाऱ्हाणे घालीत होते. टर्नस तेथे होता आणि या हत्येचा त्वेषपूर्ण धिःकार कळसाला पोहोचला असताना, ट्रोजनांना राजसत्तेत वाटेकरी होण्याकरिता पाचारण करण्यात आले होते, फ्रिजिअन बीजाचा लॅटिन रक्ताशी संकर होणार असून, त्याला स्वतःला दारातून दूर लोटले जाणार आहे, अशा तक्रारी करून त्याने उद्रेक द्विगुणित केला. नंतर बॅक्कसच्या मत्त प्रभावाने ज्या स्त्रियांच्या पिसाट झुंडी वाट नसलेल्या घनदाट अरण्यात उधळत गेल्या होत्या, त्यांचे आप्तस्वकीय सर्व बाजूंनी जमले, आणि आमाताच्या थोर प्रतिष्ठेच्या आधारावर त्यांनी मार्सकडे दाद मागण्यासाठी अखंड ओरडा सुरू केला. कुणा दुष्टशक्तीने दैवी सूचनेचा अव्हेर करण्यास व देवांच्या नियतीबध्द इच्छेला विरोध करण्यास प्रवृत्त केलेल्या व आधिच दुर्दैवाधीन झालेल्या या समग्र राष्ट्राने घातक युध्दाचा दुराग्रह धरला. एकमेकांशी स्पर्धा करीत राजा लॅटिनसच्या प्रासादाभोवती त्यांनी गर्दी केली. जिथे प्रचंड गर्जना करणाऱ्या लाटा फुटतात, कपारी आणि समुद्रफेनाचा शिडकाव होत असलेल्या खडकांच्या रांगा भोवताली व्यर्थ किंचाळत असतात, अशा जागी ज्याच्या कुशीवर सागरी वनस्पती जोरात आपटून पुनः पाण्यात गरगरत भिरकावली जाते असा सागरातील एखादा खडक, भोवताली कितीही लाटा किंचाळत असल्या तरी केवळ आपल्या प्रचंडपणाने जसा खंबीर राहतो, तसा राजा लॅटिनस अढळ राहिला. परंतु

घटना याप्रमाणे निर्दय जूनोच्या इच्छेनुसार घडत गेल्यामुळे त्यांच्या या अविवेकी निर्णयावर मात करण्याचा मार्ग सापडत नसलेला वृध्द राजा केवळ असहाय्यपणे देवांचा व न मानणाऱ्या वाऱ्यांचा धावाच केवळ दीर्घकाळ करू शकत होता. 'हाय' दुर्भाग्या! दैवाने आपल्याला वादळ पाठीवर घेऊन सागरावर लोटले आहे! आपले गलबत मोडून तोडून टाकले आहे. माझ्या दीन प्रजाजनहो, या देवांविरूध्द वर्तनाचे प्रायश्चित्त तुम्हाला तुमच्या स्वतःच्या रक्ताने करावे लागणार आहे. अरेरे! टर्नस तुझ्या कृत्यातील प्रमाद तुला केव्हातरी भोवतील, त्यांची शिक्षा तुला भोगावी लागेल, आणि शेवटी जेव्हा तू भक्तीने देवांना नवस करू लागशील तेव्हा फार उशीर झालेला असेल. माझ्या पुरते म्हणाल तर आता विश्रांती घेण्यास मी मोकळा आहे. मात्र विश्रांतीस्थानाच्या अगदी दारात असतानाच, अंत्यसंस्कारातून प्राप्त होणाऱ्या शांतीला मात्र मी वंचित होणार आहे." तो अधिक काही बोलला नाही, परंतु त्याने स्वतःला त्याच्या प्रासादात कोंडून घेतले आणि राज्याच्या सूत्रांचा त्याग केला.

लॅशिअममध्ये, या पश्चिमभूमीत, एक पवित्र प्रथा होती, अल्बातील नगरे ती नेहमी पाळीत असत. आणि आजही जगातील सर्वश्रेष्ठ रोम ती प्रथा पाळते. जेव्हा रोमन युद्धारंभ करण्याकरिता मार्सची आराधना करतात,मग ते युद्ध गेटी हिरकॅनिअन विरुध्द किंवा अरब राष्ट्राविरूध्द सर्व शक्ती एकवटून त्यांच्यावर संहाराची आग पाखडण्याचे असो, किंवा उषेच्या मार्गाने हिंदुस्थानला जाण्याकरिता प्रवासाची सिध्दता करून पार्थिअनांकडे आपले ध्वज परत करण्याची मागणी करायची असो– प्रत्येक वेळी रोमन ही प्रथा पाळीत असतात. युध्दाची जुळी दोन दारे आहेत, लोक त्यांना त्याच नावाने संबोधितात– माणसांच्या भीतीयुक्त आदराने व अदय मार्सच्या भयावह अस्तित्वाने ती दारे पवित्र झाली आहेत. ब्राँझच्या शंभर गजांनी व कठीण लोहाच्या चिरंतन शक्तीने ती दारे बंद केली आहेत, आणि त्यांच्या उंबरठ्यावरुन कधीही न हलणारा जेनस त्यांची राखण करतो. जेव्हा नगरपिते युध्दाचा अनिवार्य निर्णय घेतात तेव्हा क्विराईन दरबारी झगा (टोगा) व गॅबाईन कमरपट्टा परिधान केलेला व त्यामुळे मोठा उठून दिसणारा लोकप्रतिनिधी स्वतः त्या दारांचे आडणे काढतो आणि त्यांचे बिजागऱ्यांचे खांब कुरकुरतात, युध्दास सुरवात करण्याची घोषणा तोच करतो आणि नंतर उरलेले पुरुष मागून येतात, आणि ब्राँझच्या रणभेरी आपले निनाद हवेवर सोडून आपली घोगऱ्या आवाजातली संमती प्रकट करतात.

याच विधीनुसार इनीआस आणि त्याच्या सैनिकाविरूध्द युध्दाचा पुकार करण्याची व ही भयंकर दारे उघडण्याची मागणी लॅटिनसकडे आता करण्यात आली होती. परंतु त्या वृध्द पित्याला त्यांना स्पर्शही करवेना. या तिरस्करणीय कर्तव्यापासून बिचकून तो मागे सरला व दूर निघून गेला आणि अंधाराच्या छायेत तो नजरेआड झाला. नंतर देवांची सॅटर्निअन राज्ञी स्वतः आकाशातून भूमीवर अवतीर्ण झाली आणि तिने स्वतःच्या हाताने ती अडून बसलेली दारे आत ढकलली. बिजागऱ्यांचे खांब फिरले, आणि तिने लोखंडाने बंदिस्त केलेली ती युद्धाची दारे सताड उघडून टाकली.

आजवर कुठल्याही भयाने विचलित न झालेली ती शांत भूमी– इटली– पेटून उठली. तिची काही माणसे तिच्या मैदानांवरून पायी चाल करून जाण्यास सिद्ध झाली. कांही धुळीच्या लोटांतून उंच घोड्यांवर आरूढ होऊन पिसाटासारखे दौडले. सर्वच शस्त्रांकरिता ओरडा करीत होते. काही उत्तम मेणाचा उपयोग करून ढालींना गुळगुळीत होईपर्यंत घाशीत होते, भाल्याची फाळे चकचकीत करीत होते किंवा धारेच्या दगडावर घासून परशूंना धार लावीत होते. उत्साहाने त्यांनी आपली निशाणे उभारली आणि तुतारीचे इशारे ऐकले. सामर्थ्यशाली ॲटिना, प्रमत्त टायबर, आर्डिआ, क्रस्टुमेरिअम आणि उंच मनोरे असलेला ॲन्टेम्नि–या पाच मोठ्या नगरींनी नव्या ऐरणी बसविल्या आणि आपली शस्त्रागारे पुन्हा सज्ज करण्यास प्रारंभ केला. त्यांनी संरक्षक शिरस्त्राणे कोरुन घडविली. ढालीच्या गुंड्यांभोवती बसविण्याकरिता वाळुंजाची कडी केली, दुसऱ्या कोणी ब्रॉंझची उर-स्त्राणे घडविली, किंवा कठीण चांदीचे ठोकून गुळगुळीत बाणाचे भाते घडविले, विळा आणि फाळ यावर असलेल्या त्यांच्या श्रद्धेने, व नांगरावरील त्यांच्या प्रेमाने आता याला जागा करून दिली होती. त्यांच्या पित्यांची खड्गे त्यांनी भट्टीत घालून पुनः घडविली. रणभेरी आता दुमदुमू लागल्या. युद्धाचे परवलीचे शब्द घुमू लागले. थरथरत्या हातांनी शिरस्त्राण पकडून एक माणूस घरातून बाहेर पळाला, दुसऱ्याने आपल्या खिकाळणाऱ्या घोड्यांच्या जोडीच्या पाठीवर रथाचे खोगिर चढवून त्यांना रथाला जुंपले व ढाल लटकावून आणि सुवर्णाचे तीन पदरी उर-स्त्राण चढवून त्याने आपले भरवशाचे खड्ग कमरपट्ट्यात खोचले.

प्रतिभादेवींनो, हेलिकॉन पुरे खुले करून त्यावेळी कोणते राजे युद्धाकरिता एकत्र जमले, आणि रणांगणावर गर्दी करणाऱ्या कोणत्या प्रकारच्या सेना प्रत्येक राजाच्या पाठीमागे अनंत रांगांत उभ्या ठाकल्या, त्या अतिपूर्वीच्या काळातही इटलीच्या संपन्न भूमीतून कोण पुरुषश्रेष्ठ ललामभूत असे होते, आणि तिच्या

शौर्याचे तेज कोणत्या शस्त्रांतून प्रकट झाले हे सांगण्याकरिता मला स्फूर्ती देण्याचा समय आला आहे. कारण तुम्ही देवांश आहात आणि स्मरण शक्ती आणि कथन-चातुर्य या शक्ती तुमच्या स्वाधीन आहेत; परंतु माझ्यापर्यंत मात्र त्या महान कथेचा केवळ अतिक्षीण प्रतिध्वनीच पोहोचू शकला आहे.

युद्धात प्रथम प्रवेश करुन व आपल्या सेनेचे नेतृत्व करून पुढे चाल करून आलेला, देवांची मुलाहिजा न करणारा, इट्रुरिआच्या सीमेवरून आलेला अतिक्रुद्ध मेझेन्टिअस होता. त्याच्या बरोबरच सौंदर्यात केवळ धिप्पाड लॉरेन्टाईन टर्नसनेच मागे टाकलेला, त्याचा पुत्र लॉसस होता. घोड्यांना वठणीवर आणणाऱ्या, हिंस्त्र श्वापदांशी झुंज घेऊन त्यांना जिंकणाऱ्या लॉससने एक सहस्त्र योद्धयांचे नेतृत्व केले. ॲगिला नगरीतून त्याच्या मागून आलेल्या योद्धयांचे ते आगमन शेवटी व्यर्थच ठरले. आपल्या पित्याच्या जुलुमाखाली त्याला प्राप्त होऊ शकले त्याहून अधिक सुख मिळण्याची त्याची खरे म्हणजे पात्रता होती, मेझेन्टिअसहून अधिक चांगला पिता लाभण्याची त्याची योग्यता होती.

त्याच्यानंतर हर्क्यूलीज जितका सुंदर होता तितकाच सुंदर असलेला हर्क्युलीजचा एक पुत्र ॲव्हेन्टिनस आला. त्याच्या घोड्यांनी जिंकलेल्या विजयी पामच्या फांदीने सुशोभित केलेला रथ त्याने गवति.कुरणावरून हाकला; त्याने आपल्या पित्याचे सन्मान चिन्ह, शंभर सर्पांची प्रभावळ असलेले हायड्राचे चित्र, त्याच्या ढालीवर धारण केले होते. ॲव्हेन्टिनसचा जन्म ॲव्हेंन्टाईन पर्वतावरील वनात गुप्तपणे झाला होता, योगिनी ऱ्हीआ ही त्याची माता होती; गेरिआॅनचा वध केल्यानंतर, टायरिन्थिअन हर्क्युलीजने विजयश्रीच्या दिमाखात लारेन्टाईन कृषीभूमीत प्रवेश केला आणि त्याच्या स्पॅनिश गाई इट्रस्कन नदीत डुंबल्या, तेव्हा या मर्त्य स्त्रीचा त्या देवाशी संयोग झाला. त्याच्या सैनिकांनी समराकरिता भाले आणि सरळ खड्गे हाती धारण केली होती; परंतु ते वक्र असिधारानी किंवा सॅबेलिअन दांडपट्ट्यानेही लढत असत. त्यांचा प्रमुख स्वतः प्रासादाकडे चालत आला. त्याने खांद्यावर बांधलेले अजस्त्र सिंहाचे कातडे हेलकावत होते, त्यावरील भयंकर राठ केस विस्कटलेले होते. ते कातडे त्याने डोक्यावर ओढले होते आणि सिंहाच्या जबड्यातील पांढरे सुळे विकट हास्यात विचकलेले होते; हर्क्यूलीजच्या या वेषात तो क्रूर दिसत होता.

त्याच्यानंतर टायबरच्या किल्ल्याहून आलेले दोन भाऊ होते; तिसऱ्या भावा-वरून त्यांच्या देशातील लोकांना टायबरटस हे नाव प्राप्त झाले होते, त्या भावांची नावे कॅटिलस आणि प्रतापी कोरॅस अशी होती, ते तरुण होते आणि आर्गाईव्ह रक्ताचे होते. ते दोघे पुढच्या रांगेतून आघाडीवरून शस्त्रांच्या वर्षावातून, पर्वत

शिखरावरून, हिमाच्छादित ऑथ्रिस आणि होमोलीवरून दौडत खाली येणाऱ्या विस्तृत अरण्ये ज्यांना वाट करून देतात आणि वाळलेली काष्ठे काडकन् मोडून ज्यांना चालायला जागा करून देतात त्या मेघांचे पुत्र सेंटॉरांप्रमाणे चाल करून येत असत.

ज्याने प्रिनेस्टी नगराची स्थापना केली तो सिक्यूलसही त्यांना येऊन मिळाला. त्याचा जन्म व्हल्कनपासून झाला आहे असे तेव्हापासूनची प्रत्येक पिढी मानीत आली आहे. शेत जमिनीवरील गुरांच्या खिल्लारामध्ये, राजा होण्यासाठी म्हणून त्यांचा जन्म झाला; हे नवजात अर्भक शेकोटीतील अग्नीजवळ सापडले होते. त्याच्याबरोबर ग्रामजनांची प्रचंड दले आली होती. त्यांना दूर प्रदेशातून पाचारण केले होते. त्यांची वसती प्रिनेस्टीच्या उंच भागात, गॅबी येथील जूनोच्या शेत जमिनीवर, शीतल ॲनिओजवळ आणि हर्निकनच्या, झऱ्यांनी भिजविलेल्या सच्छिद्र खडकांच्या प्रदेशात होती; त्यांच्याबरोबर ॲनॉग्नीआच्या संपन्न भूमीतून किंवा पिता ॲमॅसेनसच्या नदीतून जीवन प्राप्त होणारे लोकही होते. त्या सर्वांच्याच जवळ शस्त्रे किंवा खडखडाट करणाऱ्या ढाली किंवा गडगडणारे रथ होते असे नाही. त्यातील बरेचसे गोफणीतून शिशाच्या करड्या गोळ्यांचा वर्षाव करीत; परंतु काही हातात भाल्यांच्या जोड्या परजीत होते. लांडग्यांच्या कातड्याच्या तपकीरी टोप्या त्यांनी आपल्या मस्तकाचे रक्षण करण्याकरिता डोक्यासरशी घातल्या होत्या! डाव्या अनावृत पायाचे ठसे उठवीत ते चालत! उजव्या पायावर न कमावलेल्या चामड्याची पादत्राणे घातलेली असत.

त्याचवेळी साक्षात नेपच्यूनचा पुत्र, ज्याचा मृत्यू अग्नीने किंवा शस्त्राने होणार नाही असे देवांचे वरदान होते, त्या घोड्यांना वठणीवर आणणाऱ्या मेसॅपसने पुन: खड्ग धारण केले. युद्धात चालून जाण्याचा दीर्घकाळ सराव नसलेल्या सुखासीन जीवनात संतोष मानणाऱ्या जमातींना त्याने शस्त्रे धारण करावयास लावून एकत्र केले. त्यांच्यापैकी काहींची वसती फेसे निअमच्या अंतर्दुर्गात होती, किंवा ते, मैदानात वसती करून राहिलेले फॅलिस्कन होते; दुसरे सॉरॅक्टीज पर्वताच्या खडबडीत शिखराखाली, सिमिनस पर्वत आणि त्याच्या सरोवराजवळील फ्लॅविनिअमच्या शेतजमिनींवर किंवा कॅपेनाच्या पवित्र कुंजातून राहणारे लोक होते. कुरणातून परतणारे हिमधवल हंस जसे मृदुल मेघांतून जाताना, माना पुढे काढून आपले तालबद्ध संगीत गातात, आणि त्यांच्या ध्वनीच्या आघाताने नदी आणि आशियातील दलदल दूरवर घुमून उठतात त्याप्रमाणे– ते लयबद्ध तालात, त्यांच्या राजाच्या स्तुतीपर, कवायतीची गीते गात चाल करून जात. हे पुढे पुढे चाल करून जात असलेले असंख्य लोक म्हणजे खरो–

खर ब्राँझची चिलखते घातलेले लढाऊ सैन्य आहे असे कुणालाही वाटले नसते, परंतु ते खोल समुद्रावरून भूप्रदेशाकडे येणारे, जोरदार आवाजाच्या, हवेतून भ्रमण करणाऱ्या पक्ष्यांचे घनसदृश थवे आहेत असे वाटले असते आणि या इकडे प्राचीन सॅबाईन वंशाचा क्लॉसस हा एका सामर्थ्यशाली तुकडीला त्वरेने कूच करण्यासाठी हुकूम सोडीत होता. परंतु तो स्वतःच एखाद्या प्रबळ सेनेसारखा सामर्थ्यशाली होता. तो सर्व क्लॉडिअन टोळ्यांच्या वंशाचा व क्लॉडिअन घराण्याचा पूर्वज होता. रोममध्ये सॅबाईनांना त्यांच्या वाट्याचा अधिकार प्रदान करण्यात आल्यानंतर, सर्व लॅटिनममधे हा वंश पसरला. क्लॉससबरोबर फार प्रचंड सेना आली; त्यापैकी काही पुरातन क्विराईटस होते, काही ॲमिटर्नमहून आले होते, इरिटम आणि जिथे ऑलिव्ह वृक्षांची लागवड होते त्या म्युट्यूस्काहून सर्व सेना आली होती; त्याच प्रमाणे नॉमेन्टम नगरीत रहाणारे, व्हेलिनस सरोवराभोवतालच्या रोझीआ प्रदेशातून, टेट्रिकाच्या सुरीसारख्या धारदार कडेकपारींतून, किंवा कॅस्पेरियातील सेव्हिरस पर्वतप्रदेशातून फॉऱ्युलीतून आणि हिमेला नदीजवळील प्रदेशातून आलेले; टायबर आणि फॅबॅरिसचे जल प्राशन करणारे; थंड नुर्सियाहून पाठविलेले आणि होर्टीचेसुद्धा सैन्य आणि लॅटिन लोक, आणि शिवाय ज्यांची भूमी विभागलेली आहे तेथून आणि अभागी नाम असलेल्या ॲलिआने भिजविलेल्या प्रदेशातून लोक आलेले होते. ते निर्दय मृगशीर्ष नक्षत्र हिवाळ्याच्या लाटांआड लपलेले असताना लिबिआच्या धवल सागरावर उठणाऱ्या लाटांइतके किंवा जेव्हा लिसिआच्या पिवळ्या पडलेल्या शेतांवर किंवा हर्मसच्या सखल प्रदेशावर नव्या तेजाने सूर्य तळपतो तेव्हा कोळपून निघणाऱ्या मक्याच्या कणसांइतके अगणित होते. ढालींचा खणखणाट होत होता; आणि त्यांच्या पावलांच्या आघाताने पृथ्वी भयभीत झाली होती.

त्यांच्या नंतर आला हॅलिसस–ॲगमेमनॉनचा माणूस, आणि ट्रॉयच्या नावाचाही द्वेष करणारा शत्रु; त्याने रथाला घोडे जुंपले आणि टर्नसच्या सहाय्याकरिता आपल्या एक सहस्त्र स्वाभिमानी टोळ्यांना घेऊन त्वरेने कूच करीत निघाला. त्यांच्यापैकी काही बॅक्कसला अत्यंत फलद्रूप होणाऱ्या मॅझिक भूमीची कुदळीने मशागत करीत असत. आणखी दुसऱ्यांना ऑरन्कन श्रेष्ठींनी उंच पर्वतप्रदेशातून किंवा जवळच्या सिडिसिनिअनांच्या सखल भूमीतून पाठविले होते; काही कॅलसिहुन आले होते; काही उथळ पात्र असलेल्या व्होल्टर्नस नदीजवळ राहत असत, त्या शिवाय अत्यंत कडवे असे सॅटिक्यूलाचे लोक होते आणि ऑस्कनांचीही एक तुकडी होती. फेकण्याची गोलाकार गदा हे त्यांचे शस्त्र

होते, या गदा लवचीक वाद्यांनी बांधण्याची त्यांची प्रथा होती. चामडयाच्या ढालींने त्यांच्या डाव्या हाताचे रक्षण होत असे; आणि हातघाईच्या लढाईत ते जंबियांचा उपयोग करीत. या कथेत इबॅलसचा उल्लेख केल्याशिवाय चालणार नाही. असे म्हणतात की वयस्कर असलेला टेलॉन, कॅप्रिईमधील टेलीबीवर राज्य करीत असता, सेबेथिस या वनदेवतेला त्याच्यापासून एक पुत्र झाला. वारसा हक्काने प्राप्त झालेल्या राज्याने त्याचे समाधान होत नव्हते, परंतु सार्नस नदी ज्या सखल प्रदेशावर जलसिंचन करते त्या सॅरॅस्टिअन टोळयांच्या विस्तृत भूमीवरही कबजा करण्याचा त्याचा कधीपासूनचा प्रयत्न चालू होता; आणि रूफी, बॅटुलम, आणि सेलेग्नाच्या कृषी भूमीवर वसती असलेले, किंवा जिथून सफरचंदांच्या बागांमधून ॲबेलाची तटबंदी खाली डोकावते तेथील योध्देही इबॅलसला आपल्या सत्तेखाली आणावयाचे होते. आणि त्याने टयूटॉनप्रमाणे त्यांनाही बूमरॅंग फेकण्याचे शिक्षण दिले होते; बुचाच्या वृक्षांच्या सालींची शिरस्त्राणे त्यानी डोक्यावर घातली होती, आणि त्यांच्या ब्रॉंझने मढविलेल्या छोटया गोल ढाली आणि ब्रॉंझची खड्गे झगमगत होती.

पर्वतप्रदेशातील नेर्सिने, कथांमधून रणांगणावर भाग्यवान म्हणून विख्यात असलेला राजपुत्र युफेन्स याला युद्धावर पाठविले होते. त्याचे गिरीजन इक्विक्युलन हे इतरांहुन मागासलेले रानटी स्थितीत होते; ते कठीण नापीक भूमीवर उपजीविका करीत व अरण्यात नित्य शिकार करीत. जमिनीची मशागत करतेवेळीही ते सशस्त्र असतात, आणि नित्य नवी लूट करून ती घरी हाकून आणण्यात त्यांना नेहमी आनंद वाटत असे. आणि लूटमारीच्या उत्पन्नावरच ते जगत असत.

मॅरूव्हिअन जमातीचा एक पुरोहीतही आला होता. त्याने आपल्या शिरस्त्राणावर बहरलेल्या ऑलिव्ह पर्णाचा तुरा खोवला होता. तो महान प्रतापी अम्ब्रो होता, आणि त्याला राजा आर्किपसने पाठविले होते. तो त्याच्या संगीताने आणि हस्तस्पर्शाने विषारी सर्पावर व विषारी निश्वास टाकणाऱ्या जलसर्पांवर, त्यांचे क्रोधदमन करून, त्यांच्यावर निद्रिस्त करणारे सिंचनही करू शकत असे, आणि आपल्याकौशल्याने सर्पदंशावर उताराही देत असे. परंतु डार्डन भाल्याचा घाव बरा करण्याइतके सामर्थ्य त्याच्या ठायी नव्हते, कारण मार्सच्या पर्वतावरून जमविलेल्या निद्रा आणणाऱ्या वनस्पती व मंतरलेले ताईत त्याला स्वतःच्या जखमा बऱ्या करण्यासही उपयोगी पडल्या नाहीत. अँगिशियाचा कुंज, व निर्मल जललहरी असलेल्या फ्युसाईन सरोवराने त्याच्याकरिता आक्रोश केला आणि स्वच्छ जलाशयांनी शोक केला.

हिपॉलिटसचा एक पुत्र व्हिर्बिअसही मोठ्या थाटात युद्धावर दौडत आला. त्याची माता अॅरिशिआ हिने त्या गुणी पुत्राला पाठविले होते. एजेरियाच्या अरण्यात तिच्या सरोवराजवळील दलदलीच्या प्रदेशाजवळील अरण्यात, जिथे डायनाच्या वेदीवर केलेल्या समृद्ध यज्ञयागाने तिची कृपा प्राप्त होत असे, तिथे त्याचे पालन झाले होते. अशी कथा सांगतात की सावत्र आईच्या कपटाने मृत्यू पावलेला व उधळलेल्या घोड्यांच्या टापांखाली छिन्नविच्छिन्न झालेल्या हिपॉलिटसने आपल्या रक्ताने आपल्या पित्याचे ऋण पूर्णपणे फेडले, नंतर तो आकाशाखालील वातावरणात तारकांचे पुन: दर्शन घेण्याकरिता अॅपोलोच्या औषधींनी व डायनाच्या प्रेमाने पुन: जिवंत झाला. परंतु मर्त्य मनुष्य पाताळलोकातील छायांतून चैतन्यमय सूर्यप्रकाशात यावा हे त्या सर्वशक्तिमान पित्याला रुचले नाही; त्याने त्या निरामय करणाऱ्या औषधी निर्माण करणारा अॅपोलोचा पुत्र इस्क्युलॅपिअस याला स्वत:च्या वज्राने स्टीक्सच्या जलात खाली फेकले. परंतु दयाळू डायनाने हिपॉ–लिटसला सुरक्षितपणे दूर एका घरात लपविले; वनदेवता एजेरियाच्या निगेखाली तिच्या अरण्यात तिने त्याला बंदिस्त करून ठेवले होते; तिथेच इटलीच्या अरण्यात त्याला सर्व जीवन व्हिर्बिअस या दुसऱ्या नावाने अज्ञातवासात एकट्याने व्यतीत करायचे होते. आणि याचमुळे डायनाच्या पवित्र वनात किंवा तिच्या मंदिरात शिंगासारखे टणक खूर असलेल्या घोड्यांना प्रवेश नाही. कारण समुद्रातून वर आलेल्या राक्षसास पाहून बिथरलेल्या घोड्यांनीच तो रथ आणि त्यातील तरुण राजपुत्र यांना समुद्रकिनाऱ्याजवळ भूमीवर पाडले होते. तरीही त्याचा पुत्र स्वत:चे तेज घोडे फेकीत सखल प्रदेशातून आपला रथ हाकारीत युद्धावर आला होता.

इतरांहून एका पूर्ण डोईने उंच असलेला उमद्या दिसणारा टर्नस स्वत: हाती शस्त्र धारण करून आघाडीवरील सैन्यातून इकडे तिकडे फिरत होता. त्याच्या उंच शिरस्त्राणावर पिसांचा तिहेरी तुरा खोवलेला होता, आणि त्यावर जबड्यातून एट्नाच्या ज्वालांचे निश्वास टाकणारा किमेरा होता. आणि रक्ताच्या पाटांमधे समराची तीव्रता जशी वाढे तसा तो अधिक मोठ्याने गर्जे आणि त्याच्या ज्वालांचा दाह अधिक प्रखर होई. त्याच्या ढालीवर असलेल्या इओच्या सुवर्ण प्रतिमेने त्याच्या चकचकीत ढालीला वैशिष्ठ्य प्राप्त करून दिले होते; तीवर इओ गाईमध्ये रूपांतर झालेली दाखविली होती. तिच्या अंगावर ताठ केस होते आणि तिने आपली शिंगे उगारली होती.– ते चिन्ह मोठे सूचक होते; तिच्या बरोबर इओच्या कौमार्याचे रक्षण करणारा आर्गस दाखविला होता. आणि कौशल्याने घडविलेल्या चांदीच्या पात्रातून आपली नदी ओतणारा पिता इनॅकस होता.

टर्नसच्या मागून पायदळातील सैनिकांचा लोट येत होता; त्यांच्या ढाली घेत–लेल्या रांगांनी सर्व रणमैदान व्यापले होते. ॲरगॉसची सेना, ऑरनकॅनचे दल, रूटुलिअन पुरातन सिकॅनिअन, युद्धार्थं शिस्तीत चाललेले सॅक्रॅनिअन आणि रंगीत ढाली असलेले लॅबिकन; त्यांच्याबरोबरच टायबरच्या व न्युमिकसच्या पवित्र काठांवरील दऱ्यात शेती करणारे, किंवा रुटुलिअन टेकड्यात, सरसेईच्या भूशिरावर, ॲन्क्सरच्या ज्युपिटरची सत्ता असलेल्या शेतवाड्यात व आनंदित असलेल्या फीरोनियाच्या हरित वनात शेती करणारे लोक होते; आणि इतर सॅटचूराच्या काळ्या दलदलीजवळ आणि जिथे थंड युफेन्स आपला मार्ग खोल दऱ्यातून काढून शेवटी समुद्रात लपून जाते तिथे वसती असलेले लोक होते.

या सर्वांसह कॅमिला आली. ती व्हॉल्शिअन वंशाची होती, तिने ब्राँझमधे झगझगणाऱ्या घोडेस्वाराच्या तुकड्यांच्या एका मोठ्या विभागाचे नेतृत्व केले. ती लढाऊवृत्तीची होती. कुवारपणी तिच्या हाताला मिनर्व्हाच्या चातीचा किंवा कातलेल्या लोकरीच्या टोपलीचा धागा कातण्याकरिता कधी स्पर्शही झाला नव्हता व तिच्या हातांना ते वळण कधीच लागले नाही, परंतु कुमारी असूनही ती घनघोर संग्रामाला मात्र लढत देत असे आणि पायाच्या गतीत ती वाऱ्यालाही मागे टाकीत असे. उभ्या पिकावरून ती वेगाने अलगद धावली असती तर तिच्या स्पर्शाने नाजूक कणसांनाही कधी धक्का लागला नसता; किंवा सागरावरील उफाळत्या लाटांवरून अगदी मधून तिने आपला मार्ग आक्रमिला असता तर तिच्या गतिमान पायाचे तळवे लाटांच्या पृष्ठभागाने एकदाही ओले झाले नसते. माता आणि युवकांचे थवे घरातून आणि शेतातून बाहेर पडत असताना कौतुकाने, तिच्याकडे ती जात असताना पहात; राजशाही थाटात जांभळ्या वस्त्राने तिचे नितळ खांदे कसे सजले आहेत, सोन्याच्या चापाने तिचे केस कसे जागच्या जागी बसविले आहेत व तिने लिसिअन भाता कसा लटकविला आहे आणि भाल्याचे फाळ बसविलेला मेंढपाळांचा मर्टलचा दंड कसा धारण केला आहे हे आश्चर्याने आ वासून ते पहात होते.

## सर्ग आठवा

# भावी रोम नगराची जागा

टर्नसने लॉरेन्टाईन अंतर्दुर्गावर युध्दाचे निशाण फडकवले, त्याच्या घोड्यांना चेव आणला आणि आपल्या शस्त्रांचा खणखणाट केला, रणभेरींचा कर्कश स्वर दणकून उठला. मनाचा सारा तोल एकदम सुटून सगळे लॅशिअॅम सशस्त्र प्रतिकाराच्या वेडाने पछाडले होते; तरुण माणसे रक्त सांडण्यासाठी बेभानपणे पिसाट झाली. त्यांचे प्रमुख, मेसॅपस, युफेन्स आणि देवांचा उपहास करणारा मेझेन्टिअस यांनी बऱ्याच मोठ्या भागातील शेतकऱ्यांच्या पिकांची पार सगळी कापणी करून पहिल्या प्रथम आपली खंडणी वसूल केली. वेन्युलसला तर मदतीकरिता डायोमिडीच्या नगरीलासुध्दा पाठविले होते. ट्रोजनांनी आतापासूनच लॅशिअॅममध्ये कसा शिरकाव करून घेतला आहे, आपली जुन्या घरातील पराजित दैवते घेऊन इनीआस समुद्रावरून येऊन, या देशाचा आपण राजा व्हावे, असा दैवी आदेश आहे असा दावा कसा करीत आहे, असंख्य माणसे कशी या डार्डन राजपुत्राला येऊन मिळाली आहेत व त्याच्या नावाला सर्व लॅशिअॅममध्ये दूरवर कीर्ती कशी प्राप्त होत आहे हे स्पष्ट करून सांगण्याचे कार्य त्याच्याकडे होते. या राजपुत्राने केलेल्या या पहिल्या हालचालींचा हेतू नेमका काय होता किंवा दैवाने त्याला साथ दिली तर या युध्दाचा कोणता परिपाक त्याला अपेक्षित होता हे राजा टर्नस किंवा राजा लॅटिनसहूनही डायोमिडीला अधिक स्वच्छपणे कळत होते.

लॅशिअॅममध्ये घटना याप्रमाणे घडत होत्या. आणि लॅओमिडॉनच्या कुलातील हा वीरपुरुष जे घडत होते ते पाहून चिंतेच्या खवळणाऱ्या लाटांवर फेकला गेला होता. एखाद्या पात्रात खळखळणाऱ्या, सूर्यप्रकाशाने उजळलेल्या किंवा चन्द्रकिरणाचे आपल्या पृष्ठावरून परावर्तन करणाऱ्या पाण्यावर पडलेला थरथरता प्रकाश जसा सर्वत्र दूरवर चंचलपणे फिरतो, आणि शेवटी वर हवेत झेपावतो आणि

डोक्यावरील तक्तपोशीतील चौकटींवर पडतो त्याप्रमाणे त्याचे मन सारखे सर्व बाजूंनी तडफडत होते; आपल्या सर्व समस्यांचा उलगडा करण्यात सहाय्यभूत होतील अशा निरनिराळ्या दृष्टीकोनांचा तो घाईघाईने शोध घेत होता. तो रात्रीचा समय होता, आणि सर्व भूलोकावर शिणलेले जीव, आकाशगमन करणाऱ्या पक्ष्यांच्या जमाती आणि शेतातील जनावरे गाढ निद्रेच्या आधीन झाली होती. त्याचवेळी युद्धाच्या भीषणतेने अंतःकरण विकल झालेला ट्रॉयप्रमुख इनीआस आभाळाखालच्या थंड प्रकाशात नदीकिनाऱ्यावर विसावला आणि रात्री खूप उशिरा त्याने आपला देह विश्रांतीच्या स्वाधीन होऊ दिला. आणि त्या स्थलाचा देव त्याच्या सुखद व पॉपलर पर्णांनी आच्छादित अशा प्रवाहातून वर आलेला पुरातन टायबर स्वतः त्याच्या पुढे प्रकट झाला. तलम धाग्याचे करडे वस्त्र त्याने परिधान केले होते, आणि केसात वेळूची श्यामल पाने माळली होती. नंतर तो इनीआसशी बोलला आणि आपल्या शब्दांनी त्याच्या सर्व चिंतांचा त्याने परिहार केला. 'हे देवकुलोत्पन्ना, तू ट्रॉयनगरी शत्रूच्या हातून पुनः आमच्याकडे परत आणीत आहेस. आणि तिच्या रक्षणाचे केन्द्रस्थान चिरंतन राखणार आहेस. लॉरेन्टाईन भूमी आणि लॅटिन जमीन तुझी दीर्घकाल प्रतीक्षा करीत आहेत. तुझे घर इथे निश्चित होणार आहे आणि कुलदैवतांचे अंतिम स्थानही इथेच आहे. पाऊल मागे घेऊ नको. युद्धाच्या धमक्यांनी घाबरू नको. कारण देवांचा प्रकोप आणि त्यांचे दुष्ट वैर आता संपले आहे. आणि हे सगळे तुझ्या निद्रेने निर्मिलेले कल्पित स्वप्न आहे, असे तुला वाटू नये म्हणून हे एक चिन्ह दाखवीत आहे. समुद्र किनाऱ्यावर सदापर्णी ओक वृक्षाच्या तळाशी पसरलेली एक प्रचंड शुभ्र वराही, नुकत्याच जन्म दिलेल्या तीस पिलांसह तुला आढळेल. तिच्या सारखीच सर्व पांढरी असलेली ती पिले तिच्या आचळांना लुचलेली असतील. हीच जागा तुझ्या नगराचे स्थान असेल, आणि तिथेच तुला तुझ्या कष्टांपासून निश्चित विश्रांती लाभेल. आतापासून तीस वर्षांच्या कालचक्रभ्रमणानंतर अॅस्केनिअस अल्बा हे प्रख्यात नाव असलेल्या नगरीची स्थापना करील. माझे भाकित खोटे ठरणार नाही. आता लक्षपूर्वक ऐक; कारण तुझ्यापुढे असलेल्या समस्यांच्या गुंत्यातून तू यशस्वीपणे कसा मार्ग काढावास त्याचे उपाय मी तुला थोडक्यात स्पष्ट करणार आहे. इथे या प्रदेशात पॅलस पासून चालत आलेल्या कुलातील आर्केडिअन रहातात. राजा इव्हॅन्डरचे साथी म्हणून त्यांनी त्याचा आणि त्याच्या ध्वजाचा आश्रय घेतला आहे; आणि पर्वतप्रदेशातील एका मनपसंत जागेवर आपल्या पूर्वजांच्या नावावरून पॅलॅन्टिअम हे नामाभिधान दिलेल्या नगरीची त्यांनी स्थापना केली आहे. लॅटिन राष्ट्र व आर्केडिअन यांचे दीर्घकाळ अखंड युद्ध चालू आहे. त्यांच्याशी

तह करून त्यांना सामील करून घे आणि दोस्त राष्ट्र म्हणून तुझ्या सेवेत त्यांचा समावेश कर. मी स्वतः तुला माझ्या प्रवाहाच्या किनाऱ्यावरून घेऊन जाईन आणि प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने गलबते हाकारण्यास सहाय्य करीन. म्हणून हे व्हीनसपुत्रा चल, ऊठ, आणि तारका अस्तंगत होऊ लागल्या की जूनोची यथोचित आराधना करून, शरणागतीच्या शपथा घेऊन व्रतांनी तिच्या प्रकोपाच्या धाकावर मात कर. तुझा तुला विजय प्राप्त झाल्यावर तू माझा कृतज्ञतेने सन्मान करून माझे ऋण पुर्णपणे फेड. मी, तू पहातोस तो या किनाऱ्यांना घसटून वहाणारा आणि उदंड जलौघाने समृद्ध कृषीभूमीमधून मार्ग काटणारा जलटायबर, परमेश्वराचा सर्व नद्यांपेक्षा जास्त लाडका तो मी आहे. माझ्या भव्य महालातून ओसंडून वाहणारी महाधारा इथे, या स्थळी आहे. ती गौरवशाली नगरांच्या जीवनाचे उगमस्थान आहे.

तो नदीदेव असे बोलला, आणि खोल डोहात सूर मारून तळाशी गेला. निद्रा आणि निशा यांनी बरोबरच इनीआसचा निरोप घेतला. तो उठला आणि आकाशात प्रगटणाऱ्या सूर्यप्रभेकडे त्याने निश्चल नयनांनी पाहिले; विधीपूर्वक आपल्या ओंजळीत नदीजल उंच धरून तो आकाशाला उद्देशून अंतःकरणपूर्वक बोलला. 'वन देवतांनो, नदीजलातून जन्मलेल्या लॉरेन्टाईन जलदेवतांनो, पिता टायबर, तू आणि तुझा पवित्र जलौघ, माझा, इनीआसचा स्वीकार करा आणि अखेर माझ्या संकटात मला संरक्षण द्या. आमच्या आपत्तीत आम्हावर दया करा म्हणून जिथे-जिथे कोणत्याही झऱ्याने तुमची निवासस्थाने असलेले डोह भरत असतील, आणि जिथे जिथे तुम्ही कुठल्याही भूमीतून वैभवाने प्रगट होत असाल तिथे तिथे पश्चिमभूमीतील सर्व जलावर अधिसत्ता असलेल्या हे वक्राकार नदी, सन्मान आणि आराधना यांनी माझ्याकडून तुमचा नेहमीच सत्कार केला जाईल; मात्र तुम्ही स्वतः नेहमी माझ्याबरोबर रहावे व प्रत्यक्ष उपस्थितीत आपल्या दृष्टांतांची साक्ष पटवून द्यावी. असे म्हणून त्याने आपल्या आरमारातील वल्हयांच्या जोड बैठकीची दोन गलबते निवडली, वल्ही मारणाऱ्या खलाशांची भरती केली आणि हे करीत असताना आपल्या सशस्त्र सोबत्यांना एकत्र केले.

अचानक एक लक्षणीय आणि प्रभावी दृश्य दिसू लागले. त्या हिरव्या नदी किनाऱ्यावर एक तेजस्वी पांढरी वराही त्याच वर्णाच्या तिच्या पिलावळीसह वनातील जमिनीवर पसरलेली दिसली. सत्यशील इनीआसने उपकरणे आणली आणि त्या वराहीला आणि पिलावळीला वेदीवर ठेवले. आणि त्याने त्या सर्वांची जूनोला, केवळ जूनोला, सर्वश्रेष्ठ जूनोला आहुती दिली. त्यांनंतर टायबरने आपला

खळबळता प्रवाह सर्व रात्रभर शांत ठेवला, आणि आता निःशब्द झालेल्या आपल्या लाटांचा ओघ थांबविला. आणि त्याने त्याच्या पृष्ठावरील लहरी सारख्या केल्यानंतर त्याचा पृष्ठभाग इतका शांत झाला की ज्याच्यावर वल्ह्यांना ताण पडणार नाही अशा एखाद्या दयार्द्र जलाशयासारखा किंवा शांत दलदलीसारखा तो दिसला. अशा तऱ्हेने नंतर ट्रोजनांनी आपला प्रवास सुरु केला आणि इनीआसला जे सांगण्यात आले होते ते ऐकून उत्साहित होऊन त्यानी जहाजे वेगाने हाकारली. लुकण लावलेली पाईनची जहाजे उथळ पाण्यावरून सुळकन सरकत होती. लाटा सुद्धा आश्चर्यचकित झाल्या आणि या दृश्याला नवखी असलेली अरण्ये, योद्धयांच्या दूरवर चमकणाऱ्या ढाली वाहून नेणारी गडद रंगाची गलबते तरंगताना पाहून थक्क झाली. एक दिवस आणि एक रात्र सरेपर्यंत ट्रोजन अविश्रांतपणे जहाजे वल्हवीत होते. मोठी वळणे मागे टाकून, आणि नाना प्रकारच्या वृक्षांच्या छायेतून त्यांनी अनुकूल नदीप्रवाहावरून हरित अरण्यांमधून मार्ग काढला. तप्तसूर्य आकाशगोलाच्या मध्यबिंदूवर चढला तेव्हा त्यांच्या समोरच त्याना तटभिंती, बालेकिल्ला आणि विखुरलेली घरांची छपरे दिसली; रोमन सामर्थ्याने आता त्या सर्वांची कीर्ती स्वर्गाइतकी उंचावली असली तरी त्या काळी इव्हॅन्डर तिथे दारिद्र्यातच जगत होता. त्यांनी त्वरेने नाळी किनाऱ्याकडे वळविल्या. आणि ते नगरीच्या जवळ येऊन ठेपले.

योगायोगाने त्याच दिवशी अर्केडिअन राजा, ॲम्फिट्रिऑनचा शक्तिशाली पुत्र, हर्क्यूलीज आणि इतर देव यांच्या सन्मानार्थ वार्षिक उत्सव त्याच्या नगरीसमोरच्या वनात साजरा करीत होता. त्यांच्याबरोबर त्यांचा पुत्र पॅलस प्रमुख तरुण अर्केडिअन आणि त्याची नगरसभा ही सर्व फारशी संपन्न नसलेली मंडळी देवतांपुढे धूप जाळीत होती आणि वेदीवर उष्ण रक्त वाहत होते. त्यांनी जेव्हा ती गलबते दोन्ही बाजूंच्या छाया तरूंच्या अरण्यांमधून तरंगत येताना पाहिली व खलाशी निःशब्दपणे वल्ही वल्हविताना त्यांना दिसले तेव्हा या अन-पेक्षित दृश्याने ते घाबरले, आणि भोजनसमारंभ सोडून सर्वजण एकदम उठून उभे राहिले. परंतु पॅलसने साहसी वृत्तीने त्यांना 'विधी खंडित करू नका' असे सांगितले आणि एक शस्त्र हाती घेऊन या परकीयांना भेटण्याकरिता तो एकटाच धावला. बरेच दूर असतानाच एका उंचवट्यावरून तो ओरडला. 'योद्धयांनो, कोणत्या हेतूने या अज्ञात मार्गाचा शोध घेण्यास तुम्हाला प्रवृत्त केले ? तुम्ही कोठे निघाला आहात ? तुम्ही कोणत्या वंशाचे आहात ? तुम्ही मागे सोडून आलात ते घर कुठे आहे ? आणि तुम्ही आम्हाकडे मित्रभावाने आला आहात की युध्द करण्यासाठी ? आपल्या गलबताच्या उंच वरामावरून प्रमुख इनीआस शांततेचे प्रतीक असलेली

ऑलिव्हची डहाळी हातात पुढे धरून, उत्तरला. 'तुझ्यापुढे दिसत आहेत ते ट्रोजन कुलातील पुरूष आहेत. त्यांच्या शस्त्राचे वैर,आम्ही आश्रय मागितला तेव्हा ज्यांनी आम्हाला तिरस्काराने धिःकारले त्या लॅशिअॅमच्या लोकांशीच केवळ आहे. आम्ही आता इव्हॅन्डरच्या शोधात आहोत. आमचा निरोप त्यांच्याकडे घेऊन जा; त्याला सांग की डार्डनचे निवडक नेते मैत्रीचे सशस्त्र साहाय्य मागण्याकरिता आले आहेत. हे महान नाव ऐकून पॅलस आश्चर्याने स्तंभित होऊन उभा राहिला. नंतर तो म्हणाला. 'तुम्ही कुणीही असा, कृपाकरून किनाऱ्यावर उतरा, आणि स्वतः माझ्या पित्याशी बोला; आमचे अतिथी म्हणून सरळ आमच्या घरी या. त्याने त्याचा हात हाती घेतला. आणि त्यांचे हस्तांदोलन दृढ आणि दीर्घ होते. ते चालत चालत पुढे गेले आणि नदी मागे टाकून अरण्यात आले.

इनीआस नंतर स्नेहाने राजाशी बोलला. 'महाराज, ग्रीक लोकात तुम्ही सर्व श्रेष्ठ आहात; आणि दैवी आदेशाने मी ही लोकरीने शृंगारलेली डहाळी तुम्हाला विनंतीपूर्वक अर्पण करीत आहे. आपण एक अर्केडिअन आहात, ग्रीकांचे एक नेते आहात आणि एट्रिअसच्या दोन्ही पुत्रांचे जन्माने संबंधित आहात हे मला माहीत असूनही माझ्या मनात तुमच्या विषयी भयाचा प्रादुर्भाव झाला नाही. उलट माझे स्वतःचे शौर्य,देवांची पवित्र भविष्यभाषिते, माझे वडील आणि आपले वडील यांच्या मधील आप्त संबंध आणि आपली स्वतःची त्रिखंडातील सुकीर्ती ही सर्व एकवटून आपला आणि माझा स्नेह संबंध निर्माण झाला आहे. आणि माझ्या नियतीच्या आज्ञा पालन करण्याकरिता स्वेच्छेने मला येथे आणले आहे. आमच्या इलीयम नगरीचा आद्य संस्थापक पिता डार्डनस हा सागर पार करून टयूक्रिअन लोकांमध्ये गेला आणि त्या नगरीला त्याने सामर्थ्यशाली केले; तो, ग्रीक लोक सांगतात त्यानुसार अॅटलसची कन्या इलेक्ट्राच्या पोटी जन्मला होता, कारण विश्वगोल स्वतःच्या खांद्यावर पेलणाऱ्या शक्तीशाली अॅटलसनेच इलेक्ट्राला जन्म दिला होता. आपला कुलपिता मर्क्यूरी आहे. सिलेनीच्या थंड पर्वतशिखरावर सुंदर माईआच्या गर्भातच तो राहिला आणि वाढला. आता आपण जे ऐकले आहे त्यावर विश्वास ठेवला तर, माईआला सुद्धा अॅटलसनेच– जो आकाशीच्या नक्षत्रपुंजांना पेलतो त्या अॅटलसनेच जन्म दिला होता. अशा तऱ्हेने आपल्या दोन्ही कुलशाखा एकाच वृक्षाच्या मुळातून उद्‌भवल्या आहेत. या संबंधावर विसंबून आपणास प्रथम भेटण्याकरिता मी दूतांचा किंवा राजकीय डावपेचाचा उपयोग केला नाही; परंतु त्या ऐवजी मी माझे स्वतःचे जीवित धोक्यात घालून आपल्या दारी माझी याचना सादर करण्याकरिता मी स्वतः आलो. जो डॉनिअन वंश तुमचा छळ करीत आहे

त्यानेच आमच्यापुढेही निर्दय युद्धाचा धाक उभा केला आहे. त्यांची अशी समजूत आहे की त्यानी आम्हाला हुसकावून लावले की सर्व पश्चिमभूमी पूर्णतया त्यांच्या जोखडा खाली आणण्यास आणि पूर्व आणि पश्चिम किनारा भिजविणाऱ्या सागरावर नियंत्रण ठेवण्यास कोणताही प्रत्यवाय उरणार नाही. आमच्या अभिवचनाचा स्वीकार करा आणि तुमचे अभिवचन आम्हास द्या. युद्धात आम्ही बेडर दिलाने लढतो, आमच्यात हिंमत आहे आणि कृतींनी पारखून निघालेले पौरुषही आहे.

इनीआस असे बोलला. तो बोलत असताना एव्हॅन्डर कांही काळ त्याच्या मुखाकडे आणि डोळ्यांकडे एकटक पहात होता. व त्याच्या सर्व शरीराचे अवलोकन करीत होता. नंतर थोड्याच वेळात त्याने उत्तर दिले. "शूर ट्रोजन श्रेष्ठा, मी मोठ्या आनंदाने तुला आपला मानतो आणि तुझे स्वागत करतो. थोर ॲकायसीझचे शब्द, आवाज आणि मुख मला किती स्पष्टपणे आठवत आहे; आपली बहीण सिऑनी हिच्या राज्याला भेट देण्याकरिता सॅलॅसिसकडे प्रवास करीत असता, लॅओमिडॉनचा पुत्र प्रायम याने आर्केडिआच्या थंड सीमांत आणखी पुढे येऊन दिलेली दुसरी एक भेट मला आठवते. त्यावेळी यौवन माझ्या गालावर त्याच्या पहिल्या बहराचा साज नुकतेच चढवीत होते. सर्वच ट्रोजन प्रमुख मला आवडले होते. त्यामध्ये ॲलॅओमिडॉनचा स्वतःचा पुत्र आवडला होता, परंतु चालत असताना अँकायसीझ सर्वांत अधिक उंच दिसत होता. जाऊन त्या राजपुत्राशी संभाषण करण्याच्या व त्याचा हात माझ्या हाती घेण्याच्या ज्वलंत इच्छेने माझे युवाहृदय भरून गेले होते. म्हणून मी त्याच्याकडे गेलो आणि मोठ्या उत्कट अगत्याने त्याला फेनेऑस नगरीत घेऊन आलो. तो गेला तेव्हा त्याने मला लिसियाचे बाण असलेला एक डौलदार भाता आणि भरजरी धाग्यानी विणलेले एक उपवस्त्र आणि आता माझा पुत्र पॅलसयाच्याजवळ असलेली लगामातील सुवर्णाची मुखनियंत्रणाची जोडी नजर केली. म्हणूनच या तुझ्या भेटीतील उद्दिष्ट असलेल्या संधीमध्ये मी माझा उजवा हातच केवळ तुझ्या हाती दिला नसून, त्याशिवाय, उद्या पहाटे, जेव्हा पृथ्वीवर प्रकाशाचे पुनरागमन होईल आणि मी तुला निरोप देईन त्यावेळी मी तुला दिलेल्या सहाय्याने आणि मी तुला जी भरीव मदत करीन त्याने तुझे पूर्ण समाधान होईल. परंतु तोवर तू माझ्यावर एक कृपा कर, आणि ज्याअर्थी तुम्ही आमचे मित्र म्हणून आला आहात त्याअर्थी आम्ही साजरा करीत असलेल्या आणि जे पुढे ढकलणे पाप होईल, त्या प्रति वार्षिक विधीकर्मात सामील हो आणि मित्रांच्या मेंजाशी घरच्यासारखे वागण्यास सुरवात कर"

असे म्हणून एव्हँन्डरने, जे अन्न आणि मद्य हलविण्यात आले होते ते परत मांडण्याची आज्ञा केली आणि हिरवळीवरील बैठकीवर अतिथीकरिता जागा केली. इनीआसकरिता खास स्वागताची व्यवस्था होती. त्याने त्याला सिंहाचे केसाळ कातडें अंथरलेल्या मेपलच्या आसनावर बसविले. नंतर वेदीच्या पुरोहिताने' निवडक तरुण सहाय्यकांच्या उत्सुक आणि दक्ष मदतीने बैलाचे भाजलेले मांस आणले, माणसांच्या मेहनतीला सेरोज देते त्या देणग्यांनी शिगोशिग भरलेल्या टोपल्या मेजावर मांडल्या आणि बॅक्कसची मदिरा सर्वांना दिली. इनीआस आणि त्याचे ट्रोजन सोबती यानी बैलाची सबंध पाठ आणि यज्ञीय अंतर्भाग यांचे यथेच्छ सेवन केले.

जेव्हा त्यांची भूक पूर्ण भागली आणि अन्नावरची वासना कमी झाली तेंव्हा एव्हॅन्डर बोलू लागला. "हा नेमाने होणारा उत्सव आणि हे धर्मविधीतलाच एक भाग असे भोजन, आणि एका महान शक्तिदेवतेच्या सन्मानार्थ उभारलेली ही वेदी ही सर्व काही कुठल्या चमत्कारिक अंधश्रद्धेने किंवा प्राचीन देवतांच्या उपेक्षेने आमच्यावर कुठल्याही प्रकारे लादलेली नाहीत. हे ट्रोजन अभ्यागता, हे नव्या आराधनेतील विहित विधिकर्म पार पाडण्यास आम्ही कर्तव्याने बांधलेले आहोत, कारण आम्ही खरोखर क्रूर संकटापासून वाचविलेली अशी माणसे आहोत. आता प्रथम पुढे झुकलेला कडा असलेल्या या शिलाखंडाकडे प्रथम पहा आणि त्याच्या पलीकडे, आता वसती नसलेली, परंतु अद्यापि अस्तित्वांत असलेली पर्वत गुहा पहा. तिचे प्रचंड खडकाचे बांधकाम आता पडून झडून गेले आहे, आणि कोसळत्या खडकांनी केलेल्या अमाप नासधुशीच्या खुणा अद्यापीही दिसत आहेत. सूर्य प्रकाशाच्या कक्षेपलिकडली खूप खोलवर गेलेली अशी एक खोल गुहा पूर्वी इथे होती. या गुहेत हिडीस रूप असलेला, कॅकस नावाचा एक नरराक्षस रहात होता. तेथील जमिनीवर नित्य सांडलेल्या रक्ताची दुर्गंधी येत असे; भयानक, कुजलेली, माणसांची फिक्कट शिरे दशहत निर्माण करण्याकरिता गुहेच्या प्रवेशदारातच टांगलेली असत. व्हल्कन हा या राक्षसाचा पिता होता आणि हे अजस्त्र धूड चालताना त्याच्या पित्याच्या भट्टीच्या काळ्याकुट्ट धुरकट ज्वाला त्याच्या तोंडातून ढेकरांसरशी बाहेर पडत असत.

परंतु काल ज्याप्रमाणे सर्वांच्या प्रार्थना ऐकतो त्याप्रमाणे त्याने शेवटी आमच्याही सहाय्याच्या प्रार्थनांना एका देवाच्या आगमनाने उत्तर दिले. कारण, अन्यायांस शासन करणारा सर्वश्रेष्ठ हर्क्यूलीज स्वतःच आला–आणि आला तो त्याच्या

परमआनंदाच्या कालातच; कारण त्यावेळी त्याने नुकताच त्रिदेही गीरिऑनचा वध करून त्याला लुटले होते. या विजयात त्याने जिंकलेले प्रचंड बैल हाकारीत तो मजल मारीत या बाजूला आला होता; त्या खिल्लारांनी सबंध दरी आणि नदीही व्यापली होती. कोणतेही दुष्ट कर्म किंवा फसवणूक करण्याचे, साहस करण्याचे किंवा ते करण्याचा प्रयत्न करण्याचें राहू नये अशी आपल्या पिसाट कल्पकतेमुळे सदैव इच्छा करणाऱ्या कॅकसने चार मोठे उमदे बैल व चार विशेष सुंदर कालवडी त्यांच्या गोठ्यातून चोरून नेल्या; आणि ते पशू त्याने त्यांच्या शेपटांना धरून ओढीत आपल्या गुहेकडे नेले; अशा तऱ्हेनें त्यांच्या खुरांचे बोलके माग राहू नयेत म्हणून त्याने त्यांच्या पायाचे ठसे उलटे उमटविले. त्याने आपल्या खडकाच्या गुहेतील अंधारात हे चोरलेले पशुधन ठेवले होते, आणि कुणी जर त्यांचा शोध करू लागला तर त्याला गुहेकडे नेतील असे कोणतेही माग वाट दाखविण्यास ठेवले नव्हते. त्याच सुमारास तेथून निघण्याची तयारी म्हणून ॲम्फिट्रायोनिड हर्क्यूलीजने त्याचे पुष्ट कळप गोठ्यातून हलविण्यास सुरवात केली होती. ते तेथून दूर जात असताना खिलारे हंबरली, आणि त्यांच्या करुण हंबरण्याने अरण्य भरून गेले आणि ते निघून जाताना त्यांच्या गोंगाटाने टेकड्या दुमदुमत होत्या; त्या प्रचंड गुहेच्या खोल अंतरंगातून एकट्या एका गाईने हंबरून त्यांना उत्तर दिले; आणि ती जरी कडेकोट बंदोबस्तात ठेवलेली होती तरी तिने कॅकसच्या आशांची फसगत केली.

तेव्हा मात्र हर्क्यूलीजची चीड विखारी काळ्या क्रोधाच्या एका प्रचंड उद्रेकाने खवळून उठली. जड गाठी असलेल्या गदेसह काही शस्त्रे उचलून घेऊन उंच पर्वताच्या उभार कपारींकडे तो धावला. त्या दिवसापर्यंत, डोळ्यात घबराट उतरलेला, भ्यालेला असा कॅकस आमच्यापैकी कुणीही कधीही पाहिला नव्हता. परंतु आता तो कसलाही विचार करण्यासाठी न थांबता पूर्ववाऱ्यापेक्षाही चपळाईने आपल्या गुहेकडे धावला. भीतीने त्याच्या पायांना जणू पंख फुटले होते. त्याच्या पित्याने कौशल्याने एका साखळदंडाला टांगलेला प्रचंड खडक तो साखळदंड तोडून त्याने खाली पाडून त्याच्या गुहेच्या दाराच्या दोन्ही बाजूंना हा अडथळा घट्ट बसवून त्याच्या गुहेचे दार त्याने दुर्गम केले आणि स्वतःला त्याने आत कोंडून घेतले.

पण तो पहा! क्रोधाने खवळून टायरिन्थिअन त्या गुहेच्या प्रवेश दारात केव्हाच पोहोचला. दात ओठ खात त्याने एकदा एकीकडून, पुनः दुसरीकडून पहाणी करून प्रवेश करण्याच्या सर्व संभाव्य मार्गांचा विचार केला. उसळत्या संतापाने त्याने ॲव्हेन्टाईन पर्वताला तीन प्रदक्षिणा घातल्या. तीन वेळा त्याने दगडाने अडविलेला

मार्ग मोकळा करण्याचा प्रयत्न केला परंतु व्यर्थ! थकून तीन वेळा तो खालच्या दरीत शिणून खाली पहुडला तिथे एक गारगोटी पाषाणाच्या शिखराचा उंच सुकळा होता, तो त्या गव्हरावरील कपारीवर थेट सरळ उंच गेला होता. जणू त्याच्या भोवतीचा खडक सारखा फोडून काढला होता. शिकारी हिंस्त्र पक्ष्यांच्या घरट्यांस योग्य असलेला तो घेरी आणणारा सुळका म्हणजे एक मनावर ठसा उमटवणारे दृश्य होते. तो सुळका डावीकडच्या नदीकडे कलून खालच्या उतरणी–कडे झुकला होता. हर्क्यूलीझ त्याला उजवीकडून जोर लावीत पुढे रेटू लागला. याने तो हलबिला, मुळापासून उपटला आणि त्याला एकदम धक्का देऊन पुढे लोटला. त्याबरोबर उंच आकाशात गडगडाट झाला नदीकिनारे दूर उडाले आणि नदीचा प्रवाहही भयाने उलटा वाहू लागला. कॅकसची गुहा, त्याचा प्रचंड किल्ला, एकदम उघडा पडला व स्पष्ट दिसू लागला. आणि त्याचा अंधारलेला अंतर्भाग उजेडात आला. जणु काही एखाद्या उत्पाताने भूमी दुभंगली व खोल पाताळातील निवासस्थाने खुली झाली आणि देवांना घृणास्पद वाटणारे फिक्कट साम्राज्य सताड उघडले, आणि भयावह पृथ्वीगर्भ वरून दृष्टीकक्षेत आला आणि आत येणाऱ्या प्रकाशाच्या झोताने पिशाच्चे शहारली. याप्रमाणे अनपेक्षित सूर्यप्रकाशात पकडला गेलेल्या आणि स्वतःच्याच खडकाच्या पोकळीत अडकलेल्या, व पूर्वी कधीही केला नसेल एवढा आक्रोश करीत असलेल्या कॅकसला पाहून हर्क्युलीझने हल्ल्याच्या सर्व प्रकारांचा उपयोग करीत त्याच्यावर वरून अस्त्रांचा मारा केला व त्याची तारांबळ उडवून दिली व झाडांच्या फांद्या आणि प्रचंड शिलाखंड घेऊन त्याच्यावर चाल केली. कोसळलेल्या संकटात दुसरा कुठलाही सोडवणुकीचा मार्ग खुला नसल्यामुळे आपल्या जबड्यातून कॅकसने दाट धुराचे लोट ओकण्यास सुरवात केली. ते दृश्य मोठे आश्चर्यकारक होते, त्याने आपली गुहा दाट, अंध बनविणाऱ्या अंधाराने भरून टाकली. आणि उसळणाऱ्या धुराचे आणि त्यात मिसळणाऱ्या ज्वालांचे धुके निर्माण केले. हे हर्क्यूलीझच्या स्वाभिमानी वृत्तीला सहन होण्याजोगे नव्हते. एक मोठी झेप घेऊन, त्याने जिथून अत्यंत दाट धुराच्या लाटा पसरत होत्या. व काळ्याकुट्ट धुक्याचा भाग जिथे प्रचंड गुहेत घुसळून निघत होता, तिथे आगीतून स्वतःला झोकून दिले. आणि अंधारात अजूनही निष्प्रभ अशा आगीच्या ज्वाला ओकत असलेल्या कॅकसला त्याने पकडले. व त्याची गठडी वळली. त्याचे डोळे डोक्यातून बाहेर पडेपर्यंत आणि त्याचा घसा रक्तहीन व कोरडा पडेपर्यंत त्याने त्याला दाबून धरले. नंतर तात्काल त्याने दारे उपटून काढलीं आणि ती अंधारी गुहा खुली झाली. ते चोरलेले पशु, ज्या लुटीचा कॅकसला त्याग करावा लागला ते चोरलेले पशुधन आकाशाच्या नजरेस पडले. ते

लोळागोळा झालेले प्रेत पायाला धरून बाहेर फरपटत नेण्यात आले, ते भयानक डोळे व तोंड, आणि त्या मानवी-पशूच्या छातीवरील राठ गुंतलेले केस, किंवा आता ज्वाला विझलेला तो जबडा पाहून बघ्यांचे पुरेसे समाधान होत नव्हते.

तेव्हापासून हा समारंभविधी पाळला जात आहे आणि नंतरच्या वंशजांनीही तो क्रम आनंदाने चालू ठेवला आहे. प्रथम ती जबाबदारी पॉटिटिअसवर पडली आणि नंतर ती हर्क्युलीजच्या पूजेचे मानकरी असलेल्या पिनॅरिअन कुलाकडे गेली. पॉटिटिअसने ही वेदी इथे अरण्यात उभी केली. आम्ही तिला आमची 'सर्वश्रेष्ठ वेदी' म्हणतो. आणि आमच्या लेखी ती नेहमीच 'सर्वश्रेष्ठ' राहील. म्हणून तरुण योद्धयांनो, या! मस्तकावर पर्णमाला धारण करा व उजव्या हाती मद्याचे प्याले घेऊन या गौरवशाली प्रतापी कृत्याच्या सन्मानार्थ अर्घ्य अर्पण करा. देवाची प्रार्थना करा. कारण तो आमचा आणि तुमचाही देव आहे. आणि सद्भावनेने ही मदिरा अर्पण करा.' तो आपले बोलणे संपवीत असताना त्याने दाट छाया असलेल्या हर्क्यूलीझच्या प्रिय छायाशील पॉप्लर वृक्षाची एक डहाळी घेतली, आणि तिची माला त्याने आपल्या केसात माळली व त्याच्या रुपेरी हिरव्या पानांचे एक पदकही खोवले. त्याच्या हातात विधीत वापरण्याचे काष्ठपात्र होते. नंतर त्या सर्वांनी मोठ्या आनंदाने आणि त्वरेने आपल्या मेजांवर अर्घ्य दिले आणि देवतांची प्रार्थना केली.

मध्यंतरी ऑलिम्पसच्या खालच्या उतरणीवर संध्या उतरली. नंतर पुरोहित आले. पॉटिटिअस त्यांच्या पुढे होता. त्यांनी रूढीनुसार कातडी परिधान केली होती, आणि हातात जळते पलिते घेतले होते. आणि मेजवानी पुनः सर्वांनी सुरू केली. दुसऱ्यावेळी वाढण्याकरिता त्यांनी आपल्याकडून भर म्हणून अन्न आणले होते. त्यांनी वेदीवर पुरेपुर भरलेली पात्रे मांडली. नंतर पॉप्लरच्या पर्णमाला भालप्रदेशांवर घातलेले सॅली प्रज्वलीत वेदीभोवती गाण्या–करिता आले. त्यांची दोन पथके होती. एक तरुणांचे आणि दुसरे वृद्धांचे, आणि त्यांनी स्तोत्रांतून हर्क्युलीजच्या प्रतापांची गौरवस्तवने गाइली. प्रारंभीच त्याने त्याच्या सावत्र आईने पाठविलेले दोन राक्षसी सर्प स्वतःच्या शक्तीने कसे चिरडून गुदमरवून मारले; ट्रॉय आणि इकॅलिआ ही दोन युद्धात असामान्य शौर्याने लढा देणारी नगरे कशी उखडली, आणि तो राजा युरिस्थिअसच्या सेवेत असताना त्याचा द्वेष करणाऱ्या जूनोने त्याचे कर्मभोग म्हणून त्याच्यावर लादलेली महान श्रमांची एक सहस्त्र कठीण कामे कशी पूर्ण केली, हे सर्व आख्यान त्या स्तोत्रात होते. 'हे अजिक्य देवा! तू स्वतः तुझ्या शक्तीने मेघात जन्मलेल्या एकातच दोन देह असलेल्या हायलिअस आणि फॉलस यांचा वध केलास त्याचप्रमाणे त्या अजस्त्र

क्रेटन वृषभाचा वध केलास; आणि नेमिआच्या खडकाखाली त्या विक्राळ सिंहाला ठार मारिलेस. तू स्टीक्स सरोवराचे पाणी हादरविलेस, आणि रक्ताने भिजलेल्या त्याच्या गुहेत कुरतडलेल्या हाडांच्या राशीवर पहुडलेल्या ऑर्कसच्या रखवालीच्या कुत्र्यालाही थरथर कापायला लावलेस. कुठल्याही पिशाच्याच्या दर्शनाने तू कधी घाबरला नाहीस, हाती शस्त्रे घेऊन उभा राहिलेल्या भल्या उंच टायफिअसनेही तुला भयभीत केले नाही. दाटी करून धडाला बिलगलेल्या आपल्या असंख्य शिरांनी लर्नाच्या सर्पाने तुला विळखे घातले असताही तुझी योजकता कमी पडली नाही. हे ज्युपिटरच्या निष्ठावंत पुत्रा, तुझे स्वागत असो! तू देवांमधील तुझ्या उपस्थितीने त्यांच्या वैभवाला अधिक उजाळा देतोस! तू आमच्या सन्निध ये आणि तुला स्वतःला अर्पिलेल्या पवित्र विधिविहित यज्ञीयांचा स्वीकार कर आणि तुझा कृपाप्रसाद आम्हावर होऊ दे!

अशा तऱ्हेने त्यांनी त्याच्या प्रतापाचा त्यांच्या स्तोत्रातून गौरव केला. आणि नंतर या सर्वांवर कळस म्हणून कॅकसची गुहा आणि अग्नीज्वालेचे निश्वास टाकणारा तो राक्षस यांचे आख्यान असलेली स्तोत्रे गाइली. सर्व अरण्य त्या उत्साही आवाजाच्या तालावर दुमदुमले आणि पर्वतांनी ते गीत प्रतिध्वनित केले. नंतर त्यांची आराधना पूर्ण झाल्यावर सर्व समुदाय चालत नगरीकडे परतला; वार्धक्याने अवघडत चालत असताना राजाने सोबतीकरिता इनीआस आणि त्याचा स्वतःचा पुत्र यांना आपल्या दोन्ही बाजूला ठेवलें होते, आणि अनेक विषयांवर संभाषण करीत त्याने प्रवासाचा शीण हलका केला. जे पहायला मिळाले त्याने आकर्षित झालेल्या इनीआसने आश्चर्यचकित होऊन आपला दृष्टी भोवताली सर्वत्र फिरविली, आणि मोठ्या उत्सुकतेने त्याने पूर्वीच्या पिढ्यांच्या स्मृत्यवशेषाविषयी प्रश्न विचारले, आणि रोमच्या बालेकिल्ल्याचा संस्थापक राजा ईव्हॅन्डरने केलेले स्पष्टीकरण ऐकून घेतले. 'पूर्वी हे अरण्य येथील रहिवासी वनदेव-देवतांचे आणि वृक्षांच्या टणक खोडापासून झालेल्या मानववंशाचे वसतीस्थान होते. या माणसांच्या जीवनाला सुधारणेचा स्पर्श नव्हता. बैलांना जोखडाला जुंपणे किंवा अन्नाकरिता धान्याची निर्मिती करणे, व त्याचा राखीव साठा करणे त्यांना माहीत नव्हते. परंतु ते वृक्षांच्या फांद्यावरील फळांवर व कष्टप्रद मृगयेने प्राप्त होणाऱ्या शिकारीवर निर्वाह करीत असत. त्यांच्यात स्वर्गीय ऑलिम्पसवरून सॅटर्न प्रथम आला. ज्युपिटरच्या शस्त्रांपुढे माघार घेऊन, स्वतःचे सिंहासन गमावून तो आला होता. त्याने पर्वतशिखरावर विखरून वसती केलेल्या आणि मंदगतीने ज्ञानधारणा करणाऱ्या लोकांना एकत्र आणले, त्यांना न्यायदंडक दिले आणि या भूमीकरिता

लॅशिअॅम' हे नाव निवडले. कारण तो या भूमीच्या सरहद्दीत 'लपून' 'सुप्त' राहिल्यामुळे सुरक्षित होता. त्याच्या रियासतीत गेलेली संवत्सर शतके 'सुवर्ण युग' म्हणून विख्यात आहेत. कारण त्याची सत्ता स्नेहमय आणि शांततामय होती. पुढे हळू हळू युद्धपिसाट आणि सत्ताभिलाषेने कलंकित झालेले हीन युग आले. नंतर ऑसोनिअनांची एक टोळी व सिकॅनिअन जमाती आल्या; आणि सॅटर्नच्या या भूमिला स्वतःच्या नावाचा विसर पडू लागला. त्यानंतर बरेच राजे होऊन गेले, त्यांमध्ये एक उग्र राक्षस थायब्रिस नावाचा होता. त्याच्या नावावरूनच आम्ही इटलीच्या रहिवाश्यांनी आमच्या नदीचे 'टायबर' हे नाव ठेवले, आणि अशा तऱ्हेने तिचे प्राचीन काळातील अल्बुला हे खरे नाव हरपले. मला स्वतःला माझ्या मातृभूमीतून हद्दपार करण्यात आले होते. आणि मी सागराच्या अंतापर्यंत प्रवास केला. शेवटी सर्वशक्तीमान आणि अनिवार्य नियतीने वसती करण्याकरिता मला इथे आणून सोडले. माझ्या मातेच्या, वनदेवता कारमेन्टिसच्या भयसूचनांनी आणि देवता अॅपोलोच्या आज्ञेने मला इथे येणे भाग पाडले होते.'

हे शब्द त्याच्या मुखातून बाहेर पडताच राजा सरळ सरळ पुढे झाला आणि त्याने इनीआसला प्रथम एक वेदी आणि नंतर वनदेवता कारमेन्टिसला पूर्वी प्राप्त झालेल्या सन्मानाचे स्मारक म्हणून रोमन जिला तिच्या नावावरून 'कारमेन्टल प्रवेशद्वार' म्हणतात ती वेस दाखविली. ती भविष्यद्रष्टी होती व तिनेच प्रथम इनीआसच्या पुत्राच्या महत्तेचे आणि पॅलॅन्टिअमच्या सुकीर्तीचे भविष्य भाषित केले होते. त्यानंतर एव्हॅन्डरने एक घनदाट अरण्य दाखविले. महाप्रतापी रोमलस याचाच पुढे 'पवित्र आश्रमस्थान' म्हणून उपयोग करणार होता, आणि एका दमट कपारीखाली 'लूपर्कल'– लांडग्याची गुहा दाखविली; तिला आर्केडिअन प्रथेनुसार "लांडग्याची आकृती धारण करणाऱ्या देवाच्या" लायकीअन पॅनच्या' नावाने संबोधिले जाते.त्याने त्याला आर्गिलेटमचा पवित्र कुंजही दाखविला आणि साक्ष म्हणून ते स्थान दाखवून अतिथी असूनही अॅर्गासचा तिथे मृत्यू कसा घडला ते सांगितले. तिथून तो त्याला टार्पियाच्या स्थानी आणि नगरसभेकडे घेऊन गेला. आता ती वास्तु संपूर्ण सुवर्णाची आहे परंतु एकेकाळी ती दैन्यावस्थेत आणि ओबडधोबड होती, आणि झाडझाडोऱ्याने झाकलेली होती. ग्रामजन जसे येथील झाडांच्या आणि खडकांच्या दर्शनाने आजही थरथर कापतात तसेच ते त्या जुन्या काळीही कापत; तेव्हाही मनात भय आणि धास्ती निर्माण करणारी अशी एक प्रकारची आदरयुक्त पण दुःश्चित अशी भावना त्या वास्तुला बिलगून असे. एव्हॅन्डर पुढे सांगू लागला, ही वनराईने आच्छादिलेली व पर्णांकित शिखर अस-

लेली टेकडी कुणा देवाचे वसतीस्थान आहे; परंतु तो कोणता देव आहे हे मात्र माहीत नाही. वादळी मेघांना जागविण्याकरिता ज्यूपिटर स्वत: आपल्या उजव्या हातातील काळी ढाल हलवीत असताना अनेक वेळा इथे दिसतो अशी आर्केडिअनांची श्रद्धा आहे. आणि इथे तुला आता भिंती कोसळलेले दोन मनोरेसुद्धा टेकडीवर दिसत आहेत, ते प्राचीन मानवाचे अवशेष आणि स्मारके आहेत. या दोन बालेकिल्ल्यांपैकी एकाची स्थापना पिता जेनसने केली आणि दुसरा सॅटर्नने स्थापिला, म्हणून फार पूर्वीपासून एकाला जॅनीक्यूलम आणि दुसऱ्याला सॅटर्निआ असे म्हणतात.' अशा तऱ्हेने बोलत ते एव्हॅन्डरच्या घराजवळ आले. ते एका गरीब माणसाचे घर होते, आणि आज जिथे रोमन सभास्थान आणि डौलदार कॅरिनी आहे त्या जागांवर सगळीकडे गुरांचे कळप हंबरत होते. ते घरी आल्यावर एव्हॅन्डर म्हणाला. 'त्याच्या विजयाच्या घडीला या घरात प्रवेश करताना स्वत: हर्क्यूलीजने आपले मस्तक नमविले होते. हा आमचा राजनिवास त्याच्यासारख्या थोर पुरुषालाही काही कमी पडला नाही. माझ्या अभ्यागता, संपत्तीचा उपहास करण्याचे सामर्थ्य तुला प्राप्त होवो आणि तुझी घडण अशी घडव की तू सुद्धा देवांशी संवाद करण्यास पात्र व्हावेस. गरीबाच्या घरात प्रवेश करताना फार मोठ्या अपेक्षा ठेवूच नकोस, असे बोलून त्याने प्रतापी इनीआसला त्या छोट्याशा इमारतीच्या उतरत्या छपराखालून आत नेले, आणि त्याला पाने अंथरून तयार केलेल्या बिछायतीवर आफ्रिकी अस्वलाचे कातडे पसरलेला त्याचा बिछाना दाखविला. रात्र झाली आणि तिने वसुंधरेला आपल्या अंधाराच्या पंखाखाली घेतले.

पण त्याचवेळी, लॉरेन्टिअनांच्या भरभक्कम उठावाने व धमक्यांनी, मातेच्या हृदयाला साहजिकच वाटणाऱ्या नितांत धास्तीने व्हीनस व्हल्कनशी बोलत होती. ती तिच्या पतीच्या सुवर्ण-शयन-मंदिरात होती, आणि बोलताना तिने आपल्या शब्दांत स्वर्गीय प्रीतीचा अंश मिसळला : 'नियतीने ज्याच्या प्राक्तनात युद्धाने सर्वनाश लिहिला होता व वैराग्नीने त्याचा बालेकिल्ला कोसळावा असे नियोजित केले होते त्या ट्रॉयची संरक्षण व्यवस्था अर्गाइव्ह राजपुत्र मोडून काढीत होते तेव्हा मी तुमच्याकडे एकदाही शस्त्रांची मागणी केली नाही, किंवा तुमच्या कौशल्याच्या कक्षेत असलेली दुसरी कोणतीही मदत माझ्या असहाय्य लोकांकरिता मागितली नाही; आणि प्रायमच्या पुत्रांचे माझ्यावर अनंत ऋण असताना आणि इनीआसच्या दारुण यातनांनी मी अनेकवार दु:खी झालेली असतानाही, प्रिय नाथ, तुम्हाला व्यर्थ श्रम करण्यासाठी उद्युक्त करावे अशी माझी इच्छा नव्हती. परंतु आता जोव्हने अनुज्ञा दिल्यामुळे इनीआसला रटु-

लिअनांच्या भूमीत आधार मिळाला आहे. म्हणून यावेळी मी विनीत होऊन याचना करण्याकरिता तुमच्याकडे आले आहे आणि तुमच्या वंद्य देवत्वापाशी एक माता म्हणून पुत्राकरिता शस्त्रांची मागणी करते. निरिअसची कन्या आणि टिटोनसची पत्नी–या दोघींच्या अश्रूंनी तुमच्यावर प्रभाव पाडला. आणि माझ्या-विरुद्ध मात्र राष्ट्रे कशी एक झाली आहेत आणि तटबंदीयुक्त नगरींनी आपल्या वेशी कशा बंद केल्या आहेत आणि माझ्याविरुद्ध माझ्या लोकांचा नाश करण्या-करिता कसे शस्त्र परजले आहे हे तुम्हीच पहा. स्वर्गीय व्हीनस असे बोलली. तिचा पती द्विधा मनावस्थेत होता. परंतु तिने आपले हिमधवल कर त्याच्या अंगावरून इतस्ततः फिरविले आणि आपल्या कुरवाळणाऱ्या आलिंगनाने त्याचे मन वळविले; आणि नित्याप्रमाणेच तो अचानक पेटून उठला. विजेच्या चमचमाटाने वादळी मेघ एकमेकांपासून फुटावे व त्यांच्यामधून विजेचा कडकडाट सट्कन चमकून जावा त्याप्रमाणे एक चिरपरिचित गरम लहर त्याच्या रोमरोमांत भिनली आणि त्याच्या थरथरत्या अस्थींमधून सरसरत गेली. त्याच्या सहचारिणीला ते समजले. तिला स्वतःच्या सौन्दर्याची पूर्ण जाणीव होती आणि आपण वापरलेल्या युक्तीने ती खूष झाली होती. त्या अमर प्रीतीच्या शृन्खलेत गुंतलेल्या वृद्ध पित्याने उत्तर दिले. "विनंती करण्याकरिता तू इतक्या भूतकाळाचा कशाला हवाला देतेस ? देवी, माझ्यावरील तुझ्या विश्वासाचे काय झाले ? पूर्वीच्या दिवसांतसुद्धा तुझी चिंता आता इतकी तीव्र असती, तर मी दोषार्ह न ठरता तुझ्या ट्रोजनांना शस्त्रे पुरविली असती. कारण ट्रॉयने अजिंक्य रहाण्यास किंवा प्रायमने आणखी दहा वर्षे जगण्यास सर्वशक्तीमान पिता किंवा दैव यापैकी कोणीच प्रत्यवाय केला नव्हता. म्हणून आता जर तू युद्धाची सिद्धता करीत असलीस आणि तशीच तुझी इच्छा असली तर माझ्या कौशल्याने जे काही सहाय्य होण्याजोगे असेल– लोह, वितळलेले सुवर्ण किंवा रौप्य, आणि अग्नी आणि भात्याच्या वायूचे सर्व सामर्थ्य यांच्या सहाय्याने जे घडवायचे असेल ते सर्व करण्यास मी तयार आहे. पण ही याचना आणि स्वतःच्या सामर्थ्याविषयीचा संदेह सोडून दे.' तो बोलत असतानाच त्याने तिला वांछित आलिंगन दिले; आणि नंतर आपल्या पत्नीच्या वक्षावर विसावून त्याने सुखोद्भव निद्रा आपल्या गात्रांवर चोरपावलांनी पसरू दिली.

परंतु नंतर रात्र आपल्या मार्गातील मध्यबिंदू पासून ढळली असताना आणि पहिल्या झोपेनंतर अंगावरील सुस्ती उडाल्यावर तो देव उठला. ज्यावेळी सूत काढण्याची चाती आणि मिनर्व्हाचे किंचित सहाय्य यावर अवलंबून जीवनाचा भार वहाणारी गृहिणी आपल्या विवाहातील पावित्र्य राखण्याकरिता आणि आपले

लहान पुत्र वाढविण्याकरिता राखेतील सुप्त अग्नी प्रज्वलीत करते, रात्रीच्या घटिका कामाच्या वेळात मिळवते, सेविकांना खूप काम नेमून देते, आणि दिव्यांच्या प्रकाशात ते करायला लावते. त्या समयी, आणि तितक्याच तत्परतेने अग्नी हेच ज्याचे बाल आहे असा हा देव आपल्या मृदु शय्येवरून आपल्या भट्टीशी कामाला लागण्याकरिता उठला. इओलिअन लिपाराजवळ सिसिलीच्या कुशी जवळच्या समुद्रात लाटांच्या तुषारांनी भिजलेल्या खडकातून थेट वर उंचावणारे एक बेट आहे, तिथे पूर्वी लोहार काम करणाऱ्या सायक्लोप्सनी मूळ खोदलेले भूगर्भातील एक गव्हर आणि एटनाकडून येणारी भुयारे ढगांच्या गडगडाटाप्रमाणे गर्जत असतात, कारण तेथून ऐरणीवर घातलेले जोराचे घाव ऐकू येतात व त्यांचा आवाज प्रतिध्वनित होतो. खडकांच्या कोठडीत कॅलिबिअन धातूंच्या (लोखंडाच्या) लगडी किणकिणत असतात आणि भट्ट्यातून अग्नी धापा टाकीत असतो. हे बेट व्हल्कनचे निवासस्थान आहे आणि त्याचे नाव व्हल्कॅनिआ आहे.

अग्नीस्वामी व्हल्कन त्यावेळी उच्च स्वर्गातून तेथे अवतीर्ण झाला. एका विस्तृत सज्जात सायक्लोप्स लोहकाम करीत होते, ते 'मेघ गर्जना' 'तडिता घात' आणि उघड्या अंगाचा 'तप्त ऐरण' हे होते. त्यांच्या हातात एक ओबडधोबड घडविलेले असे वज्र होते. त्याचा एक भाग पूर्णत्वाने चमकत होता परंतु उरलेला भाग अजून अपूर्ण होता. पिता आकाशाच्या सर्व दिशांतून मोठ्या संख्येने पृथ्वीवर सोडतो त्या प्रकारचे जे वज्र होते. त्यांनी त्याच्यावर पीळ भरलेल्या वर्षेचे तीन गुंडे बसविले होते. वर्षा मेघाचे तीन पट्टे चढविले होते. तीन लाल ज्वालेचे आणि पंख असलेल्या दक्षिण वायूचे तीन आणि आता ते त्यांच्या निर्मितीत भयभीत करणारे, चकचकाट, कडकडाट आणि खुनशी ज्वालांत लपेटलेला धावता घबराट मिसळून टाकीत होते. दुसरे इतरत्र मार्सकरिता उडत्या चाकांचा एक रथ तातडीने तयार करीत होते. योध्दयांना आणि संपूर्ण नगरीना युद्धासाठी चेतविण्याकरिता तो त्याचा उपयोग करीत असे. त्याचप्रमाणे पॅलस-करिता, जेव्हा तिची शांतता ढळते तेव्हा वापरण्याकरिता भय निर्माण करणारी एक ढाल तयार करीत होते. परस्परांशी स्पर्धा करीत सायक्लोपस तिच्या दोन्ही बाजूंना सर्प गुंडाळून तिच्यावर सुवर्ण सर्पाच्या खवल्याची चकाकी चढवीत होते. आणि त्या देवतेच्या वक्षाकरिता मानेपासून अलग केलेले आणि तरीही डोळे गरगर फिरविणारे गॉर्गनचे शिर सिद्ध करीत होते ते सगळे दूर सारा व्हल्कन म्हणाला, तुम्ही ज्या ज्या कामाला सुरवात केली असेल ते सारे बाजूला ठेवा आणि एटनाच्या सायक्लोप्सहो, मी काय म्हणतो इकडे लक्ष द्या. अत्यंत धैर्यवान असलेल्या एका मर्त्यवीराकरिता आपल्याला शस्त्रे घडवायची आहेत.

आता तुम्हाला सर्वशक्ती, तुमच्या हाताचे चापल्य व घट्टपकड, आणि तुमचे श्रेष्ठ कौशल्य या सर्वांची गरज आहे. एक क्षणाचाही विलंब लावू नका "तो अधिक काही बोलला नाही. सर्व सायक्लोप्सनी मिळून काम सारखे वाटून घेतले आणि ते त्वरेने कामाला लागले ब्राँझ आणि निव्वळ सोन्याचे शुद्ध करावयाचे धातूरस धातु नळ्यातून वाहू लागले, आणि प्रचंड भट्टीमध्ये घायाळ करणारे पोलाद वितळत राहिले. त्यानी लेशिअॅमच्या सर्व अस्त्रांविरूद्ध अभेद्य अशी उभी ठाकू शकणारी एक प्रचंड ढाल तयार केली आणि तिच्यावरचे सातही थर त्यांनी घट्ट बसविले.वादळी वाऱ्यासारखा झोत असलेले भाते वापरून इतर सायक्लोप्स हवा आत घेऊ लागले आणि बाहेर सोडू लागले, कांहींनी गोल जलाशयात तप्त चरचरणाऱ्या ब्राँझला पाणी दिले. जमिनीवर बसविलेल्या ऐरणीमुळे सर्व भुयार दुमदुमत होते, सर्व शक्तींनिशी ते एक तालात हात वर उचलींत होते. आणि चिमटयाच्या पकडीने धातूचे तुकडे फिरते ठेवीत होते

लेम्नॉसचे लोक ज्याची आराधना करतात तो पितासम देव इओलिआच्या प्रदेशात हे काम घाईने उरकीत असता पहाटेचा उजळत जाणारा प्रकाश आणि वळचणीखालची पाखरांची प्रभातीची किलबिल यांनी इव्हॅन्डर जागा झाला व आपले साधेसुधे घर सोडून बाहेर जाण्याची तयारी करू लागला वृद्ध राजा उठला त्याने आपला कुडता घातला. आणि पायावर इट्रस्कन चढाव बांधले. नंतर त्याने आपले टिजिअन खड्ग खांद्यावर अडकवून बाजूस लटकत सोडले. डाव्या बाहूवर लोंबत रहाणारे एक चित्त्याचे कातडे अंगाभोवती लपेटले. पुढच्या दाराच्या उंबऱ्यावरून उड्या मारून त्याच्या पुढे झालेले त्याचे दोन राखणीचे कुत्रे आता त्याच्या बरोबर धावत होते. अतिथि इनीआस ज्या वेगळ्या घरात वसतीला होता तिकडे तो निघाला कारण नेकीच्या माणसाला असावे तसे त्याला त्याच्या संभाषणाचे आणि त्याने दिलेल्या मदतीच्या आश्वासनाचे स्मरण होते. इनीआस सुद्धा इव्हॅन्डर प्रमाणेच सकाळी लवकर उठून कामाला लागला होता. इव्हॅन्डरचा पुत्र पॅलस त्याच्या पित्याबरोबर होता, आणि इनीआस बरोबर अॅकेटीझ होता. त्यांची भेट झाली आणि त्यांनी हस्तांदोलन केले. नंतर ते त्या दालनाच्या मध्यभागी आरामाने बसले आणि त्यांनी या संधीचा मोकळेपणे बोलण्याकरिता लाभ घेतला.

राजाने संभाषण सुरू केले. 'ट्रॉयच्या नेत्यांमध्ये तू सर्व श्रेष्ठ आहेस जोवर तू आहेस, तोवर ट्रोजन साम्राज्याचा आणि ट्रॉयच्या जीवनाचा सर्वथैव मोड झाला आहे असे मी कधीही मानणार नाही. ट्रॉयच्या विख्यात नावाच्या तुलनेने तुम्हाला युद्धात माझ्या कुवतीप्रमाणे मी जी मदत

करीन ती नगण्यच आहे. एका बाजूने आम्हाला इट्रूस्कन नदीने वेढले आहे आणि दुसऱ्या बाजूने आम्हाला रूटुलिअनांनी रेटले आहे, त्यांच्या शस्त्रांचा खण-खणाट आमच्या तटभिंती भोवतीही होत असतो. परंतु मी तुझ्या बाजूला आधीच रणक्षेत्रांत उतरलेली, संपन्न राज्यांकडून शस्त्रसामग्री प्राप्त झालेली, सामर्थ्यशाली राष्ट्रे आणू शकतो.

ही सहाय्याची आशा, एका आपल्याला अनुकूल अशा अनपेक्षित घटनेने निर्माण झाली आहे. तू इकडचा मार्ग शोधीत येऊन, नियतीची एक अपेक्षा पुरी केली आहेस. अॅगिलाची नगरी इथून फार दूर नाही. तेथील नागरीक, फार पूर्वी जेव्हा लिडिअन लोकपट्टीच्या योद्धयांचे राष्ट्र, इद्रुरिआच्या टेकडयात तिथे स्थाईक झाले तेव्हा ज्या खडकावर या नगरीची स्थापना झाली. त्या खडकावरच अजूनही वसती करत आहेत. त्यांचा एक राजा मेझेन्टिअस याचे शस्त्राच्या क्रूर बलावर आधारलेले जुलमी सत्तेचे अन्यायकारक राज्य सुरु होईपर्यंत, अॅगिला दीर्घकाल वैभवात होते. या जुलमी हुकूमशहीच्या पिसाट व दुष्ट रक्तपाती कृत्यांचा वृत्तांत तुला कथन करण्याची आवश्यकता नाही. त्याने ज्या यातना दुसऱ्यांना दिल्या त्या देवांनी त्याच्याकरिता आणि त्याच्या आप्तांकरिता राखून ठेवाव्यात; अरे काय सांगू ! जिवंत माणसाचे हात तो प्रेतांच्या सडणाऱ्या हातांना बांधीत असे आणि तोंडे सडणाऱ्या तोंडाना भिडवीत असे. हा खरोखर अनन्वित छळ होता आणि अशा तऱ्हेने या यातनामय मिठीत त्याने सडलेल्या मासाने माख-लेल्या बऱ्याच माणसांचा त्याचा मृत्युकाळ लांबवीत बळी घेतला. शेवटी या उच्चा-रवणारही नाही अशा रक्तपिपासेला कंटाळून त्याचे प्रजाजन सशस्त्र होऊन त्याच्या घरासभोवती गोळा झाले. त्यांनी त्याच्या वैयक्तिक रक्षकांची हत्या केली आणि त्यांच्या घराच्या छपरावर जळते पलिते फेकले. परंतु हे हत्याकांड चालू असता मेझेन्टिअस रूटुलिअन देशात पळून गेला आणि त्याचा अतिथी-मित्र असलेल्या टर्नसच्या शस्त्र बळावर त्याने तिथे संरक्षण मिळविले. म्हणून आता सर्व इट्र्यूरिआ एका न्याय्य पण हिंसक भावनेने प्रेरित होऊन सूड घेण्याकरिता उठले आहे. आणि तात्काळ युद्धाचा धाक घालून, त्यांच्या राजाला देहदंडाची शिक्षा देण्याकरिता त्याच्या स्वाधीन करावे अशी जोरदार मागणी करीत आहेत. इनीआस, या हजारो इट्रूरिअनांचे नेतृत्व तुझ्याकडे यावे असे मी करू शकेन. कारण त्यांची जहाजे त्यांच्या किनाऱ्यावर एकजुटीने शिस्तीत सज्ज आहेत आणि ते अधीरतेने व उच्च स्वरात, चढाईची चाल करून जाण्याच्या आज्ञेची मागणी करीत आहेत, परंतु एका वृध्द द्रष्टयाच्या (यज्ञीय पशूंच्या यकृतावरून तो भविष्य वर्तवतो) भवितव्य

भाकितांनीं ते रोखले गेलें आहेत, तुम्ही-लिडिआतील सर्वोत्तम शूर पुरुष हो, तुम्ही एका प्राचीन वंशाचे उत्तमांग आणि साक्षात् शौर्य आहात. मेझेन्टिअसने आपल्या करणीने आपल्यावर ओढवून घेतलेल्या तुमच्या न्याय्य क्रोधाने चेतविलेला त्वेष तुम्हाला शत्रूविरुद्ध उठाव करण्यास उद्युक्त करीत आहे. पण तुम्ही हे जाणले पाहिजे की इटलीतल्या कोणत्याही पुरूषाकडून तुमच्यासारख्या बलिष्ठ राष्ट्राचे नेतृत्व व्हावे असा नियतीचा संकेत नाही; म्हणून तुम्ही परकीय नेता निवडला पाहिजे." या वचनामुळे इट्रस्कन सेना, दैवी सूचनेच्या भयाने, पूर्वी प्रमाणे मैदानात तळ ठोकून आहे, टार्कॉनने स्वतः त्याच्या राज्याचा मुकुट आणि राजदंड घेऊन आपला दूत माझ्याकडे पाठविला होता. राज्याचे सर्व हक्क माझ्या स्वाधीन करून मी त्याच्या पक्षांत जाऊन इट्रस्कन राजसिंहासनावर अधिष्ठित व्हावे अशी त्याची इच्छा होती. परंतु वार्धक्यामुळे माझे रक्त आता थंड आणि मंद झाले आहे. आणि यौवनाचा काळ उलटून गेल्यामुळे आता माझ्याकडे देण्यासारखे फार थोडे उरले आहे. आणि शूर साहसे करण्याचे सामर्थ्य माझ्या ठायी आता उरलेले नाही; आणि त्यामुळे सैन्यातील उच्चाधिकार मी स्वीकारू शकत नाही. माझा पुत्र मिश्ररक्ताचा नसता तर मी त्यालाच याचा स्वीकार करण्यास सांगितले असते; पण एका सॅबाईन मातेपासून त्याने अन्य राष्ट्रीयत्वाचा अंश घेतला आहे; परंतु ज्यांच्या वयावर आणि संबंधावर नियती एवढी कठोर झालेली नाही, त्यांच्यापैकी तू एक आहेस (तुला वार्धक्य आलेले नाही व तुझ्या रक्तात संकर झालेला नाही.) ट्रोजनांचा आणि इटालियनांचाही तू महाप्रतापी सेनानी आहेस; आणि दैवी सत्तांना तूच हवा आहेस. तू चाल करून पुढे जा. माझी एकमात्र आशा आणि संतोष असलेला पॅलस मी तुझ्याबरोबर देतो. तुझ्या मार्गदर्शनाखाली मार्सच्या उग्र क्षेत्रात, त्याला दीर्घकाळ चालणाऱ्या युद्धकर्माचा सराव होऊ दे; तुझी वीरकृत्यें त्याला पाहू दे, त्याच्या बालवयापासूनच त्याला तुझ्याकडे आदर्श म्हणून आदराने पाहू दे. मी त्याच्याबरोबर आर्केडियाच्या दोनशे निवडक तरूण योद्धयांचे सज्ज अश्वदल देतो. आणि पॅलस स्वतःच्या वतीने तितकेच स्वार देईल." त्याचे शब्द अजून संपलेले नव्हते इतक्यात अँकायसोस-पुत्र इनीआस आणि एकनिष्ठ ॲकेटिस अधोवदन होऊन उभे असताना व त्यांच्या एकाकी, उदास मनोवृत्तीस अस्वस्थ करणाऱ्या विचारांची मालिका सुरू झाली असताना, सिथिरिअनने स्वतः निरभ्र आकाशातून आपले चिन्ह प्रकट केले. आकाशात अचानक वीज चमकली आणि मेघांचा कडकडाट झाला, सर्व आकाशच कोसळते आहे की काय असें भासले, आणि इट्रुस्कन रणभेरींचा उच्च स्वर आरपार आकाशातून दुमदुमत आहे असे वाटले. त्यांनी वर पाहिले; तो महाध्वनी पुनः पुनः दुमदुमला, आणि

नंतर आकाशाच्या निरभ्र भागातील मेघामधून शस्त्रे दिसली. तेजस्वी प्रकाशात ती तप्तलाल दिसली. आणि जणू काही प्रतिप्रहार करीत आहेत असा प्रचंड खणखणाट ती करीत होती. बाकीचे भयभीत होऊन स्तब्ध राहिले परंतु ट्रॉयच्या वीरपुरुषाने त्या ध्वनीतून त्याच्या स्वर्गीय मातेने दिलेले आश्वासन ओळखले; नंतर तो म्हणाला, 'माझ्या अपरिचीत मित्रा, या आश्चर्यकारक चिन्हांनुळे कोणती घटना सूचित केली आहे हे विचारण्याची तुला खचित गरज पडणार नाही. आलिम्पस मला आवाहन करीत आहे. माझ्या दवी मातेने युध्दाचा धोका संभवेल तेव्हा असे चिन्ह पाठवीन असे मला पूर्वीच सांगितले होते. आणि व्हल्कनने घडविलेली शस्त्रें माझ्या मदतीसाठी आकाशमार्गे पुरवीन असेही सांगितले होते. अरेरे! बिचाऱ्या लॉरेन्टाइनांवर असले भयंकर हत्याकांड ओढवणार आहे ही दुःखाची गोष्ट आहे! टर्नस! तू 'केलेल्या अपराधाबद्दल, हा जो दंड मला देणार आहेस तो फार घोर आहे. आणि पिताश्री टायबर तुझ्या लाटांखालून किती शूर योद्धें आणि त्यांच्या ढाली आणि शिरस्त्राणें झपाट्याने वाहून जाणार आहेत! आता त्यांना आमचा संधी मोडू द्या! आता त्यांना युध्दाचा अट्टाहास करू द्या!" असे म्हणून तो आपल्या उच्चासनावरून उठला. प्रथम त्याने हर्क्यूलीजच्या पवित्र वेदीवरचा दबलेला अग्नी चेतविला. आणि नंतर आदल्या रात्रीच्या घरातील अग्नीकडे जिथे त्या लहानशा घराची दैवतें होती, तिकडे तो संतोषाने गेला. नंतर आणि ट्रॉयच्या योद्धयांनी, सर्वांनी सारखा भाग घेऊन, दोन वर्षांची काही निवडक मेंढरे विधिपूर्वक बळी दिली. नंतर इनीआस आपल्या जहाजांकडे मित्रांना भेटावयास गेला. त्यांच्यापैकी सर्वात विशेष शूर असलेल्या काही जणांना या युद्धकामगिरीवर त्यांच्याबरोबर जाण्याकरिता त्याने निवडले. बाकीचे विनासायास प्रवाहाबरोबर प्रवाहाच्या सहाय्याने तरंगत, अॅस्कॅनिअसला त्याच्या पित्याच्या आणि जे काही घडले होते त्याचा वृत्तांत सांगण्यासाठी परतले. नंतर जे ट्रोजन आता इट्रूस्कन भूमीकडे जाणार होते. त्यांच्याकरिता घोडयांची व्यवस्था करण्यात आली. इनीआसकरिता त्यांनी एक खास घोडा निवडला. त्याच्या सर्वांगावर लालसर तपकिरी सिंहाचे कातडे घातलेले होते. त्याच्या कडेला सोन्याने मढवलेले पंजे चमकत होते. एकदम वदंताराक्षसीला पंख फुटले आणि तो वेगाने त्या छोट्या नगरीत भ्रमण करू लागली. ती सांगत सुटली की इट्रूस्कन राजाच्या प्रासादाच्या प्रवेशद्वाराकडे घोडेस्वार दौडत येत आहेत. भयाने मातांनी आपल्या प्रार्थना दुपटीने वाढविल्या संकट हे जवळ जवळ त्यांच्या भयाइतकेच मोठे होते. आणि मार्सची आकृती पूर्वी पेक्षा अधिक विक्राळ होऊन पुढे उभी राहिली. नंतर पिता इव्हॅन्डरने आपल्या कामगिरीवर निघालेल्या पुत्राचा उजवा हात हातीं घेतला; त्याला बिलगून बोल–

ताना त्याला रडें आवरत नव्हते. 'अरे! माझी गेलेली वर्षे ज्युपिटरने मला परत दिली आणि मला पहिल्यासारखा केलं तर! प्रिनेस्टीच्या तटभिंतींच्या तळाशी मीं शत्रुची आघाडीची फळी यशस्वीपणे जमीनदोस्त केली, त्यांच्या ढालींचे ढीग जाळले आणि राजा इऱ्युलसला या हाताने यमसदनास पाठविले. त्यावेळी मी होतो तसा आता असतो तर! ती कथाच विलक्षण आहे. इऱ्युलसच्या जन्माच्या वेळी त्याची माता केरोनिआ हिने त्याला तीन जीव दिले होते त्यामुळे तो तीन प्रकारची शस्त्रे हाताळू शकत होता आणि त्याला तीन वेळा ठार मारावे लागले असते. तरीही त्या काळात माझ्या या हातांनी मी त्याचे तीनही जीव घेतले.आणि तीन वेळा त्याची शस्त्रें त्याच्याकडून हिरावून घेतली. माझ्या पुत्रा, त्यावेळी मी होतो, तसा आज असतो तर तुझ्या प्रिय आलिंगनातून मला दूर व्हावे लागले नसते आणि मी जणू काही त्याच्या हद्दीच्या पलीकडेच जिवंत नाही अशा बेदरकारपणे मेझेन्टिअसने आपल्या खड्गाने इतक्या जणांचा क्रूर मृत्यू घडवून आणला नसता, आणि आपल्या नगरीचे सौभाग्यहरण इतक्या पुरूषांच्या मृत्यूनी झाले नसते; परंतु तुम्ही स्वर्गस्थ शक्तीगो, आणि हे देवाधिदेवा सर्वश्रेष्ठ ज्युपिटर, मी भीक मागतो. या आर्केडिअन राजावर दया करा आणि एका पित्याची प्रार्थना ऐका. जर तुमची दैवी इच्छा आणि नियती यांच्या योजनेने पॅलसचे जीवन तुमच्या ताब्यात सुरक्षित असेल; जर तुम्हीं माझ्याकरिता त्याचे रक्षण करणार असाल, आणि जर त्याला पुन: जीवंत असताना पाहण्याची आणि भेटण्याची निश्चिती असेल तरच आणि फक्त तेव्हाच मला जीवंत ठेवा अशी मी याचना करतो. तेवढीच केवळ माझी प्रार्थना आहे कारण जे दु:ख माझ्या दैवात असेल ते भोगण्यास मी स्वेच्छेने मान्यता दिली आहे. परंतु हे दैवा! तू जर काही अनुच्चारणीय आपत्तीचा घाक घालीत असलास तर माझ्या चिंता संदेहाधीन असतानाच, भविष्याविषयीच्या अपेक्षा अनिश्चित असताना, आणि अजूनही तू माझ्या आलिंगनात असताना,माझ्या प्रिय पुत्रा, माझ्या वृध्दापकाळातील एकमात्र आनंद, एखाद्या दारुण दु:खद वृत्ताने माझे कान फुटण्यापूर्वीच हे अत्यंत निष्ठूर जीवन मला याच क्षणी खंडित करू दे.

मंडळी निघण्यापूर्वी शेवटच्या क्षणी त्या पित्याने अशी मन:पूर्वक प्रार्थना' केली; नंतर एकदम त्यास घेरी आली आणि तो खाली पडला. आणि त्याच्या सेवकांनी त्याला त्याच्या घरांत नेले.

यावेळेपर्यंत ती घोडेस्वारांची तुकडी उघडलेल्या वेशीतून बाहेर पडली होती. सर्वात पुढच्या स्वारांत इनीआस आणि त्याचा एकनिष्ठ मित्र अॅकेटीझ होता, आणि त्यांच्या मागे ट्रॉयची इतर सरदार मंडळी होती. तुकडीच्या मध्यावर

पॅलस होता. त्याचे भडक रंगीत वस्त्र आणि शस्त्रास्त्रे यामुळे तो उठून दिसत होता. व्हीनसला सर्व तेजःपुंज नक्षत्रगणामध्ये अधिक आवडणाऱ्या, जो सागराच्या लाटांनी भिजून आपले पवित्र बिंब आकाशात उंचावतो आणि अंधःकार ताबडतोब वितळून जातो त्या प्रभात ताऱ्याप्रमाणे तो दिसत होता. भयभीत माता नगरतटांवर उभ्या राहिल्या आणि घोडेस्वारांच्या अंगावरील ब्राँझचा चकचकाट आणि धुळीचा लोट यांच्यावरून त्यांची नजर फिरत होती. सर्वांत जवळचा मार्ग आक्रमीत घोडेस्वारांचे सशस्त्र पदक झाडोऱ्यातून त्यांच्या उद्दिष्टाकडे दौडत गेले. एक आरोळी उठली. त्यांनी एक रांग केली. चतुष्पादांच्या खुरांच्या गडगडाटाने उखडली जाणारी धरती हादरली. केरीच्या नदीच्या शीतल प्रवाहाजवळ वक्राकार टेकड्यांनी वेढिलेले एक विस्तृत अरण्य आहे त्या टेकड्यांवरील काळसर पाईन वृक्षांनी दऱ्यांना संरक्षण दिले आहे. त्याच्याविषयी फार दूरवरच्या प्रदेशात पूर्वापार भक्ती आणि दरारा आहे; लॅटिन भूमीचे फार पूर्वीचे आदिवासी-पुरातन पेलॅस्टिअन यांनी ते अरण्य, कृषीभूमीचा आणि पशुधनाचा देव सिल्व्हॅनस याच्या नावाने पवित्र झालेले स्थान म्हणून मानले होते आणि त्याच्या उत्सवाचा एक दिवसही मुक्रर केला होता. इथून जवळच टारकॉनने आपल्या इट्रस्कनांबरोबर नैसर्गिक अशा संरक्षणाच्या जागी तळ टाकला होता त्यांची विस्तृत प्रदेशावर पसरलेली समग्र सेना एखाद्या उंच टेकडीवरून दिसू शकत होती. सेनाप्रमुख इनोआस आणि त्याचे निवडक योद्धे या तळापर्यंत दौडत गेले. दौडीमुळे दमून गेलेल्या त्यांनी घोड्यांची व्यवस्था केली आणि स्वतःही आराम केला.

परंतु तोवर आपल्या भेटी घेऊन व्हीनस अवतीर्ण झाली. तिच्या भोवतीच्या मेघांतून तिचे स्वर्गीय तेज प्रकाशमान झाले होते. दूर अंतरावर, त्या शीतल प्रवाहाच्या पलीकडील एकीकडच्या दरीत गेलेला इनीआस तिला दिसला. ती सरळ तेथ गेली. आणि त्याला उद्देशून बोलली, 'हे पहा, माझ्या पतीने कौशल्याने तयार करून देईन म्हणून आश्वासन दिलेल्या देणग्या पूर्ण तयार झाल्या आहेत; म्हणून कुठल्याही उद्धट लॉरेन्टाईनला युद्धाचे आव्हान देण्यास किंवा स्वतः उग्रप्रतापी, संतापी टर्नसलाही आव्हान देण्यास अनमान करण्याचे प्रयोजन नाही." सिथेरिअन असे बोलली आणि तिने पुत्राला आलिंगन देण्यास जवळ बोलाविले. आणि ती तेजस्वी शस्त्रें त्याच्या समोरील ओक वृक्षाखाली ठेवली. त्या भेटींनी व त्यांच्यामध्ये अभिप्रेत असलेल्या आपणाविषयींच्या श्रेष्ठ समान भावनेने तो आनंदित झाला. त्याचे डोळे प्रत्येक शस्त्रावर कौतुकाने स्थिरावले. आणि कितीही पाहिले तरी त्याचे समाधान होत नव्हते. त्याने ती शस्त्रे हातात घेतली, वाहूत कवळली, आणि

ती सर्व बाजूंनी फिरवून पाहिली, ते ज्वाला फेकणारे शिरस्त्राण, त्याच्या शिर-पेचांतील भय; मृत्यूने भारावलेले ते खड्ग, ते कडक आणि रक्तासारखे लाल ब्राँझचे उरस्त्राण; सूर्यप्रकाशात उजळलेला एखादा विशाल काळा करडा मेघ जसा प्रकाशमान होऊ लागतो आणि ते तेज दूरवर फेकतो तसे ते प्रचंड उरस्त्राण होते. नंतर ते अनेक वेळा शुद्ध करण्यासाठी वितळविलेल्या सुवर्णाचे व रुप्याचे बनविलेले चकचकीत पोटऱ्यासाठी चिलखत, आणि तो भाला, आणि अवर्णनीय घडण असलेली ती ढाल.

त्या ढालीवर अग्निपती व्हल्कनने इटलीची सर्व कथा आणि रोमची विजयगाथा कोरली होती कारण त्याने भविष्यद्रष्टयाची भाषिते ऐकली होती आणि भवितव्यात काय घडणार आहे हे त्याला ज्ञात होते; त्याने ॲस्कॅनिअस-पासून पुढच्या भावी वंशजांच्या कुळांचा, ते करणार असलेल्या युद्धांचा क्रमवार यथायोग्य समावेश केला होता. याशिवाय तिच्यावर त्याने, प्रसवल्यानंतर, मार्सच्या हिरव्या गुहेतील भूमीवर विसावलेल्या तिच्या भोवती खेळणाऱ्या आणि निर्भयपणे तिच्या आचळांना झोंबून आपल्या पालनकर्त्या आईचे स्तनपान करणाऱ्या जुळ्या अर्भकांना आपली नितळ मान वळवून पाळीपाळीने कुरवाळणाऱ्या व त्यांचे अवयव चाटून सुडौल करणाऱ्या ईहामृगीची कथाही त्याने कोरली होती. त्यांच्या जवळच त्याने रोमनगर दाखविले होते. आणि रुढीनियम धाब्यावर बसवून, कसरतीच्या क्रीडेतील महत्वाचे खेळ चालू असताना जमलेल्या गर्दीमधून प्रेक्षागारातून चटकन पळवून नेलेल्या सॅबाईन स्त्रियाही दाखविल्या होत्या. आणि नंतर रोमलसची सेना आणि टॅटिअस व त्याची क्यूरीस येथील कडवी माणसे यांच्यामध्ये अचानक भडकलेले नवे युद्ध दाखविले होते, परंतु नंतर तेच दोन राजे कलह बाजूस सारून हाती मद्याचे प्याले घेऊन शस्त्रधारी जोव्हच्या वेदीपुढे बळी दिलेल्या वराहीच्या देहासमोर संधी करून एकत्र उभे राहिलेले दाखविले होते. त्या दृश्याजवळच त्याच्या उधळलेल्या चार घोड्यांनी छिन्नविछिन्न केलेला मेटस दाखविला होता. अरे, अल्बाच्या पुरुषा, पण तूही तुझे वचन पाळायला हवे होतेस! आणि खाली पडलेल्या सेनाप्रमुखांचे अवशेष अरण्यातून ओढीत नेत असताना टुलस दाखविला होता; काटेरी झुडुपावर उडालेले रक्तही दिसत होते. हद्दपार केलेल्या टार-क्विनचा परत स्वीकार करण्याची रोमला आज्ञा करणारा आणि त्या नगराभोवती भयंकर वेढा आवळणारा पॉरसेनाही रेखाटला होता. आणि त्यांच्या बाजूला स्वातंत्र्याकरिता मृत्यूकडे झेपावणारे इनीआसचे वंशज दिसत होते. कॉक्लीसने पूल उखडून टाकण्याचे धाडस केल्यामुळे आणि कुमारी क्लौलिआने बंदीशाला

फोडून नदी पार केली म्हणून खवळलेल्या क्रुद्ध भेडावणाऱ्या सत्ताधीशांची साक्षात प्रतिमा असलेला असा पॉरसेना पुन्हा एकदा दाखविला होता.

त्या ढालीच्या वरच्या बाजूला टार्पिअन बालेकिल्ल्याचा विश्वस्त मॅन्लिअस, मंदिरासमोरच्या आपल्या जागेवरून त्या उत्तुंग मंदिराचे रक्षण करीत असलेला दिसत होता. आणि खाली वाळलेल्या कडक गवताने नुकतीच शाकारलेली रोमलसची झोपडी होती. मंदिरावरून अचानकपणे उडून सुवर्णाच्या स्तंभालयात जाऊन गॉल्स सीमेवर येऊन ठेपल्याची सूचना देणारी चंदेरी कलहंसी दिसत होती. रात्रीच्या अनुकूल पडद्यामागे, अंधाराच्या संरक्षणाखाली झुडुपांतून सरपटत ते किल्ल्यासमीप जवळ-जवळ पोहोचले होते. त्यांचे केस व वस्त्रेंही सोनेरी होती. पट्ट्यांच्या झग्यात ते चमकत होते. आणि त्यांच्या सुवर्णमालाभूषित माना दुधासारख्या धवल दाखविल्या होत्या. प्रत्येक योद्धा दोन दोन अल्पाईन भाले परजीत होता. आणि आपल्या देहाच्या संरक्षणाकरिता त्यांनी हाती लांब ढाली घेतल्या होत्या. नंतर व्हल्कनने त्यावर उड्या मारणाऱ्या साली आणि अनावृत्त ल्यूपर्की हातोडीने ठोकून घडविल्या होत्या. आणि लोकरीचे तुरे असलेली शिरस्त्राणे आणि आकाशातून पडलेल्या ढाली होत्या. आणि रोम नगरातील पवित्र पूजाविधीतील धार्मिक उपकरणी गाद्यांच्या रथातून मिरवीत जाणाऱ्या पवित्र माता होत्या. या देखाव्यांपासून थोड्या दूरवर व्हल्कनने प्ल्यूटोचे उंच प्रवेशद्वार आणि टार्टरसमधील अपराधांना शिक्षा देण्याच्या जागा दाखविल्या होत्या. तिथे कलत्या प्रचंड खडकांच्या कपारीवर लटकलेली चंडिकांची मुखें पाहून थरथरणारा कॅटिलाइन दाखविला होता. दूरच्या वेगळ्या जागेत न्यायदंडल नियुक्त करणाऱ्या कॅटोबरोबर पुण्यात्मे होते. या दृश्यांच्या मध्ये एका रुंद पट्ट्यावर सुवर्ण रंगात उसळता सागर दाखविला होता. परंतु त्याचा पृष्ठभाग निळा होता, समुद्र फेसाच्या तुऱ्याने शुभ्र झालेल्या लाटा दाखविल्या होत्या-सभोवती रुपेरी रंगात चमकणारे, गोलाकार फिरत, लाटा कापीत समुद्राचा पृष्ठभाग आपल्या शेपटांनी ढवळणारे डॉल्फिन मासे होते.

मध्यभागी ॲक्टिअम येथे युद्ध करीत असलेली ब्रॉझच्या पत्र्याने मढविलेली आरमारे दिसत होती. युद्धाच्या हालचालीच्या धाईगर्दीत असलेले समग्र ल्युकेट दृष्टीस पडत होते. सोनेरी लाटा चमकत होत्या. एका बाजूला छोटी गृहदैवते आणि श्रेष्ठ कुलदैवते घेऊन युद्धात इटॅलिअनांचे नेतृत्व करणारा, ऑगस्टस सीझर, नगरसभा आणि नागरिकांसहित दिसत होता. तो त्याच्या गलबताच्या उंच धक्क्यावर उभा होता. त्याचे प्रफुल्लनेत्र भालप्रदेशातून बाहेर येणाऱ्या जणू दोन

प्रकाशशलाका होत्या. आणि त्याच्या मस्तकावर त्याच्या पित्याचा ज्यूलिअन तारा होता. इतरत्र वारा आणि दैवाच्या साहाय्याने आपल्या उंच गलबतांच्या सेनेचे अॅग्रिपा नेतृत्व करीत होता. आणि त्याचा भालप्रदेश विजयी संग्रामाच्या गर्वोध्दत चिन्हाने,–सागरी किरिटावरील जहाजांच्या नाळींच्या चिन्हाने–विलसत होता. त्यांच्याविरुध्द अँटनी खडा होता. त्याच्याबरोबर गलबतावर इजिप्शिअन आणि अति दूर बॅक्ट्रिआ पासूनची पूर्वेकडील सर्व समर्थ सेना होती. त्याच्या बाजूला पौर्वात्य संपदा आणि विविध प्रकारची शस्त्रास्त्रे होती. विजयाच्या दिमाखात तो उषादेवीच्या राष्ट्रांकडून आणि तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावरून येत आहे– आणि शरमेची गोष्ट की त्याचा पाठलाग त्याची इजिप्शिअन पत्नी करीत आहे. सर्व गलबते पूर्ण वेगाने एकत्र येत होती: मागे खेचलेल्या वल्हयांनी आणि गलबतांच्या त्रिधारांनी घुसळलेला सागर फेसाळला होता. सर्व गलबते खुल्या समुद्राकडे वळली. जणू काही सायक्लेडची बेटे मुळातून उखडली होती आणि समुद्रावर तरंगत होती; अथवा ज्या उंच नाळींवर हल्ला करणारे उभे राहिले होते त्या इतक्या प्रचंड होत्या की जणू काही वाटत होते की हे उंच पर्वत दुसऱ्या पर्वतांवर जोराने आदळत आहेत. झगमगत्या प्रत्यंचातून सुटणाऱ्या अग्नीसारख्या तेजस्वी बाणांचा हातांनी वर्षाव केला जात होता. आणि सगळीकडे हवेत उडणारे लोखंडी टोके वाहून नेतांना दिसत होते. नेपच्यूनचे सर्व क्षेत्र नुकत्या सांडलेल्या रक्ताने लाल झाले होते. मध्यभागी असलेली राणी आपल्या देशाची खास खंजिरी वाजवून आपल्या सेनेला सिध्द राहण्याचा आदेश देत होती; तिच्या प्रारब्धात असलेल्या विषारी फुरशांच्या जोडीचा विचारही अजून तिच्या मनात आला नव्हता. भुंकणाऱ्या अॅनुबिससहित विविध जातीतील राक्षसी आकारातील तिच्या देवांनी नेपच्यून, व्हीनस, आणि साक्षात मिनर्व्हा यांच्यावर शस्त्रे रोखली होती. समराच्या मध्यावर लोहात घडविलेला क्रुध्द मार्स होता, आणि आकाशातून पिसाट दृष्टीने बघत चंडिकांनी आपल्या रानटी शक्तींचा धुडगूस मांडला होता. चिंध्या झालेल्या वस्त्रात संघर्ष देवता आनंदाने दौडत होती आणि आपल्या रक्तलांछित चाबकासहित बेलोना तिच्या पाठोपाठ होती. परंतु अॅक्टिअमच्या अॅपोलोने ते पाहिले आणि आपल्या उंच मोक्याच्या जागेवरून आपले धनुष्य वाकविलेसुद्धा. त्याच्या भयाने प्रत्येक इजिप्शिअन, हिन्दुस्तानी लोक, प्रत्येक अरब आणि शेबाची सर्व सेना पळून जाण्याच्या बेतात होती. राणी स्वतः वाऱ्यांचा धावा करताना आणि शिडे उभारताना दिसत होती; ती शिडे झटकून मोकळी करीत असतानाचा क्षण रेखाटला गेला होता. अग्नीपती व्हल्कनने तिला सर्व हत्याकांडाच्यामध्ये जवळ

भिडलेल्या मृत्यूच्या छायेने निस्तेज पडलेली, वायव्यवाऱ्यावर लाटांवरून वेगाने जाताना दाखविलेली होती. तिच्या पुढे समग्र विस्तृतपात्रावर दुःखाची छाया पसरलेल्या नाईल नदीने आपला झगा पूर्ण खुला केला आणि आपल्या सर्व वस्त्रांनी, सर्व पराजितांना तो आपल्या निळ्या जलाच्या उराशी आणि आपल्या प्रवाहाच्या आश्रयस्थानात बोलावीत होता. नंतर ऑगस्टस सीझर आपल्या तिहेरी विजयाच्या मिरवणूकीतून रोमच्या इमारतींपुढून रथांतून जाताना दिसत होता. आणि त्याने आपल्या नगरीत तीनशे भव्यमंदिरे उभविण्याचा पवित्र; अनिवार्य संकल्प इटलीच्या देवांपुढे सोडला. आनंदाच्या जल्लोषाने आणि जय-घोषांनी रस्ते गरजत होते. प्रत्येक मंदिरात माता नाचत होत्या; आणि प्रत्येक मंदिरात वेदीवर बळी दिले जात होते. त्यांच्यासमोर बळी दिलेले बैल जमिनीवर पाय ताणून पडले होते. ऑगस्टस् सीझर स्वतः तेजस्वी अॅपोलो मंदिराच्या हिमधवल उंबरठ्यावर नाना राष्ट्रांकडून आलेले नजराणे पाहत बसला होता, व ते भव्य स्तंभांवर लटकवीत होता. विविध वेष आणि भाषांप्रमाणेच विविध शस्त्रे असलेले पराजित लोक लांब रांगा करून चालत होते. न्युमिडिअनांची एक जमात इथे तर सैल झगे धारण केलेले आफ्रिकी तिथे; इथे लेलीजिअन आणि कॅरिअन तर तिथे त्यांच्या बाणांसहित जेलोनिअन असे व्हल्कनने चितारले होते. युफ्रेटीस नदही दिसत होता. आता त्याच्या प्रवाहात जास्त नम्रता दिसत होती. फार दूरचे रहिवासी मॉरिनीही दाखविले होते, आणि दोन शिंगे असलेला ऱ्हाईन नद; आतापावेतो अजिंक्य असलेले सिथिअन तिथे होते, आणि त्याच्यावरील नव्या पुलामुळे रूष्ट झालेला अॅरॅक्सीज नदही होता.

त्याच्या मातेने त्याला दिलेल्या आणि व्हल्कनने घडविलेल्या त्या ढाली-वरीलही अशाप्रकारची काढलेली दृश्ये इनीआसने नवलाने पाहिली. त्या घटनांचे त्याला ज्ञान नव्हते, पण तरीही त्याने आपल्या वारसांचे यश आणि नियती असलेली ती ढाल जेव्हा आपल्या खांद्यावर लटकविली तेव्हा त्या सर्व घटनांच्या चित्रणाने त्याला समाधान वाटत होते.

सर्ग नववा

# ट्रोजन छावणीला वेढा

**त्या** भूमीच्या दूरच्या भागात हे घडत असताना सॅटर्निअन ज्यूनोने आयरिसला आकाशातून खाली प्रतापी टर्नसकडे पाठविले. त्यावेळी टर्नस एका पवित्र दरीत असलेल्या, त्याचा पूर्वज पिलम्नसला अर्पण केलेल्या वनात बसला होता. आपल्या गुलाबी ओठांनी थॉमसची कन्या त्याला म्हणाली : 'हे पहा टर्नस, केवळ तुझी कितीही उत्कट इच्छा असली तरी देवांनाही जे वरदान देण्याचे साहस झाले नसते ते कालचक्राच्या पुरोगामी गतीनेच केवळ सहजपणे तुला प्राप्त झाले आहे. इनीआसने त्याचा तळ, त्याचे सोबती आणि आरमार सोडले आहे आणि पॅलेटाईन टेकडयांवरील इव्हॅन्डरच्या सार्वभौम सत्तेचे अधिष्ठान असलेल्या त्याच्या घराच्या मार्गाला तो लागला आहे. आणि तेवढयानेही समाधान न झाल्यामुळे तो पुढे त्या दूरच्या कॉरिन्थसांच्या नगरांकडे गेला आहे. तिथे तो ग्रामजनांची जमवाजमव करीत आहे आणि शस्त्रसज्ज लिडिअनांची सेना त्याच्या दिमतीस आहे. मग तू आता अनमान कसला करतो आहेस ? तुझ्या अश्वदलाला आणि युद्धातील रथांना पुकारण्याची हीच वेळ आहे. सर्व अडचणी मागे सारून मार्ग काढ; अनपेक्षित चपळाईने हल्ला करून त्यांच्या तळात घबराट उडव. व तो तात्काळ आपल्या ताब्यात घे. आयरिस असे म्हणाली आणि समतोल पंखांवर तिने आकाशात उड्डाण केले. तिच्या भ्रमणात तिने मेघांच्या पार्श्वभूमीवर एक भव्य इन्द्रधनुष्य कोरले. त्या तरुण राजपुत्राने तिला ओळखले. त्याने दोन्ही हात जोडून आकाशातील तारकांकडे उंचावले आणि ती दूर जात असताना तिच्या पाठीमागे त्याचे उच्च स्वर उमटले, 'हे स्वर्गभूषण असलेल्या आयरिस, माझ्याकरिता संदेश घेऊन मेघातून द्रुत गतीने भ्रमण करीत तुला खाली पृथ्वीवर कुणी पाठविले? सूर्यप्रकाशात अचानक एवढे तेज कशामुळे आले ? आकाशाचा पडदा मधोमध दुभंगल्यासारखा मला दिसत आहे आणि आकाशमध्यावर इतस्ततः संचार करणाऱ्या तारका दिसत आहेत, मला युद्धाचा आदेश देणारी तू कुणीही असलीस

तरी तुझ्या प्रभावी प्रसादचिन्हाचा मी स्वीकार करतो." आपले विचार बोलून दाखविल्यावर तो पुढे पाण्याजवळ गेला, एका लहरीच्या पृष्ठावरून त्याने ओंजळ भरली आणि त्याने देवांची दीर्घकाल प्रार्थना केली. व स्वर्गस्थ देवांप्रीत्यर्थ त्याने खूप नवसाचे संकल्प सोडले.

आणि आता त्याचे सर्व सैन्य, भरजरी वस्त्रे आणि सुवर्णालंकार यांनी भूषित अमाप अश्वदल खुल्या मुलुखातून चाल करू लागले. मेसॅपसने आघाडी सांभाळली होती आणि टायरसच्या तरुण पुत्रांनी पिछाडी रोखली होती; सर-सेनानी म्हणून टर्नस सर्व दलाच्या मध्यस्थानी होता. (हाती शस्त्रे घेऊन तो सर्वत्र संचार करीत असताना सर्वाहून पूर्ण एका डोईने उंच दिसत होता.) त्या दलाची ही चाल आपल्या सात प्रवाहातून शांतपणे वर चढणाऱ्या आणि अधिकाधिक खोल होत जाणाऱ्या गंगानदीसारखी होती; किंवा आपले कल्याणकारी जल नदी खोऱ्यातून मागे घेऊन पुनः एकदा आपल्या प्रवाहात स्थिरावणाऱ्या नाईल नदीसारखी होती. आता निरीक्षण करीत असलेल्या ट्रोजनांना दूरवर धुळीचा काळा ढग जमताना दिसला आणि त्यामुळे मैदानांवर अंधार पसरताना दिसला. पहिली आरोळी उठली ती शत्रूच्या समोरच एका उंच बांधावर असलेल्या कायकस कडून : 'माझ्या देशबांधवानो, हा काजळी काळोखाचा पसरणारा लोट कसला आहे ? तुमची खड्गे आणि शस्त्रांचा साठा घेऊन लगेच या. भिंतीवर चढा, अरे ! शत्रू वेशीशी येऊन ठेपला आहे !" मोठ्याने आरोळ्या ठोकीत सर्व वेशीतून पार होत ट्रोजन आसऱ्याला गेले आणि त्यांनी बुरजावर पहारे ठेवले. कारण जाताना त्यांच्या सूज्ञ सेनानीने त्यांना सूचना दिली होती की त्याच्या अनुपस्थितीत आणीबाणीच्यावेळी खुल्या मैदानी युद्धाचा धोका पत्करायचा नाही किंवा समोरासमोर युद्धव्यूह रचून लढायचे साहस करायचे नाही. परंतु त्यांच्या मातीच्या कोटाने रक्षिलेल्या छावणीच्या तटबंदीच्या आत राहण्यातच समाधान मानायचे. म्हणून जरी शरमेने आणि संतापाने त्यांना शत्रूशी भिडण्याचा मोह पडत होता तरीही त्यांनी आज्ञापालन केले. शत्रूला वेशीचे दरवाज बंद केले, आणि आपल्या मनोऱ्यांच्या पोकळीत दडून, शस्त्रे घेऊन ते शत्रूची वाट पहात राहिले.

परंतु टर्नस, त्याच्यापेक्षा अति मंदगतीने चाल करीत असलेल्या दलाच्यापुढे होऊन निवडक वीस घोडेस्वारांसह दौडत पुढे आला. थ्रेसच्या दुरंगी घोड्यावर आरुढ होऊन आणि लाल तुरा असलेले सुवर्णाचे शिरस्त्राण घालून तो आश्चर्य-

कारक वेगाने छावणीजवळ आला. 'तरुण योध्दयानो' तो ओरडला. 'तुमच्यापैकी कोणाला शत्रूवर हल्ला चढविणारा पहिला सैनिक म्हणून माझ्याबरोबर येण्याची आकांक्षा आहे काय? कारण, इकडे पहा!' आणि त्याने युद्धाचा आरंभ करण्याकरिता खूण म्हणून आपला भाला भिरभिरत हवेतून फेकला. घोड्यावरून दौडत तो मैदानाकडे झेपावला, आरोळ्या ठोकीत त्याच्या साथीदारांनी त्याचे आव्हान स्वीकारले. आणि युद्धाच्या धडकी भरविणाऱ्या गर्जना करीत ते त्याच्या मागे धावले. रणांगणावरील तुल्यबळ युद्धाचा धोका स्वीकारून आपल्या शस्त्रांनिशी वीर पुरुषाप्रमाणे बाहेर न येता आपल्या तळाला चिकटून राहणाऱ्या ट्रोजनांच्या भ्याड भासणाऱ्या वर्तनाने ते आश्चर्यचकित झाले. पिसाटासारखा टर्नस तळाभोवती एकदा उजवीकडून, एकदा डावीकडून, तटभिंती न्याहाळीत, आत घुसण्याचा मार्ग शोधीत, दौडत राहिला. परंतु त्याला एकही फट सापडली नाही. अंधारात आपल्या आईच्या कुशीत असलेली आणि सतत बेंऽबेंऽ असे केकाटणारी कोकरे सुरक्षित असतात; पण मेंढ्यांची गर्दी असलेल्या मेंढकोटाबाहेर दबा धरून बसलेल्या आणि अगदी कुडाजवळ जाऊन गुरगुरणारा व अंधाऱ्या मध्यरात्रीच्या वाऱ्यापावसाला दाद न देणारा लांडगा मात्र भयंकर आणि हेकट क्रोधाने आपला संताप आवाक्याबाहेर असलेल्या भक्ष्यावर काढतो, कारण त्याचा कोरडा पडलेला रक्तहीन जबडा आणि त्याची सारखी वाढणारी भयंकर भूक त्याला स्वस्थ बसू देत नाही; त्या भिंतींकडे आणि तळाकडे वटारून पहाताना, भडकून चढत जाणाऱ्या रुटुलिअनाच्या क्रोधाचे झटके त्याला लांडग्यासारखे होते. आणि आत कसे घुसावे आणि कुठल्या मार्गाने ट्रोजनांना धडकी भरवून, त्यांच्या तटबंदीच्या वेढ्यांतून काढून त्यांना खुल्या मैदानात धावत पळत आणावे याचा विचार करताना त्याची दाहक चीड अगदी त्याच्या कठीण हाडांपर्यंत भिडत होती. शेवटी तळाच्या अगदी जवळ कुशीत लपलेल्या, एका बाजूने ट्रोजनांनी बांधलेल्या मातीच्या धक्क्याने आडोसा झालेल्या परंतु इतर बाजूंनी केवळ नदीच्या लाटांशिवाय काही संरक्षण नसलेल्या आरमारावर त्याने हल्ला चढवला. टर्नसने आपल्या चेकाळलेल्या साथीदारांना अग्नी आणावयास सांगितले. मोठ्या त्वेषाने त्याने पाईनचा जळता पलिता आपल्या मुठीत घट्ट धरला. त्याच्या स्वतःच्या त्यांच्यामधील प्रभावी उपस्थितीने प्रोत्साहन मिळालेली त्याची माणसे मोठ्या इर्ष्येने त्याने कामाला लागली. प्रत्येक सैनिकाने हाताशी येईल तो अग्नी उचलला आणि काळा धुमसणारा जळता पलिता हातात तयारीने धरला. धूर ओकणाऱ्या पाईनच्या फांद्यांतून धुरकट जाळ येत होता, आणि व्हल्कनने ठिणग्या आणि राख यांचे मिश्रण वर आकाशातील तारकांकडे सोडले.

हे काव्य देवतांनो, मला सांगा, त्या संतप्त ज्वालांपासून कोणत्या देवाने ट्रोजनांचे रक्षण केले? कोणत्या देवतेने त्यांच्या गलबतांवरील भयंकर अग्नी मागे रेटला? या घटनेला फक्त पुरातन दाखलाच तेवढा आहे परंतु त्याची स्मृती कधीच लोप पावत नाही.

ज्यावेळी इनीआस फ्रिजिअन इडावर त्याचे आरमार सिद्ध करण्यास प्रारंभ करीत होता, आणि खोल समुद्राकडे ते वळवण्याची तयारी करीत होता तेव्हा बेरीसिन्टसची देवी, साक्षात देवांची माता, हिने सर्वश्रेष्ठ जोव्हला ही विनंती केली असे म्हणतात : 'मुला, तू आता ऑलिम्पसचा प्रभू आहेस, म्हणून तू तुझ्या मातेची प्रार्थना ऐक आणि ती तुला करीत आहे ती विनंती मान्य कर. माझे एक पाईन वृक्षाचे वन होते. माझा त्यावर बरीच वर्षे जीव होता, काळचा पिच् वृक्षांनी आणि मॅपल वृक्षांच्या खोडांनी झाकाळलेल्या माझ्या दुर्गाच्या माथ्यावर तो कुंज उभा होता, आणि माणसे तिथे समर्पण करावयाच्या वस्तू आणीत असत. परंतु जेव्हा तरुण डार्डनला आरमाराची गरज पडली तेव्हा त्याला मी आनंदाने माझी झाडे दिली. परंतु आता भय आणि चिंतेने मी कष्टी झाले आहे. माझे हे भय दूर कर आणि कोणत्याही प्रवासात या गलबताना धोका पोचणार नाही, वादळाने किंवा वाऱ्याच्या तडाख्याने ती खिळखिळी होणार नाहीत असे माझ्या प्रार्थनेच्या सामर्थ्याने घडो! घडले. माझ्या पर्वतावर तो निर्माण झाली, या गोष्टीचा त्यांना एवढा लाभ होऊ दे.' आकाशात तारकांगण फिरविणाऱ्या तिच्या पुत्राने तिला उत्तर दिले, ' माते, प्रारब्धाला तू कोणत्या कामाला जुंपीत आहेस? तू तुझ्या जहाजांकरिता काय मागते आहेस? मर्त्य हाताने घडविलेल्या सांगाड्याना अमरत्वाचा अधिकार प्राप्त व्हावा काय? प्रत्येक धोक्याच्या संकटातून इनीआस निर्वेधपणे पार पडावा अशी तुझी इच्छा आहे काय? कोणत्या देवाला अशी शक्ती प्राप्त झाली आहे? हे घडणार नाही. परंतु एक दिवस, त्यांच्या प्रवासाच्या उद्दिष्टाला पोहोचून ते इटलीच्या एखाद्या बंदरात जेव्हा सुरक्षित असतील तेव्हा लाटांचे तडाखे खाऊन डार्डन राजपुत्राला लॉरेन्टाईन कृषीभूमीत घेऊन जाणाऱ्या प्रत्येक जहाजाचे मर्त्यरुप मी लुप्त करीन आणि निरिइड डोटो आणि गॅलॅटिआप्रमाणे समुद्र कापीत असताना आणि छातीवर फेसाळ लाटा झेलताना ती सर्व जहाजे उदंड सागराच्या देवता म्हणून राहतील; ही माझी आज्ञा आहे.' तो असे म्हणाला, आणि आपली मान हलवून त्याने आपले शब्द, त्याच्या स्टिजिअन भावाचा प्रवाह आणि काळे स्त्रोत आणि मधल्या काळ्या

विवराच्या दोन्ही बाजूंचे किनारे यांची शपथ घेऊन वज्रलेप केले. आणि त्याच्या मान डोलावण्याबरोबर सबंध ऑलिम्पस हादरू लागले.

म्हणून आता दैवाने पूर्वनियोजित केलेला काल पूर्ण झाल्यानंतर वचनपूर्तीचा दिवस आला होता. त्या पवित्र जहाजांची हानी करण्याच्या टर्नसच्या उद्देशामुळे त्याच्या जळत्या पलित्यांपासून ती वाचविण्याची महामातेला सूचना मिळाली. आणि अचानकपणे एक विलक्षण नवा प्रकाश सर्वांच्या डोळ्यांपुढे उजळला, आणि एक प्रचंड मेघ दिसला, आणि त्याच्याबरोबर पूर्वेकडून आकाशात दौडत येणारा इडा पर्वतावरील नर्तकांचा तांडा दिसला. नंतर एक धडकी भरविणारा आवाज आकाशात उठला आणि ट्रोजन आणि त्याप्रमाणेच रुटुलिअन सेनेत घुमला. 'ट्रोजनहो माझ्या जहाजांचे रक्षण करण्याकरिता घाबरून धावपळ करू नका, किंवा शस्त्रेही धारण करू नका, पाईनच्या पवित्र लाकडाची ही जहाजे जाळण्यापूर्वी टर्नसला प्रत्यक्ष हा सागरच जाळण्याची शक्ती द्यावी लागेल! आणि हे जहाजांनो, समुद्राच्या देवतांनो, तुम्ही जा, तुम्ही मुक्तपणे जा. तुमची माता तुम्हाला आज्ञा करीत आहे.' आणि तात्काल प्रत्येक वरामाने आपले दोर धक्क्यांपासून तोडले आणि डॉल्फिन माशाप्रमाणे नाळीचे टोक खाली करून प्रत्येक जहाज खाली बुडाले आणि बुडी मारून तळाशी गेले. आणि काय चमत्कार! समुद्राच्या तळातून समुद्र किनाऱ्यावर नांगरलेल्या ब्राँझचे कवच असलेल्या पूर्वीच्या जहाजांच्या संख्येइतक्याच समुद्रकन्या तळातून वर आल्या, आणि समुद्रावर पोहू लागल्या.

या दृश्याने रुटुलिअनांचा आवेश गारठल्यासारखा वाटला. मेसॅपस स्वतः भयभीत झाला होता, आणि त्याचे घोडे बावरून गेले होते. नदी टायबरही गुरगुरत गर्जून थबकली आणि दचकून समुद्रातून त्वरेने मागे वळली. तरीही प्रतापी टर्नसचा आत्मविश्वास मुळीच ढळला नाही. उलट त्याने आपल्या माणसांची खरे तर थोडी निर्भर्त्सना करून त्यांची हिंमत वाढविण्यासाठी त्यांना आव्हान केले.

'या चमत्काराने ट्रोजनांनाच भय निर्माण झाले आहे. कारण सहाय्याकरिता ज्यांवर त्यांचा मुख्य भर होता ती जहाजेच स्वतः ज्युपिटरने त्यांच्याकडून हिराबून घेतली आहेत. त्यांची जहाजे रुटुलिअन शस्त्रे आणि रुटुलिअन अग्नीकरिताही थांबली नाहीत. अशा तऱ्हेने समुद्र ट्रोजनांना बंद झाला आहे आणि त्यांना निसटून

जाण्याची आशा उरली नाही. अर्धे जग त्यांच्या पल्ल्यातून हटविले गेले आहे. भूमीवर आपला ताबा आहे कारण इटलीची सर्व राष्ट्रे हजारोंच्या संख्येने शस्त्र-सज्ज आहेत. दैवी भाषितांच्या आधाराची बढाई फ्रिजिअनांना मारु द्या परंतु असल्या गोष्टींचे भय मला नाही. व्हीनस आणि नियती देवता यांच्या मागण्या ट्रोजनांच्या इटलीच्या संपन्न कृषीभूमीतील केवळ आगमनातच पुरेशा पूर्ण झाल्या आहेत. शिवाय माझी स्वत:ची नियती आहेच की; माझी वधू चोरणाऱ्या गुन्हेगारांच्या या राष्ट्राची पाळेमुळे या माझ्या खड्गाने तोडून काढणे हे माझ्या दैवात आहे. केवळ अँत्रिअसच्या पुत्रांच्या वाट्यालाच हा दुःखद अनुभव आला होता असे नाही आणि केवळ मायसिनीलाच शस्त्र उपसण्याचा अधिकार आहे असेही नाही. त्यांच्या वंशाचा एकदा झालेला उच्छेद पुरेसा आहे असे ट्रोजन विनवून म्हणतील. त्याला माझे उत्तर असे आहे की मग एक अपराध तेवढा पुरेसा नव्हता काय? त्यांचा दुराराध्य द्वेष जगातील प्रत्येक स्त्रीवर काढण्याचे त्यांना प्रयोजन नव्हते. आणि आता त्यांना मृत्यूपासून अगदी थोडेच दूर ठेवणाऱ्या त्यांच्या संरक्षक भिंती आणि संरक्षक खंदक यांच्या भरवशाने त्यांना धीट बनविले आहे. परंतु नेपच्यूनने स्वतःच्या हाताने बांधलेली ट्रॉयची तटबंदी आगीत कोसळताना त्यांनी पाहिली नाही काय? आता माझ्या सहकाऱ्यांनो, माझ्या निवडक वीरांनो, शस्त्राने या भिंती उखडून टाकण्यास तुमच्यापैकी कोण तयार आहे? भयाने गर्भगळीत झालेल्या त्यांच्या छावणीवर हल्ला करण्याकरिता माझ्याबरोबर येण्यास कोण तयार आहे? या ट्रोजनांशी लढण्यास मला व्हल्कनच्या शस्त्रांची आणि सहस्त्र गलबतांचीही गरज नाही! होय! आणि सर्व इट्रुस्कन सरळ येऊ देत आणि आपले सैन्य ट्रोजनांशी सामील करून त्यांचे संख्याबल वाढवू देत. रात्री मंत्राच्या ताईताची भ्याड चोरी व बरोबरच त्यांच्या किल्ल्याच्या टोकावरील रक्षकांच्या हत्याकांडाची त्यांना भीती वाटण्याचे कारण नाही. आम्ही कुठल्या घोड्याच्या पोटातही लपून बसणार नाही. दिवसाच्या प्रकाशात आणि उघडपणे त्यांच्या तटभिंती आगीने वेढण्याचा माझा निश्चय आहे. आणि त्यांना मी हे लवकरच मान्य करायला भाग पाडीन की त्यांना सामना करायचा आहे तो काही केवळ डॅनानांबरोबर नाही; हेक्टर ज्यांना दहाव्या वर्षापर्यंतही रोखू शकला त्या केवळ ग्रीसच्या तरुण पोरांबरोबरही नाही. परंतु आता दिवसाचा बराचसा काळ संपला आहे, म्हणून, वीरांनो सध्या उरलेल्या वेळात तुमच्या आरामाकडे लक्ष द्या; आजच्या दिवसात मिळालेल्या यशाचे समाधान माना, आणि एवढी खात्री असू द्या की मी तुम्हाला भरपूर लढण्याची संधी देणार आहे.'

टेहाळणी-पथके ठेवण्याची वेशी रोखण्याची आणि तटभितींभोवती रखवालीच्या शेकोटया सतत पेटत्या ठेवण्याची जबाबदारी मेसॅपसवर सोपविली होती. नंतर भितींवर टेहाळणी करण्याकरिता व गस्त घालण्याकरिता चौदा रुटुलिअनांची नियुक्ती केली होती; त्यांच्यापैकी प्रत्येकाबरोबर लालभडक तुरे घातलेले आणि सुवर्णाच्या साजाने झगझगणारे शंभर सशस्त्र सैनिक होते. सर्व आपआपल्या कामगिरीवर जाण्याकरिता गडबडीने गेले; काहींनी पाळीने पहारे बसविले तर काही आपल्या मद्याचे संतोषदायी सेवन करण्याकरिता त्यांचे मद्य-मिश्रणाचे ब्रॉंझचे चषक रिते करीत गवतात पसरले. तळावरच्या शेकोटयांचे कडे चांगलेच झगमगत होते. रात्रभर खेळत, पहारा जागता राहिला. त्यांच्या वरच्या बाजूला उंचावर शस्त्रसज्ज होऊन तटावरून हे सर्व पाहत ट्रोजन खडे होते. परंतु चितायुक्त धास्तीने त्यांनीही आपल्या वेशींची पाहणी केली, आणि शस्त्रे खाली न ठेवता ते आपले बुरुज आणि रसदीच्या पुलाचे काम पूर्ण करू लागले. त्याच्या अनुपस्थितीत जर त्यांना अनपेक्षित धोक्यास तोंड द्यावे लागले तर त्यांचा प्रमुख इनीआस याने लढवैय्या सैनिकांची आणि डावपेचांच्या आखणीची जबाबदारी ज्यांच्यावर सोपविली होती त्या नेस्थिअसने आणि दमदार सेरिस्टसने अधिकार सूत्रे हलवण्यास सुरवात केली. सर्व सेना, धोक्याच्या जागा चिठ्ठया टाकून निवडून, भितीच्या आत बाजूबाजूनी तळ ठोकून राहिली; आणि प्रत्येक माणसाने त्याच्यावर रक्षणासाठी सोपविलेल्या त्याच्या पुढील आघाडीच्या बाजूचा फेरफटका करीत, पहाणी करून, आपल्या कर्तव्याचे पालन केले.

हिरटॅकसचा पुत्र, प्रतापी योद्धा नायसस एका वेशीचा रक्षापाल होता. मृगया-पर्वत इडाने त्याला इनीआस बरोबर प्रवासाला पाठविले होते; भाला फेकीत आणि हलक्या तीरांच्या फेकीत तो अतिचपळ होता. त्याच्या जवळच त्याचा साथीदार युरिॲलस होता. इनीआसच्या पदरी त्याच्या इतका देखणा, किंवा ट्रोजन शस्त्रे धारण करणाऱ्या योध्दयांमध्येही त्याच्याइतका कुशल क्वचितच दुसरा नजरेस पडला असता, तो तर केवळ पोरसवदा होता. आणि त्याचे कोवळे यौवन त्याच्या अजून स्मश्रू न उगवलेल्या गालावरून स्पष्ट होत होते. गाढ स्नेहाने ते दोघेही निगडीत झाले होते आणि रणधुमाळीत घुसतानाही ते अविभक्त राहत असत. आताच्या वेळीही साहजिकच ते एकाच वेशीचे रक्षण करीत एकाच पहाऱ्याच्या चौकीवर होते. नायसस म्हणाला: 'आपल्या ठायी असलेला हा युद्धाचा उत्साह देवानेच आपल्या हृदयांत ठेवला आहे ना? की आपलीच अनावर सहज–प्रेरणा आपण सर्व देवाच्या नावावर खपवितो? माझ्या बाबतीत म्हणशील

तर मला या निष्क्रिय शांततेचा कंटाळा आला आहे. लढाईच्या गर्दीत घुसावे किंवा दुसऱ्या एखाद्या मोठ्या साहसात उडी घ्यावी असा मी बराच वेळ विचार करीत आहे त्यांच्या स्वतःच्या ताकदीवरील विश्वासाने हे रुटुलिअन किती निष्काळजी झाले आहेत हें तू पाहतो आहेसच. शेकोटीचा जाळ तुरळकच दिसतो आहे आणि मदिरेने त्यांच्यावर पुरा अंमल केला आहे; ते झोपेत जमिनीवर आडवे झाले आहेत आणि त्यांच्या चौफेर तळावर सर्वत्र शांतता पसरली आहे. यावरून माझ्या मनात काय आहे आणि तिथे कोणती योजना आकार घेत आहे याची तुला कल्पना येईल. आपले देशबांधव, वडीलधारी मंडळी आणि तमाम लहान-मोठ्या दर्जाची सेना इनीआसला इथे परत बोलावण्याचा आणि येथील परिस्थिती त्याला कळविण्याकरिता दूत पाठविण्याचा आग्रह धरीत आहे. मी ज्याची मागणी करावी असे मला वाटते ते बक्षीस जर तुला द्यावयास ते तयार असतील तर ही कामगिरी पार पाडल्याबद्दलची कीर्ती तेवढी मला मिळावी एवढीच माझी इच्छा आहे. मला असे वाटते की त्या पलीकडच्या टेकडीच्या पायथ्याजवळून पॅलॅन्टि-अमच्या तटभिंतीजवळ व बुरुजांजवळ जाण्याचा मार्ग मला सापडेल.'

युरिॲलसला आश्चर्य वाटले आणि त्याने एक आक्षेप घेतला. यशाच्या तीव्र तृष्णेने उल्हसित होऊन त्याने आपल्या तेजस्वी मित्राला उत्तर दिले: 'नायसस, तुझ्याबरोबर तुझ्या साहसात तुझा साथीदार म्हणून मला येऊ द्यायची तुझी इच्छा नाही असाच ना याचा अर्थ ? या महान धोक्यात मी तुला एकट्या-लाच जाऊ द्यावे काय? ट्रॉयच्या भयंकर दिव्याच्या काळात आर्गाइव्हच्या आपत्तीत मला ज्यानी वाढवले त्या युद्धात कसलेल्या माझ्या वडिलांनी, ऑफेल्टीसनी, मला हे असे शिकवले नाही ! मी ज्या वृत्तीने उदारहृदयी इनीआसच्या मागोमाग असताना, तुझ्या खांद्याला खांदा लावून लढलो आणि दैवाने माझ्यापुढे जे काही वाढून ठेवले त्या सगळ्याला मी तोंड दिले ती वृत्ती ही नव्हे. माझा पिंड जागत्या जीवनाचा मुलाहिजा करणारा नाही, आणि जो पुरुषार्थ करण्याचा तू प्रयत्न करीत आहेस त्याच्याबद्दल जीवाचे मोल देणे, हा स्वस्त सौदा आहे असे मी मानतो.' यावर नायसस उत्तरला : 'तुझ्याविषयी असली शंका मला कधीच नव्हती. तशी शंका घेणे हे खरोखर पापकर्म झाले असते. सर्वश्रेष्ठ ज्युपिटर किंवा आपल्या कृत्यांकडे जो कुणी निःपक्षपातीपणे पहात असेल तो मला विजयी करून सुरक्षित-पणे तुझ्याकडे परत आणील अशी मला जर तितकीच खात्री असती तर बरे झाले असते. या अशा गंभीर संकटात जसे वारंवार घडते असे आपण पाहतो तसे काही अरिष्ट, अपघाताने किंवा एखाद्या देवाच्या रोषाने माझ्यावर ओढवले तर तू मागे

रहावास अशी माझी इच्छा आहे. कारण तुझे वय असे आहे की माझ्यापेक्षा जगण्याचा अधिकार तुलाच अधिक आहे. माझे शव रणांगणातून शोधून उचलून आणण्याकरिता, किंवा खंडणी देऊन परत मिळवण्याकरिता, आणि विधिपूर्वक त्याचे अंत्यकर्म करून दफन करण्याकरिता, किंवा दैवाने त्यालाही मना केली तर–कारण दैवगती तशीच लहरी असते–माझ्या स्मृतीकरिता समाधीशिला बांधून तिथे श्राद्ध–संतर्पण करण्याकरिता एकजण तरी राहू दे. शिवाय बलदंड ॲसेस्टीझच्या तटभितीयुक्त नगरीचा कधीही विचारही न धरता, अनेक मातांमधील फक्त ज्या एका मातेने आमच्या सर्व प्रवासांत आपल्या पुत्राचा मोठ्या धैर्याने पाठपुरावा केला त्या तुझ्या गरीब बिचाऱ्या आईच्या दुर्धर दुःखाला मी कारणीभूत व्हावे असे मला वाटत नाही.' परंतु युरिॲलसने उत्तर दिले : 'तू या लंगडया सबबी अगदी व्यर्थ सांगत आहेस. आणि त्यामुळे माझा निश्चय क्षीणही झाला नाही किंवा बदललाही नाही. चल आपण त्वरित कामाला लागू.' असे बोलत असताना त्याने इतर पहारेकऱ्यांना जागे केले. ते उठले आणि त्या दोघांचे पहाऱ्याचे काम त्यांनी केले. त्या जोडीने आपल्या राजाच्या शोधासाठी जाण्याकरिता चौकी सोडली. युरिॲलस नायसस बरोबर चालत होता.

सर्व भूलोकावरील इतर जगते जीव त्यावेळी निद्रेमधे आपल्या चिंता बुडवून टाकीत होते आणि त्यांच्या अंतःकरणांना झालेल्या श्रमाच्या विस्मरणात विसावा देत होते, परंतु ट्रॉयचे प्रमुख धुरीण, ट्रॉयचे पुरुषश्रेष्ठ, त्यांच्या अत्यंत गंभीर परिस्थितीवर सभा भरवून विचार-विनिमय करीत होते; आपण काय कृती करावी आणि हे वृत्त इनीआसकडे कोणी न्यावे यावर चर्चा चालली होती. आपल्या लांब भाल्यावर रेलून आणि ढालीवर हात ठेवून छावणीच्या मध्यभागी असलेल्या सभास्थानात ते उभे होते. अचानकपणे युरिॲलससह नायसस तिथे आला. ते मोठ्या उत्सुकतेने व घाईने आले आणि पुढे अत्यंत उपकारक ठरणाऱ्या महत्त्वाच्या कामासाठी आत जाण्यास ताबडतोब परवानगी मिळावी अशी ते विनवणी करू लागले. आयुलसने सूत्रे हाती घेतली आणि त्याने उत्साहित झालेल्या त्या जोडीचे स्वागत केले. नायससला त्याने बोलण्याची आज्ञा केली.

नंतर हिरटॅकसचा पुत्र नायसस म्हणाला : 'हे इनीआसच्या साथीदारांनो, तुमची मर्जी असेल तर सहानुभूतीने ऐका आणि आमच्या यौवनावरून आमच्या सूचनेचे मूल्यमापन करू नका. निद्रा आणि मदिरेच्या प्रभावाने सर्व रुटुलिअन गप्पगार झालेले दिसत आहेत. अनपेक्षित हल्ला करण्यास योग्य अशी एक जागा आमच्या पाहण्यात आताच आली आहे. समुद्राजवळच्या वेशीबाहेर जिथे दोन

रस्ते फुटतात तिथे एक फट दिसते, इथे पहाऱ्याच्या शेकोटीच्या कडचात मोकळी जागा आहे. तिथून आकाशात चांदण्याकडे चढणाऱ्या काळ्या धुराशिवाय दुसरे काही नाही. इनीआसच्या शोधात पॅलॅन्टिअमच्या तटबंदीपर्यंत जाऊन आमच्या दैवाची कसोटी पाहण्यास तुम्ही आम्हाला अनुमती दिलीत तर हत्याकांडाचा गदारोळ उठवून, आमची लूट घेऊन, आम्ही लवकरच परत आलेले तुम्हाला दिसू. जाताना आम्ही आमचा मार्ग चुकणार नाही; कारण आमच्या नित्याच्या मृगयेत आम्ही स्वत.च जिथे दरीच्या तळाशी दृष्टीआड झालो होतो, तिथून खालून आम्ही ती नगरी एकदा पाहिली आहे, आणि नदीच्या समग्र पात्राची आम्हाला चांगली माहिती आहे'

यावर ज्याच्या विवेकाची परिपक्वता त्याच्या वयोवृद्धतेशी बरोबरी करते तो ॲलेटीझ उत्तरला : 'आमच्या भूमीच्या देवांनो, तुमच्या दैवी कृपाछत्राखाली ट्रॉय चिरंतनच राहील. ज्या अर्थी असे कृतनिश्चयी आणि वीरवृत्तीचे योध्दे तुम्ही निर्माण करता त्या अर्थी आम्हा ट्रोजनांना पूर्ण नामशेष करावे असा तुमचा हेतु नसावा.' तो असे बोलत असताना त्याने त्या दोघांच्या खांद्यावर प्रेमाने थोपटले आणि त्यांचे उजवे हात हाती घेतले. त्याच्या मुखावर व गालांवर अश्रूंचे लोट वाहू लागले. नंतर तो पुढे म्हणाला : 'तरुण योध्दयांनो, तुमच्या या अत्युत्तम कृत्याला साजेसे असे कोणते बक्षिस देणे शक्य आहे याची मी कल्पना तरी करू शकतो काय ? देव आणि तुमचे स्वत.चे चारित्र्यच तुम्हाला प्रथम अत्यंत उदारहस्ते बक्षिस देईल, परंतु सत्त्वशील इनीआस बाकीच्या भरपाईबद्दल तुम्हाला त्वरित पारितोषक देईल आणि ज्याचे अजून वय झाले नाही तो बाल-ॲस्कॅनिअसही त्यात सामील होईल, आणि तो ही असाधारण सेवा कधीही विसरणार नाही'

ॲस्कॅनिअस मध्येच म्हणाला : 'खरेच विसरणार नाही परंतु माझ्या पित्याच्या सुरक्षित पुनरागमनावर माझे सर्व जीवित अवलंबून असल्यामुळे मी आपल्या घराचे रक्षण करणाऱ्या सर्व सामर्थ्यशाली देवांची आणि, होय! नायसस! ॲसॅरकस ज्या परिचित देवतेची आराधना करीत होता तिची आणि धवल कुंतल असलेल्या व्हेस्टाच्या अंतर्मंदिराची तुम्हा दोघांना शपथ घालतो; आणि माझे सर्व भवितव्य आणि माझा भरवसा तुमच्या हाती रक्षणार्थ सोपवीत आहे. माझ्या पित्याला परत घरी बोलवा आणि त्यांचे दर्शन मला परत घडवा. ते जर मला परत लाभले तर मग मला कशाचेही भय उरणार नाही; आणि तुम्हाला मी माझ्या पित्याने जेव्हा ॲरिस्बा जिंकले तेव्हा लुटीत मिळालेले

उठावाच्या भरदार आकृती असलेले भरीव रुप्याचे दोन चषक नजर करीन, आणि यज्ञीय तिवयांची एक जोडीही देईन. दोन मोठी सुवर्णाची पदके देईन आणि सिडॉनिअन डायडोने दिलेला मद्यमिश्रणाचा चषकही देईन. परंतु त्याशिवाय जर दैवाने माझ्या पित्याला इटली जिंकण्याची संधी दिली आणि त्या विजयाने इट-लीच्या राजदंडावर प्रभुत्व प्राप्त होऊ दिले. आणि लूटीची विभागणी मुक्रर झाली, तर मग काय ? टर्नस ज्या घोड्यावर स्वार झाला होता तो घोडा आणि त्याने धारण केलेली सुवर्णाच्या झगझगाटाने उजळलेली शस्त्रे तू पाहिलीच आहेस तो घोडा आणि त्याची ढाल आणि त्याचे लाल तुरा असलेले चकचकीत शिरस्त्राण मी इतर लुटीपासून निश्चित वेगळे काढीन. नायसस, या सर्व वस्तु हे तुझे बक्षिस आहे आणि या क्षणापासून त्या तुझ्याच आहेत माझे वडील तुला त्यांच्यातील काळजीपूर्वक निवडलेल्या बारा वृद्ध स्त्रिया आणि त्याशिवाय पुरुष गुलाम, त्यांच्या स्वतःच्या शस्त्रांसहित देतील. आणि त्याशिवाय आता लॅटिनसच्या आधिपत्याखाली असलेले सारे राज्यही देतील. आणि आता युरिॲलस, तू तर माझ्याहून वयाने काही फार मोठा नाहीस; तू इतका कोवळा आणि सर्वांचा साहजिकच लाडका आहेस. तुला मी माझ्या हृदयात स्थान देतो आणि माझ्या भविष्यकालीन सर्व साहसातील माझा सोबती म्हणून तुला आलिंगन देतो. तू ज्यात सहभागी होऊ शकणार नाहीस अशी कोणतीही कीर्ती, मी युद्धात गुंतलेला असो की शांततेच्या काळात असो प्राप्त करण्याची अभिलाषा माझ्या कारकीर्दीत मी कधीही करणार नाही; आणि मी जे जे बोलेन किंवा करीन त्या त्या सर्वांत तुझ्यावर सर्वस्वी अवलंबून असेन.'

युरिॲलस त्याला उत्तर देण्याकरिता बोलला : 'दैवाचा फासा आम्हाला अनुकूल पडला आणि आमच्याविरुद्ध पडला नाही तर माझ्या आताच्या साहसाशी मी इमान राखले नाही असे सिद्ध करणारा दिवस कधीही उगवणार नाही. परंतु तुम्ही जे मला देत आहा त्याशिवाय मी आणखी एका दयेची याचना करीत आहे. प्रायमच्या प्राचीन कुलातील माझी आई आहे, मी घर सोडले तेव्हा ती बिचारी माझ्याबरोबर आली, आणि इलिअमची भूमी किंवा राजा ॲसेस्टीझची तटबंदीयुक्त नगरीही तिला रोखू शकली नाही. पुढे कसलाही धोका असो—त्या धोक्याबद्दल अजिबात विचार न करता, तिचा निरोप न घेता, मी आता तिला सोडून जात आहे, ही रात्र आणि तुमचा दक्षिण बाहू याला साक्षी आहेत—कारण मला हे माहित आहे की माझ्या मातेच्या अश्रूंपुढे माझा टिकाव लागणार नाही. परंतु मी तुमच्यापाशी भीक मागतो की ती जर पुत्रहीन आणि असाह्य झाली तर तुम्ही

तिचे सांत्वन करा व तिला मदत करा, या बाबतीत तुमच्या सद्भावनेचे आश्वासन मला मिळू द्या. मग कोणतेही संकट येवो मी त्याला अधिक धैर्याने सामोरा जाईन.

सगळे डार्डन दुःखाने रडले कारण या बोलण्याचा त्यांच्यावर खोल परिणाम झाला होता; त्याच्या स्वतःच्या पित्यावरील एकनिष्ठ प्रेमाच्या या प्रतिबिंबाने त्याचे अंतःकरण हेलावल्यामुळे आयुलस सर्वात अधिक कळवळला. नंतर त्याने आपले विचार बोलून दाखविले. 'तुझ्या धीरोदात्त साहसाच्या योग्यतेप्रमाणेच सर्व काही होईल, याबद्दल विश्वास असू दे. कारण तुझी माता माझी माता होईल. फक्त क्रेउसाचे नाव तेवढे तिला असणार नाही. तुझ्यासारखा पुत्र जिला आहे तिच्या वाट्याला थोडयाशा कृतज्ञतेहून किती तरी अधिक असे काही तरी येईल. तुमच्या साहसाला दैव कसाही कौल देवो, माझे वडील जसे पूर्वी माझ्या जीवाची शपथ घेत असत तशी मी माझ्या जीवाची शपथ घेऊन तुला सांगतो. जे तू यशस्वी होऊन परतल्यानंतर तुला देईन असे मी तुला आश्वासन दिले आहे ते तू परत आला नाहीस तरी ते तसेच सर्व तिला आणि तिच्या संबंधितानाही मिळेल. आपल्या स्वतःच्या शब्दांच्या ध्वनीने सद्गदित होऊन तो असे बोलला, आणि असे बोलत असतानाच त्याने नॉसॉसच्या लिकेऑनने मोठ्या आश्चर्यकारक कौशल्याने घडविलेले, सुवर्णाने मढविलेले व बाळगण्यास सुलभ व्हावे म्हणून हस्तीदंताच्या म्यानात बसविलेले खड्ग आपल्या खांद्यावरुन काढले. नंतर नेस्थिअसने नायससला केसाळ सिंहाचे मोठे चामडे दिले; आणि एकनिष्ठ ॲलेटीझने त्याच्याशी आपल्या शिरस्त्राणाची अदलाबदल केली. त्या जोडीने त्वरीत शस्त्रें धारण केली आणि ती निघून गेली. ते जात असतांना तरुण-वृद्ध सर्व प्रमुखांचा समुदाय वेशीजवळ जमला होता व त्यांनी आपल्या प्रार्थना त्यांच्या संरक्षणाकरिता त्यांच्यामागे पाठविल्या. त्याच्या वयाच्या मानाने कितीतरी जास्त समजूत असलेल्या व मोठ्या पुरुषाची जबाबदारी पेलणाऱ्या देखण्या आयुलसने आपल्या वतीने आपल्या पित्याला सांगण्याकरिता अनेक संदेश त्यांच्या बरोबर दिले. परंतु वाऱ्याने ते सर्व विखरून टाकले जावयाचे होते आणि त्याने मेघानी दिलेली ती एक व्यर्थ भेट ठरणार होती.

जरी या साहसाचा शेवट होण्यापूर्वी ते स्वतःच अनेकांचा नाश करणार होते तरी, खंदक पार करून, रात्रीच्या छायेतून त्या तळाकडे आणि त्या तळावरील संभाव्य संकटाकडे, त्या जोडींने शोधीत शोधीत आपला मार्ग काढला. सगळीकडे गवतावर पसरलेले, दारुच्या धुंदीत निद्रिस्त असलेले सैनिक, समुद्र किनाऱ्यावर तिरके करून ठेवलेले रथ आणि त्यांच्या चक्रांच्या व लगामांच्या पसाऱ्यात पडलेले सारथी, आणि जमिनीवर पडलेली शस्त्रे आणि त्यांमधून विखुरलेले मद्याचे कुंभ

त्यांना दिसले. हिरटॅकसचा पुत्र प्रथम बोलला. तो म्हणाला 'युरिॲलस, आपल्या बलशाली दक्षिण बाहूंनी आता धीटपणे काम केले पाहिजे; समय आता त्याचीच मागणी करीत आहे. आपला मार्ग या बाजूने आहे. कुठलीही तुकडी एकदम उठून आपल्यावर पाठीमागून हल्ला करू शकणार नाही. याबद्दल सावधगिरी ठेवण्यासाठी तू तीक्ष्ण नजरेने आणि सावधानतेने आपल्या पिछाडीकडे लक्ष ठेवले पाहिजेस. इथे असलेल्या सर्वांचा मी फडशा पाडतो, आणि रुंद आणि निर्धोक मार्गाने तुला पुढे घेऊन जातो ' तो असे म्हणाला आणि त्याने आपले बोलणे आवरले बोलणे बंद करताच त्याने, छातीतून अगदी खोलातून उमटणाऱ्या घोरण्याने आपली निद्रा जणू बाहेर सोडणाऱ्या, दुलयांच्या ढिगाऱ्यावर उंचावर झोपलेल्या गर्विष्ठ हॅम्नेसवर आपल्या खड्गाने हल्ला केला. तो स्वतः एक राजा होता आणि द्रष्टाही होता. राजा टर्नसचे त्याच्यावर प्रेम होते. परंतु त्याचे भविष्यज्ञान त्याला काही मृत्यूपासून वाचवू शकले नाही. नायससने नंतर, दोन्ही बाजूस शस्त्रे ठेवून आपल्या धन्याभोवती पसरलेल्या त्याच्या तीन सेवकांवर घाला घातला. त्याने रेमसचे चिलखत संभाळणारा आणि त्याचा सारथी यांच्यावरही हल्ला केला. सारथी घोड्यांच्या अगदी जवळच निजलेला आढळला. त्यांच्या खाली ढळलेल्या माना त्याने आपल्या खड्गाने तोडल्या. नंतर त्यांच्या धन्याचेही शिर तोडले. आचक्यां-बरोबर रक्ताचे लोट बाहेर टाकणारे त्याचे धड त्याने तेथेच सोडले. जमीन आणि त्याचा बिछाना त्या रक्ताच्या प्रवाहाने भिजून जात होता. त्याने लॅमिरस, लॅमस आणि रात्रभर खेळत असलेल्या आणि बॅकसच्या उदंड प्रसादाने गात्रांवर ताबा केल्यामुळे तिथे निपचित पडलेल्या तरुण आणि सर्वांत अधिक देखणा असलेल्या सेरॅनसचाही वध केला. त्याने त्याचा खेळ रात्र सरेपर्यंत आणि दिवस उगवेपर्यन्त चालविला असता तर तो अधिक भाग्यवान ठरला असता. नायसस, एखाद्या खवळविणाऱ्या भुकेने पिसाट झालेल्या, मेंढयानी गच्च भरलेल्या मेंढेकोटामधून फिरणाऱ्या, भयाने आवाज उमटत नसलेली ती मृदु जनावरे फराफरा ओढून व कुरतडून भोवताली सर्वनाश फैलावणाऱ्या, व रक्ताने माखलेल्या जबड्यातून गर्जना करणाऱ्या उपाशी सिंहासारखा होता.

युरिॲलसही तसाच प्रबळ क्रोधाने पेटला होता–आणि त्यानेही काही कमी हत्या केली नाही. लपत छपत जाऊन त्याने, फारसे प्रसिद्ध नसलेल्या वीरांना–फॅडस, हर्बिसस, ऱ्हीटस आणि ॲबॅरिस यांना ते बेसावध असताना गाठले; फक्त ऱ्हीटस जागा होता आणि त्याने सर्व पाहिले परंतु एका मोठ्या मद्यकुंभाआड भयाने दडून तो स्वतःचे तेवढे रक्षण करू शकला; आणि नंतर जेव्हा तो हातघाईचे युद्ध लढण्याकरिता उभा राहिला तेव्हा युरिॲलसने आपले

लांब खड्ग त्याच्या छातीत पूर्ण खुपसले आणि त्याचा प्राण गेल्यावर रक्ताच्या पाटाबरोबर बाहेर काढले. ऱ्हीटसचा प्राण लालकाळ्या रक्ताबरोबर बाहेर पडला, आणि मरताना त्याला मद्याबरोबर मिसळलेल्या रक्ताच्या गुळण्या झाल्या. युरिअॅलस छुपे हल्ले करीत मोठ्या जोमाने पुढे गेला. तो आता गडबडीने मेसॅपसच्या तुकडीच्या तळाकडे जात होता. आणि त्याला रांगेने बांधलेले, गवत चघळत असलेले घोडे, आणि विझत चाललेल्या तळावरच्या शेवटच्या शेकोट्या दिसल्या. त्यावेळी या हल्ल्यात त्याच्या हत्येच्या अतिरिक्त वेडाने तो वाहवत चालला आहे असे लक्षात येऊन नायसस त्याला जरा जरबेने म्हणाला : 'आपण आता हे थांबवू या, कारण आता उजाडू लागले आहे आणि इथे थांबणे धोक्याचे आहे. शत्रूच्या फळीमधून आपला मार्ग आता मोकळा झाला आहे, आणि आपली सूडाची तहान पुष्कळच भागली आहे. त्यांनी योध्दयांची रुप्यामध्ये बसविलेली असंख्य शस्त्रे, तसेच मद्यमिश्रणाचे चषक आणि सुंदर रजया तेथेच टाकल्या. परंतु युरिअॅलसने रॅम्नसची आयुधे आणि सुवर्णाच्या फुल्या बसविलेला खड्ग लटकविण्याचा पट्टा घेतला आणि सर्व साज आपल्या बळकट खांद्यावर बसविला. परंतु हे सारे व्यर्थच होते असे नंतर सिद्ध झाले! फार पूर्वी या वस्तू वैभवशाली कॅडिकसने त्याच्या अनुपस्थितीत त्याच्या गाढ स्नेहाची खूण म्हणून टायबरच्या रेम्युलसला नजर केल्या होत्या, आणि नंतर रेम्युलसने मृत्यूसमयी त्याच्या पौत्राला वापरण्याकरिता दिल्या होत्या; युद्धामध्ये तो पौत्र गतप्राण झाला तेव्हा रटुलिअनांनी त्या जिंकून घेतल्या. नंतर युरिअॅलसने मेसॅपसचे सुरेख तुरे असलेले सुंदर शिरस्त्राण चढविले. ते त्याला ठीक बसले. नंतर त्या दोघांनी तळ सोडला आणि ते सुरक्षित प्रदेशाच्या मार्गाला लागले.

परंतु त्याचवेळी राजपुत्र टर्नसच्या मागण्यांना लॅटिनांचे उत्तर घेऊन, लॅटिन नगरीतून पुढे पाठविलेले घोडेस्वार दौडत येत होते. उरलेली सेना मागे मैदानात शिस्तीत रचना केलेली अशी लढण्यास सज्ज होती. व्होलसेन्सच्या आधिपत्याखाली ते तीनशे घोडेस्वार होते. त्यांच्याजवळ ढाली होत्या. ज्यावेळी त्या ट्रोजन जोडीला त्यांच्या डाव्या बाजूच्या नव्या मार्गावरून वळताना त्यांनी पाहिले तेव्हा ते जवळजवळ तळावर पोहोचले होते आणि तळाच्या तटबंदीजवळ येत होते. त्या जिंकलेल्या शिरस्त्राणाने रात्रीच्या अंधुक अंधारात चमकून आणि प्रकाश किरणाचे परावर्तन करून युरिअॅलसचा विश्वासघात केला. हा पकडले जाण्याचा धोका तो विसरला होता. त्या चमकणाऱ्या शिरस्त्राणाचे दृश्य शत्रूच्या नजरेतून सुटले नाही. आपल्या तुकडीच्या अग्रभागी असलेला व्होलसेन्स ओरडला, 'परकीयांनो, थांबा!

तुमच्या प्रवासाचा हेतू काय आहे ? तुम्ही सशस्त्र आहात, तुम्ही कोण आहात ? तुम्ही कुठे चालला आहात ?

त्यांनी उत्तर देण्याचा प्रयत्न केला नाही, परंतु रात्रीच्या अंधारावर विसंबून ते अरण्यात त्वरेने पळाले. त्यांना माहित असलेल्या वाटेवरील नाक्यांवर त्याना आडविण्याकरिता दोन्ही बाजूला त्या घोडेस्वारांनी ठाण मांडले, आणि त्यांना घेरण्याकरिता, निसटून जाण्याच्या प्रत्येक संभाव्य ठिकाणी पहारे ठेवले. सदापर्णी ओक वृक्षाच्या काळ्या अंधःकारात झुडपांच्या निबिड जाळ्यांमधून व दाट काट्याकुट्यांतून ज्याचा पार लागणार नाही असे ते अरण्य दूरवर पसरले होते, झाडांच्या सावल्यांनी आणि त्याच्या लुटीच्या ओझ्याने युरिॲलस अडखळत होता. आणि मनांतील भयाने आणि चुकीच्या दिशेने नेणाऱ्या वाटांनी त्याची फसगत होत होती, कारण परस्परात गुंतलेल्या झाडोऱ्यातून जिथे थोडी मोकळी जागा दिसत होती तिथेच काय ती वाट अशी काय दिसत होती. परंतु तरीही नायसस मात्र पुढे झेपावला आणि दिशेचा वगैरे कसलाही विचार न करता धावत त्याने लवकरच शत्रू मागे टाकला आणि तो धोक्याच्या बाहेर पडला. पुढे आल्बा लाँगा-वरून ज्याला आल्बान हे नाव पडले, परंतु त्या काळी राजा लॅटिनस कुंपण घालून ज्याचा खिल्लारांकरिता उपयोग करीत असे ते स्थळ त्याने मागे टाकले. नंतर तो थबकला आणि त्याने आपल्या हरवलेल्या मित्रासाठी सभोवार पाहिले. परंतु व्यर्थ. 'अरेरे, बिचाऱ्या युरिॲलस ! मी तुला कुठेसे सोडले बरे !' तो उद्गारला. 'तुला शोधण्याकरिता मी कोणत्या मार्गानें जाऊ, आणि या फसव्या अरण्यातून ज्या नागमोडी वाटेने मी आलो ती परत कशी उलगडू ?' तो असे बोलत असता-नाच त्याने त्याचे मागे जाणारे माग कुठे दिसतात का हे लक्षपूर्वक पाहिले, आणि तो त्या निःशब्द झाडीतून ते माग शोधून काढण्याकरिता चाचपडू लागला. नंतर त्याला घोड्यांचा आणि पाठलाग करणाऱ्यांचा आणि त्यांच्या इशाऱ्याच्या पुकारांचा आवाज आला; आरोळ्या कानी यायला आणि शेवटी फसव्या जमिनीने आणि अंधाराने घात केलेल्या आणि अचानक उठलेल्या आरोळ्यांच्या गोंगाटाने घाबरून गेलेल्या, सर्व तुकडीने पकडलेला आणि हताशपणे सर्वशक्तीनिशी अजूनही झगडत असलेल्या युरिॲलसला ते दूर खेचून नेत असताना पहायला त्याला फार वेळ तिष्ठावे लागले नाही.

आता नायससने काय करावे ? कुठल्या शक्तीने किंवा त्याच्या आवाक्यात असलेल्या कोणत्या शस्त्रांच्या कारवाईने तो त्या मुलाला सोडवू शकत होता ?

त्यांच्या खड्गांवर झेप घेऊन निश्चित मृत्यूकडे जावे आणि घायाळ होऊन त्या मार्गाने वीरोचित मरण स्वीकारावे ? त्याने भाला फिरवण्याकरिता आपला हात तात्काळ मागे घेतला आणि उंच आकाशातील चन्द्राकडे पाहून त्याने मोठ्याने प्रार्थना केली : 'हे देवी ! सर्व तारकांचे भूषण, लॅटोनाच्या कन्ये, आणि वनांच्या रक्षणकर्ते, तू आमच्या सन्निध रहा आणि आमच्या संकटात आम्हाला सहाय्य कर. माझ्या पित्याने, हिरटॅकसने, जर कधी माझ्या करिता प्रार्थनापूर्वक तुझ्या वेदींवर पूजादि द्रव्ये समर्पण केली असतील व जर कधी तुझी वेदी माझ्या मृगयेतील यशाने समृद्ध झाली असेल, किंवा जर कधी मी तुझ्या घुमटाला विजय-चिन्हे लटकविली असतील किंवा तुझ्या पवित्र छपरांखाली ती बसविली असतील तर माझ्या शस्त्रांची फेक हवेतून अचूक होऊ दे आणि त्यांच्या तुकडीत मला गदारोळ उठवू दे.' त्याने आपली प्रार्थना संपविली आणि सर्वशक्ती लावून आपला भाला फेकला. त्या भिरभिरत्या भाल्याने रात्रीच्या छाया दुभंगून टाकल्या, तो सल्मोच्या पाठीत पुरा घुसला व तिथे रुतून बसला; शेवटी तो मोडला आणि त्याचे काळीज लाकडाच्या चिरटोळ्यांनी पिंजून गेले. सल्मो छातीतून उसळणारे उष्ण रक्त ओकीत जमिनीवर गडगडला, त्याच्या कुशी खोल आचक्याने हादरल्या आणि तो थंडगार पडला. बाकीचे इकडे तिकडे वळून सभोवार पाहू लागले. आपल्या अचूक घावाने उत्तेजित झालेला नायसस दुसरा एक भाला कानाजवळ उंच धरून फेकण्यासाठी उगारीत होता पहिल्या धक्क्यातून शत्रू सावरण्यापूर्वीच ते शस्त्र टॅगसच्या दोन्ही कानशिलांतून फुत्कार टाकीत पार झाले आणि त्याचा मेंदू भेदून, तप्त होऊन तिथे रुतून बसले. व्होलसेन्स अचाट क्रोधाने बेभान झाला होता परंतु भाला कुणी फेकला असावा ते त्याला दिसेना व आपला भडकलेला राग, हल्ला करून कुणावर काढावा तेही कळेना; म्हणून तो युरिॲलसवरच ओरडला 'जोवर दुसरा कोणी दिसत नाही तोवर तुझ्याच तरुण उष्ण रक्ताने मी बदला घेतो आणि दोघांचा सूड तुझ्यावरच काढतो, आणि या शब्दांबरोबर हाती नग्न खड्ग घेऊन तो त्याच्यावर धावून गेला. ते दृश्य पाहून नायसस भयाने वेडा झाला त्या दृश्याने त्याला झालेल्या यातना सहनशीलतेपलिकडच्या होत्या. आणि मग तो अधिक काळ अंधारात राहू शकला नाही, 'हे पहा,' तो ओरडला, 'ते माझे कृत्य ! मी इथे आहे, हा पहा मी ! रुटूलिअनांनो तुमची शस्त्रे माझ्याकडे वळवा. अपराध सर्वस्वी माझाच आहे तो पारगा काहीच करायला धजला नाही; खरेच त्याला काहीही करता येणे शक्यच नव्हते. या वरच्या आकाशाला आणि सत्य ज्ञात असलेल्या या तारकांना याबद्दल ग्वाही देण्याची मी याचना करतो. दुर्दैवी

मित्रावर त्याने केवळ अतिरिक्त प्रेम मात्र केले.' परंतु तो हे बोलत असतानाच जोराने मर्मावर खुपसलेले खड्ग युरिॲलसच्या बरगडयांतून आत घुसले आणि त्याचा धवल ऊर फुटला; मृत्युमुखातले त्याचे शरीर जमिनींवर तडफडत घरंगळू लागले. त्याच्या सुंदर गात्रांवर रक्त पसरले आणि ढिली पडून त्याची मान त्याच्या खांद्यावर ढळली. नांगराने कापल्या गेलेल्या, सुकलेल्या आणि निर्माल्य झालेल्या तेजस्वी फुलासारखा, किंवा अचानक पावसाच्या सरीने झोडपलेल्या, शिणलेल्या मानांवर डोकी टेकणाऱ्या पॉपी–पुष्पासारखा तो दिसला. नायसस तात्काल शत्रूंच्या मधोमध धावला आणि व्होलसेन्सचाच केवळ वेध घेत आणि केवळ त्याच्या शिवाय दुसऱ्या कुणाचाही विचार न करता, त्याने सर्वांना मागे टाकले. शत्रूंनी त्याच्या भोवती कडे केले आणि दोन्ही बाजूनीं भिडून हातघाईच्या झुंजीत त्यानी त्याला मागे रेटले असते. परंतु तरीही शेवटी आपले वज्रतुल्य खड्ग गरगर फिरवीत तो पुढेच जात राहिला. त्याने ते त्या रुटुलिअनाच्या ओरडणाऱ्या मुखात पूर्ण खुपसलें. असा त्याने शत्रूचा जीव घेतला पण त्या बरोबर तो आपलाही जीव गमावून बसला. काळजाचा आरपार भेद झालेला नायसस त्याच्या मित्राच्या निष्प्राण देहांवर कोसळला आणि स्वागतार्ह ठरलेल्या मृत्यूमधे तिथे त्याला शेवटी शांती लाभली.

हे भाग्यवान द्वयी! माझ्या काव्यात जर काही सामर्थ्य असेल तर जोवर इनीआसचे पुत्र कॅपिटॉलच्या अविचल दगडी वास्तूजवळ नांदत आहेत, आणि जोंवर एका रोमन पित्याचे राज्य शाबूत आहे तोवर कुठल्याही दिवशी काळाच्या स्मरणातून तुमचे अपहरण होणार नाही.

आता नव्या आणि पुन्हा परत जिंकलेल्या लुटीचे धनी असलेल्या रुटुलिअ-नांनी आक्रोश करीत व्होलसेन्सचा मृत देह छावणीवर परत आणला. तेथेही असाच दारुण आक्रोश चालू होता, कारण हत्या झालेला ऱ्हॅम्नेस आणि त्याच्या बरोबर एकाच वेळी मारले गेलेल्या इतर सर्व प्रमुखांची प्रेते सापडली होती. त्यांच्यामध्ये सेरॅनस आणि न्युमाही होते. जिथे रक्ताने भिजलेली जमीन अजून उष्ण होती आणि फेसाळणाऱ्या रक्ताच्या नद्या अजून भरभरुन वाहत होत्या, तिथे मृतांच्या देहांजवळ, तसेच घायाळांजवळ व मृत्यूच्याजवळ पोहोचलेल्या लोकांजवळ मोठा जमाव तात्काळ जमला. ज्या परत मिळविण्याकरिता एवढे घामाचे आणि श्रमाचे मोल द्यावे लागले होते, त्या लुटीतील वस्तु, मेसॅपसचे चकचकीत शिरस्त्राण आणि त्यांचा सर्व युद्धीय साज ते एकमेकाला दाखवू लागले व सर्वांनी त्या वस्तू ओळखल्या.

परंतु उषा आताच टिथोनसची केशरी शय्या सोडीत होती आणि तिची पहिली शलाका पृथ्वीवर नवा ताजा प्रकाश शिंपडीत होती. आता सूर्यप्रकाश खाली पसरू लागल्यामुळे दिवसाच्या प्रकाशात भूमी दिसू लागली म्हणून टर्नसने प्रथम स्वतः शस्त्रे धारण केली, आणि नंतर त्याच्या माणसांना शस्त्रे धारण करण्यास उठविले, त्याच्या प्रत्येक सेनाधिपतीने, सैनिकांचा त्वेष अधिक तीव्र करण्याकरिता तपशीलवार वृत्तांत सगळीकडे पसरवीत, आपली ब्रांझची चिलखते घातलेली सेना लढण्याकरिता एकत्र केली. खरोखर त्यापैकी कांहीनी तर युरिॲलस आणि नायसस यांची शिरे भाल्यांच्या टोकांवर लटकवली. ते दृश्य अति करुणास्पद होते. इतर सैनिक आरोळ्या देत त्यांच्या मागून गेले. प्रतिकाराकरिता इनीआसच्या माणसांनी मोठ्या निर्धाराने प्रतिकाराची आघाडी डाव्या कुशीच्या भिंतीच्या बाजूने उभारली कारण त्यांच्या उजव्या बाजूला नदीने वेढा घातला होता; आणि जेव्हा त्यांना आपल्या मित्रांची भाल्यावर लटकवलेली, काळ्या रक्ताचा पाट वाहणारी आणि त्यांच्या दुःखी साथीदारांना सुपरिचित असलेली शिरे पाहून धक्का बसला तेव्हा ते त्यांच्या खोल खंदकाच्या बाजूनी माणसांच्या रांगा उदासपणे उभ्या करीत होते आणि आपल्या उंच मनोऱ्यावरील स्वतःच्या जागा घेत होते.

मध्यंतरी पंख असलेली वदंता आपल्या संदेशासह त्वरेने त्या छावणीतून फिरली आणि ती सरळ युरिॲलसच्या मातेच्या कानापर्यन्त पोहोचली. बिचारी स्त्री! तिच्या अंगातील सर्व उब तिला सोडून गेली धोटा तिच्या हातातून उडाला आणि तिचा लोकरीचा गुंडा उसवला. भयंकर दुःखाने व्यग्र होऊन ती धावत सुटली, आणि स्त्रिया करतात तसा आक्रोश करीत व आपले केस उपटीत, विकल झालेल्या मनाने ती जिथे आघाडीचे सैन्य खडे होते त्या भिंतीकडे धावली. भाल्यांपासून संभवणाऱ्या धोक्याचा किंवा तिथे पुरुष-माणसे होती याचा तिने विचार केला नाही आणि नंतर तिने आपल्या शोकाने सारे आकाश भरून टाकले : 'युरिॲलस, मी जे पाहत आहे, तो खरा तूच आहेस का – माझे वार्धक्य आता संपायला आले असताना माझा एकमेव आसरा असलेला तूच? अरे निर्दया, मला एकटीला सोडून जायला तुझा जीव धजला तरी कसा? आणि या तुझ्या कामगिरीतील भयंकर धोक्यांना तोंड द्यायला जाताना, तुझ्याशी बोलण्याची अखेरची संधीही तुला तुझ्या गरीब बापड्या आईला द्यायची नव्हती काय? हाय रे! तुला परक्या मुलखात लॅशिअमच्या कुत्र्यांचे आणि गिधाडांचे भक्ष्य होण्याकरिता टाकले आहे.

तुझी आई तुझ्या अंत्ययात्रेत तुला सोबत करायला पुढे झाली नाही, तुझे डोळे तिने झाकले नाहीत. तुझ्या जखमा तिने धुतल्या नाहीत; रात्रंदिवस मेहनत करून तुझ्याकरिता मी जे वस्त्र विणून पूर्ण करण्याचा प्रयत्न करीत होते, आणि ते विणीत असताना माझ्या म्हाताऱ्या जिवाची दुःखे हलकी करीत होते, ते वस्त्र मी तुझ्यावर कफन म्हणूनसुद्धा घातले नाही ? आता तुला शोधण्याकरिता मी कुठे जाऊ? तुझा विच्छिन्न देह कोणत्या भूमीवर पडला आहे ? तुझे ठेचलेले अवयव, तुझे तोडलेले हातपाय कुठे आहेत ? मुला, माझ्याकडे आणण्यासारखे असे तुझे म्हणून एवढेच उरले आहे काय? आपल्या भूमीवरील आणि सागरावरील सर्व प्रवासात मी ज्याच्यामागून आले त्या माझ्या मुलाचे याहून अधिक मला काहीच मिळायचे नव्हते काय ? रुटुलिअनांनो तुमच्यात काही दयेचा अंश असेल तर मला जखमी करा ! तुमचे सर्व भाले माझ्यावर फेका, केवळ माझ्यावर, आणि खड्गाने वध करण्याकरिता सर्वांच्या आधी माझी निवड करा ! हे होणार नसेल तर हे सर्वश्रेष्ठ देवपित्या, माझ्यावर दया कर आणि जर दुसऱ्या कोणत्या मार्गाने मी या जगण्यातील क्रौर्य खंडित करू शकत नसेन तर तुझ्या वज्राघाताने माझ्या या घृणास्पद जीवाला खोल टारटॅरसच्या गर्तेत लोट.' तिच्या शोकाने सर्वंच हेलावले. दुःखाचे हुंदके सर्व सेनेत पसरले; त्यांचा युद्धाचा जोम ओसरला आणि ते मरगळून गेले. नंतर त्या मातेचे दुःख अनावर होऊन अधिक तीव्रतेने व्यक्त होऊ लागले तसे इलिऑसच्या आणि दारुण शोक करणाऱ्या आयुलसच्या सूचनेवरून आयडिअस आणि अॅक्टॉर यांनी तिला पटकन उचलून दोघांच्यामध्ये धरून तिच्या घरी नेले आणि शय्येवर ठेवले.

परंतु आता दूरवरून ब्राँझच्या निनादातून रणभेरींचा भयावह ध्वनी कर्कशपणे उठला. त्याच्या पाठोपाठ आरोळ्या आल्या आणि आकाशाने गर्जून त्या प्रतिध्वनित केल्या. खंदक भरून काढण्याच्या आणि तटबंदी उखडून टाकण्याच्या हेतूने, इटॅलिअनांनी ढाली एकमेकात अडकवून एकच रांग केली आणि त्यांच्या चालीची गती वाढविली. एका ठिकाणी जिथे संरक्षक सेनाबळ कमी असल्यामुळे संरक्षणाची फळी तुटक होती आणि म्हणून पुढच्या रांकेतून मागचा प्रकाश दिसत होता, तिथून शिड्यांच्या सहाय्याने तटभिंतीवर चढण्याची संधी घेण्याचा आणि सरळ हल्ला चढविण्याचा मार्ग शोधण्याचा प्रयत्न एक तुकडी करीत होती. ट्रॉयच्या दीर्घ युद्धात तटबंदीच्या संरक्षणाचा चांगलाच अनुभव मिळविलेल्या ट्रोजनांनी हल्लेखोरांवर सर्व प्रकारच्या शस्त्रांचा वर्षाव केला आणि वेढ्यांत वापरावयाच्या, लोखंडी टोकांच्या बळकट दांडक्यांनी त्यांना परत खाली रेटले.

अतिशय अवजड वजनदार दगडही त्यांनी शत्रूची चिलखती आघाडी मोडून काढण्याच्या उद्देशाने खाली लोटले; तरीही त्या कासवाच्या कवचासारख्या चिवट रचनेच्या आघाडीने आपल्यावर कोसळणाऱ्या प्रत्येक अस्त्राला तत्परतेने तोंड दिले. परंतु लवकरच ते अधिक काळ तग धरू शकले नाहीत; कारण ज्या ठिकाणी एकत्रित झालेल्या सैन्यबळापासून धोका निर्माण झाला होता तिथे ट्रोजनांनी एक प्रचंड आकाराचा खडक उखडून गडगडत खाली सोडला. तो ढालींचे छत फोडून कोसळला आणि त्याने रुटुलिअनांची एक संपूर्ण तुकडी चिरडून टाकली. साहसाची उर्मी कमी झालेल्या रुटुलिअनांचा एका सुरक्षित आवरणाखाली धुंदपणे लढण्याचा उत्साह मावळला, आणि लांब पल्याच्या शस्त्रांचा उपयोग करून संरक्षण कर–णाऱ्यांना त्यांच्या तटबंदीतून हुसकावून लावण्याचाच त्यांनी आता प्रयत्न आरंभला. परंतु इतरत्र नुसत्या दर्शनानेच धडकी भरविणाऱ्या मेझेन्टिअसने, संरक्षक फळीवर आग आणि धुराचे लोट यांचा वर्षाव करणारा इट्रस्कन पाईनचा जळता पलिता परजला. त्याच वेळी अश्वशिक्षक, साक्षात नेप्च्यूनचा पुत्र, मेसॅपस ती तटबंदी उखडून टाकण्याच्या हेतूने बुरजावर चढण्याकरिता शिडया आणण्याची ओरडून मागणी करीत होता.

हे कॅलीऑपी! हे गीतांच्या दैवतानो, मी तुमची प्रार्थना करतो की टर्नसच्या खड्गाने त्या समरांगणावर पसरविलेल्या संहाराच्या, त्याने घडवून आणलेल्या आणि त्याने प्लूटोच्या विश्वात पाठविलेल्या प्रत्येक वीराच्या, मी सांगत असलेल्या कथेला तुमच्या प्रतिमेची जोड द्या. त्या युद्धाचा विस्तृत इतिहासपट परत उलगडण्याच्या कार्यात मला साथ द्या. कारण तुम्ही देवांश आहा आणि ती कथा कथन करण्याचे सामर्थ्य तुमचेच आहे.

तिथे एका मोक्याच्या जागेवर, खालून वर पाहिले तर डोळे फिरविणारा उत्तुंग मनोरा होता; त्याला उंचावर दळणवळणाचे पूल होते. सर्व इटॅलिअन सेना आपल्या सर्वशक्तीनें त्यांच्यावर हल्ला करून त्यांच्या आवाक्यात असलेल्या कोणत्याही साधनाने तो पाडण्याचा प्रयत्न करीत होती. त्याला प्रत्युत्तर म्हणून ट्रोजन दगडाच्या माऱ्याने हल्ला परतवून त्याचे रक्षण करण्याचा प्रयत्न करीत होते आणि ते उघडया गवाक्षातून त्यांच्यावर हल्ला करणाऱ्यांवर अस्त्रे फेकण्या–करिता तिथे एकत्र जमले. टर्नस त्याच्या सेनेच्या पुढे होता आणि त्याने एक भयंकर भडकलेला जळता पलिता भिरकावला आणि त्याने आपली ज्वाला त्या मनोऱ्याच्या बाजूत रोवली. वाऱ्याने अग्नी भडकला; त्याने फळ्या पेटल्या टेक्यांना आग लागली आणि अग्नीने जोर धरला. आता त्या मनोऱ्यात सर्व

गोंधळ आणि हाहा:कार उडाला, आणि या भयंकर संकटातून वाचण्याची असहाय्य धडपड सुरू झाली. ट्रोजन तिथून माघारी फिरले आणि जिथे अजून धोका निर्माण झाला नव्हता, त्या तक्तपोशीच्या भागावर गर्दी करून उभे राहिले, आणि त्यांच्या एकदम पडलेल्या भाराने तो मनोरा एकदम कोसळला, त्याच्या पडण्याच्या आवाजाने सबंध आकाश मेघगर्जनेप्रमाणे दुमदुमून उठले. स्वतःच्याच भाल्यांनी काळीज फुटलेले आणि कठीण लाकडाच्या अणकुचीदार ढलप्या छातीत घुसून मरणोन्मुख झालेले ट्रोजन खाली कोसळताना ते प्रचंड धूड त्यांच्या पाठोपाठच आले.

हेलेनॉर आणि त्याच्या बरोबर लायकसच तेवढे सुरक्षितपणे तिथून निसटू शकले. हेलेनॉर हा उमेदीतील तरुण पुरुष होता. त्याची माता लिसिम्निआ ही एक गुलाम स्त्री होती. परंतु त्याच्या जन्माचे रहस्य उघड न करता तिने त्याला लिडिआच्या राजाचा पुत्र म्हणून वाढविले; आणि त्याला जरी जायला मना केलेली होती तरी तिने त्याला शस्त्रे घेऊन ट्रॉयभूमीकडे जाताना पाहिले होते, तो हलकीच शस्त्रे घेऊन, केवळ एक खड्ग आणि कोणत्याही शौर्यकथेच्या गौरव चिन्हाने अलंकृत न झालेली त्याची ढाल घेऊन गेला होता. हेलेनॉर आता टर्नसच्या लॅटिन सेनेच्या-त्याला खेटून दोन्ही बाजूंना खड्या असलेल्या हजारो सैनिकांच्या फळ्यांमध्ये सापडला. शिकाऱ्यांच्या दाट कड्यात सापडलेला वन्यपशु ज्या प्रमाणे क्रुद्ध होऊन शिकाऱ्यांच्या शस्त्रांना तोंड देतो आणि नंतर जो मृत्यू निश्चित आहे हे त्याला माहित असते त्या मृत्यूवर झेप घेतो आणि त्याची उडी नेमकी त्याचा वेध घेणाऱ्या भाल्यावर पडते, त्याचप्रमाणे भोवती गर्दी केलेल्या शत्रूंमध्ये ज्या ठिकाणी शस्त्रे अधिक दाट होती तिथे त्या कुमाराने सहजतेने मृत्यूवर झेप घेतली. परंतु लायकस हा हेलेनॉरहून जास्त चपळाईने धावणारा होता. तो, शत्रू आणि त्यांची शस्त्रे या मधून सरळ तीरासारखा पुढे धावला; त्याने भिंत गाठली, आपल्या बोटांनी वरील कठडा पकडण्याचा आणि आपल्या मित्रांचे हात धरण्याचा त्याने प्रयत्न केला. परंतु टर्नसने ओरडत त्याचा पाठलाग केला; धावता धावता त्याने आपला भाला फेकला, आणि विजयोन्मादाने, कुत्सितपणे म्हणाला, 'म्हणजे मूर्खा, माझ्या हातातून निसटण्याची तू आशा करीत होतास तर!' असे म्हणत ज्याप्रमाणे साक्षात जोव्हच्या चिलखत-वाहक गरूडाने स्वतःच्या वक्र नख्यांत एखादा ससा किंवा धवल तेजस्वी हंस पकडून आकाशात उंच भरारी मारावी; किंवा एखाद्या लांडग्याने मार्सच्या पवित्र पशूने, मेंढकोटातून एखादे कोकरू पळवून न्यावे आणि त्याच्या आईने खूप ओरडत त्याच्या मागून धावावे त्याप्रमाणे टर्नसने

लोंबकळत असलेल्या लायकसला पकडले आणि भिंतीच्या मोठ्या तुकड्यासह खाली खेचले.

सर्व बाजूंनी आरोळ्या उठल्या. लॅटिन आतपर्यंत धावले आणि त्यांनी दगडांच्या कपाऱ्यांनी तो खंदक भरून काढायला सुरवात केली; इतरांनी मनोऱ्यांच्या उतरत्या छपरांवर जळते पलिते फेकले. इलिऑनिअसने त्यांच्यावर एक पाषाण एखाद्या पर्वतावरून प्रचंड कडा तुटून पडावा तसा फेकला आणि आग लावण्याची साधने घेऊन ल्यूसेटिअस एका वेशीवर चाल करून येत असताना त्या पाषाणाने त्याला खाली पाडले. आणि लायगरने इमॅथिऑनचा आणि ॲसिलॅस कॅरिनिअसचा वध केला; लायगरचा बरचीवर पक्का नेम होता आणि ॲसिलॅस दूर अदृश्य राहून बाणाने वेध घेण्यात वाकबगार होता. नंतर केनिअसने ऑर्टिजिअसचा वध केला आणि टर्नसने केनिअसचा त्याच्या विजयाच्या क्षणी वध केला; आणि त्याने आयटीझ, आणि क्लोनिअस, डायोक्झिपस, प्रोमोलस, सॅगॅरिझ यांचा आणि बुरुजाच्या शिखरावर संरक्षणाकरिता उभा असलेल्या इडासचाही वध केला. थेमिलॅसने फेकलेला एक हलका भाला ज्याला नुकताच चाटून गेला होता त्या प्रायव्हर्नसचा कॅपिझने वध केला. त्यावेळी प्रायव्हर्नसने आपली ढाल मूर्खासारखी बाजूला फेकली होती आणि आपला हात त्या जखमेकडे वळविला होता. त्यामुळे वेगाने येणाऱ्या त्या पंखधारी बाणाला त्याचे लक्ष्य सुलभपणे सापडले, त्याचा हात त्याच्या डाव्या बाजूला खिळला गेला आणि घातक जखम करीत बाण आत घुसला आणि त्याने प्राणवायू पुरविणाऱ्या श्वासनलिकाच फोडून टाकल्या, तिथेच तेजस्वी शस्त्रे घेतलेला आणि भरतकामाने चित्रित केलेली दृश्ये असलेले स्पेनच्या लाल रंगाने चमकून उठलेले उपवस्त्र परिधान केलेला आणि दिसण्यात अत्यंत देखणा असलेला ॲरसेन्सचा पुत्रही उभा होता. जिथे पॅलिकसच्या वेदीवर केलेल्या यथासांग यज्ञयागाला निश्चित फलप्राप्ती होते त्या सिमिथस नदीच्या किनाऱ्यावरील मार्सच्या पवित्र वनात त्याचे पालनपोषण झाले होते, आणि त्याच्या पित्याने त्याला युद्धावर पाठविले होते. मेझेन्टिअसने आपला भाला बाजूला ठेवला. त्याने टोकाला सूं करीत जाणारा शिश्याचा गोळा असलेली गोफण सज्ज केली, आपल्या डोक्याभोवती तीन वेळा फिरविली. आणि आता वितळलेल्या शिश्याच्या गोळ्याचा शत्रूवर थेट पुढून मारा केला, त्या गोळ्याने त्याचे कपाळ मध्यभागी फोडून दोन शकले केली आणि त्याला वाळूवर पुरा आडवा केला.

असे म्हणतात की आतापर्यंत हिंस्त्र श्वापदांना भयभीत करून वेगाने पळवून लावण्यापुरताच मर्यादित अनुभव असलेल्या ॲस्कॅनिअसने याप्रसंगी प्रथमच

प्रत्यक्ष युध्द कर्मात द्रुतगती बाणाने वेध घेतला त्यानं रेम्युलस हे आडनाव असलेल्या शूर न्यूमॅनसला आपल्या स्वतःच्या सामर्थ्याने खाली लोळविले. न्यूमॅनसने नुकताच टर्नसच्या एका धाकटचा बहिणीचा पत्नी म्हणून स्वीकार केला होता. या राजवंशाशी जडलेल्या नव्या संबंधाने तो गर्वाने फुगून गेला होता. म्हणून तो ओरडत आणि आपल्या अजस्त्र देहाचे प्रदर्शन करीत आणि पुनरुक्ती करण्यास योग्य आणि अयोग्य असे दोन्ही प्रकारचे अपशब्द उच्चारून स्वतःच्या बडबडीनेच आपण फार मोठे आहोत असे भासवीत, मोठचा दिमाखात आघाडीच्या फळीच्याही पुढे झाला. 'दोन वेळा पराजित झालेल्या फ्रिजिअनांनो, मृत्यूपासून स्वत.चे रक्षण करण्याकरिता पुनः एकदा तटभितीवर विसंबून राहून या दुसऱ्या वेळीही वेढचात अडकून, तटबंदीच्या आड बंदीवान होऊन पडण्याची तुम्हाला शरम नाही वाटत? आणि हीच माणसे म्हणे युद्ध करून आमच्यापासून आमच्या वधू हिरावून घेणार आहेत! कोणत्या देवाने किंवा कोणत्या वेडेपणाने तुम्हाला इटलीला यायला भाग पाडले! तुम्हाला इथे एत्रिअसचे पुत्र आढळणार नाहीत किंवा फसवी संभाषणे करण्याच्या कसबाचा शोधक युलिसीसही भेटणार नाही. आम्ही जन्मजातच दुर्धर असलेल्या वंशातले आहोत. आम्ही नुकत्याच जन्मलेल्या आमच्या अर्भकांना नदीवर घेऊन जातो आणि पाण्याच्या बर्फासारख्या थंडपणाने त्यांना राकट बनवतो. आमचे कुमार निद्रेची फिकीर न करता मृगयेच्या मागे जातात आणि वनांना ते कधी उसंत घेऊ देत नाहीत. घोडचांना लगामाच्या कसबाने गोलगोल फिरवणे आणि धनुष्यातून टोकदार बाण द्रुतगतीने सोडणे हे त्यांचे खेळ आहेत. आमची तरुण माणसे काम करतात, कष्ट सोसतात आणि हालअपेष्टा सहन करण्याचे त्यांना शिक्षण मिळालेले असते; ते नित्य नियमाने जमीन कसतात आणि तिला हवी तशी वळवतात; किंवा युद्धाच्या धुमाळीने नगरे हादरवितात. वयाच्या प्रत्येक वर्षी आम्हाला पोलादाच्या जखमा होत असतात. बैलाच्या पाठीला आरणी लावण्याकरिता आम्ही भाल्याच्या उलटचा फाळाचा उपयोग करतो. वार्धक्याने आमच्या शरीराच्या शक्ती मंदावतात पण कधी ते आमची हिंमत क्षीण करीत नाही किंवा आमचा जोम कमी करीत नाही; पिकलेले केस आम्ही शिरस्त्राणाखाली दडपतो आणि याही वयात ताजी शिकार घरी आणण्यात आणि लुटीवर गुजराण करण्यात आम्हाला आनंद वाटतो. परंतु तुम्ही, तुमची वस्त्रे केशरी धाग्याने भरतकाम केलेली आणि जांभळचा रंगाने भडक दिसणारी आहेत. आळसाचे जीवन तुम्हाला सर्वाधिक प्रिय आहे, आणि नृत्यात रममाण होणे हा तुमचा आनंद आहे. अरे! तुमच्या अंगरख्यांना बाह्या आहेत

आणि तुमच्या टोप्यांना बांधण्याकरिता बंद आहेत ! तुम्ही फ्रिजिआतील बायका आहात ! फ्रिजिआचे पुरुष खचितच नाही. डिन्डिमाच्या पर्वतावर दोन छिद्रे असलेल्या वेळूच्या पाव्याच्या संगीताच्या तालावर तुम्ही आपले पळत जा; खरोखर या पद्धतीचेच तुम्हाला शिक्षण मिळाले आहे. माता इडाची बेरेसिन्टिअन ढोलकी आणि बॉक्सवुडचे पावे हीच तुमच्या धंद्याची आयुधे आहेत ! परंतु शस्त्रे मात्र पुरुषांकरिता ठेवा; पोलादावर तुम्ही हक्क सांगू नका.'

अपशकुनाची सूचना देणारे त्याचे शब्द असे बढाईखोर होते; त्याची ही वल्गना ॲस्कॅनिअसच्या सहनशीलतेचा अंतच पहाणारी होती. ॲस्कॅनिअसने आपले धनुष्य, त्याच्या घोड्याच्या आतड्याची प्रत्यंचा दृढपणे स्वतःकडे ओढून ताणले; आणि बाहू परस्परांपासून दूर ठेवून तो स्तब्ध उभा राहिला. परंतु प्रथम त्याने नम्रपणे प्रार्थना केली आणि ज्यूपिटरला त्याने नवस केले : 'हे सर्वशक्तिमान ज्युपिटर, माझ्या धीट साहसाला आशीर्वाद दे. आणि कृतज्ञतेची परतफेड म्हणून मी स्वतः प्रतिवर्षी तुझ्या मंदिरात नाना द्रव्ये समर्पण करीन. मी तुझ्या वेदीपुढे एक, सुवर्णाने शिंगे मढविलेला, त्याच्या आईइतकेच उन्नत मस्तक ठेवणारा आणि ज्या वयात प्राणी ढुश्या देतो आणि खुराने वाळू उखडून उडवतो त्या वयाला आलेला पांढराशुभ्र बैल ठेवीन." स्वर्गस्थ पित्याने त्याची प्रार्थना ऐकली. त्याने डाव्या बाजूला गडगडाट केला, पण ज्या भागात गडगडाट झाला तिथे निळे आकाश दिसत होते, आणि त्याच क्षणी दैवगतीचे वाहन असलेल्या त्या धनुष्याने टणत्कार केला. मागे खेचलेला बाण पुढे झेपावला आणि त्याचा चित्कार भयंकर होता; तो बाण रेम्युलसच्या मस्तकातून आरपार गेला आणि त्याचे लोखंडी टोक त्याच्या कपाळाच्या मागच्या पोकळीपर्यंत घुसले. ॲस्कॅनिअस म्हणाला : 'हे घे ! आता जा, आणि बढाईखोर माणसा, शौर्याची थट्टा कर ! दोनदा पराजित झालेल्या फ्रिजिअनांनी रुटुलिअनांना दिलेले हे उत्तर आहे !" तो एवढेच बोलला. त्याच्या यशाने ट्रोजनांनी आनंदाने आरोळ्या मारल्या व त्यांच्या हृदयात न मावणारा हर्ष जणू स्वर्गापर्यंत पोचला.

त्याचवेळी आकाशातील एका भागातून लांब केस असलेला ॲपोलो योगायोगाने खाली इटॅलिअन सेनेकडे आणि त्या वसाहतीकडे पाहत होता. त्याच्या मेघावरील आसनावरून तो विजयी आयुलसला म्हणाला : 'देवांचा वंशज असलेल्या आणि भावी देवांचा पूर्वज असलेल्या तरुण राजपुत्रा, तुझ्या नवोदित पौरुषाला माझे आशीर्वाद आहेत ! तारकांकडे जाणारा मार्ग तुला सापडला आहे. नियती जी युद्धे घडवून आणणार आहे त्यांच्या ॲसॅरॅकसच्या राजवंशाच्या

अमलाखाली यथोचितपणे शांततेत शेवट होईल. ट्रॉय तुझ्या कर्तृत्वाची मर्यादा ठरणार नाही.' या स्पष्ट वचनांचा उच्चार करून, वायुलहरी दूर करीत त्याने आकाशातून थेट खाली झेप घेतली आणि तो सरळ ॲस्कॅनिअसकडे आला. नंतर त्याने आपल्या चेहऱ्यावरील मुद्राविभ्रमांत बदल करून, तो डार्डन अँकायसीझच्या प्रवेशद्वाराचा विश्वासू रक्षक आणि शिलेदार असलेल्या आणि नंतर ज्याची ॲस्कॅनिअसचा सवंगडी म्हणून त्याच्या पित्याने, इनीआसने नेमणूक केली होती त्या वृद्ध ब्युटीससारखा दिसेल असे केले. आणि नंतर चालताना ॲपोलोचे सर्व रूप, आवाज, वर्ण, पांढरे केस आणि भीषण खणखणाट करणारी शस्त्रे, त्या वृद्ध सेवकासारखी दिसत होती. तो सरळ या साहसाने अत्यंत उत्तेजित झालेल्या आयुलसशी बोलला : 'इनिआस पुत्रा, न्युमॅनस तुझ्या धनुष्याला बळी पडला आणि त्याचा सूड घेतला गेला नाही एवढे पुरेसे आहे. सर्वोच्च ॲपोलोने हे तुझे पहिले गौरवाचे कृत्य संमत केले आहे आणि तुझी शस्त्रे त्याच्या स्वतःच्या शस्त्रांसारखी प्रभावी आहेत याचे त्याला वैषम्य नाही. परंतु तू लहान आहेस तोवर भविष्यात युद्धापासून दूर रहा' हा छोटा आदेश देऊन, तो बोलत असतानाच मानवी दृष्टीपुढून अदृश्य झाला. आणि दृष्टीपथातून दूर जात हवेत विरून गेला. परंतु काही डार्डन प्रमुखांनी त्या देवाला ओळखले कारण तो दूर जात असताना त्याच्या भात्याची सळसळ त्यांनी ऐकली आणि ती स्वर्गीय शस्त्रे त्यांनी ओळखली; म्हणून फीबसने व्यक्त केलेल्या स्पष्ट इच्छेनुसार त्यांनी ॲस्कॅनिअसला, त्याला जरी लढण्याची उत्सुकता होती तरी मागे पाय घेण्यास लावला. त्याच्याऐवजी आपले जीवित उघड उघड संकटात घालून ते स्वतः रणकंदनात पुढे सरसावले. सर्व लांबलचक तट–भिंतींच्या बाजूने एक आरोळी उठली. उत्सुकतेने त्यांनी आपली धनुष्ये वाकविली आणि आपल्या गोफणी फिरविल्या. सगळ्या जमीनभर शस्त्रांचा सडा पडला. आणि आता ढाली आणि पोकळ शिरस्त्राणे एकमेकांवर आदळून खणखणली आणि ज्याप्रमाणे आर्द्र सारथी (मिथुन) नक्षत्रपुंजाच्या उदयाच्या वेळी पश्चिमेकडील वादळी वर्षा भूमीला झोडपून काढते किंवा दक्षिण वाऱ्याच्या पिसाट काळ्या धुक्यात ज्युपिटर आपल्या वर्षेच्या झंझावाताना गती देतो, आणि आकाशातील मेघकुंभ फोडतो आणि त्यातून उथळ समुद्रांवर गारा कोसळतात त्याप्रमाणे रणकंदन नव्या कडवेपणाने विस्तारले.

ज्युपिटरच्या पवित्र वनात आएरा या वनदेवतेने वाढविलेल्या, त्यांच्या पित्याच्या पर्वतावरील पाईन वृक्षांप्रमाणे अति उंच असलेल्या, इडा येथील अलकॅनॉरच्या पॅन्डॅरस आणि बायटिअस या तरुण योध्दयांनी त्यांच्या सेनानीच्या

आज्ञेवरून त्याच्यावर सोपविलेली वेस उघडली; आणि त्यांच्या स्वतःच्या शस्त्रांवर सर्वस्वी विसबून आणि त्यांच्या स्वत.च्याच इच्छेने, त्यांनी शत्रूला आतल्या संरक्षण फळीत घुसण्याचे आवाहन केले. शस्त्रसज्ज असलेल्या आणि मस्तकावर उंचावर डोलणारे तुरे असलेल्या त्यांनी डाव्या आणि उजव्या बाजूच्या मनोऱ्यासमोर वेशीत आपले ठाण मांडले. पो नदीच्या किंवा रम्य अॅथेसिस नदीच्या किनाऱ्यांवर वाहत्या पात्रांजवळ वरील हवेत एकत्र उंचावणाऱ्या ओक वृक्षांच्या जोडीसारखे ते होते, आणि त्यांची उंच मस्तके डोलत असताना त्यांचे लांब वाढवलेले केस हवेत उंच उडत होते. उघडी वेस पाहून रुटुलिअन आत घुसले. तात्काळ क्यूरसेन्स, चिलखतात देखणा दिसणारा अॅक्विकॉलस, अधिरा तमारस, मार्सचा वीर हिमॉन हे सर्व या सैन्याच्या पुऱ्या तुकड्यांच्या लोंढ्यांपुढे पळून तरी गेले असावेत किंवा त्यांनी त्या वेशीच्या उंबरठ्यावरच आपले देह तरी ठेवले असावेत. यामुळे प्रत्येक हृदयात संघर्षाच्या क्रोधाचा त्वेष भयंकर प्रमाणांत वाढला. ट्रोजन आता एकत्र झाले. आणि धोक्याच्या जागी दाटीवाटीने भिडले, आणि उघड्यावर थेट चाल करून जाऊन तिथे हातघाईच्या लढाईत झुंजण्याचेही धाडस त्यांनी केले.

समराच्या दुसऱ्या क्षेत्रात आपला क्रोध प्रकट करून गोंधळ उडवून देणाऱ्या प्रमुख सेनाधिपती टर्नसकडे संदेश पाठविण्यात आला की नुकत्याच झालेल्या रक्तपातातील यशाने उत्तेजित झालेल्या शत्रूने वेशी खुल्या करून ठेवल्या आहेत. टर्नसने हातातील कार्य तसेच टाकले आणि राक्षसी क्रोधाने प्रवृत्त होऊन जिथे ते उद्दाम बंधू डार्डन वेशीत खडे होते तिकडे तो धावला. त्याच्या मार्गात प्रथम आलेल्या, राजपुत्र सर्पेडॉनपासून थीबन मातेला झालेला अनौरस पुत्र अॅन्टिफेटसला त्याने एका भाल्याच्या फेकीत तात्काळ खाली आणले; इटॅलिअन कॉर्नेल लाकडाचा भाल्याचा दांडा प्रतिरोध न करणाऱ्या हवेतून उडत त्याच्या पोटात शिरला आणि वरपर्यंत त्याच्या छातीत घुसला. त्या जखमेच्या अंधारलेल्या पोकळीतून फेसाळणाऱ्या रक्ताचा पूर लोटला; आणि ते पाते विद्ध झालेल्या फुप्फुसात ऊब घेत राहिले. नंतर टर्नसने मोठ्या जोरदारपणे मेरोपिस आणि इरिमॅस यांचा वध केला आणि नंतर अॅफिड्नसचा आणि बायटिअसचा त्याच्या डोळ्यातील आग आणि गरजणारा उद्दामपणा याला न जुमानता वध केला. परंतु त्याने त्याचा भाल्याने वध केला नाही. कारण भाला फेकीच्या जखमेने बायटिअसने आपला प्राण कधीही जाऊ दिला नसता. परंतु एखाद्या वज्राप्रमाणे मोठ्याने घोंघावत येणाऱ्या, ताकदीने फेकलेल्या बरचीने त्याने त्याचा वध केला होता. बैलाची दोन चामडी आणि सुवर्णाचे दुहेरी कवच असलेले भरवशाचे उरस्त्राणही त्या बरचीला

रोखू शकले नाही. तो धिप्पाड देह कोलमडून खाली कोसळला; धरणी त्या भाराने विव्हळली आणि ती प्रचंड ढाल गडगडाट करीत तिच्या धन्याच्या देहावर पडली. आधीच प्रचंड दगडविटांनी बांधून काढलेला, खडकासारखा भक्कम आधारस्तंभ बेई उपसागरावरील क्यूमी जवळील समुद्रात माणसे जेव्हा लोटतात तेव्हा तो कधी कधीं असाच कोसळतो; कोसळता कोसळता मागे असाच गदारोळ उठवितो, उथळ पाण्यात दाणकन आपटतो आणि तो समुद्राच्या तळाशी विसावताना समुद्र सभोवार बाटोळा उसळतो आणि काळी वाळू ढवळून निघते. त्या धडाक्याने उंच प्रोचिता हादरतो आणि जोव्हच्या आज्ञेवरून टायफिअसवर, त्याला उठता येऊ नये म्हणून, दाबून बसवलेले इनॅरिमी बेटही कापून उठते.

आणि आता मार्सने, युद्धाच्या देवाने, लॅटिनांच्या हिंमतीला अरी लावून आणि ती आरणी पिळवटून त्यांना अधिक धैर्य आणि अधिक सामर्थ्य दिले, आणि ट्रोजनांवर त्याने 'दाणादाण' आणि 'काळी मेघातिरपीट' हे राक्षस सोडले. समराच्या सर्व क्षेत्रातून जिथे झुंजण्याची संधी निर्माण झाली होती तिथे लॅटिन गोळा झाले युद्धदेव त्यांच्या काळजात झडप घालून घुसला. आता पॅन्डॅरसने धरणीवर सपशेल आडवा झालेला आपल्या भावाचा देह पाहिला आणि आपली प्रतिकूल परिस्थिती आणि घटनांना मिळालेले विनाशक वळण ओळखून त्याने आपले रुंद खांदे वेशींच्या द्वाराला रेटे देऊन भिडवले आणि जबरदस्त ताकदीने, बिजागरीचा खांब मागे खेचला आणि आपल्या अंगाच्या जोरावर धाडकन दार मिटवून टाकले असे केल्यामुळे त्याचे बरेच मित्र बाहेर अडकले आणि दारूण युद्धात लोटले गेले; परंतु आपल्याबरोबरच इतर पळून आलेल्या बऱ्याच जणांना रणधुमाळीतून वाचवून आत बंदिस्त केले; परंतु त्याचा हा मूर्खपणाच झाला; कारण त्या माणसांच्या महापुराच्या लोंढ्यामधील खुद्द रुटुलिअन राजा त्याला दिसला नाही आणि त्याने स्वयंस्फूर्त कृतीने असहाय्य खिलारामध्ये जणू एखाद्या विक्राळ वाघाला कोंडावे तसे त्याला त्या छावणीत बंदिस्त केले. उग्र तेजाने डोळ्यापुढे अचानक तळपू लागलेल्या टर्नसच्या भयंकर अवताराने ट्रोजनांना अमानुष भयाने ग्रासले. त्याच्या शस्त्रांचा खणखणाट त्यांना भयभीत करीत होता; त्याच्या शिरस्त्राणातील पिसे रक्तासारख्या लाल रंगाने थरथरत होती, आणि त्याच्या ढालीवरून विजेसारखे किरण चमकून ज्योतीसारखे परावर्तित होत होते. ती तिरस्कृत आकृती, तो राक्षसी देह ओळखून इनीआसच्या माणसांना अचानक धक्का बसला. पण नंतर धिप्पाड पॅन्डॅरस पुढे झेपावला आणि आपल्या भावाच्या मृत्यूमुळे भडकलेल्या क्रोधाने तो उघडच म्हणाला: 'वरदक्षिणेचा भाग

म्हणून तुला नजर केलेला हा ॲमाताचा प्रासाद नाही; आणि आता टर्नसला ज्याने वेढले आहे ते मातृभूमीच्या तटबंदीने सुरक्षित राहिलेले ॲरडिआही नव्हे; नाही! तुझ्यापुढे दिसत आहे ते दृश्य शत्रूची छावणी आहे. इथून निसटून जाण्याची संधी मिळणार नाही. ' टर्नसने त्याच्याकडे पाहून स्मित केले आणि तो प्रसन्नपणे म्हणाला. ' शूराची छाती असेल तर चल, ये पुढे! युद्धास तोंड लागू दे. लवकरच तू प्रायमला सांगायला जाशील की तुला इथे दुसरा ॲकिटीझच भेटला.'

त्याने बोलणे संपविले. पॅन्डॅरसने संपूर्ण ताकद लावली आणि अजूनही दांड्यावर हिरवी साल आणि गाठी असलेला ओबडधोबड, वर पुरा हात न फिरलेला भाला भिरभिरत त्याच्यावर फेकला परंतु वाऱ्याने त्याचा नेम चुकला; कारण सॅटर्नाईन जूनोनें ते वेगाने येणारे अरिष्ट दुसरीकडे वळविले आणि तो भाला वेशीच्या दारांत घुसला. ' मी जसा तुझ्या शस्त्रापासून निसटलो तसा तू माझ्या शस्त्रापासून निसटणार नाहीस. माझा दक्षिण बाहू प्रहार करीत आहे आणि तोही जोराने. आता जो तुझ्यावर घाव घालीत आहे आणि तुला घायाळ करीत आहे तो तुझ्यासारखा नाही.' टर्नस असे म्हणाला आणि त्याने आपले खड्ग उगारले आणि घाव घालण्याकरिता तो उंचावला, त्या पात्याने त्याने त्याचे मस्तक दोन्ही कानशिलांच्या मध्यावर त्याच्या गुळगुळीत कोवळ्या जबड्या पर्यंन्त भेदून एक भयंकर जखम केली. त्या प्रहाराचा मोठा आवाज झाला आणि त्या अतिजड भाराने धरणी थरथरली. मरता मरता पॅन्डॅरस सारे अवयव गोळा होऊन धरणीवर पडला; त्याची शस्त्रे, रक्त आणि मेंन्दूने माखली होती आणि त्याचे दुभंगलेले शिर त्याच्या उजव्या आणि डाव्या खांद्यावर कलंडले. भयभीत होऊन ट्रोजन गडबडीने माघारी फिरून पळ काढू लागले आणि पांगून गेले, आणि त्या वेळी त्या विजेत्याला एका धावात अडसर तोडून त्याच्या साथीदारांना वेशीतून आत घेण्याचा विचार ताबडतोब सुचला असता तर युद्धाचा तो शेवटचा दिवस ठरला असता आणि ट्रोजन राष्ट्राचा अंत झाला असता. परंतु टर्नस भडकलेल्या त्वेषाच्या आहारी गेला होता आणि त्याच्या प्रमत्त, पिसाट रक्त—पिपासेने त्याला आणखी पुढे हल्ला करण्यास प्रवृत्त केले. प्रथम त्याने फॅलॅरिसवर व गायगीसवर अचानक घाला घातला, त्याने गायगीसचा गुडघा मागून कापला. त्याने त्यांच्याकडून त्यांचे भाले हिसकावले आणि पळून जाणाऱ्यांच्या पाठीवर त्यांचा वर्षाव केला. जूनोने त्याला नवी हिंमत आणि नवी शक्ती दिली. त्याने हॅलिसला मृतांच्या भेटीस पाठविले, आणि त्याची ढाल फोडून फिजिअसलाहीं, आणि नंतर तटभिंतीवर मार्सचे कार्य करीत असलेल्या आणि बेसावधपणे गाठल्या

गेलेल्या अलॅक्झॅन्डर, हेलिअस नोअेमॉन आणि प्रायटॅनिस यांचा त्याने वध केला. आपल्या साथीदारांना पुकारीत लिन्सिअस वाट काढीत त्याच्याकडे धावला. टर्नस उजवीकडील बुरुजाकडे एकदम झुकला, आणि थरथरत्या खड्गाच्या घावाने त्यानेच प्रथम आघाडी साधली, आणि अगदी जवळून घातलेल्या एकाच घावाने धडापासून वेगळे केलेले त्याचे शिर त्यावरील शिरस्त्राणासह त्याच्या धडापासून दूर पडले. टर्नसने नंतर, हिंस्त्र श्वापदांची मृगया करणाऱ्या आणि शस्त्रे दूषित करण्यात आणि त्यावर विष चढविण्यात सर्वात अधिक कुशल असलेल्या ॲमिकसचा वध केला. आणि त्याने इओलिड क्लायटिअसचा आणि कलादेवतांचा खुद्द सोबती आणि मित्र असलेल्या, गीते, वीणावाद्ये आणि ताणलेल्या तारांच्या सुरांवर पद्यपंक्ती बसविणे परमप्रिय असलेल्या, नित्य घोड्यांची आणि सशस्त्र योद्ध्यांची, आणि त्यानी मारलेल्या लढायांची कवने गाणाऱ्या क्रिथिअसचा वध केला.

शेवटी ट्रोजन सेनाधिपति नेस्थिअस आणि प्रतापी सेरेस्टस यांनी आपल्या माणसांच्या हत्याकांडाविषयी ऐकले; ते समरस्थळी आले आणि त्यांनी आपल्या साथीदारांची झालेली दाणादाण आणि वेशीच्या आत घुसलेला शत्रू पाहिला. नेस्थिअस ओरडला : 'ट्रोजन बांधवहो, तुमच्या पलायनाने तुम्ही कुठे जाण्याचा प्रयत्न करीत आहात? याशिवाय दुसरी कोणती तटबंदी आणि दुसरी कोणती मजबूत छावणी तुम्हाला मिळण्याजोगी आहे? तुमच्या मातीच्या तटभिंतीच्या आत कोंडलेल्या एका माणसाने तुमच्या नगरीत सर्वत्र हे भयंकर हत्याकांड केले, त्याचा सूड घेणारा त्याला कुणी भेटला नाही, आणि त्याने तुमचे सर्वश्रेष्ठ वीर-पुरुष मृत्यूच्या मुखात लोटले असे म्हटले जावे काय? भ्याडांच्या शरमेबरोबरच यातना सोसणाऱ्या तुमच्या मातृभूमीविषयी तुमच्या प्राचीन देवतांविषयी आणि थोर इनीआसविषयी तुम्हाला करुणा वाटत नाही काय?' या आवाहनाने ट्रोजनांना नवे तेज आणि नवे सामर्थ्य प्राप्त झाले. ते एकत्र झाले आणि त्यांनी त्यांची संघटित फळी तयार केली. पाण्याच्या प्रवाहाच्या दिशेने, नदीकडे सरकत टर्नस हळूहळू लढाईतून मागे हटू लागला. मोठ्याने गर्जत, संघटित हल्ला करण्याकरिता ट्रोजन अधिक नेटाने चालून आले. शिकाऱ्यांच्या टोळीने रोखलेल्या भाल्यांनी गर्दी केल्यामुळे भयभीत आणि क्रुद्ध झालेला हिंस्त्र सिंह जळजळीत डोळ्यांनी मागे हटतो, कारण त्याचा क्रोध आणि त्याचे शौर्य त्याला पाठ फिरवून पळूनही जाऊ देत नाही व ती शस्त्रे आणि ते शिकारी, यांचा, त्याच्या मनात असूनही, तो प्रतिकारही करू शकत नाही, त्या सिंहाप्रमाणे मनात क्रोध उफाळत असूनही टर्नसने अनिच्छेने आणि सावकाश पाऊल मागे

घेतले. असे असूनही खरोखर त्याने पुन: दोन वेळा शत्रूवर अगदी मधोमध चाल केली आणि दोन वेळा शत्रूची दाणादाण उडवून त्याला तटभिंतींकडे सैरावैरा पळवून लावले. परंतु आता एक तुकडी छावणीतून गडबडीने आली आणि एक-जुटीने भिडली. सॅटर्निअन जूनोलाही त्याला नवी शक्ति देण्याचे धैर्य झाले नाही. कारण ज्युपिटरने आकाशातून आयरिसला खाली अशी सक्त आज्ञा आणि ताकीद घेऊन आपल्या बहिणीकडे पाठविले की टर्नस जर ट्रोजनांच्या उंच संरक्षण-भिंतीवरून मागे हटला नाही तर त्याला जड जाईल. प्रत्येक भागातून शस्त्रांचा एवढा प्रचंड वर्षाव होत होता की त्या तरुण योध्दयाच्या ढालीत आणि त्याच्या हातात त्याचे स्वत:चे रक्षण करण्याचीही शक्ती आता उरली नव्हती. सतत चाललेल्या गोंगाटाने त्याच्या थडथड उडणाऱ्या कपाळावरील शिरस्त्राण घुमत होते; दगडांच्या माऱ्याखाली भरीव ब्राँझलाही भेगा पडू लागल्या होत्या; त्याच्या मस्तकावरील तुरे चुरा होऊन दूर फेकले गेले होते. त्याच्या ढालीचा पत्रा घाव पेलू शकत नव्हता; आणि ट्रोजनांनी–त्यांच्यामधे भयंकर गर्जना करणारा नेस्थि-असही होता, भाल्यांचा वर्षाव दुप्पट वाढविला. आणि आता टर्नसच्या सर्वांगाला घाम फुटला आणि तो काळ्या नदीसारखा पसरू लागला; कारण त्याला श्वास आणि उसंत घ्यायलाही संधी मिळत नव्हती; आता तो थकला होता, आणि तो थरथरू लागला व वेदनेने धापा टाकू लागला. त्यानंतरच शेवटी त्याने अंगावरील चिलखतासहित खाली सरळ उभी उडी घेतली आणि तो पाण्यात खोलवर पोचला, आणि तो बुडी मारीत असताना त्या नदीने आपल्या पीत प्रवाहात त्याचे स्वागत केले, आणि ती त्याला आपल्या लाटांवरून हळुवारपणे घेऊन गेली. तिने त्याचे रक्त धुवून टाकले आणि ती त्याला सुखाने त्याच्या साथीदारांकडे परत घेऊन गेली.

## सर्ग दहावा

# – उसंत आणि घनघोर युद्ध –

**त्या**च सुमारास सर्वसत्ताधीशाचे अधिष्ठान असलेल्या ऑलिम्पसचे प्रवेशद्वार सताड उघडले गेले आणि जो देवपिता आणि माणसांचा राजाधिराज आहे त्याने, जिथून तो वरचेवर खालच्या भूलोकावर, डार्डनांच्या छावणीकडे आणि लॅशिअॅमच्या लोकांकडे दृष्टीक्षेप टाकीत असे, त्या उच्च तारकांगणाच्या प्रासादात देवसभा बोलाविली होती. दोन प्रवेशद्वारे असलेल्या दालनात देव आपल्या आसनावर स्थानापन्न झाले होते. ज्युपिटरने स्वतःच बोलण्यास आरंभ केला : 'हे स्वर्गस्थ दिव्य देवांनो तुमचा निर्णय का फिरविण्यात आला? परस्परविरोधी संकल्पांच्या तीव्र संघर्षात तुम्ही का गुंतले आहात? युद्धाच्या लढतीत इटॅलिअनांना ट्रोजनांशी सामना करण्यास मी अनुमती दिलेली नाही. माझ्या या प्रतिबंधाविरुद्ध हा उठाव का? शस्त्र संघर्षाचा हा मार्ग अवलंबिण्यास आणि असिधारेस चेतविण्यास दोन्ही पक्षांना कोणत्या भयाने उद्युक्त केले आहे? युद्धाचा योग्य समय येईल; तो ओढवून घेण्याची घाई करू नका. ज्या दिवशी क्रुद्ध कार्थेज आल्प्स्मधून मार्ग फोडून काढील आणि रोमच्या किल्लेकोटांवर भयंकर हलकल्लोळ उठवतील तोच युद्धसमय असेल. त्यावेळी बळाचा विधीसंमत वापर करून द्वेषांच्या स्पर्धेत परस्परांशी बरोबरी करण्याचे स्वातंत्र्य तुम्हाला मिळेल. परंतु आता हे सोडून द्या; आणि मी नियोजित केलेला संधी सिद्ध करण्यास मला आनंदाने सहाय्य करा.'

ज्युपिटर असे परिमित बोलला. परंतु सुवर्णा व्हीनसचे उत्तर असे परिमित नव्हते : "हे पित्या, हे सर्व मानववंशावरील आणि अखिल भूतलावरील अनंत अधिसत्ताधीशा! आम्ही विनवणी करू शकू अशी आता दुसरी शक्ती उपलब्ध नाही. रुटुलिअन कसे उद्दामपणे विजयी होत आलेत आणि मार्सने केलेल्या कृपेमुळे गर्वाने फुगून टर्नस कसा दिमाखाने आपले आक्रमक घोडे आमच्या ट्रोजन सेनेच्या

थेट मधून पिटाळीत आहे हे तुम्ही पहाताच आहात. ट्रोजनांची स्वत:ची तटबंदी त्यांचे रक्षण करण्यास आता बंदिस्त राहिलेली नाही, कारण त्यांचा शत्रू युद्धाच्या रणधुमाळीत खुद्द त्यांच्या वेशीच्या आत मातीच्या भिंतींच्या बाजूंनी लढत आहे. व लढून खंदक रक्तांच्या पुराने ओसंडून जात आहेत. इनीआसला यातले काहीच माहीत नाही कारण तो दूर आहे त्यांना वेढ्यापासून तुम्ही कधीच उसंत मिळू देणार नाही का? ट्रॉयचा पुनर्जन्म होत असतानाच आणखी एक शत्रू आणि आणखी एक विद्वेष्टी सेना ट्रॉयच्या तटबंदीला पुन: धमकावीत आहे; आता इटोलिअन आर्पिकडून येत असलेला डायोपिड आता दुसऱ्यांदा ट्रोजनांच्या विरूद्ध चाल करून येत आहे. माझ्यापुरते म्हणायचे तर मला असे वाटते की पुन: मी युद्धात जखमी होणार आहे, आणि आता, या क्षणी मी, प्रत्यक्ष तुमची कन्या मी बोलत असतानाही एकाद्या मर्त्य योद्ध्याला माझ्याकरिता तिष्ठत ठेवले आहे. तुमच्या संमतीशिवाय आणि तुमच्या दैवी इच्छेविरूद्ध ट्रोजन जर इटलीकडे वळले असले तर त्यांच्या अपराधाचे त्यांना प्रायश्चित मिळू दे, आणि तुम्हीही तुमच्या सहाय्याने त्यांना उचलून धरणे बंद करावे. परंतु जर त्यांना खरेच स्वर्गस्थ देवांच्या आणि पाताळलोकीच्या अधिष्ठात्यांच्या भाषिताने येथवर आणले असेल तर तुमची अनुज्ञा रद्द करण्याचे सामर्थ्य कुणालाही का असावे? आणि त्यांच्याकरिता सर्वस्वी वेगळी अशी नियती कुणी का कार्यान्वित करावी? त्यांचे आरमार इरिक्सच्या किनाऱ्यावर अग्नीने कसे जळले, वादळांच्या राजाने त्याच्या झंझावाती वाऱ्यांना इओलिआ मधून कसे उठविले, किंवा आयरिसला मेघांतून द्रुत गतीने संचार करून पृथ्वीवर कसे पाठविले या सर्वांचे स्मरण करण्याची मला खचित गरज नसावी. विश्वनिर्मितीतील ज्या अंशाचा पूर्वी कधीही ज्यूनोने उपयोग केला नव्हता, ती राक्षसयोनीही आता तिने आपल्या कामाला जुंपली आहे; आणि वरच्या लोकात अचानक मोकाट सोडलेल्या अॅलेक्टोने इतस्तत: संचार करून आताच इटलीच्या नगरातून हाहाकार उडविला आहे. जोवर दैवाची आम्हाला साथ होती तोवर आमचे आशास्थान असलेल्या राज्यात आता मला स्वारस्य उरलेले नाही; आता तुम्ही निवडलेला कोणताही पक्ष विजयी होऊ दे. तुमच्या निर्दय राज्ञीला संमत असलेली ट्रोजनांना प्राप्त व्हावी अशी कोणतीही भूमी कुठेही अस्तित्वात राहिली नसेल तर, बाबा उध्वस्त झालेल्या ट्रॉयच्या धुमसत्या भग्नावशेषांची शपथ घालून विनंती करते की अॅस्कॅनिअसला रणधुमाळीतून सुरक्षितरित्या काढून घेण्याची मला अनुमती द्या. माझा नातू जगू द्या. इनीआसला अज्ञात सागरांच्या वादळी लाटांवर खुशाल भरकटू द्या, आणि

दैवाने दाखविलेल्या कोणत्याही मार्गाने त्याला जाऊ द्या. ॲस्कॅनिअसचे रक्षण करून त्याला समराच्या भयानक खाईतून उचलून घेऊन जाण्याला पुरेल एवढे सामर्थ्य मला असू द्या. ॲमॅथस, सिथेरा आणि पॅफॉसचा पर्वतमय प्रदेश माझा आहे, आणि इडॅलिअम येथे माझे मंदिर आहे. यापैकी एखाद्या ठिकाणी शस्त्रे बाजूस ठेवून त्याला त्याचे अनामिक जीवन जगू द्या. चिरडून टाकलेला इटली कार्थेजच्या पोलादी सत्तेखाली राहिला पाहिजे अशी आज्ञा करा. तसे असेल तर कोणत्याही टायरिअन नगरीच्या मार्गांत ॲस्कॅनिअस अडथळे आणणार नाही. ट्रॉयचा दुर्ग पुनः बांधण्याकरिता ट्रोजन लॅशिअमच्या शोधात असताना, त्यांच्या–बरोबर राहून युद्धाच्या शापापासून निसटण्यात, आर्गाईव्हच्या अग्नीप्रलयांतून सुरक्षितपणे पळ काढण्यात आणि सागरावरील आणि विशाल भूमीप्रदेशांवरील प्रत्येक संकटाला तोंड देण्यात त्यांचा कोणता फायदा होता! ज्या भूमीवर पूर्वी ट्रॉय उभे होते तिथल्या घरांच्या उरल्या सुरल्या अवशेषांवर, त्या धुमसत्या काष्ठांवरच राहणे अधिक चांगले झाले नसते का? बाबा, मी भीक मागते तुमच्यापाशी, ट्रोजनांनी जर यातनाच भोगायच्या असल्या तर त्यांची झान्थस आणि त्यांची सिमॉईस त्यांना परत द्या, आणि ट्रॉयच्या दुर्दैवाच्या सर्व चक्रातून त्यांना आणखी एकदा पुरे फिरण्याची अनुमती द्या.

नंतर राजराज्ञी जूनो आपल्या पिसाट द्वेषाने उत्तेजित होऊन ताडकन बोलली " तू मला माझे संयमाने पाळलेले मौन भंग करण्यास का भाग पाडीत आहेस आणि माझी अंतर्हित कटुता माझ्या बोलण्यातून मला प्रकट करायला कां लावते आहेस? युद्धाचा मार्ग निवडण्याची आणि राजा लॅटिनसवर निष्कारण हल्ला करण्याची जबरदस्ती कुणी माणसाने किंवा देवाने इनीआसवर केली होती काय? तुम्ही म्हणता " नियती देवतांनी त्याला इटलीकडे प्रयाण करण्यास प्रवृत्त केले " छे हो; कॅसॅन्ड्राच्या बरळण्यामुळे तो या भरीस पडला. आपली वसती सोडून आपले प्राण वाऱ्यावादळाच्या हवाली करण्यास मी थोडेच सांगितले त्याला? किंवा युद्धाच्या सर्वोच्च मार्गदर्शनाची आणि त्याच्या तटभिंतीच्या रक्षणाची जबाबदारी एका पोराच्या हाती सोपविण्याचा आग्रह त्याला मी केला होता काय? किंवा इट्रुस्कन निष्ठा आणि राष्ट्रांतील शांतता याचा भंग करण्याचा आग्रह मी केला होता? आमच्या बाजूच्या कोणत्या देवाने, कोणत्या निर्दय शक्तीने अन्याय करण्याची त्याच्यावर सक्ती केली होती? यापैकी कोणते कृत्य जूनोने किंवा मेघातून उतरून आयरिसने पार पाडले? तुम्ही म्हणता, " इटॅलिअनांनी नवजात ट्रॉयला आगीचा वेढा घातला आणि पिल्यूम्नस ज्याचा पूर्वज आणि देवता

व्हेनिलिआ ज्याची माता आहे त्या टर्नसने त्याच्या स्वतःच्या मातृभूमीवर प्रबळ आघाडी उभी केली हा अत्याचार आहे." मग ट्रोजन जेव्हा काळे जळते पलिते घेऊन लॅटिनांवर क्रूर हल्ला करतात, आणि त्यांची स्वतःची नसलेल्या कृषी-भूमीवर बळजबरीने ठाम कबजा करतात, आणि तिची लूट करतात, मनाला येईल त्या कुणाच्याही मुलींची विवाहाकरिता निवड करतात, आणि वाग्दत्त वधूंना भ्रष्ट करून त्यांच्या प्रियकरापासून हिरावतात–हा काय प्रकार आहे? हात पसरून ते शांततेची याचना करतात आणि गलबतांच्या वरामांवरून लटकवलेली शस्त्रे मिरवतात! ग्रीकांच्या डोळ्यांपुढे तरंगत्या धुक्याचे ढग तुझ्या प्रिय वीर पुरुषाच्या जागी निर्माण करून इनीआसला ग्रीकांच्या पकडीतून पळविण्यासाठी आणि त्यांच्या जहाजांचे सरसकट समुद्रपऱ्यांत रूपांतर करण्यासाठी आपले सामर्थ्य वापरण्याची परवानगी तुला मात्र आहे! आणि मग मी रुटुलिअनांना उत्तरास प्रत्युत्तर म्हणून किंचित सहाय्य केले तर ते मात्र अमानुष ठरते का? तू म्हणशील, "इनीआसला यातील काहीच माहीत नाही कारण तो दूर आहे." दूर आहे तर तो दूरच राहू दे. आणि त्याला काही माहीत पण नसू दे. "पॅफॉस, इडॅलिअम, आणि सिथेराचा पर्वतमय प्रदेश म्हणे तुझ्या मालकीचा!" तर मग लढाऊ सामर्थ्याने ठासून भरलेल्या आणि जिथे भावना प्रक्षुब्ध झालेल्या आहेत, अशा नगरीच्या वाटेस का जातेस? आधीपासूनच नाही तरी डबघाईस आलेल्या तुझ्या फ्रिजिअन वैभवाची पाळेमुळे उखडून टाकण्याचा प्रयत्न काय, मी करीत होते? अभागी ट्रोजनांना ग्रीकांच्या मार्गांत भिरकावले ते मी का त्या दुसऱ्या कोणी? युरोप आणि आशिआ यांनी विश्वासघाताच्या कृत्याने शांततेच्या करा-राचा भंग केला आणि सशस्त्र उठाव केला त्याचे कारण काय होते? व्यभिचारी डार्डन स्पार्टामधे घुसला त्यावेळी त्याला वाट मी दाखविली काय? की मी त्याला शस्त्रे पुरविली आणि युद्ध भडकविण्याकरिता लालसेचा उपयोग केला? तुझ्या लोकांविषयी चिंता करण्याची तीच योग्य वेळ होती. तुझ्या असत्य निषेधांनी आणि अर्थहीन शिव्याशापांच्या माऱ्याने मला आव्हान करणे हे तू आता फार उशिरा–वेळ निघून गेल्यावर करीत आहेस." जूनोचे वक्तव्य असे होते. ज्याप्रमाणे अरण्यात गुरफटलेल्या वादळाचे पहिले कुजबुजणारे निश्वास, जरी काहीही हाल-चाल दिसत नसली तरी खलाशांना लवकरच येणाऱ्या झंझावातांची पूर्वसूचना देतात त्याप्रमाणे सर्व स्वर्गस्थ देवांनी कुजबुजून एका किंवा दुसऱ्या वक्त्याशी आपले सहमत व्यक्त केले.

परंतु नंतर ज्याची भूलोकावर आदिसत्ता आहे, तो सर्वशक्तिमान पिता बोलू लागला, आणि तो बोलत असताना तो देवसभेचा उंच महाल शांत झाला. खोल

खाली, पृथ्वी थरथरू लागली, उंच आकाश निःशब्द होते, पश्चिम वाराही पडला, आणि सागराने आपला पृष्ठभाग स्थिर केला : "ठीक आहे. मग माझ्या शब्दांचा तुमच्या अंतःकरणात स्वीकार करा आणि ते तिथे बिंबवून ठेवा. ऑसोनिअनांनी संधी करून ट्रोजनांना सामील होणे तुम्हाला संमत नाही हे ज्या अर्थी सिद्ध झाले आहे आणि आज माणसे व्यक्तिशः कोणतेही दैवभोग भोगीत असली, आणि त्यांच्या पैकी प्रत्येकजण आशेची कुठली तरी वाट शोधून काढीत असला तरी ज्याअर्थी तुमच्यातील कलहाचा अंत होत नाही, त्याअर्थी ते ट्रोजन असोत किंवा रुटुलिअन असोत, मी त्यांच्यात भेदभाव करणार नाही; मग इटॅलिअनांच्या दैवगतीने ट्रोजनांच्या वसाहतीला वेढा पडलेला असो किंवा दुष्ट भविष्यभाकितांमुळे भ्रमंतीचा शाप ट्रोजनांच्या नशीबी आलेला असो, शिवाय मी रुटुलिअनांनाही दोषमुक्त ठरवीत नाही प्रत्येक माणसाला त्याने स्वेच्छेने केलेल्या कर्मानुसार यातना किंवा सुभाग्य दोन्ही प्राप्त होईल ज्युपिटर सर्वांवर सारख्याच निःपक्ष-पातीपणे राज्य करतो. नियतीदेवता आपला मार्ग निश्चित करतील." आणि मान झुकवून आपले भाष्य वज्रलेप करण्याकरिता आपल्या स्टिजिअन बंधूच्या नद्यांची आणि त्यांच्या होरपळवणाऱ्या काळाकुट्ट किनाऱ्यांची व त्यांच्यामधे असलेल्या काळ्या विवराची ज्युपिटरने ग्वाही दिली. आणि आपल्या मानेच्या डोलविण्या-बरोबर त्याने सर्व ऑलिम्पस हादरविले. त्याच्या भाषणाचा हा शेवट होता. नंतर ज्युपिटर त्याच्या सुवर्णाच्या सिंहासनावरून उठला, आणि स्वर्गस्थ देव त्याच्या-भोवती जमले आणि त्याला त्या महालाच्या उंबऱ्यापर्यन्त घेऊन गेले.

त्याच सुमारास रुटुलिअन शत्रूचे रक्त वहावण्याच्या आणि त्याला हतबल करण्याच्या, आणि त्यांच्या तटभिंतींना आगीचा विळखा घालण्याच्या उद्देशाने प्रत्येक वेशीजवळ निकराने भिडले. दुसऱ्या बाजूकडे सुटकेची आशा नसलेली इनीआसच्या माणसांची सर्व सेना वेढली गेली होती व त्यांच्या तटबंदीत कोंडली गेली होती. रक्षकांचे विरळ कडे करून भिंतीचे रक्षण करण्याकरिता दीनवाणे, असाहाय्य ट्रोजन त्यांच्या उंच मनोऱ्यांवर उभे होते. आघाडीवर इम्ब्रॅसचा पुत्र ऑसिअस आणि हायसेटॉनचा पुत्र थायमीटीझ होते, आणि दोघे, ज्यांची नावे अॅसॅरॅकस आणि थायम्ब्रीस अशी होती ते पण होते. थायम्ब्रीस वयोवृद्ध होता, आणि त्याच्याजवळ कॅस्टर होता; त्यांच्याबरोबर स्वाभिमानी लिसिआहून आलेले सर्पिडॉनचे दोन भाऊ, क्लॅरस आणि थिमॉन हे होते. लार्यनिससचा अॅकमॉन हा एक प्रचंड शिलाखंड, कड्याचा एक प्रचंड तुकडा, आपली सर्व शक्ती लावून, घेऊन चालला होता, कारण तो त्याचा पिता क्लायटिअस किंवा त्याचा भाऊ

म्नेस्थिअस यांच्याहून कमी प्रतापी नव्हता. अशा तऱ्हेने त्यांनी शत्रूला हटविण्याचा प्रयत्न केला. काही भाल्यांचा उपयोग करीत होते तर काही दगडांचा; काही पेटते पलिते फेकीत होते किंवा प्रत्यंचेला बाण लावीत होते.

आणि तो पहा! त्यांच्या अगदी मधोमध व्हीनसच्या विशेष प्रेमास खचित पात्र असलेला खुद्द डार्डन तरुण राजपुत्र होता. त्याचे डौलदार मस्तक अनावृत होते आणि तो गळयात किंवा मस्तकावर धारण करण्याच्या अलंकारातील काळसर सुवर्णात जडविलेल्या रत्नाप्रमाणे, किंवा बॉक्सवुडच्या काष्ठात किंवा ऑरिकमच्या टर्पेन्टाईनच्या काष्ठात कसबाने बसविलेल्या चकचकीत हस्तीदंताप्रमाणे चमकत होता; त्याचे केस लवचिक सुवर्णांच्या वाटोळया चापाने एकत्र घट्ट बसवले होते, आणि तिथून ते त्याच्या दुधासारख्या धवल मानेवर खाली रुळत होते. आणि तिथेच त्या स्वाभिमानी ट्रोजनांच्या तांड्यासमोर आणखी एक, जिथे बलवान पुरुष सकस कृषीभूमीत कष्ट करतात आणि पॅक्टोलस ती भूमी सुवर्णजलाने भिजविते त्या लिडिआतील थोर कुलातील एक वंशज इस्मॅरस शत्रूला घायाळ करण्याकरिता वेळूच्या विषारी बाणाने वेध घेत होता. टर्नसला मातीच्या तट-भिंतींवरून हुसकावून लावताना त्याने केलेल्या पूर्वीच्या प्रतापाने प्राप्त झालेल्या कीर्तीने उच्चपद मिळवलेला म्नेस्थिअसही तिथे होता; आणि ज्याच्या नावावरून कॅम्पॅनिअन नगरीला तिचे नाव प्राप्त झाले तो कॅपिसही होता.

अशा तऱ्हेने दोन्ही सैन्ये निकराच्या संघर्षात परस्परांना भिडून झुंजली; त्याचवेळी इनीआस मध्यरात्रीच्या समयी सागराचे प्रवाह कापीत चालला होता. इव्हॅन्डर सोडल्यानंतर त्याने इट्रुस्कन छावणीत प्रवेश केला होता. आणि तो राजाला भेटला होता. नंतर त्याने त्याला आपले नाव आणि कुल सांगितले होते, आणि त्याच्या स्वतःच्या गरजा आणि साधनसामग्री विषयीच्या राजाच्या प्रश्नाची योग्य उत्तरे दिली; मेझेन्टिअसच्या वर्तनामुळे त्यांच्या बाजूस केवढी मोठी सेना जाऊन मिळाली होती, व टर्नसची वृत्ती किती निष्ठुर आणि हिंस्त्र होती याचा त्याने खुलासा केला; मनुष्यबळावर किती मर्यादितपणे अवलंबून राहता येते याचे-सुद्धा त्याने राजाला स्मरण करून दिले, आणि नंतर त्याने आपली विनंती सादर केली तिथे मुळीच दिरंगाई झाली नाही. टारकॉनने त्याच्याशी करार केला आणि त्याला मदतीस आपले सैन्यबळ दिले. लिडिआच्या राष्ट्राने आपले नियतीचे ऋण आता असे फेडले. दैवी आज्ञेनुसार त्यांनी स्वतःला 'एका परकीय नेत्याच्या' हाती सोपविले, आणि शेवटी ते आपल्या आरमारावर चढले इनीआसचे गलबत रांगांत

सर्वांत पुढे होते; त्याच्या नाळीच्या चोचीवर, गृहहीन झालेल्या ट्रोजनांना प्रिय असलेले दृश्य,–फ्रिजिअन सिंहाची जोडी आणि उंचावरून त्यांच्यावर डोकावणारा इडा पर्वत–कोरलेले होते नाळीवर स्वतः धीरोदात्त इनीआस युद्धातील विविध संभाव्य घटनांचा विचार करीत बसला होता. त्याच्या जवळच डाव्या बाजूला पॅलस, कधी रात्रीच्या अंधारात त्यांचे मार्गदर्शन करणाऱ्या तारकांविषयी तर कधी इनीआसच्या सागरावरील आणि भूमीवरील साहसांविषयी प्रश्न विचारीत बसला होता.

हे काव्य–देवतांनो, हेलिकॉन–स्फूर्तीचे उगमस्थ न खुले करा आणि इनीआसच्या मागून इट्रुस्कन किनाऱ्यांवरून आपल्या गलबतांवर माणसे चढवून, सागरावर संचार करीत जी सेना येली तिचे वर्णन करण्यास मला स्फूर्ती द्या.

मॅसिकस हा त्यांपैकी पहिला कप्तान होता आणि त्याचे 'व्याघ्री' हे ब्राँझच्या पत्र्याने मढविलेले गलबत सागराचा पृष्ठभाग भेदीत जात होते. त्याच्या आधिपत्याखाली क्लुसिअमच्या तटबंदीकडून आणि कोसी नगरीकडून कूच करीत पुढे आलेले एक सहस्त्र तरुण योद्धे गलबतांतून सागरपर्यटन करीत होते; त्यांची शस्त्रे, मृत्यूशी गाठ घालणारी धनुष्ये आणि खांद्यावर लटकविलेल्या हलक्या भात्यातील बाण ही होती. मॅसिकसबरोबर उग्र आबास होता; त्याच्या सेनेमध्ये सर्वांकडे उत्तम शस्त्रे होती, आणि त्याच्या गलबताची नाळ ॲपोलोच्या सुवर्ण प्रतिमेने झगमगत होती. पॉप्युलोनिआ या त्याच्या मातृनगरीने युद्धाचा अनुभव असलेले आपले सहाशे पुत्र,–तरुण योद्धे,–त्याला दिले होते, आणि शॅलिबिअन लोहाचा अखंड साठा असलेल्या खाणींनी समृद्ध असलेल्या इल्व्हा बेटाने आणखी तीनशे पाठविले होते. महाप्रभावी द्रष्टा आणि देव आणि मानव यांच्यामधे मध्यस्थी करणारा, आणि पशूच्या अंतरिन्द्रियांची, आकाशातील तारकांची, पक्ष्यांच्या शब्दांची, आणि भविष्यसूचक विद्युत प्रकाशाची अंतर्भूत रहस्ये जाणणारा ॲसिलॅस त्या रांगेत तिसरा होता. आपल्या सहस्त्र योद्ध्यांना तो गडबडीने पुढे नेत होता; खांद्याला खांदा लावून खड्या असलेल्या सेनेत त्याचे भाले ठाम उभारलेले होते. ॲल्फिअस नदीकिनाऱ्यावरील ग्रीक नगरी पिसीने इट्रुस्कन भूमीवर पिसापासून प्रस्थापित झालेल्या नगरीने–त्यांना त्याच्या आधिपत्याखाली ठेवले होते. आपल्या घोड्यावर आणि आपल्या इन्द्रधनुष्याच्या रंगांनी चमकणाऱ्या चिलखतावर अत्यंत भरवसा असलेला देखणा ॲस्टायर त्याच्यामागून आला. एकदिलाने युद्धात सामील झालेले आणखी तीनशे योद्धे केरीच्या प्रदेशातील लोकांनी पाठविलेले, आणि मिनिओच्या

कृषीभूमीतून आणि प्राचीन पायर्जि आणि रोगट ग्रॅव्हिस्किहून आले होते. हे लिग्युरिअनांच्या शूर युद्धनेत्या क्युनॅरस, तुझा उल्लेख टाळणारा मी नाही. आणि जरी तुझे अनुयायी अल्पसंख्य होते तरी क्युपॅवो, तुझाही नाही. ज्याचे क्युपिड आणि त्याची माता यांना लांछन आहे त्या तुझ्या पित्याच्या रूपांतराचे प्रतीक असलेली हंसाची पिसे तुमच्या शिरस्त्राणातून उंचावली होती. अशी कथा सांगतात की आपल्या प्रियतम फिथॉनच्या विरह–दुःखात सायक्नस आपल्या प्रीतीचा शोकांत संगीताने हलका करीत, एकेकाळी फिथॉनच्या बहिणी असलेल्या पॉप्लरच्या पर्ण–राशीतून आणि त्यांच्या छायेतून गीते गात फिरत असता त्याने वार्धक्याचे शुभ्र केस अंगावर न ओढता मृदुल शुभ्रपिसे धारण केली आणि हा लोक सोडला आणि गात गात तारकांच्या मागून गेला. त्याचा पुत्र क्युपॅवो, आता गलबतावर जमलेल्या स्वतःच्या पिढीतील माणसांबरोबर आपले प्रचंड गलबत 'सेन्टॉर' वल्ह्यानी पुढे रेटीत समुद्र संचार करीत होता; त्याचे गलबत पाण्यावर झेपावत होते आणि त्याच्या गलबताच्या नाळीच्या चोचीवर लाटांना भयभीत करणारा एक भयावह कातळ होता आणि त्याचा लांबलचक साठा खोल सागरात चर कापीत चालला होता.

आपल्या मातृभूमीच्या सीमा प्रदेशातून उभी केलेल्या तुकडीसहित आलेला दुसरा एक, ऑक्नस होता तो भविष्यवेत्ता मॅन्टो आणि इट्रुस्कन नदीचा पुत्र होता त्याने मान्टुआ नगरीला आपल्या आईचे नाव आणि तटबंदी दिली मान्टुआ एकाच कुलातील नसलेल्या अशा अनेक पूर्वजांनी समृद्ध आहे. तिथे तीन वंश नांदत आले आहेत. आणि प्रत्येक वंशात चार जमाती आहेत. मान्टुआचा, आपली राजधानी, म्हणून त्यांनी स्विकार केला आहे. परंतु तिचे सामर्थ्य मात्र तिला इट्रुस्कन वंशातूनच प्राप्त झाले आहे. मेझेन्टिअसने स्वतः विरुद्ध शस्त्रसंघर्षात उठविलेले आणखी पाचशे योद्धे त्याच प्रदेशांतून आलेले होते, आणि करडया वेळूंनी आच्छादिलेली, बेनॅकस सरोवराचा पुत्र मिन्सिअस नदाची आकृती त्यांना त्यांच्या पाईनच्या लाकडाच्या लढाऊ गलबतातून पुढे खुल्या रुंद समुद्रात नेत होती. झाडांच्या खोडांच्या शंभर वल्ह्यांच्या तडाख्यांबरोबर वर उसळत, आणि लाटांना झोडपीत आणि जिथे समुद्राचा पृष्ठभाग ढवळून निघत होता तिथे जलमार्ग फेसाळीत ऑलिस्टिस अवजडपणे सरकत होता. त्याला घेऊन जाणारे अजस्त्र गलबत 'ट्रायटन' होते. त्याची प्रतिमा त्यांच्या शंखाच्या शिंगाने निळया लाटांना भयभीत करीत होती. तो पोहत असताना त्याच्या कुशीपर्यन्तचा केसाळ पूर्वभाग मानवी दिसे परंतु त्याच्या उदराचा शेवट समुद्रातील राक्षसी प्राण्यासारखा होता

या संकरित राक्षसाच्या छातीखाली सागराचे पाणी कुजबुजत होते, फेसाळत होते.

आपल्या ब्रॉंझ नाळीनी क्षार सागराचा सपाट पृष्ठभाग भेदणाऱ्या तीस गलबतांतून सागरी प्रवास करणाऱ्या निवडक प्रमुखांची यादी ही अशी आहे.

दिवस आता आकाशातून परतला होता; आणि दयाघन फीबी आपल्या निशासंचार करणाऱ्या चमूसह मध्य ऑलिम्पसवर विहरत होती. परंतु इनीआसच्या गात्रांना चिंतेने विश्रांती मिळू दिली नाही, म्हणून तो स्वत: जातीने गलबत हाकारीत आणि शिडांकडे लक्ष ठेवीत सुकाणूवर बसला होता. तो काय! त्याच वेळी अचानक, मार्गाच्या मध्यावर त्याच्या खुद्द मित्रांचा एक समूह त्याला भेटला त्या जीवनदायी सायबेलीने, सागरावर देवतांसम अधिकार गाजवण्याची आज्ञा दिलेल्या, आणि तत्पूर्वी समुद्रकिनाऱ्यावर विसावलेला ब्रॉंझच्या पत्र्याने मढविलेली गलबते असणाऱ्या व नंतर रूपांतर झालेल्या समुद्रपऱ्या होत्या; आणि आता त्या लाटा कापीत त्याच्याबरोबर पोहत होत्या. फार दूरवरून त्यांनी आपल्या राजाला ओळखले होते; आणि त्याला जणू अभिवादन करण्याकरिता त्यांनी त्याच्याभोवती नृत्याचा फेर धरला होता. त्यांच्यामधे वाणीवर सर्वात अधिक प्रभुत्व असलेली सायमोडोसी त्याच्या मागोमाग जात होती. आपली सर्व पाठ समुद्राच्या पृष्ठावर उंचावून तिने उजव्या हाताने त्याच्या गलबताची नाळ पकडली आणि आवाज न करता डाव्या हाताने खालच्या पाण्यात पोहत राहिली. नतर तो अजूनही गोंधळलेल्या अवस्थेत असताना, ती त्याच्याशी बोलली. ' हे देवांश इनीआस, तू जागा आहेस का? तर मग ऊठ, तुझी शिडे सैल सोड आणि ती वाऱ्याने भरू देत. आम्हीं तुझे आरमार आहोत, आम्ही पूर्वी इडाच्या पवित्र शिखरावरील पाईन वृक्ष होतो, आणि आता सागरपऱ्या आहोत. जेव्हा शस्त्रबलाने आणि अग्नीने तो कपटी रुटुलिअन आम्हाला सैरावैरा हुसकावून लावणार होता तेव्हा आम्ही आमच्या मनाविरुद्ध तुझे नांगर तोडले; आणि तेव्हापासून आम्ही सागरावर तुझा शोध करीत आहोत. आमची दया येऊन मातेने आम्हाला हे रूप दिले; आम्ही देवता होऊन सर्व जीवनभर सागरतळाशी राहावे असे आम्हाला तिने वरदान दिले आहे. परंतु आता तुझा पुत्र ॲस्कॅनिअस याला तटभितीत आणि खंदकात वेढा पडला असून युद्धाच्या इर्षेने तटाटलेल्या लॅटिनांच्या वेढ्यात त्याच्यावर शस्त्रांचा वर्षाव झडत आहे. आताच काही आर्केडिअन घोडेस्वार, आणि त्यांच्यामध्ये काही शूर इट्रुस्कन, युद्धाकरिता सज्ज होऊन खडे आहेत. परंतु ते ट्रोजन छावणीत जाऊन मिळण्यापूर्वीच त्यांच्याशी आपल्या मुख्य तुकड्यांनी थेट समोरासमोर

भिडण्याचा टर्नसचा निश्चित हेतू आहे. म्हणून चल, उठ. पहाट होताच युद्धाकरिता सिद्ध राहण्याची तू तुझ्या साथीदारांना आज्ञा करायला हवीस, आणि तू स्वतः तुझी सुवर्णाची वर्तुळाकार कडा असलेली, अग्नीपती देवाने तुला दिलेली अजिंक्य ढाल हाती घ्यायला हवीस; माझ्या संदेशातील सत्यतेवर तुझा विश्वास असेल तर उद्याच्या पहाटला मृत रुट्लिअनांच्या प्रचंड राशी दिसतील.' तिने बोलणे संपविले आणि कोणती शक्ति उपयोजिली पाहिजे हे माहित असल्यामुळे तिने जाता जाता ती उंच नाळ आपल्या हाताच्या धक्क्याने जोराने पुढे लोटली. आणि ते गलबत एखाद्या भाल्याहूनही जास्त द्रुतगतीने, वाऱ्याच्या वेगाने जाणाऱ्या बाणाहूनही अधिक जलद गतीने लाटांवरून पुढे झेपावले, आणि त्याच्यामागून इतर गलबतेही आपला मार्ग शीघ्रगतीने आक्रमू लागली.

अँकायसीसचा पुत्र, ट्रॉयचा पुरुषश्रेष्ठ कुंठित, आश्चर्यचकित झाला होता; परंतु त्याला झालेल्या दृष्टांताच्या आदेशानुसार त्याने आपल्या मनी हिंमत धरली आणि नंतर वर आकाशाच्या घुमटाकडे पाहून त्याने एक छोटी प्रार्थना केली; "इडा येथील माते, देवमाते, जीवनदायिनी, डिन्डायमावर आणि मनोरे असलेल्या नगरीवर, आणि एका जोखडाला जुंपलेल्या, लगाम लावलेल्या सिंहांच्या जोडीवर प्रेम करणाऱ्या, माया करणाऱ्या माते, युद्धामध्ये आता तू माझी स्वर्गीय मार्गदर्शक आहेस; तू या भविष्यवचनाची यथोचित पूर्तता कर, आणि तुझ्या कृपायुक्तचरणांनी तू ट्रोजनांच्या बाजूला उभी रहा." त्याने उत्कटतेने केलेली प्रार्थना ही अशी होती त्या सुमारास दिवसाने अंधार उधळून लावला होता आणि द्रुतगतीने भ्रमण करीत पूर्ण प्रकाशाने तो परतला होता. त्याने पहिल्या प्रथम आपल्या साथीदारांना त्यांच्या ध्वजामागे कूच करण्याकरिता, त्यांच्या वृत्ती युद्धानुवर्ती करण्याकरिता आणि युद्धाकरिता सिद्ध होण्याकरिता आज्ञा केली. आणि आता त्याच्या गलबताच्या पुढच्या धक्क्यावर उभे राहून इनीआस आपली छावणी आणि आपले ट्रोजन पाहू शकत होता; आणि तात्काळ त्याने आपली चमकती ढाल आपल्या डाव्या हाताने उंचविली. त्यांच्या तटभिंतीवरून डार्डनांनी केलेला जयघोष आकाशात दुमदुमला. आशेच्या या नव्या आगमनाने त्यांचा त्वेष भडकला, आणि त्यांनी आपले भाले, मागे पंखांचा फडफडाट उठवीत आणि इशाऱ्याच्या शब्दाच्या तुताऱ्या फुकीत दक्षिण वाऱ्यावर काळ्या मेघांच्या पार्श्वभूमीवरून आकाशातून कळपाने उड्डाण करणाऱ्या स्ट्रायमॉनच्या बगळ्यांच्या झेपीप्रमाणे जोरात फेकले. रुटुलिअन राजा आणि त्याचे इटॅलिअन सरदार यांना या प्रकाराने पार गोंधळवून टाकले. पण मग त्यांनी मागे

वळून पाहिले तेव्हा ते आरमार किनाऱ्याकडे वळलेले आणि समुद्रावर सरकत्या गलबतांची चाललेली एकच हालचाल त्यांना दिसली. इनीआसचा शिरपेच त्याच्या मस्तकावर झळाळत होता आणि त्याच्या पिसांचा शिरपेच असलेल्या शिरस्त्राणातून जणू अग्नीज्वाला बाहेर पडत होत्या; निरभ्र रात्री एखाद्या धूमकेतूच्या अशुभ रक्तासारख्या लाल तेजासारखा, किंवा यातना सोसणाऱ्या मानवजातीला तृष्णा आणि व्याधी आणणारा व्याधाचा तारा उदयमान होऊन सब आकाशात भय पसरविण्याकरिता भयंकर तेजाने तळपतो त्याप्रमाणे एक रुंद तेजस्वी किरण त्याच्या सुवर्णाच्या ढालीच्या मध्यावरून बाहेर पडला.

परंतु टर्नसचे धैर्य मुळीच खचले नाही. किनाऱ्यावर वेळीच ताबा करून, शत्रू किनाऱ्यावर उतरत असतानाच आपण त्याला मागे रेटू शकू असा त्याला दृढ विश्वास होता. (मुळीच वेळ न दवडता, आपल्या माणसांचा धीर उंचावण्याकरिता तो त्यांना खोचकपणे बोलला.) "ती आली आहे, जिच्याकरिता तुम्ही उत्कंठित झाला होता आणि प्रार्थना करीत होता ती तुमच्या खड्‌गाने त्यांच्या सेनेचा मोड करण्याची संधी जवळ आली आहे! तुम्ही जर मर्दाप्रमाणे लढलात तर या समराचा निर्णय तुमच्या मुठीत आहे. आता तुम्ही तुमच्या स्त्रियांचे आणि घरांचे आणि ज्या थोर कर्तृत्वामुळे तुमच्या पित्यांना कीर्ति प्राप्त झाली त्यांचे स्मरण केले पाहिजे. आपण आताच पुढाकार घेऊ आणि ते अस्थिर आणि अनिश्चित असतानाच, आणि किनाऱ्यावर उतरल्यावर त्यांची पहिली पावले डळमळीत असतानाच पाण्याच्या काठावर त्यांच्यासमोर उभे ठाकू. जे धाडस करतात त्यानाच सुदैव सहाय्य करते." तो असे म्हणाला आणि शत्रूवर चाल करून जाण्यासाठी कुणाला बरोबर न्यावे आणि तटभिंतींच्या वेढयाची जबाबदारी कुणावर योग्य प्रकारे सोपवावी याचा तो स्वतःशी विचार करू लागला.

परंतु इनीआस अगोदरच आपल्या साथीदारांना उंच नाळींवरून बाहेर पडण्याच्या अरुंद पुलांवरून किनाऱ्यावर खाली उतरवीत होता. लाटांचा जोर कमी होऊन त्या मागे केव्हा हटतात इकडे लक्ष ठेऊन अनेकांनी उथळ पाण्यात निर्धास्तपणे खाली उडया घेतल्या, तर इतर वल्ह्यांवरून घसरत खाली उतरले. टार्कॉनने समुद्राच्या किनाररेषेची पाहणी केली आणि जिथे वाळूदांडा खालीवर होत नव्हता किंवा जिथे लाटा फुटून गर्जत उलटून येत नव्हत्या परंतु सागराचे संथ पाणी आत येऊन फुगत होते आणि प्रवाह निर्वेध होता त्या दिशेकडे आपल्या गलबताची नाळ एकदम फिरवली. आणि तो आपल्या साथीदारांना म्हणाला :

' माझ्या लाडक्या निवडक गडयांनो, तुमच्या दणकट वल्हयांवर जोर करा. हं उचला ! चला, तुमच्याबरोबर खेचा त्याला ! शत्रूच्या जमिनीत तुमच्या गलबताच्या चोची घुसू द्या. तुमच्या साठयांना तिथे खोल चर कापू द्या. किनाऱ्यावर पाय रोवायला जागा मिळविण्याकरिता मी माझे गलबतही खुषीने फोडून रुतवून टाकीन. ' टार्‌कॉन असे स्पष्टपणे बोलला, त्याच्या साथीदारांनी वल्हयांवर जोर धरला आणि त्यांनी आपली गलबते फेसाळलेल्या पाण्यातून लशिअॅमच्या भूमीत घुसविली आणि त्याच्या नाळी कोरडया मातीत खुपसल्या आणि सर्व साठे सुरक्षितपणे जमिनीवर टेकले. परंतु टार्‌कॉन, तुझे स्वतःचे गलबत मात्र तसे सुरक्षित राहिले नाही! ते वाळूच्या दांडयावर आदळले आणि खडबडीत खडकाच्या खरावात अडकून बसले. बराच वेळ तिथे कसाबसा तोल सावरीत, व लाटांचा जोर अडवीत अतिदुर्बल आधारावर लटकून राहिले आणि शेवटी ते फुटले, आणि त्यातील खलाशी धक्क्यावरून लाटांवर फेकले गेले, तिथे त्यांना वल्हयांच्या तुकडयांचा आणि तरंगत्या वाशांचा अडथळा झाला, आणि त्याच वेळी ओहोटीच्या लाटांनी त्यांचे पाय खेचले व त्यांना निराधार केले.

परंतु कोणतीच घटना टर्नसला रोखू शकली नाही, प्रतिबंध करू शकली नाही किंवा मागे खेचू शकली नाही. जोमदार आणि चपळाईने हालचाली करणाऱ्या टर्नसने आपली सर्व युद्ध आघाडी हलवून ट्रोजनांच्या विरूद्ध उभी केली आणि त्यांना गाठण्याकरिता त्याने किनाऱ्यावरच माणसे ठेवली. रणभेरी निनादल्या. इनीआसच प्रथम ग्रामजनांच्या दलांवर चालून गेला, आणि त्यानेच प्रथम आघात करून लॅटिनांना लोळविले. युद्धाच्या अंतिम निर्णयाची ही एक चांगलीच साक्ष होती. त्याच्यावर हल्ला करण्यात सर्वात पुढे असलेल्या, सर्वात उंच थेरॉनला त्याने मारले; इनीआसने त्याचे ब्रॉंझचे सांधलेले चिलखत फोडले व सुवर्णाच्या धाग्यांनी कडक झालेला अंगरखा चिरला, आणि खड्गाने त्याची कूस फोडून उघडी केली आणि तिच्यातून त्याच्या शरीरातील रक्त वाहून गेले. नंतर त्याने लायकॅसवर धाव घातला. त्याच्या मातेच्या मृत्यूनंतर त्याला तिच्यापासून कापून काढले होते. आणि बाल्यावस्थेपासूनच खड्गाच्या पात्यापासून त्याचा घात होणार नाही असे वरदान असल्यामुळे त्याला बाल्यावस्थेतच फीबिसला अर्पण केले होते. थोडयाच वेळात इनीआसने आपल्या गदांनी संपूर्ण तुकडयांचा संहार करणाऱ्या बलदंड सिसिअसचा आणि राक्षसी गायसचा वध केला; ते हर्क्यूलीझच्या शस्त्रासारखीच शस्त्रे वापरीत होते आणि त्यांचे स्वतःचे बाहू बलवान हाते; किंवा जोवर पृथ्वीने हर्क्यूलीझला अति

कष्टप्रद कामे लावली होती तोवर त्याचा साथीदार असलेला मेलॅम्पस त्यांचा पिता होता या गोष्टींचा त्यांना काही उपयोग झाला नाही. नंतर इनीआसने एक बरची मोठ्याने बढाई मारणाऱ्या परंतु काहीही कर्तृत्व न करणाऱ्या फॅरसवर भिरकावली आणि ती त्याच्या ओरडणाऱ्या तोंडात रुतविली. आणि अभागी कायडॉन, तुझेही पतन झाले असते. तू तुझ्या नवथर प्रीती विषयामागे, प्रथमच उगवलेल्या कोवळ्या लवेने गाल सोनेरी झालेल्या क्लायटिअसमागे धावत होतास आणि तुझ्या भावांच्या, फॉर्कसच्या पुत्रांच्या एकजूट झालेल्या तुकडीने इनीआसवर चढाई केली नसती तर डार्डनच्या शस्त्राने तुझा दीनवाणा शेवट झाला असता, आणि तुझ्या ठायी नित्य असलेल्या यौवनाच्या आतुर प्रेमातून तुला मुक्त केले असते. तुझ्या सात भावांनी सात भाले फेकले, त्यातील काही निरुपद्रवीपणे त्याच्या शिरस्त्राणावरून किंवा त्याच्या ढालींवरून परतले, आणि इतर त्याला केवळ घासून गेले कारण त्याचे रक्षण करणाऱ्या व्हीनसने ते बाजूला वळविले.

इनीआस त्याच्या निष्ठावान ॲकेटिझला म्हणाला: "इलिअमच्या मैदानावर एकेकाळी ग्रीकांच्या शरीरात घुसलेल्या शस्त्रांची माझ्याकरिता एक रास कर. तुला दिसून येईल की माझ्या हाताने मी ती शस्त्रे रूटुलिअनांवर फेकली तर त्यातील एकही शस्त्र आपल्या लक्ष्याचा वेध करण्यात अयशस्वी होणार नाही." असे बोलून त्याने एक भाला घेतला आणि फेकला; तो पुढे झेपावला आणि एकाच घावात त्याने मिऑनची ब्राँझची ढाल फोडून एकाच क्षणात त्याचे उरस्त्राण आणि छाती फोडली. त्याचा भाऊ आल्कॅनॉर तात्काळ त्याच्या सहाय्याला धावला आणि तो कोसळत असताना त्याने आपल्या उजव्या हाताने त्याला सावरले. दुसरी झेपावणारी बरची त्याच्या बाहूत घुसून रक्ताळून पुढे भिरभिरत गेली, आणि तो हात खांद्यापासून स्नायूच्या धाग्यावर निर्जीवपणे लटकत राहिला. आणि आता न्युमिटरने तो भाला त्याच्या भावाच्या देहातून खेचून काढला आणि इनीआसवर फेकण्याकरिता वेध घेतला. परंतु या वेळी तो त्याच्या वेधाच्या लक्ष्यात रुतविण्यात यशस्वी झाला नाही. कारण धिप्पाड ॲकेटिझच्या कुशीला घासून जाण्यापलिकडे तो काही करू शकला नाही. त्या क्षणी नवतारुण्याच्या शक्तीच्या विश्वासाने क्युरिसचा क्लॉसस पुढे आला. आणि त्याच्या ताठ भाल्याच्या पल्लेदार फेकीने त्याने ड्रायपॉसच्या हनुवटीखाली जोरदार घाव घातला; भाल्याने त्याचा कंठभेद केला आणि तो बोलत असतानाच एकाच क्षणी त्याचा आवाज, आणि प्राण यांचे हरण केले. म्हणून तो धरणीवर कपाळावर कोसळला आणि त्याच्या तोंडातून दाट रक्ताची गुळणी फुटली. क्लॉससने बोरिसच्या अति उच्च कुलातील

तीन थ्रेशिअनांना आणि त्यांच्या पित्याने त्यांच्या मातृभूमीतून, इस्मारातून, युद्धावर पाठविलेल्या इतर तिघांना जमीनदोस्त केले; आणि त्यांच्यापैकी प्रत्येकजण वेगवेगळ्या पद्धतीने कामास आला. नंतर हॅलिसस ऑरन्कनांच्या तुकडीसह आणि आपल्या झोकदार टोळीचे नेतृत्व करीत पाठोपाठ येणारा नेप्च्यूनचा पुत्र मेसॅपस यासह युद्धात भिडला. एका पाठोपाठ एकाने आक्रमकांना हुसकून लावण्याचा प्रयत्न केला; आणि तिथे इटलीच्या अगदी उंबरठ्यावरच संघर्ष भडकला. ज्याप्रमाणे परस्परांशी झुंजणारे वारे समान धैर्याने आणि सामर्थ्याने विशाल आकाशात रणधुमाळी उठवितात, कारण एक दुसऱ्याला हटत नाही किंवा मेघ आणि सागरही मागे हटत नाही, त्यामुळे झुंज दीर्घकाळ अनिर्णित असते आणि वारे सर्व पृथ्वीविरुद्ध जोर करीत असतात; त्याप्रमाणे ट्रॉयचे आणि लॅटिअमचे सैन्य धडाक्याने एकमेकाशी भिडले, आणि पायात पाय गुंतले आणि माणसाला माणूस गर्दीत भिडला.

समरांगणावर इतरत्र जिथे खळखळणाऱ्या प्रवाहाने खडक गडगडत कोसळू लागले होते आणि तीरांवरील झाडेझुडे जमिनीतून उखडून पडली होती आणि विस्तृत प्रदेशावर वाहून नेली होती, तिथे, पायदळाच्या धुमाळीत चढाई करण्याचा सराव नसलेले आणि खडबडीत जमिनीमुळे आपले घोडे परत पाठविण्यास प्रवृत्त केले गेलेले आपले आर्केडिअन त्वेषाने पाठलाग करणाऱ्या लॅटिनांच्या पुढून पळून जाण्याकरिता मागे फिरत आहेत असे पॅलसने पाहिले व अशा बिकट प्रसंगी आपल्याला करता येण्यासारखी एकच गोष्ट उरली होती असे त्याच्या लक्षात आले. कधी विनवणी करून तर कधी कडवटपणे टोमणे मारून त्याने त्यांचे धैर्य पुन: चेतविण्याचा प्रयत्न केला. 'मित्रहो, तुमचे हे पलायन तुम्हाला कुठे घेऊन जाणार आहे ? तुमच्या स्वत:च्या शूर कर्तृत्वाची, तुमचे नेतृत्व करणाऱ्या इव्हॅन्डरच्या नावाची, त्याने जिंकलेल्या गौरवशाली युद्धांची, आणि माझ्या पित्याच्या कीर्तीची बरोबरी करण्याच्या माझ्या स्वत:च्या आकांक्षांची शपथ घालून मी तुम्हाला विनवितो की पलायन करणाऱ्याच्या वेगावर कधीही भरवसा टाकू नका ! खड्गाच्या जोरावरच तुम्ही शत्रूमधून तुमचा मार्ग फोडून काढला पाहिजे. जिथे योद्धे मोठ्या संख्येने दाट भिडलेले आहेत तिथूनच तुम्ही आणि तुमचा सेनानी असलेल्या मी आपला मार्ग आक्रमिला पाहिजे अशी तुमच्या स्वाभिमानी भूमीची अपेक्षा आहे, कोणत्याही स्वर्गीय शक्ती आपल्यापुढे युद्धासाठी ठाकलेल्या नाहीत; कारण आपल्यावर चढाई करून येणारा शत्रूही आपल्या

सारखाच मर्त्य आहे. आणि आपले प्राण आणि आपले हात संख्येने त्यांच्या-इतकेच आहेत. आणि हे पहा, संपूर्ण जलाशयाच्या जणू भिंतीनी सागराने आपल्याला वेढले आहे. तुमच्या माघारीकरिता आता भूमीच उरली नाही. मग आपण आता समुद्रात जायचे आहे की सरळ ट्रॉयलाच ?'

तो असे बोलला आणि तडक शत्रूच्या थेट गर्दीमध्ये चालून गेला. त्याला प्रथम भेटला तो लॅगस. निर्दय दैवानेच त्याला तिकडे ओढून नेले. कारण जमिनीतून एक वजनदार खडक उपटण्याचा तो प्रयत्न करीत असता पॅलसने आपला भाला फेकला आणि जिथे त्याचा कणा बरगड्यांना विभागीत होता तिथे, मध्यभागातूनच तो घुसला. नंतर त्याने भाला जिथे हाडात रुतला होता तिथून उपटून काढण्याकरिता खेचला. त्याचवेळी हिस्बोने त्याच्यावर झडप घातली, परंतु त्याने केवळ अविचाराने गृहीत धरल्याप्रमाणे, तो त्याला बेसावध असा गाठू शकला नाही. कारण पॅलस तिथेच होता आणि त्याला प्रतिसाद देण्याच्या तयारी-तत्र होता, आणि आपल्या प्रिय मित्राच्या मृत्यूच्या भयंकर दृश्याने बेभान झालेला हिस्बो जसा पिसाटपणे हल्ला करण्यास धावून आला तसे पॅलसने आपले खड्ग त्याच्या फुगलेल्या फुप्फुसात खोल खुपसले. स्थेनिअसवर व खुद्द आपल्या सावत्र आईची शय्या ज्याने बेशरमपणे भ्रष्ट केली होती त्या प्राचीन ऱ्हीटसच्या वंशातील अॅन्केमोलसवरही पॅलसने हल्ला केला. आणखी दोघे त्या रुटुलिअन रणभूमीवर पडले. लॅरिडीस आणि थिम्बर,–डॉकसचे जुळे पुत्र – इतके दिसायला सारखे की त्यांचे मातापिताही आपल्या गोड गोंधळात त्यांना वेगळे ओळखू शकत नव्हते. परंतु पॅलसने त्यांना आपल्या क्रूर कृत्यांनी वेगळे दाखवून दिले; कारण इव्हॅन्डरच्या खड्गाने त्याने थिम्बरचे शिर तोडले आणि लॅरिडीसचा उजवा हात कापून काढला; अजूनही खड्गावर पकड असलेल्या, निर्जीव होत असलेल्या त्या हाताची बोटे, थरथरत आपल्या मालकाला शोधीत होती.

आपल्या नायकाचे खडसावणे आणि त्याची दिव्य वीरकृत्ये पाहून, आर्के-डिअनांना पश्चाताप आणि शरम या मिश्रभावनांतून शत्रूला सामोरे जाण्याचे धैर्य परत प्राप्त झाले. आणि त्याच वेळी त्याच्या दोन घोड्यांच्या रथातून पॅलसला ओलांडून पुढे दौडत जाणाऱ्या ऱ्हिटिअसचा पॅलसने वध केला. तो हे करीत असताना आयलसला उसंत घेण्याकरिता आणि उसासा टाकण्याकरिता वेळ मिळाला; परंतु तो केवळ एकच क्षणापुरता. कारण पॅलसने आपला कणखर भाला रोखला होता तो दूर असलेल्या आयलसवर आणि थोर ट्यूआस आणि त्याचा भाऊ

टायरीस यांच्या पुढून पळून जाणारा व्हिटिअस सरळ त्या भाल्याच्या उड्डाण रेषेत आला, तो आपल्या रथातून गडगडत खाली आला आणि आपल्या दुर्बल टाचा रुटुलिअन भूमीवर झाडू लागला. आणि ज्याप्रमाणे प्रार्थनेला प्रतिसाद म्हणून ग्रीष्मात वारे वाहू लागतात, आणि कुणी मेन्ढपाळ अरण्यभूमीत ठिकठिकाणी अग्नी चेतविती आणि अचानक मधली झाडीही पेटते, अखेरीस व्हल्कनची वाकडी-तिकडी धडकी भरविणारी संग्रामरेषा विस्तृत प्रदेशात अखंड विस्तारते आणि तो मेंढपाळ त्या आक्रमक ज्वाळांकडे विजयाच्या समाधानाने पाहत बसतो. त्या प्रमाणे त्याच्या मित्रांचे सर्व शौर्य एका धगधगणाऱ्या ज्वालेत अग्निप्रलयांत एक–वटले आणि त्याने पॅलसला सहाय्य केले. परंतु युद्धात नित्य चपल असलेला हॅलिसस शत्रूला तोंड देण्याकरिता धावला आणि आपल्या शस्त्रांमागे ठाम पवित्रा घेऊन सिद्ध झाला. आणि त्याने लॅडॉन फिरीस आणि डेमोडॉकसचा वध केला; त्याचा गळा घोटण्याकरिता स्ट्रायमोनिअसने वर केलेला हात त्याने आपल्या खड्गाच्या चकचकीत पात्याने कलम केला; नंतर त्याने थोॲसच्या तोंडावर दगडाचा घाव घातला आणि त्याची कवटी फोडून मेंदू आणि रक्त यांचा काला केला. भविष्यात काय घडणार आहे याचे पूर्वज्ञान असलेल्या हॅलिससच्या पित्याने त्याला एका अरण्यात लपविले होते, परंतु त्याचा पिता वयोवृद्ध झाल्यावर, त्याचे केस पिकल्यावर, आणि शेवटी त्याचे डोळे मृत्यूने निमाल्यावर नियती देवतांनी त्याच्या पुत्राला आपल्या हातांनी पकडले आणि त्याला इव्हॅन्डरच्या शस्त्रानी प्राप्त होणाऱ्या मृत्यूला समर्पण केलें. हॅलिसस त्याच्यावर चालून येत असता पॅलसने प्रार्थना केली : " पिता टायबर, मी आता फेकण्याकरिता रोखीत असलेल्या भाल्याच्या फाळाला कणखर हॅलिससच्या छातीतून यशस्वी मार्ग दे. नंतर आता माझ्यापुढे जी शस्त्र दिसत आहेत, व जी माझ्या शत्रूकडून मी मिळवलेली लूट होणार आहे, ती तुझ्या स्वतःच्या ओक वृक्षाच्या स्वाधीन होतील. " आणि देवाने ती प्रार्थना ऐकली. हॅलिसस आयमेओनला स्वत.च्या ढालीने रक्षण देण्याचा प्रयत्न करीत असताना दुर्दैवाने त्याची स्वतःची छाती आर्केडिअन भाल्यापुढे असहाय्यपणे उघडी पडली. परंतु त्या युद्धात सामर्थ्याचा महामेरू असलेल्या लॉसमने आपल्या सेनेला तिच्या श्रेष्ठ योद्ध्याच्या मृत्यूमुळे निराश होऊ दिले नाही. त्या लढाईतील प्रत्यक्ष आधार आणि मर्मबंध असलेल्या आबासला, त्याच्या पुढे आलेल्या पहिल्याच योद्ध्याला ठार करून त्याने चढाईस आरंभ केला. आर्के-डिआचे पुत्र धारातीर्थी पडले, इट्रुस्कनही पडले, आणि ज्यांना ठार करण्यात ग्रीकांना यश आले नव्हते ते ट्रोजन व इट्रुस्कनही पडले. नेतृत्व आणि सामर्थ्य यात तुल्यबळ असलेल्या युद्ध-आघाड्या धडाक्याने भिडल्या.

पिछाडीवर असलेल्यांनी आघाडीवरील रांगांना इतके पुढे रेटले की तेथील गर्दीमुळे शस्त्रे किंवा हाताचाही प्रयोग करण्यास जागा उरली नाही. एका बाजूने पॅलस नेटाने पुढे रेटीत चालला होता तर दुसऱ्या बाजूने लॉसस. त्या दोघात वयाचे फार अंतर नव्हते आणि दोघेही भव्योदात्त दिसत होते. नियतीने मातृभूमीत पुनरागमन दोघांनाही विहित केले नव्हते तरीही उंच ऑलिम्पसच्या अधिपतीने दोघानाही समोरासमोर येऊन द्वंद्वयुद्धात भिडण्याची अनुमती दिली नव्हती; कारण त्या प्रत्येकाचा अधिक प्रतापी शत्रूच्या हातून लवकरच घडणारा मृत्यू त्यांची वाट पहात होता.

त्याच सुमारास टर्नसला त्याच्या रक्षणकर्त्या बहिणीने, ज्युटर्नाने, लॉससच्या मदतीकरिता धावण्याची सूचना केली. आपल्या दौडणाऱ्या रथातून तो रण-धुमाळीच्या मध्यावरून मार्ग कापीत गेला. आपल्या मित्रांना पाहिल्यावर तो त्यांना म्हणाला : "तुम्ही युद्धातून बाजूला होण्याची ही वेळ आहे. पॅलसवर हल्ला करणे हे केवळ माझे कार्य आहे. कारण केवळ माझाच त्याच्यावर हक्क आहे. मला एवढेच वाटते की हे पाहण्याकरिता त्याचा पिता इथे असायला हवा होता.' तो असे बोलला आणि त्याच्या आज्ञेनुसार त्याचे साथीदार त्यांच्या रणांगणातील स्थानावरून मागे सरले. जेव्हा रुटुलिअन मागे हटले तेव्हा या आज्ञेच्या अधिकार-पूर्ण सुराने चकित झालेल्या तरुण पॅलसने टर्नसकडे आश्चर्याने पाहिले आणि त्याच्या विशाल देहावरून त्याची नजर फिरत राहिली. दोघामधील अंतरावरून त्याने टर्नसच्या शरीराचा प्रत्येक अवयव वैरभावाच्या दृष्टीने पाहिला आणि नतर स्वतःच्या बढाईखोर शब्दानी त्या उद्धट राजपुत्राच्या शब्दांना प्रत्युत्तर दिले : 'एका सेनानीची शस्त्रे लुटून, किंवा वीरोचित मृत्यूने मला लवकरच सुकीर्ती प्राप्त होणार आहे. माझा पिता दोन्हीही पर्यायांना सारखाच सिद्ध आहे तुझ्या धमक्या बंद कर. ' या वचनांनी तो रणभूमीच्या मध्यावर पुढे धावला. आर्केडि-अनांच्या काळजातील रक्त गोठले. टर्नसने आपल्या रथातून खाली उडी घेतली आणि पायउतार होऊन भिडण्याची त्याने सिद्धता केली. ज्याप्रमाणे एखादा सिंह उंच मोक्याच्या जागेवरून, खूप दूर, मैदानावर उभा राहून झुंजीची तालीम करणाऱ्या बैलाला पाहतो आणि त्याच्यावर खाली झडप घालतो तसेच चित्र टर्न-सच्या चढाईमुळे दिसत होते. जेव्हा पॅलसला वाटले की टर्नस भालाफेकीच्या पल्ल्यात येत आहे तेव्हा तो वेगाने प्रथम पुढे धावला आणि आपण सामर्थ्याने कमी असलो तरी जर केवळ साहसाने वागलो तर योगायोग कसे तरी सहाय्य करील अशी आशा करीत त्याने विस्तृत स्वर्गाकडे पाहून प्रार्थना केली: "तू जेव्हा अपरिचित म्हणून माझ्या पित्याकडे आलास तेव्हाच्या तुझ्या माझ्या पित्याशी जडलेल्या

अभ्यागत स्नेहाचे स्मरण करून माझ्या थोर आकांक्षेला आधार दे अशी, हे हर्क्यूलीझ, मी तुला विनवणी करतो. मृत्यूच्या क्षणी मी त्याची रक्ताळलेली शस्त्रे खेचीत आहे हे टर्नसला पाहू दे! आणि त्याच्या विजेत्याचे रूप त्याच्या निष्प्रभ होत असलेल्या डोळ्यांवर कायमचे कोरले जाऊ दे."

हर्क्यूलीझने त्या युवकांची प्रार्थना ऐकली. त्याच्या खोल हृदयात एक गाढ निश्वास त्याने आवरून धरला. आणि त्याचे अश्रु असहाय्यतेने ओघळले. नंतर तो पिता आपल्या पुत्राला प्रेमळ शब्दात म्हणाला: "प्रत्येक माणसासाठी त्याचा दिवस निश्चित झालेला असतो. सर्वच मानवांच्या जीवनाचे दिवस थोडे असतात आणि एकदा गेलेले परत मिळविता येत नाहीत. परंतु वीरकृत्यांनी कीर्ती चिरंतन करणे हे शौर्याचे कर्तव्यकर्म आहे. ट्रॉयच्या उंच तटभिंतींच्या तळाशी असंख्य देवपुत्र कामास आले; होय! आणि त्यांच्याबरोबर माझा पुत्रही, सर्पेडॉनही, पडला. टर्नसचा मृत्यूही त्याला पाचारीत आहे; तो सुद्धा त्याच्या वाट्याला आलेल्या कालाच्या अंताप्रत पोहोचला आहे." तो असे म्हणाला आणि नंतर त्याने आपली दृष्टी रुटुलिअन कृषीभूमीपासून दूर वळविली. परंतु पॅलसने आपला भाला सर्व बळ एकवटून फेकला आणि नंतर त्याने आपले चकचकीत खड्ग त्याच्या पोकळ म्यानातून खसकन उपसले. तो भाला पुढे झेपावला. ढालीच्या कडेतून तो घुसला आणि जिथे त्याचा खांदा आच्छादणारे चिलखत खूप उंचावले होते तिथे त्याने आघात केला, आणि शेवटी तिथून सामर्थ्यशाली टर्नसच्या त्वचेवर निसटती जखम करून पार गेला. टर्नसने पोलादाचे टोक असलेला, बळकट ओकच्या लाकडाचा एक भाला बराच वेळ हातात पेलला आणि ओरडत पॅलसवर फेकला. 'माझे शस्त्र तुझ्यापेक्षा सरसरीत्या वेध घेते का ते पहा.' तो असे म्हणाला आणि थरथरत्या आघाताने भाल्याचे टोक पॅलसच्या ढालीच्या मध्यातून, लोह आणि ब्रॉंझ आणि बैलाच्या जाड चामड्याच्या अनेक जाडजुड थरांतून घुसले; त्याच्या उरस्त्राणाचे रक्षण फोडून त्याने त्याच्या रुंद छातीचा भेद केला. त्वरेने त्याने ते तप्त शस्त्र त्याच्या जखमेतून उपसले, परंतु व्यर्थ; कारण त्या भाल्याबरोबर नंतर त्याच जखमेतून त्याचे जीवनरस असे रक्त आणि प्राण उमळून बाहेर पडले. तो त्याच्या जखमेवरच खाली कोसळला, त्याची शस्त्रे खणखणाट करीत त्याच्यावर कोसळली; आणि प्राण सोडताना त्याने रक्ताळलेल्या तोंडाने वैऱ्याच्या भूमीचा जणू चावा घेतला. त्याच्या देहाजवळ उभे राहून टर्नसने पुकार केला: "आर्केडिअनांनो, लक्षात ठेवा! माझ्याकडून हा संदेश राजा इव्हॅन्डरकडे घेऊन जा. त्याची पात्रता जाणूनच पॅलसला मी त्याच्याकडे यथायोग्यरीत्या परत पाठवीत

आहे. समाधीमुळे होणारा सन्मान, व त्याच्या अंत्यकर्माने प्राप्त होणारे समाधान मी त्याला मोकळेपणाने देत आहे. इनीआसच्या केलेल्या स्वागताचे, इव्हॅन्डरला काही कमी मोल मोजावे लागणार नाही !" असे म्हणून त्याने आपला डावा पाय पॅलसच्या निष्प्राण देहावर रोवला आणि भयानक दृश्य कोरलेला खड्ग लटकविण्याचा जड, जाड कमरपट्टा त्याच्या देहावरून खचून काढला; तरुण नवरदेवांच्या, त्यांच्या विवाहाच्या रात्रीच्या प्रथम प्रहरीच, अमानुषपणे केलेल्या वधाचे दृश्य, वधुमहालातील सांडलेल्या रक्तासहित युरिटसचा पुत्र क्लोनस याने पुष्कळशा सुवर्णामध्ये पट्ट्यावर कोरले होते. हे असे विजयचिन्ह जिकल्यामुळे टर्नसला हर्ष झाला व मोठा अभिमान वाटला. दैव आणि भवितव्य या बाबतीत माणसे किती अंध असतात आणि यशाच्या गर्वयुक्त क्षणी संयम कसा राखावा याची त्यांना किती अल्प जाण असते ! टर्नसवर एक वेळ अशी येईल की, काही अपाय न होता, पॅलस पूर्ववत होण्याकरितां वाटेल तितकी मोठी किंमत देणं आपल्याला शक्य व्हावे असे त्याला वाटेल. आणि या दिवसाची आणि त्याने मिळवलेल्या त्याच्या लुटीची त्याला घृणा वाटेल! दरम्यान पॅलसच्या मोठ्या मित्रपरिवाराने, दारुण शोक आणि दुःख करीत त्याचा देह त्याच्या ढालीवर ठेवला आणि तो ते परत घेऊन चालले. अरेरे ! पॅलस, तू जेव्हा तुझ्या पित्याकडे परतशील ,तेव्हा त्याला किती दारुण यातना होतील आणि किती मोठा अभिमानही वाटेल ! या दिवसाने तुला प्रथम समराला अर्पण केले आणि तोच दिवस तुला हिरावून घेऊन गेला; परंतु असे असले तरीही वध केलेल्या रुटुलिअनांच्या मोठ्या राशी तू मागे ठेवल्या आहेस !

या दारुण आघाताची केवळ वदंताच इनीआसच्या कानावर तात्काल आली असे नाही तर अत्यंत विश्वासार्ह असा दूत सांगत आला की त्याचे सैनिक विनाशापासून अगदी थोड्या अंतरावर आहेत आणि ट्रोजनांची दाणादाण उडाली असून त्यांना मदतीची आत्यंतिक गरज आहे. या वृत्तांताने इनीआस भडकून उठला. त्याच्या पल्ल्यात असलेल्या प्रत्येक शत्रू सैनिकाला आपल्या खड्गाने कापून काढीत त्याने शत्रूच्या फळीतून एक रुंद वाट काढली. तो, नुकत्याच केलेल्या रक्तपाताच्या कृत्याने विजयोन्मत्त झालेल्या टर्नसशिवाय दुसऱ्या कुणाचाही शोध करीत नव्हता. त्याच्या मनःचक्षूंपुढे, पॅलस, इव्हॅन्डर, एक त्रयस्थ म्हणून तो गेला असता त्या दिवशी त्याला मिळालेले आदरातिथ्य, आणि करारमदारात परस्परांशी मिळविलेले उजवे हात, उभे राहिले. तो वेगाने पुढे धावत असता त्याने सल्मोचे चार तरुण पुत्र आणि युफेन्सने वाढविलेले दुसरे चौघेजण, पॅलसच्या आत्म्याला त्याच्या

चितेच्या ज्वालांवर कैद्यांच्या रक्ताचा अभिषेक करून, मृत्यूचा नैवेद्य म्हणून बळी देण्याकरिता जीवंत पकडले. नंतर त्याने काहीशा दूरवर असलेल्या मॅगसवर एक भयंकर भाला फेकला, परंतु मॅगस चतुराईने जवळ सरकला आणि तो भाला थरथरत त्याच्यावरून पुढे गेला. मॅगसने इनीआसच्या पायांना मिठी घातली आणि शरणागत होऊन त्याने विनवणी केली : "मी तुझ्या पित्याच्या आत्म्याचे आणि आता मोठा पुरुष होत असलेल्या आयुलसविषयीच्या तुझ्या आकांक्षांचे स्मरण करून तुला प्रार्थना करतो की माझ्या पुत्राकरिता व पित्याकरिता मला सुरक्षित सोड व मला एवढे जीवदान दे. माझा एक भव्य प्रासाद आहे आणि त्यामध्ये कोरीव काम केलेली रुप्याची पदके पुरलेली आहेत, आणि घडविलेल्या व कोऱ्या सुवर्णाच्या जाड लडीही माझ्याकडे आहेत. तुझ्या ट्रोजनांचा विजय माझ्यावर मुळीच अवलंबून नाही; एका बचावलेल्या जीवाने काही एवढा मोठा फरक पडणार नाही." त्याने बोलणे संपविले, आणि इनीआसने त्याला हे उत्तर दिले : 'तू सांगतोस त्या रुप्याच्या व सुवर्णाच्या सर्व लडी तुझ्या पुत्रांकरिताच राहू देत. धर्मयुद्धाचे सर्व नियम, जेव्हा त्याने पॅलसचा वध केला त्याक्षणीच टर्नसनेच झुगारून दिले आहेत. माझ्या पित्याच्या अँकायसिसच्या आत्म्याला असेच वाटते आणि आयुलसलाही.' हे बोलत असताना त्याने मॅगसचे शिरस्त्राण आपल्या डाव्या हाताने धरले. आणि तो विनवण्या करीत असताना त्याची मान मागे खेचली आणि आपले खड्ग मुठी-पर्यंत आत थेट खुपसले.

मस्तकाभोवती पवित्र शिरोबंध बांधलेला, सर्वांगावर शुभ्र चमकणारी धवल वस्त्रे परिधान केलेला आणि इतर पवित्र चिन्हेही शुभ्र असलेला हिमो-नाईडीझ, फीबसचा आणि ट्रायव्हिआचा पुरोहित काही फार दूर नव्हता इनीआस त्याला भिडला आणि त्याने त्याचा सबंध रणांगणावरून पाठलाग केला. तो अड-खळला आणि पडला. आपल्या लांब छायेने त्याला झाकळून इनीआस त्याच्यावर ओणावला आणि त्याने त्याचा बळी घेतला, आणि सिरिस्टसने त्याचे चिलखत गोळा केले आणि युद्धात चालून जाणाऱ्या योध्दयांचा राजा मार्स, याच्याकरिता विजयचिन्ह म्हणून ते खांद्यावर टाकून घेऊन गेला. परंतु आता व्हल्कनच्या कुला-तील वंशज केक्यूलस आणि मार्सच्या पर्वतावरील अम्ब्रो, रणधुमाळीत सामील झाले; क्रोधायमान होऊन डार्डन पुत्र त्यांच्यापुढे उभा ठाकला. नुकताच त्याने आपल्या खड्गाने अँक्सरचा डावा हात आणि त्याबरोबर त्याची गोलाकार ढालही उडविली होती. पोकळ शब्दाच्या जोरावर विसंबून अँक्सर काही उद्धट बढाई मारीत होता; मानवी जीवनाच्या मर्यादा विसरून वार्धक्याने केस पांढरे होई-

पर्यंत आपण दीर्घकाल जगू असे कदाचित त्याच्या आढयतेत त्याने गृहीत धरले असावे. आता इनीआसच्या तप्त त्वेषाला सामोरे जाण्याकरिता टार्क्विटस आपल्या चमकत्या चिलखतात उद्दामपणे उधळत पुढे आला. बनदेवता ड्रायोपी ही त्याची माता होती आणि त्याचा पिता वनात बास करणारा फॉनस होता. इनीआसने आपला भाला मागे खेचला व टार्क्विटसच्या उरस्त्राणात आणि त्याच्या जड ढालीच्या ओझ्यावर तो रोवला आणि तो असहाय्यपणे याचना करीत असताना आणि आणखी काही सांगण्यासारखे आहे का याचा विचार करीत असतानाच त्याने त्याचे शिर उडवून धरणीवर पाडले; लाथेने ते उष्ण धड दूरवर उडविले आणि त्याच्यावर उभा राहून सूडाने पेटलेल्या अंतःकरणापासून बोलला : "आम्ही तुझी धास्ती घ्यावी अशी अपेक्षा करणाऱ्या तू तिथेच पड ! तुझी आई तुला कधीच प्रेमाने मातीत निजवू शकणार नाही, किंवा तुझ्या अवशेषावर कुठलीही कौटुंबिक भव्य समाधी उभारली जाणार नाही. कारण तुला रानटी गिधाडांच्या तोंडी पडावे लागेल किंवा जिथे भुकेले मासे तुझ्या जखमांचे लचके तोडतील तिथे पाण्यात टाकले जाईल. "

नंतर ताबडतोब इनीआस टर्नसच्या आघाडीच्या रांगेतील ॲन्टिअस आणि ल्युकाच्या, शूर न्यूमाच्या आणि एकेकाळी शांत ॲमिक्लीवर राज्य केलेल्या आणि इटॅलिअनांमध्ये सर्वाधिक धनवान असलेल्या, उदारहृदयी व्होलसेन्सच्या सोनेरी केस असलेल्या पुत्राच्या कॅमेर्सच्या पाठीवर गेला. शंभर हातात शंभर शस्त्रे धारण करणाऱ्या, आणि पन्नास मुखातून, पन्नास छाताडातून बाहेर आग ओकणाऱ्या, ज्युपिटरच्या वज्राघाताला तोंड देण्याकरिता पन्नास सारख्या असणाऱ्या ढालींचा खणखणाट करणाऱ्या आणि पन्नास खड्गे उपसणाऱ्या इजिऑनप्रमाणे, एकदा त्याच्या खड्गाचे अग्र तप्त झाल्यावर इनीआसने समरभूमीवर बेभान विजयी वीरश्रीने हाहाःकार उडविला. आणि तिकडे पहा आता तो निफिअस हाकीत असलेल्या रथाच्या चार घोडयांच्या छाताडांवर घाव घालण्यासाठी प्रयत्न करीत होता. परंतु तो लांब लांब पावले टाकीत आणि भयंकर गर्जना करीत पुढे चालून येत आहे असे पाहून भयभीत झालेले घोडे अचानकपणे वळले, मागे उधळले, त्यांच्या धन्याला त्यांनी बाहेर फेकले आणि रथ समुद्रकिनाऱ्याकडे पिटाळीत नेला. मध्यंतरी दोन करडया रंगाच्या घोडयाच्या रथातून ल्यूकॅगस मैदानाकडे निघाला होता. त्याच्याबरोबर लगामाच्या सहाय्याने घोडयांना काबूत ठेवण्याकरिता त्याचा भाऊ लायगर आला होता, आणि ल्यूकॅगस आपले नग्न खड्ग जोराने भराभर गरगर फिरवित होता. त्यांच्या भयंकर उत्साहाने चिडून इनीआसने

त्यांच्यावर चाल केली. आणि भाला रोखून ती सामर्थ्यशाली आकृती त्यांच्याकडे झेपावू लागली. लायगर त्याला म्हणाला " तुला इथे दिसत आहेत ते डायोमीडचे घोडे नाहीत किंवा अँकिलीझचा रथही नाही आणि फ्रिजिआची मैदानेही नाहीत. इथे आमच्या भूमीत आणि आताच्या याच घटकेला या युद्धाचा व तुझ्या जीवनाचाही अंत होईल." पिसाट लायगरचे हे शद्ब होते, आणि ते दूरवर निनादत गेले. परंतु ट्रॉयच्या वीर पुरूषाने उत्तर योजिले ते शद्बांतून नव्हते. कारण त्याने त्याच्या शत्रूवर एक भाला फेकला. चाबूक फटकारण्याकरिता पुढे ओणावलेला ल्यूकॅगस आपल्या घोड्यांना खड्गाच्या चपट्या पाठीने पुढे दामटीत होता, आणि डावे पाऊल पुढे टाकून त्याने लढण्याचा पवित्रा घेतला. त्याच्या चमकत्या ढालीच्या खालच्या कडेतून तो भाला घुसला आणि त्याने त्याचा डावा नितंब फोडला; रथातून तो फेकला गेला आणि धुळीत गडबडा लोळत त्याने प्राण सोडला. औपरोधिक कडवटपणाने सत्यशील इनीआस त्याला म्हणाला: " ल्यूकॅगस, भ्याड, पळपुट्या, घोड्यांच्या उधळण्याने तुझ्या रथाला धोका दिला नाही, किंवा काल्पनिक छायांनी शत्रूला सामोरे जाण्यापासून त्यांना निवृत्त केलेले नाही. तूच तुझ्या घोड्यांना टाकून जाण्याचे ठरविलेस, कारण तूच रथातून खाली उडी घेतलीस. " हे टवाळीचे शद्ब उच्चारीत असता इनीआसने घोड्यांची जोडी पकडली. त्याचा दुर्दैवी भाऊही रथातून खाली पडला होता आणि असहाय्यपणे इनीआसपुढे हात पसरीत होता. " हे ट्रॉयच्या पुरूषोत्तमा! मी तुला तुझ्या स्वत:ची आणि ज्या मातापित्यांनी थोर पदवीस चढण्याकरिता तुला जन्म दिला त्यांची शपथ घालून तुला विनवतो! माझा जीव माझा राहू दे. तुझी याचना करीत असलेल्या माझ्यावर दया कर. " आणखी काही बोलण्याचा त्याने प्रयत्न केला परंतु इनीआस म्हणाला: ' मघाशी तू बोलत होतास ते कांही अशा प्रकारचे नव्हते. भावाने भावाला सोडू नये. आता मर. " आणि त्याने आपल्या शस्त्राच्या टोकाने त्याच्या उरातील प्राणाचे गुप्त उगमस्थान उघडे केले.

अशा तऱ्हेने डार्डन सेनाधिपतीने त्या सर्व रणक्षेत्रावर मृत्यूचे थैमान घातले. त्याचा क्रोध हा पर्वतप्रपाताचा क्रोध होता, किंवा काळ्या वादळाचा क्रोध होता. आणि शेवटी बाल राजपुत्र अॅस्कॅनिअस आणि ट्रॉयचे सर्व सैनिक छावणीतून बाहेर फुटले. वेढा फसला होता.

या घटना घडत असताना ज्युपिटर स्वत: जूनोला म्हणाला: " माझे परमप्रेम असलेल्या माझ्या भगिनी आणि राज्ञी, तू समजलीस तसेच हे आहे. तुझी जाण

तुला फसवीत नाही. ट्रॉयच्या सत्तेला आधार देत आहे ती व्हीनसच आहे, त्यांच्या पुरुषांचे युद्धामधील संकटात न खचणारे ज्वलंत शौर्यही नाही आणि त्यांची स्वतःची अभिमानी वृत्तीही नाही." जुनोने नम्रतेने उत्तर दिले: "प्रिय नाथ, माझे अंतःकरण आधीच व्यथित असता आणि तुमच्या कठोर आज्ञेने भयभीत झाले असता मला का चिडवीत आहात? माझ्या प्रेमाचा फार पूर्वीपासून तुमच्यावर असलेला–आणि जो यथार्थपणेच होता,– तो प्रभाव जर आता असता तर तुम्ही खचित असे वागला नसतात. सर्वशक्तीमान प्रभू, या समरकांडामधून टर्नसला, त्याचा पिता डॉनस याच्याकरिता, बाजूला काढून त्याचे रक्षण करण्याची शक्ती तुम्ही मला नाकारली नसती. तर मग अशा परिस्थितीत तो नाश पावू दे. त्याच्या निष्पाप रक्ताने त्याला ट्रोजनांचे समाधान करू दे. तरी पण त्याच्या नावाचे मूळ आपल्याच स्वर्गीय कुलातच आहे हे लक्षात घ्या पिल्यूम्नस त्याच्या पित्याचा पणजा होता, आणि आपल्या उदार हस्ताने तुमच्या मंदिराच्या पायऱ्या त्याने अनेक वेळा मूल्यवान भेटींनी सजविल्या आहेत." स्वर्गीय ऑलिम्पसच्या राजाने ताबडतोब तिला उत्तर दिले: "तात्कालिक मृत्यूपासूनच त्याची सुटका करण्याकरिता,– जरी नंतर त्याचा मृत्यू घडायलाच हवा आहे; मी तसा अनिवार्य निर्णय घेतला आहे याची तुला जाणीव असेल तर,– व या तरुण राजपुत्राला केवळ थोडी उसंत लाभावी या हेतूने तू विनवणी करीत असलीस तर त्याला पलायन करू दे: या मार्गाने तू त्याला बाहेर काढ आणि लवकरच कोसळणाऱ्या मृत्यूपासून त्याला हिसकावून घे. तुझे हे इतकेच लाड करण्याची मला मुभा आहे. परंतु तुझ्या प्रार्थने आड अधिक खोल आशयाची सुटका गुप्तपणे अभिप्रेत असेल आणि सबंध युद्धाची दिशाच विस्कळित करण्याचा किंवा बदलण्याचा तुझा विचार असेल तर तू खोटी आशा बाळगीत आहेस." साश्रू नयनांनी जूनोने उत्तर दिले. "पण समजा तुमच्या ओठांनी नाकारलेली कृपा खरोखरी करण्याचा आणि टर्नसला अधिक दीर्घ आयुष्य देण्याचा तुमचा मानस असला तर! तसे नसेल तर, तो निरपराध असूनही एक यातनामय दारुण शेवट त्याची प्रतीक्षा करीत आहे; किंवा मी तरी सत्यापासून फार दूर भरकटत आहे. परंतु अहा! जर माझे भय एक खोटी थट्टा ठरली आणि तुम्ही जर अजूनही तुमच्या योजनांची दिशा अधिक चांगल्या परिणती-करिता बदलली तर! कारण फक्त तुम्हाला एकट्यालाच तो अधिकार आहे."

असे म्हणून जूनोने एक मेघ लपेटून घेतला आणि एक वादळ पुढे लोटीत, उंच आकाशातून ती तात्काल खाली झेपावली, आणि इलिअमच्या युद्धभूमीचा आणि लॉरेन्टाईनांच्या छावणीचा तिने मार्ग आक्रमिला. ती देवता असल्यामुळे

तिने छायेची एक चिंधोटी, शक्तिहीन लवचिक मेघाचा एक खंड घेतला, आणि त्याला इनीआसचे रूप दिले. ते दृश्य मोठे विलक्षण आणि चमत्कारपूर्ण होते. त्याला तिने डार्डन शस्त्रे चढविली, आणि व्हीनस–पुत्रासारखी एक ढाल दिली आणि त्याच्या मस्तकावर तसाच तुरा चढविला तिने त्याला आभासमय शब्द, विचारहीन आवाज दिला आणि चालण्याकरिता बिनचूक घडविलेला डौल दिला. हे सारे मृत्यूनंतर ज्या आकृती तरळतात त्याप्रमाणे होते, किंवा गाढनिद्रेत स्वप्ने जशी जाणिवेला भ्रम निर्माण करतात तसे होते. आता ती आभासमय आकृती आपल्या शस्त्रे नाचविण्याने आणि युद्धाचे आव्हान करण्याने अभिमानी टर्नसला चवताळवीत, सैन्याच्या अगदी पहिल्या रांगेपुढे इतस्ततः ख्यालीखुशालीत नाचू उडू लागली. टर्नस त्या छायेवर धावून गेला, आणि त्याने आपला सोसाटयाने जाणारा भाला खूप लांबून फेकला. त्या आभासाने पळून जाण्याकरिता आपली पावले उलटी वळविली. आणि इनीआस खरोखरच त्याच्यापुढून पळून जात आहे आणि माघार घेत आहे असे वाटून टर्नस भ्रामक आणि गुंतागुंतीच्या आशेच्या पार आहारी गेला. "इनीआस" तो ओरडला. "तू कुठे पळून चालला आहेस? आणाभाका घेऊन निश्चित झालेला विवाहपाश असा तोडून जाऊ नकोस! तू जिचा शोध घेत सागराच्या लाटांवरून एवढा प्रवास करून आलास ती भूमी माझा हा दक्षिण बाहू तुला आता देईल." आणि अशी उपरोधाची वक्तव्ये उच्च स्वराने करीत, आणि आपल्या खड्गाचे नग्न अग्र नाचवीत, आपल्या आनंदाचे मूळ कारण वाऱ्यावर तरंगत जात आहे हे लक्षात न घेता तो त्याचा पाठलाग करू लागला. तिथेच एक नांगरलेले गलबत खडकाच्या एका उंच कपारीला खुंटविले होते; त्याच्या शिडयाही सोईस्कर जागी लावलेल्या होत्या; धक्क्यावर उतरण्यासाठी टाकलेला अरुंद मार्ग तयारच होता. पूर्वी क्लुसिअमच्या सीमाप्रदेशातून राजा ओसिनिअसने लॅशिॲमकडे जाताना याच गलबतातून प्रवास केला होता. पळता पळता घाबरलेल्या इनीआसच्या छायारुपाने लपण्याकरिता याच गलबतात उडी घेतली. सर्व अडथळयांवरून झेपावत टर्नस मोठया वेगाने दौडत आला आणि त्याने धक्क्याला जोडलेल्या उंच सरळसोट मार्गावरून उडी घेतली. परंतु तो नाळीजवळ पोहचलाही नसेल एवढयात सॅटर्निअन जूनोने खुंटविलेले दोर तोडले, गलबत मोकळे केले आणि मागे हटणाऱ्या लाटांवरून समुद्रात लोटले.

स्वतः टर्नस मध्यसमुद्रावरून चंचल वाऱ्याच्या लहरीवर पुढे पुढे जात असता, कुठेही न सापडणाऱ्या वैऱ्याशी झुंजण्याकरिता इनीआस त्याचा शोध घेत असताना त्याने त्याच्या वाटेतील अनेक समर्थ योध्दयांना धारातीर्थी पहुडविले;

आणि आता त्या छायारुपाने लपण्याकरिता जागा शोधणे सोडून दिले. ते आकाशात उंच गेले आणि एका काळ्या मेघात विरून गेले. आपल्या या अवस्थेने भ्रमात पडलेल्या आणि या सुटकेविषयी मुळीच धन्यता न मानणाऱ्या टर्नसने आजूबाजूला पाहिले. आणि आक्रोश करून आपले दोन्ही हात आकाशाकडे उंचावले : "हे सर्वशक्तीमान पित्या, मला असे कडक शासन व्हावे अशी तुझी खरेच इच्छा आहे काय? माझ्या हातून इतका गंभीर प्रमाद घडला आहे असे तू मानतोस काय? मी कुठे चाललो आहे असा भरकटत? मी गलबतावर चढण्यापूर्वी कुठे होतो? मी असा पळून का चाललो आहे? मी परत कसा जाणार? माझी छावणी आणि लॉरेन्टाईन तटभिंती मला परत दिसतील का? माझ्या ध्वजामागून आलेल्या सेनेचे काय? अरेरे! किती भयंकर हे कृत्य! चोहोकडे अवर्णाच्य मृत्यू खडा असताना मी त्यांना सोडून आलो आहे! त्यांना उधळून लावलेले मी आता पहाणार आहे की काय? आणि त्यांचे पतन होत असताना त्यांचे विव्हळणे मला ऐकावे लागेल की काय? पण मी काय करीत आहे? अहा! पृथ्वीचे एखादे अत्यंत खोल विवर मला पोटात घेण्यासाठी उघडू शकत नाही का! वाऱ्यांनो, तुम्ही तरी माझ्यावर दया करा! हे गलबत एकाद्या खडकांच्या रांगेवर किंवा कड्यांवर लोटा! मी टर्नस, मनापासून तुम्हाला विनवीत आहे हे गलबत त्या सिर्टिसच्या कराल फसव्या पुळणीत रुतू दे; तिथे कुणीही रुटुलिअन किंवा माझ्या शरमेची एखादी वदंता माझा पाठलाग करणार नाही." असे म्हणत, या भयंकर लांछनाने अत्यंत व्यग्र होऊन स्वतःच्या खड्गावर झोकून देऊन भावनाहीन असिधारा आपल्या बरगड्यांतून घुसवावी, का धक्क्यावरून स्वतःला लाटांमधे झोकून द्यावे, त्या वक्राकार किनाऱ्याला पोहोचेपर्यंत पोहण्याची पराकाष्ठा करावी आणि ट्रोजनांच्या शस्त्रांना सामोरे जाण्याकरिता परतावे, या संभ्रमात त्याचे मन एकदा एका बाजूने, तर पुनः दुसऱ्या बाजूने विचलित होऊ लागले. तीन वेळा त्याने प्रत्येक मार्गाचा अवलंब केला परंतु तिन्ही वेळा जूनोने त्याला मोठ्या प्रयासाने आवरले आणि त्याच्याविषयीच्या हार्दिक करुणेने त्याला मागे खेचले. अशा तऱ्हेने सावकाश पुढे सरकत, लाटांच्या आणि अनुकूल प्रवाहाच्या साहाय्याने खोल पाणी कापीत शेवटी तो आपल्या पित्याच्या डॉनसच्या प्राचीन नगरीच्या किनाऱ्यावर जाऊन उतरला.

मध्यंतरी, ज्युपिटरच्या सूचनेवरून मेझेन्टिअस त्वेषाने रणकंदनात घुसला आणि त्याने विजयोन्मत्त ट्रोजनांवर हल्ला केला. झुंजीकरिता इट्रुस्कन सेना एकवटून भिडली आणि त्यांनी केवळ त्या एका योध्द्यावर आपला सर्व द्वेष

आणि आपल्या शस्त्राचा वर्षाव केन्द्रित केला. परंतु तो, आकाश आणि सागराच्या सर्व ताकदीला आणि धोक्यांना, वाऱ्यांच्या आत्यंतिक जोराला, खुल्या सागरात उघडाबोडका असूनही, चिवटपणे नित्य तोंड देणाऱ्या, उजाड पाण्यात पुढे घुसलेल्या खडकासारखा अविचल राहिला. त्याने प्रथम डॉलिकेऑनचा पुत्र हेब्रस याला आणि त्याच्या बरोबरच लॅटॅगस आणि पलायन तत्पर असलेल्या पाल्मसलाही धरणीवर लोळविले. सरळ तोंडावर पर्वतशिखरावरील प्रचंड टोकदार शिलाखंडाचा घाव घालून त्याने लॅटॅगसवर आघाडी साधली; धोंडशीर तोडून पाल्मसला त्याने असहाय्यपणे वळवळत टाकले. आणि नंतर त्याची शस्त्रे खांद्यावर लटकविण्याकरिता लॉससला दिली आणि पाल्मसचा शिरपेच लॉससच्या शिरस्त्राणावर खोवला. नंतर त्याने फ्रिजिअन इव्हँन्थेसचा, आणि पॅरिसचा अगदी जवळचा मित्र आणि समकालीन मायमॅस याचा वध केला. गर्भात जळता पलिता असलेल्या सिसीअसच्या कन्येने, राज्ञी हक्यूबाने ज्या रात्री पॅरिसला जन्म दिला त्याच रात्री थेॲनोने मायमॅसला-त्याचा पिता ॲमिकस होता-या लोकात जन्माला घातले. पॅरिस आपल्या पित्याच्या नगरीत पडला; परंतु लॉरेन्टाईन किनाऱ्याने, एका परक्या भूमीने मायमॅसला ठेऊन घेतले. ज्याप्रमाणे पाईनने आच्छादिलेल्या व्हेसुलसमध्ये किंवा जिथे वेळूचे बन हे त्याचे चराऊ रान असते त्या लॉरेन्टाईनच्या दलदलीच्या प्रदेशात दीर्घकाल सुरक्षितपणे घालविलेल्या एखाद्या भयावह वराहाला, दात विचकणारे शिकारी कुत्रे उच्च पर्वताच्या उतरणीवरून पाठलाग करून खाली हुसकवतात आणि अखरीस सगळीकडे भोवताली जाळी पसरलेली असताना जीवावर उदार होऊन तो उभा राहतो, बेदरकारपणे गरजतो, त्याच्या खांद्यावरचे केस ताठरतात आणि कुणालाही त्याच्यावर हात टाकण्याचे धैर्य होत नाही, किंवा जवळ जाऊन झुंज देण्याची छाती होत नाही. परंतु सगळे सुरक्षित अंतरावरून आरोळ्या ठोकून आणि बरच्या फेकून त्याला छळीत राहतात. मेझेन्टिअस त्या वराहाप्रमाणे होता. जे मेझेन्टिअसवर न्याय्य कारणांमुळे खवळले होते त्यांच्यापैकी एकाच्याही ठायी हाती नग्न खड्ग घेऊन त्याला भिडण्याचे धैर्य नव्हते, परंतु लांब पल्ल्याच्या शस्त्रांनी आणि आरोळ्यांच्या गदारोळाने ते त्याला केवळ चिथवू शकत होते. दातओठ खात आणि त्याच्या ढालीच्या चामड्यात घुसलेले भाले बाहेर झटकीत तो आत्मविश्वासाने आणि न खचता सर्व बाजूंनी तोंड देत होता.

कोरिन्थसच्या प्राचीन भूमीतून ॲक्रॉन नावाचा एक ग्रीक तिथे आला होता, त्याला हद्दपार करण्यात आले होते आणि म्हणून त्याचा विवाहविधि अपूर्ण सोडूनच

त्याला निघून जावे लागले होते. ज्यावेळी मेझेन्टिअसने दूरवरून त्याला पाहिले तेव्हा त्याच्या वाग्दत्त वधूने त्याला दिलेले जांभळे वस्त्र आणि लाल शिरपेच परिधान केलेला अॅक्रॉन युद्धमध्यावर मोठा गदारोळ उठवीत होता; ज्याप्रमाणे अनेक वेळा, एखाद्या भुकेने वखवखलेल्या सिंहाला तो पिसाट भुकेने उत्तेजित होऊन शेतवाड्यातील कुंपण घातलेल्या गोठ्यांमधून भटकताना एखादा उधळलेला मेंढा किंवा भली मोठी उंच शिंगे असलेला एखादा काळवीट पाहून आनंद होतो आणि जबडा राक्षसासारखा वासून, राठ आयाळ उभारून तो आपल्या शिकारीच्या भक्ष्यावर ताव मारू लागतो, त्याच्या आतड्यांना भिडतो, आणि त्या क्रूर जबड्याला किळसवाणे रक्तस्नान घडते; त्या प्रमाणेच मेझेन्टिअसने खांद्याला खांदा, भिडवून आलेल्या आपल्या शत्रूंवर चपळाईने हल्ला चढविला. अभागी अॅक्रॉनला त्याने लोळविले. प्राण सोडताना त्याने काळ्या मातीत आपल्या टाचा झाडल्या आणि त्याच्या विखुरलेल्या शस्त्रांवर रक्त शिंपले. परंतु पळून जात असलेल्या ऑरोडिसला लोळविण्याचा कोता विचार त्याने केला नाही, किंवा आपल्या तीक्ष्ण भाल्याच्या छुप्या घावाने त्याला जखमीही केले नाही. त्या ऐवजी त्याला समोरा-समोर गाठून परस्परांशी भिडण्याकरिता, लबाडीने नव्हे परंतु परस्पर झुंजीत सच्च्या शौर्याने आपण श्रेष्ठ वीर आहो हे सिद्ध करण्याकरिता तो बाजूने वळला. ऑरोडिस पडला. त्याच्या उरावर पाय रोवून, त्याच्यावर जोर देऊन त्याने आपला भाला बाहेर खेचला आणि तो म्हणाला: "मित्रहो, या युद्धात ज्याचा धाक बाळगणे क्रमप्राप्त होते तो गर्वोन्मत्त ऑरोडिस कामास आला आहे." त्याचा उन्मत्त विजयघोष प्रतिनिनादित करीत त्याच्या साथीदारांनी आरोळ्या ठोकल्या. परंतु शेवटच्या श्वासाबरोबर ऑरोडिसने उत्तर दिले: "विजेत्या, तू कुणीही असलास तरी माझ्या मृत्यूचा बदला घेतला जाण्यापूर्वी तू काही फार वेळ आनंदी राहाणार नाहीस; माझ्यासारखेच दुर्भाग्य तुझ्यावरही लक्ष ठेवून आहे. माझ्यानंतर याच क्षेत्रावर तुलाही तुझी जागा सापडेल." या शब्दांवर मेझेन्टिअसने स्मित केले, आणि त्या स्मितात क्रोध होता. "तू तर आता मर, माझ्या बाबतीत तथाकथित देवपिता आणि माणसांचा राजा काय ते ठरवील." असे म्हणून त्याने त्याच्या शरीरातून तो भाला खेचून काढला; शस्त्राने येणारी खडतर झोप त्याच्या डोळ्यांवर आली आणि अनंत अंधारात त्याच्यातील प्रकाश विलीन झाला किडीकसने आता अॅल्कॅथसचा सॅक्रॅटॉर, हायडॅस्पिसचा आणि रॅपो पार्थिनिअस याचा, त्याचप्रमाणे अति कणखर ताकदीचा योद्धा ऑरसिस याचाही वध केला-मेसॅपसने क्लोनिअस आणि लायकॉनचा पुत्र एरिकिटीझ यांना ठार केले; क्लोनिअस त्यावेळी आपल्या लगाम नसलेल्या घोड्यावरून खाली पडला होता, व

जमिनीवर पालथा पडूनच होता, परंतु जेव्हा मेसॅपस एरिकिटीझशी झुंजला तेव्हा दोघेही पायउतार झाले होते. लिसिअन ॲजिसने पायीच चाल केली होती; परंतु आपल्या पितामहाचे शौर्य प्राप्त झालेल्या व्हॅलेरसने त्याला जमिनीवरच लोळविले. तोवर मॅलिअसने थ्रोनिअसला ठार केले आणि सॅलिअसला, अदृश्य राहून दूरवरून केलेल्या भालाफेकीबद्दल आणि तिरंदाजीबद्दल ख्याती असलेल्या नेल्सेसने ठार केले.

आता मार्सने दोन्ही बाजूंनी जोर लावला आणि दोन्ही पक्षांना सारख्याच यातना-आणि मृत्यूचा सारखाच वाटा दिला; कारण जित आणि जेते सारख्याच बळाने मारीत होते आणि मरत होते; या किंवा त्या-कुठल्याही सेनेने माघार घेण्याचा कधीच विचार केला नाही. ज्युपिटरच्या प्रासादात दोन्ही बाजूने चाललेल्या अर्थहीन संहाराची देव कीव करीत होते, कुठल्याही परिस्थितीत मृत्यू अटळ असलेल्या माणसांना इतक्या भयंकर दिव्यांतून जावे लागत होते याची त्यांना खंत वाटत होती. एकीकडे व्हीनस आणि दुसरीकडे तिच्याविरुद्ध सॅटर्निअन जूनो लक्ष ठेवून होत्या, आणि झुंजणाऱ्या सहस्त्रावधी सैनिकांच्यामध्ये फिक्कट टायसिफॉनी आपला क्रोध पाखडीत होती परंतु आता आपला राक्षसी भाला हलवीत मेझेन्टिअस त्वेषाने रणक्षेत्रावर धावला : मध्यसागरातील निरिअसच्या अत्यंत गंभीर जलाशयातून चालत मार्ग कापणाऱ्या आणि तरीही मस्तक व खांदे लाटांच्यावर असलेल्या किंवा पर्वत शिखरावरील प्राचीन रोवन वृक्ष खांद्यावर टाकून धरणीवरून चालत असूनही मस्तक मेघांआड लपलेल्या ओरायनप्रमाणे तो उंच होता; आणि त्याच्याप्रमाणेच मेझेन्टिअस अवजड चिलखत घालून पुढे चालत होता. लांब युद्धरेषेच्या शेवटच्या टोकाला पाहत असता इनीआसला तो दिसला आणि त्याला समोरासमोर भिडण्याकरिता तो सिद्ध झाला. अजूनही धीर न खचलेला मेझेन्टिअस घट्ट पाय रोवून, त्याच्या स्वतःच्या प्रचंड कायेमुळे अभेद्य असा जड होऊन त्याच्या थोर अंतःकरणाच्या शत्रूची वाट पहात थांबला. तात्काल त्याने आपल्या नजरेने भालाफेकीच्या योग्य पल्ल्याचा अंदाज घेतला आणि प्रार्थना केली : " हे माझ्या दक्षिण बाहो—आता तूच माझा देव आहेस. आणि मी आता उगारीत असलेल्या शस्त्रा, मला आता सहाय्य कर. इनीआसवरील माझ्या विजयाचे चिन्ह म्हणून मी पण करतो की या सागरी लुटारूच्या देहावरील हिसकावून घेतलेल्या लुटीने मी खुद्द लॉससला शृंगारीन." तो असे म्हणाला आणि दूर पल्ल्यावरून त्याने आपला सूंऽऽ करीत जाणारा भाला फेकला. भाला पुढे झेपावला परंतु इनीआसच्या ढालीवरून तो परत फिरला आणि जवळच उभ्या

असलेल्या देखण्या अॅन्टोरिसच्या कंबर आणि मांडी यांच्यामधे घुसला. अॅन्टोरिस हर्क्यूलीझचा साथीदार होता. परंतु त्याला आर्गॉसहून घालवून दिल्यानंतर तो इटलीच्या एका नगरीत वास्तव्य करून इव्हॅन्डरला चिकटून राहिला. दुर्दैवाने त्याच्याकडे फेकलेले नसलेल्या शस्त्राच्या जखमेने तो पडला. त्याने आकाशाकडे डोळे वळविले आणि प्राण सोडताना त्याचे प्रेम असलेल्या आर्गॉसचे त्याला स्मरण झाले. नतर सत्यशील इनीआसने आपला भाला फेकला. तो त्या ढालीच्या ब्राँझच्या पत्र्याच्या तीन थराच्या घुमटाकार वर्तुळातून, कापडाचे अस्तर आणि तीन बैलांच्या चामड्याच्या थरातून घुसला आणि खाली नितंबात स्थिरावला; परंतु त्याच्या फेकीच्या पल्ल्याच्या शेवटापर्यन्त त्याचा जोर पोहोचू शकला नाही. इट्रुस्कन रक्त पाहून इनीआस आनंदला, आणि आपले खड्ग कमरेपासून उपसून हादरलेल्या शत्रूवर त्वेषाने धावून गेला. या दृश्याने लॉसस प्रिय पित्यावरील प्रेमाने व्याकूळ होऊन विव्हळला, आणि त्याच्या गालांवरून अश्रू ओघळले. माझ्यापुरते म्हणाल तर प्राचीन इतिहासाने या अशा थोर कृत्याबद्दल विश्वास संपादन केला तर, हे तरुण योध्दया, तुझ्या वाट्याला आलेला दारुण अंताचा, तुझ्या दिव्य शौर्याचा आणि अशी सुकीर्ती प्राप्त होण्याची थोर योग्यता असलेल्या तुझा स्वतःचा निर्देश केल्याशिवाय मी कधीही पुढे जाणार नाही.

अवघडून आणि असहाय्यपणे माघार घेणारा मेझेन्टिअस पाऊल मागे घेत होता, कारण त्याच्या ढालीत अजूनही रुतून बसलेला तो जीवघेणा भाल्याचा फाळ त्याला बाहेर ओढून काढायचा होता. परंतु अचानक त्याच्या बालपुत्राने पुढे झेप घेतली आणि संग्रामात स्वतःला झोकून दिले. आणि मेझेन्टिअसवर वार करण्याकरिता इनीआस हात उंचावून पवित्रा घेत असतानाच लॉससने इनीआसच्या खड्गाचे टोक पकडले आणि या अडथळ्याने त्याला रोखले. त्याचे साथीदार मोठ्याने ओरडत आणि भाले फेकीत एकत्र भिडले आणि आपल्या पुत्राच्या ढालीच्या संरक्षणाखाली तो पिता निघून जाईपर्यन्त आपल्या शस्त्रांच्या माऱ्याने शत्रूला मागे रेटून, सुरक्षित अंतरावर दूर रहाण्यास त्याला भाग पाडले. संतापाने इनीआस जरी उसळत होता तरी तो दक्षतापूर्वक दडून राहिला. ज्याप्रमाणे वादळी मेघा-खाली गारांचा पूर लोटीत असताना, प्रत्येक शेतकरी, आणि प्रत्येक जमीन कस-णारा, खुल्या शेतातून गडबडीने विखुरतो, प्रत्येक वाटसरू सुरक्षित आश्रयस्थानी, एखाद्या नदीकिनाऱ्यावर किंवा उंच, पुढे कललेल्या खडकाच्या आडोशाला, जोवर पृथ्वीवर पाऊस कोसळत असतो तोवर, सूर्यप्रकाश पुनः दिसेपर्यंत आपले दिवसाचे काम पुढे ढकलून, आसरा घेतो, त्याप्रमाणे सर्व बाजूंनी त्याच्यावर शस्त्रांचा वर्षाव

होत असताना, या संग्रामाच्या वादळी मेघाची शेवटची सर संपेपर्यंत इनीआस स्वस्थ दूर राहिला. नंतर रागवत, आणि धमकावीत, केवळ लॉससला उद्देशून इनीआस म्हणाला : "निश्चित मृत्यूकडे चालून येऊन आणि तुझ्या आवाक्या-बाहेरच्या कृत्याचे धाडस करून तू हे काय करीत आहेस ? तुझ्या पित्यावरील तुझी निष्ठा तुला अविचार करण्यास लावून तुला फशी पाडीत आहे." परंतु तरीही लॉसस त्याच्या खुल्या आव्हानाला चिकटून राहिला. आणि आता ट्रोजन सेनाधिपतीच्या ठायीचा जीवघेणा क्रोध अधिकच उग्र झाला, आणि नियती–देवता लॉससच्या नशिबाचे शेवटचे धागे गोळा करू लागल्या होत्या; कारण इनीआसने आपले खड्ग त्या कुमाराच्या सरळ पोटात खुपसले आणि मुठीपर्यंत आत रेटले. खड्गाचे टोक, त्याच्या उद्दाम वृत्तीच्या मानाने फारच हलक्या असलेल्या त्याच्या छोटया ढालीतून, आणि त्याच्या मातेने त्याच्याकरिता सोन्याच्या धाग्याने विणलेल्या अंगरख्यातून पार गेले, आणि त्या वस्त्राच्या घडीत त्याचे रक्त ओघळले. नंतर शोक करीत त्याचा प्राण त्याचा देह सोडून आकाशात इतर आत्म्यांच्या भेटीला गेला. परंतु त्याचे निष्प्राण होत असलेले मुख आणि त्यावरील मृत्यूचा गूढ फिक्कटपणा व त्यावर दिसून येणारे आपल्याप्रमाणेच पितृप्रेमाचे प्रतिबिंब जाणून अँकायसीझ–पुत्राने दयेचा एक खोल निश्वास सोडला. त्याने आपला उजवा हात पुढे पसरला आणि तो म्हणाला : "हे दीनवाण्या मुला, तुझे उच्च कोटीचे संग्राम शौर्य आणि तुझा थोर चांगुलपणा यांना साजेसे, सत्यशील इनीआस तुला काय बरे देऊ शकेल ? ज्या शस्त्रांनी तुला इतका आनंद दिला ती तुझ्याकडेच राहू देत, आणि जर तुला अशा मुक्तीमध्ये स्वारस्य असेल तर तुझ्या पूर्वजांच्या आत्म्यांमधे आणि त्यांच्या रक्षांत सामील होण्याकरिता मी तुला मुक्त करतो. परंतु सर्वनाशाच्या क्षणीही तुला सामर्थ्यशाली इनीआसच्या दक्षिण बाहूने मृत्यू आला या जाणीवेने तुझ्या करुण मृत्यूमध्ये तुला निदान काहीसे समाधान लाभेल." नंतर तो लॉससच्या मागे मागे घोटाळणाऱ्या त्याच्या मित्रांना रागावू लागला; आणि नंतर त्यानेच स्वत: जिथे लॉसस आपले व्यवस्थित कापलेले केस रक्ताने मलीन करीत भूमीवर पडला होता तिथून त्याला वर उचलले.

त्या वेळी त्याचा पिता टायबर नदीच्या प्रवाहाजवळ आपली जखम पाण्याने धूत रक्त थांबवीत होता आणि विसावा घेण्याकरिता एका झाडाच्या खोडावर रेलला होता. त्याचे ब्राँझचे शिरस्त्राण जवळच्या फांदीवर लटकत होते आणि त्याची अवजड शस्त्रे कुरणातल्या गवतावर निष्क्रिय होऊन पडली होती. त्याच्या भोवती त्याच्या निवडीचे तरुण सैनिक उभे होते. अस्वस्थ आणि धापा टाकणारा

मेझेन्टिअस आपल्या मानेला विसावा देत होता, त्याची निगा राखलेली लांब दाढी खाली त्याची छाती झाकीत रुळत होती. तो सारखा लॉससची चौकशी करीत होता आणि त्याला परत बोलविण्याकरिता व त्याच्या दुःखी पित्याची आज्ञा त्याच्याकडे पोहचविण्याकरिता वरचेवर दूत पाठवीत होता. परंतु त्याच वेळी लॉससचे मित्र साश्रु नयनांनी त्याचा जबरदस्त जखमेने पाडाव केलेल्या त्या सामर्थ्यशाली योद्धयाचा-देह एका ढालीवरून आणीत होते. अशुभाच्या दुश्चिन्हाची चाहूल लागून मेझेन्टिअसने शोकाचे आवाज फार दूरवरुन ओळखले. मूठ मूठ मातीने त्याने आपली शुभ्र दाढी माखली. दोन्ही हात आकाशाकडे पसरले आणि नंतर आपल्या पुत्राच्या देहाला मिठी मारून तो म्हणालाः " मुला मला जगण्याच्या अनिवार्य वासनेने एवढे पछाडले होते का की तुला–मी जन्म दिलेल्या तुला–मला वाचविण्याकरिता शत्रूच्या हाताखाली माझी जागा मी घेऊ दिली? तुझा स्वतःचा पिता तुला झालेल्या जखमेने सुरक्षित राहिला काय? तू मेलास म्हणून मी जीवंत आहे काय? मी आत्यंतिक दुःखाने घेरला गेलो आहे रे! माझ्या हद्दपारीची खरी कटूता मला आताच उमगत आहे, आणि आता मात्र माझी जखम खोल खोल जात आहे. आणि शिवाय, मुला, माझ्या अपराधाने मीच तुझ्या नावाला कलंक लावला आहें, कारण मी संपादिलेल्या तिरस्कारातूनच माझ्या सिंहासनापासून आणि माझ्या पित्याने धारण केलेल्या राजदंडापासून मी हद्दपार झालो. म्हणून माझ्या पितृभूमीचा आणि माझ्या प्रजेच्या तिरस्काराचा मोबदला म्हणून मीच एक त्यांचे ऋण फेडण्यास बांधील होतो, आणि मी स्वेच्छेने प्रत्येक स्वरूपातील मृत्यू सोसण्याकरिता माझ्या अपराधी आत्म्याचा मीच त्याग करायला हवा होता. पण तरीही त्या ऐवजी मी जगत आहे, आणि अजूनही हा दिवसाचा प्रकाश आणि मानवजात सोडलेली नाही. पण त्यांचा त्याग मी करीनच करीन."

हे शद्ब बोलून त्याने स्वतःला जखमी झालेल्या मांडीच्या आधाराने उभे केले, आणि जरी खोल जखमेने त्याची शक्ती क्षीण होत जात होती आणि त्यामुळे त्याची हालचाल मंद होत होती, तरीही कच न खाता, त्याने आपला घोडा आणण्याची आज्ञा केली. या घोडयाचा त्याला मोठा अभिमान होता आणि तो त्याच्या मनःशांतीचें स्थान होते. आणि त्याच्या सर्व युद्धात विजयी होऊन तो याच घोडयावर स्वार होऊन घरी परतला होता. त्याच्याशी, दुःखातील त्याच्या सोबत्याशी, या शद्बांनी आरंभ करून, तो बोललाः 'तो शद्ब जर मर्त्य जीवाच्या ताब्यात असलेल्या कोणत्याही गोष्टीकरिता योजता येत असेल तर, ऱ्हिबस आपले आयुष्य दीर्घ होते. आज एक तर तू माझ्यासह लॉससच्या यातनांचा बदला

घेशील आणि विजयी होऊन इनीआसचे शिर आणि त्याच्या रक्ताने लांछित झालेली त्याच्या शस्त्रांची लूट परत आणण्यास मदत करशील; नाहीपेक्षा तो मार्ग अनुसरण्याची शक्ती आपल्यात उरली नसली तर तू माझ्याबरोबर मरशील; कारण माझ्या शूर मित्रा, मला माहित आहे कीं तू कधीही परक्यांच्या आज्ञांना किंवा ट्रोजन धन्याला मान वाकवण्याचा कमीपणा पत्करणार नाहीस." तो असे बोलला. तो खोगिरावर मटकन बसला, आपले पाय त्याने नेहमीच्या सवयीच्या लकबीने नीट ठेवले, आणि दोन्ही हातात तीक्ष्ण भाले घेतले. घोड्याच्या राठ केसांच्या तुऱ्याखाली ब्रॉन्झच्या चमकदारपणाने त्याचे शिर तळपत होते; आणि याप्रमाणे वेगाने दौडत तो समरांगणाच्या गर्दीत घुसला; त्या एका हृदयात शरम दुःख आणि पिसाटपणा या मिश्रभावना, सूडाच्या तीव्र ओढीने तडफडणारे प्रेम, आणि स्वतःचा पुरुषार्थ पूर्ण जाणणारे शौर्य यांच्या उधाण भरतीची एकच प्रचंड लाट उसळत होती. तीन वेळा त्याने इनीआसला मोठ्याने आव्हान केले. इनी-आसने तो पुकार निश्चितच ओळखला आणि आनंदाने त्याने प्रार्थना केली: "सर्वश्रेष्ठ देवपित्याला हे संमत असू दे, आणि अॅपोलोलाही हे संमत असू दे ... ये! होऊ देत दोन हात! आणि जवळ भीड!" त्याने अशी आपली इच्छा व्यक्त केली आणि उगारलेला भाला घेऊन शत्रूला तोंड देण्याकरिता तो पुढे सरसावला. परंतु मेझेन्टिअसने त्याला उत्तर दिले: "हे अत्यंत क्रूर वैऱ्या, माझ्या पुत्राला माझ्यापासून हिरावल्यावर तू मला कसले भय घालतोस? माझा सर्वनाश कर-ण्याचा एकमेव मार्ग तुला अगोदरच सापडला आहे. मला मृत्यूचे भय नाही आणि मी कुठल्याही देवाचा भरवसा धरीत नाही. म्हणून हे सारे थांबव. कारण मी मरणाला सिद्ध होऊनच आलो आहे; आणि प्रथम मी तुला भेटी आणल्या आहेत." या शब्दांनी त्याने आपल्या शत्रूवर एक अस्त्र फेकले, आणि नंतर दुसरे, त्याशिवाय तिसरे, आणि तो मोठ्या वर्तुळात दौडत असताना त्याने ती शस्त्रे इनीआसच्या ढालीत रुतविली; परंतु ढालीच्या सुवर्णमध्याने ती सारी पेलली, आणि इनीआस अविचल खडा राहिला: सतत अस्त्रे फेकीत तीन वेळा मेझेन्टिअस डाव्या बाजूने शत्रूभोवती वर्तुळाकार दौडला; आणि तीन वेळा सारखे वळताना, ट्रॉयच्या वीराने आपल्या संरक्षक ढालीच्या ब्रॉन्झमधे रुतलेल्या भाल्यांचे विद्रूप अरण्य आपल्या-बरोबर गोल गोल फिरविले. शेवटी ती शस्त्रांची टोके उपटून काढण्याचा कंटाळा येऊन आणि या विषम संघर्षात झुंजण्याचा ताण पडून, काय करावे याचा काळजीपूर्वक विचार करून, तो पुढे झेपावला, आणि त्याने आपला भाला त्या लढाऊ घोड्याच्या कानशिलांच्या मध्यावर फेकला. तो चतुष्पाद आपल्या खुरांनी हवेत लाथा झाडत थेट वर उडाला, आपल्या स्वाराला त्याने खाली फेकले

आणि त्याला जमिनीवर चेपीत त्याच्या अंगावर तो कोसळला, आणि डोके पुढे करून कोसळत घायाळ खांद्यावर निश्चल पडून राहिला.

ट्रोजनांनी आणि लॅटिनांनी, दोघांनीही, आपल्या भावनोत्कट आरोळ्यांनी आकाश उठवले. इनीआस मेझेन्टिअसकडे धावला, त्याने म्यानातून खड्ग सटकन उपसले, आणि त्याच्यावर उभे राहून म्हणाला : "तो पूर्वीचा तापट मेझेन्टिअस आणि त्याच्या पिसाट मनीषेचा क्रुद्ध आवेग-तो कुठे आहे आता ?" त्या इट्रुस्कनने आकाशाकडे पाहिले आणि हवा फुप्फुसांत भरून घेतली; आणि भानावर येऊन त्याने उत्तर दिले : "निर्दय वैऱ्या, माझी चेष्टा का करतोस ? मरणाचे भय मला का घालतोस ? हत्या करण्यात पाप नाही; या असल्या भावनेने मी युद्ध करण्याकरिता आलो नाही; आणि लॉससनेही तुझ्या माझ्यामध्ये असला करार केला नाही. परंतु जर पराभूत शत्रूच्या इच्छा पुरवणे शक्य होत असेल, तर मी तुला एकच विनंती करतो; माझ्या देहाला मातीचे आवरण मिळू दे, मला माहित आहे की माझ्याच लोकांच्या तीव्र तिरस्काराचा वेढा माझ्याभोवती आहे. मी तुला विनवणी करतो की त्यांचा पिसाट क्रोध माझ्यापासून दूर ठेव. आणि मला माझ्या मुलासह एका समाधीत आसरा मिळू दे." तो असे म्हणाला आणि हेतुपुरःसर त्याने आपला कंठ त्या शस्त्राच्या टोकापुढे धरला; आणि रक्ताच्या लोटात त्याने आपले प्राण आपल्या शस्त्रांवर उधळले.

सर्ग अकरावा

# युध्द सभा: पुन: घनघोर युद्ध

दुसऱ्या दिवसाची उगवती पहाट सागरातून वर आली होती. मृत्यूच्या विचारांनी भारावलेल्या इनीआसने आपला वेळ साहाजिकच आपल्या साथीदारांच्या अंत्यकर्मात व्यतीत करणे पसंत केले असते. परंतु पूर्वेकडून आलेल्या पहिल्या प्रकाशकिरणांबरोबर आपल्या विजयाप्रीत्यर्थ देवांची व्रते पूर्ण करण्यास त्याने प्रारंभ केला. त्याने एका बळकट ओकवृक्षाच्या खांद्या कापल्या. एका मातीच्या ढिगावर तो उभा करून ठेवला आणि सेनाप्रमुख मेझेन्टिअसपासून लुटलेल्या लखलखीत शस्त्रांनी, युद्धामधे ज्याचे सामर्थ्य प्रकट होते त्या देवाचे विजयचिन्ह म्हणून त्या वृक्षाला सजविले. त्याच्यावर त्याने मेझेन्टिअसचा रक्तलांछित शिरपेच, त्याचे मोडलेले भाले, आणि त्याचे छिन्नभिन्न झालेले, बारा वेळा भेदलेले उरस्त्राण ठेवले. त्या विजयचिन्हाच्या डाव्या बाजूला त्याने ती ब्राँझची ढाल बांधली आणि शेवटी त्याने हस्तीदंताची मूठ असलेले ते खड्ग त्याच्या गळ्यात अडकविले. नंतर तो आपल्या सहकाऱ्यांना उद्देशून प्रोत्साहनाचे शब्द बोलला, कारण त्याचे सर्व सेनाधिकारी त्याच्याभोवती गर्दी करून होते. "माझ्या मित्रांनो, फार मोठे यश आपण मिळविले आहे. पुढच्या कार्याविषयीची धास्ती मनातून काढून टाका. एका उद्दाम राजाकडून लुटलेली ही शस्त्रे विजयाची पहिली फळे आहेत; इथे तुमच्यापुढे मी माझ्या हाताने साकार केलेला मेझेन्टिअस उभा आहे आता आपण राजा लॅटिनसवर आणि लॅटिनवर नगरीच्या तटभितीवर चाल करून जायला हवे. खऱ्या योद्ध्याप्रमाणे आपल्या शस्त्राची निगा राखा आणि पुन: युद्ध सुरु होण्याची प्रतिक्षा करा म्हणजे आपली निशाणे जमिनीतून उपटून काढून छावणीतून आपले सैन्य घेऊन चढाई करण्याची सर्वोच्च शक्तींनी अनुज्ञा दिल्यावर कोणत्याही अज्ञानी आशंकेने किंवा भ्याडपणे दिलेल्या सावधगिरीच्या सल्ल्याने आपल्या द्रुतगतीत अडथळा येणार नाही. परंतु तोवर पूर्वी आपले साथीदार असलेल्या या

दफन न केलेल्या देहांना माती देऊ या. कारण एवढेच सौजन्य अँकेरॉनच्या काठावरील खोल खोल विवरात त्यांच्यापर्यंत पोहोचणे शक्य आहे.' आणि नंतर तो म्हणाला, "जा आणि ज्यांनी प्राणपणाने आपले रक्त सांडून ही नवी भूमी आपल्याकरिता जिंकली त्या दिव्य आत्म्यांना शेवटची श्रद्धांजली वहा आणि प्रथम आता शोकनगरी बनलेल्या इव्हँडरच्या नगरीत पॅलसचा देह पोहोचवा; त्याला हिरावून नेणारा तो काळा दिवस जेव्हा आला आणि त्याने अकालीच त्याला कराल मृत्यूमुखात लोटले त्यावेळी पॅलसच्या ठायी शौर्याची वाण नव्हती."

तो असे बोलला आणि त्याने अश्रू ढाळले. नंतर तो ज्या तंबूच्यापुढे पॅलसचा निष्प्राण देह ठेवला होता तिकडे परत चालत गेला. इव्हॅन्डरच्या आर्केडिअन काळात त्याचा शिलेदार असलेला परंतु नंतर पॅलसबरोबर लाडक्या पाल्याचा नेमलेला सोबती म्हणून शेवटी अत्यंत अशुभ ठरलेली जबाबदारी स्वीकारलेला अॅकोइटीझ तिथे पहारा करीत होता पॅलसच्या पदरच्या सर्व अनुयायांची तुकडी आणि ट्रोजनांचा प्रचंड समुदाय आणि त्यांच्याबरोबर इलिअमच्या सर्व स्त्रिया या विधीकरिता केस मोकळे सोडून एकत्र जमल्या होत्या, परंतु जेव्हा त्या उंच प्रवेशद्वारात इनीआस पावले टाकीत आला तेव्हा त्या सर्वांनी आपल्या वक्षावर मुष्ठीप्रहार केले आणि तो शाहीतंबू गंभीर शोकस्वराने घुमत असता, त्यांनी उच्चस्वरानी आकाशापर्यंत उंचविलेला शोक अतिदारुण होता. इनीआसने पॅलसच्या उशीवर विसावलेल्या मस्तकाकडे, त्याच्या हिमधवल मुखाकडे आणि इटॅलिअन भाल्याने त्याच्या घोटीव छातीवर केलेल्या रुंद जखमेकडे पाहिले. त्याच्या नेत्रात अश्रू उभे राहिले आणि तो म्हणाला : 'अरेरे ! दीनवाण्या मुला, भाग्यदेवता तुझ्याकडे स्मित करीत आली; मग मत्सरामुळे का तिने प्रस्थापित होणारे माझे राज्य तुला पाहू न देता, किंवा विजयी होऊन अश्वारूढ होऊन तुझ्या मातापित्याच्या घरी परत दौडत जाऊ न देता तुला माझ्यापासून निष्ठुरपणे हिरावून नेले? ज्यावेळी तुझ्या पित्याने, इव्हॅन्डरने मला मिठी मारली आणि महासाम्राज्य जिंकण्याकरिता माझी पाठवणी करताना चिंताग्रस्त होऊन सूचना दिली की माझे शत्रू शूर आहेत आणि एका कणखर जमातीशी आम्हाला युद्ध करावे लागणार आहे, त्यावेळी निघताना मी तुझ्याविषयी तुझ्या पित्याला दिलेली आश्वासने किती वेगळी होती ! खोटया आशेने पार फसून इव्हॅन्डर आताही वेदींवर बळीचा खच करून नवस करीत असेल आणि इकडे आम्ही अर्थहीन इतमामाने, आता कोणत्याही स्वर्गीय शक्तीचे कसलेही देणे लागत नसलेल्या त्याच्या गतप्राण पुत्राला दुःखाने घेऊन जात आहोत. अरेरे ! आपल्या पुत्राचे,

काळीज पिळवटून काढणारे अंत्यकर्म पाहण्याचे नशीबी आलेला तो दुर्दैवी पिता ! ज्याच्यावर आमच्या आशा केन्द्रित झाल्या होत्या ते विजयाने स्वगृही पुनरागमन ते शेवटी हेच का ? मी गंभीर उत्कटतेने दिलेली आश्वासने अशीच पुरी होणार होती का ? परंतु इव्हॅन्डर, तुला पराभूत झालेल्या, शरमेच्या लांछनास्पद जखमा असलेल्या सैनिक पुत्राला पहावे लागणार नाही, आपला पुत्र सुरक्षित घरी परतला म्हणून शापित मृत्यूची आराधना करावी लागणारा पिता तू असणार नाहीस. हे इटली ! ज्या रक्षणकर्त्याच्या मृत्यूचा तू शोक करीत आहेस तो सामर्थ्यशाली होता; आणि आयुलस, तुझीही हानी अपरिमित आहे."

त्याचा शोक संपल्यावर इनीआसने तो दीनवाणा देह उचलण्याची आज्ञा दिली. आपल्या सर्वसेनेतून त्याने एक सहस्त्र माणसांची निवड केली, आणि त्यांना त्याने अंत्यविधीस उपस्थित राहण्याकरिता व पित्याच्या शोकात सहभागी होण्याकरिता पाठविले, एवढ्या दारुण दुःखाचे हे किंचितच सांत्वन होते. परंतु एका पित्याच्या दुःखद अवस्थेत हे एवढे तरी करणे आवश्यकच होते. हातामध्ये चापल्य असलेल्या काहींनी रानस्ट्रॉबेरीच्या डहाळ्या आणि ओकवृक्षाच्या फांद्या गुंफून लवचिक वेताची डोली तयार केली व तीवर उंच शय्या पसरली आणि पर्णयुक्त डहाळ्यांचे छत तयार करून त्यावर सावली केली. इथे त्यांनी त्या तरुण योद्ध्याला त्या खडबडीत शय्येवर इतमामाने ठेवले. तो एखाद्या रमणीने तर्जनीने आणि आंगठ्याने खुडलेल्या पुष्पासारखा होता, एखादे मृदु व्हॉयलेट पुष्प किंवा एखादे मान टाकलेले हायासिंथ पुष्प, जीवनाचा तजेला नसलेले, कोमेजून जात असलेले, जरी त्याचा नैसर्गिक आकार अजून कायम असला तरी त्याची धरणी माता त्याचे आता पोषण करीत नाही आणि त्याला नवी शक्ति देत नाही, अशा फुलासारखा पॅलस दिसत होता. इनीआसने नंतर सिडॉनिअन डायडोने आपल्या कौशल्याच्या आनंदात जरीचे भरतकाम केलेली आणि उभ्या धाग्यात सुवर्णाचे तंतू भरून त्याच्याकरिता ताठ अशी विणलेली दोन जांभळी वस्त्रे आणली. मोठ्या दुःखाने शेवटची आदरांजली म्हणून त्याने एका वस्त्रात त्या युवकाचा देह गुंडाळला आणि दुसऱ्या वस्त्राने त्याच्या मस्तकावर आणि चितेवर लवकरच जळणार असलेल्या कुंतलांवर आवरण घातले, आणि पॅलसने लॉरेन्टाईन युद्धात जिंकलेल्या असंख्य विजयचिन्हांची उंच रास केली आणि त्याने स्वतः केलेली लूट एकामागून एक अशा लांब रांगातून पुढे आणण्याची आज्ञा केली. पॅलसने आपल्या शत्रूंपासून जिंकलेले घोडे आणि शस्त्रांचाही त्यात समावेश केला. आणि याशिवाय त्याच्या आत्म्याला मृत्यूसमयी बळी दिले जाणारे, मागे हात

बांधलेले युद्धबंदी, ज्यांचा वध करून त्यांचे रक्त चितेच्या अग्नीवर शिंपडले जाणार होते तेही तयार केले होते. नंतर त्याने शत्रूसेनाधिकाऱ्यांची तिरस्कृत नावे चिकटवलेली व त्यांच्या शस्त्रानी सजवलेली, त्यांचे प्रत्यक्ष अस्तित्व सूचित करणारी अशी खोडे घेऊन मृतदेहामागे चालण्यास आपल्या माणसांना आज्ञा केली. वार्धक्याने क्षीण झालेला दयनीय अॅकोइटीझ कधी आपल्या छातीवर मुष्ठी-प्रहार करीत तर कधी नखानी आपला चेहरा ओरबाडीत मिरवणुकीतून चालला होता. शेवटी तो खाली कोसळला आणि हातपाय पसरून जमिनीवर आडवा झाला. रुटुलिअन रक्ताने चिंब झालेले रथही त्याने मिरवणुकीतून चालविले होते. मागून एथॉन, पॅलसचा घोडा, नित्याच्या अलंकाराशिवाय आणि टपोऱ्या अश्रूबिंदूंनी आपले मुख भिजवीत चालला होता. पॅलसचा भाला आणि शिरस्त्राण घेऊनही माणसे चालली होती; त्याची इतर शस्त्रे विजयी टर्नसकडे होती. त्यानंतर शोक करणारा प्रचंड समुदाय-ट्रोजन, सर्व इट्रुस्कन, आणि आर्केडिअन, आपली शस्त्रे उलटी धरून चालले होते. सर्व मिरवणूक बरीच पुढे गेल्यावर इनीआस थांबला आणि एक खोल निश्वास सोडून पुनः म्हणाला : 'युद्धाच्या याच उग्र दैवगतीने आम्हाला आता इथून दुसऱ्या अश्रूंकडे बोलविले आहे. पॅलस, श्रेष्ठ योध्दया, मी तुला चिरंतन अभिवादन करतो आणि कायमचा निरोप घेतो. अधिक न बोलता तो आपल्या उंच संरक्षक भिंतीकडे वळला आणि चालत परत त्याच्या छावणीत गेला.

या वेळेपर्यन्त लॅटिन नगरीकडून राजदूत आले होते. त्यांनी ऑलिव्हच्या फांद्यांचे गुच्छ आणले होते. आणि त्यांनी इनीआसजवळ एका दयेची याचना केली; आणि खड्गाने कामास आलेले आणि रणांगणावर पडलेले त्यांचे मृत सैनिक त्यांच्याकडे परत पाठविण्याची आणि मृतांना समाधीत शांती मिळू देण्याची विनंती केली. आकाशीच्या सूर्यप्रकाशातून निघून गेलेल्या पराजितांशी आता कसलाही कलह उरू नये असे विनवून, ज्यांना त्याने त्याच्या वाग्दत्त वधूचे संबंधित म्हणून एकदा म्हटले होते त्या त्याच्या एकेकाळच्या यजमानांविषयी त्याने दयार्द्र बुद्धी दाखवावी अशी त्यांनी इनीआसला विनंती केली. इनीआस त्यांची विनंती झिडकारू शकला नाही आणि त्याने तत्पर दयार्द्रतेने आपली अनुमती दिली. त्याहीपुढे जाऊन तो म्हणाला : "लॅटिनहो, जे भयंकर युद्ध तुम्हाला आमच्या मैत्रीपासून मागे खेचते आहे त्यामध्ये तुम्ही किती अन्यायाने व अनिच्छेने गुंतले गेले आहात ! तुम्ही मार्सच्या युद्धात योगायोगाने निष्प्राण झालेल्यांकरिता माझ्याकडे दयेची याचना करता? मी तर ती जीवंत माणसांनाही आनंदाने दिली!

असती ! मी इथे आलो ते दैवाने मला इथे वसती करण्याकरिता जागा देऊ केली म्हणूनच. शिवाय मी झुंजत आहे ते तुमच्या संपूर्ण राष्ट्राशी नाही. ज्याने माझ्याशी जोडलेल्या अभ्यागत मैत्रीचा त्याग केला आणि त्याऐवजी टर्नसच्या शस्त्रांवर विसंबून राहण्याचे ठरविले त्या तुमच्या राजाशी माझे युद्ध आहे. ही माणसे जे मरण मेली त्याला टर्नसने स्वत: तोंड दिले असते तर ते अधिक न्याय्य झाले असते. शस्त्र–बलावरच या युद्धाचा शेवट करण्याचा आणि ट्रोजनांचा संपूर्ण नाश करण्याचा टर्नसचा हेतू असेल तर माझ्याशी द्वंद्वयुद्ध करण्याचे त्याने मान्य केले असते तर ते अधिक योग्य झाले असते. आम्हा दोघापैकी तोच जगला असता की ज्याला देवाने किंवा त्याच्या दक्षिण बाहूने जीवदान दिले असते! परंतु आपण आता चला आणि आपल्या दुर्दैवी देशबांधवांना अग्नी द्या. "

इनीआस बोलल्या नंतर त्याचे श्रोते एकदम अवाक् झाले. नि:शब्द आश्चर्याने त्यांनी वळून परस्परांकडे पाहिले. आणि एकही शब्द ते बोलले नाहीत, नंतर कडवेपणे तरुण टर्नसवर नेहमी जळणाऱ्या आणि सतत निंदेने आणि द्वेषाने टर्नसचा पाठपुरावा करणाऱ्या त्यांच्यापैकी वडील अशा ड्रॅन्सेसने उत्तर देण्याकरिता आपले ओठ उघडले, आणि तो बोलू लागला " ज्याचे रणांगणावरील श्रेष्ठ कर्तृत्व त्याच्या अलौकिक कीर्तीलाही मागे टाकते त्या ट्रोजन पुरुषोत्तमा, तुझी थोरवी आकाशापर्यन्त उंचविण्यासाठीं कुठल्या प्रकारच्या प्रशंसोद्‌गारांची मी निवड करू? मी मुख्यत: तुझ्या न्यायबुद्धीकरिता तुझे कौतुक करावे की युद्धातील तुझ्या कणखरपणाबद्दल? आमच्या पुरते म्हणशील तर आमच्या पूर्वजांच्या नगरीला तुझे उत्तर घेऊन जाण्यात आम्हाला अत्यानंदच होत आहे. आणि दैवाने आम्हाला मार्ग उपलब्ध करून दिला तर आम्ही आमचा राजा लॅटिनस याचा तुझ्याशी स्नेह घडवून आणू. टर्नसला हवा असल्यास स्वत:चा शांतता संधी आपल्या पुरता करू दे. खरोखर नवे ट्रॉय उभविण्यास सहाय्य करण्याकरिता आमच्या स्वत:च्या खांद्यावरून दगड वाहून नेऊन दैवाने नियुक्त केलेल्या उंच खंबीर भिंती उभ्या करण्यातही आम्हाला सुख होईल. " त्याचे बोलणे संपल्यावर एकच घोषणा मोठ्याने करून सर्वच त्याच्याशी सहमत झाले. बारा दिवस टिकणारा शस्त्रसंधी त्यांनी केला. शांततेने अटी पाळल्या गेल्या आणि ट्रोजन आणि लॅटिन, वनातून किंवा पर्वतउतरणीवरून एकत्र भटकताना कुणालाही अपाय न होता परस्परांशी मिळून मिसळून वागू लागले. लोखडी दुधारी कुऱ्हाडीचे धाव ॲश वृक्षांवर घुमू लागले. आकाशात उंच गेलेले पाईन वृक्ष त्यांनी उन्मळून पाडले. न शिणता त्यांनी पाचरी ठोकून कठीण ओकवृक्ष व सुगंधी देवद्वार फोडले. आणि ओझ्यांनी कुरकुरणाऱ्या गाड्यां-वरून रोवनवृक्ष वाहून नेले.

परंतु नुकतेच पॅलसच्या लॅशिअममधील यशाचे वृत्तांत आणणाऱ्या वदंतेने आता इव्हॅन्डरचे आणि त्याच्या प्रासादाचे आणि सर्व नगरीचे अंत:करण विद्ध करण्याकरिता त्या दु:खाचे पहिले वृत्त घेऊन जाण्याकरिता पंख धारण केले. त्यांच्या प्राचीन प्रथेनुसार अंत्ययात्रेत वापरावयाचे पलिते घेऊन आर्केडिअन गडबडीने त्यांच्या वेशीकडे धावले. त्यांच्या पलित्यांनी उजळलेल्या मार्गाची दूरवर पसरलेली रेषा तो प्रदेश दुभंगणारी रुंद प्रकाश-शलाका झाली. त्यांना भेटण्या-करिता ट्रोजन मिरवणूक पुढे झाली आणि दोन्ही मिळून तो एकच हेलावणारा शोक करणारांचा समुदाय झाला. ते घरांजवळ येतांना मातांना दिसताच त्यांच्या आक्रोशाने ती नगरी दु:खाने पेटून उठली. पण नंतर इव्हॅन्डरला कुठलाच संयम आवरू शकला नाही. तो धावत मध्ये घुसला आणि ती डोली धरणीवर उतर-विताच त्याने आपले शरीर पॅलसच्या देहावर झोकून दिले आणि रडत आणि हुंदके देत त्याने त्याला मिठी घातली. आणि शेवटी बऱ्याच काळानंतर मोठ्या प्रयासाने दु:खाने त्याच्या आवाजाला मार्ग मोकळा करून दिला. 'हाय! पॅलेस! तू मार्सच्या क्रौर्यावर कितपत विश्वास टाकावा याची तू खबरदारी घेशील असे आश्वासन देतांना तू मला, तुझ्या पित्याला, वचन दिले होतेस ते हे नव्हे. तरीहीं यौवनसुलभ सहजप्रवृत्त यौद्ध्याची गर्ववृत्ती किती प्रखर असते आणि पहिल्याच समरप्रसंगात मिळविलेला सन्मान किती परमावधीचा मधुर असतो याची मला जाणीव आहे. अरेरे, युवाजीवनाची पहिली फळे किती दु:खद ठरली ही! आमच्या घराशी अगदी येऊन भिडलेल्या या युद्धाचे धडे किती दुर्धर ठरले! आणि एकाही देवाने माझे नवस आणि प्रार्थना ऐकल्या नाहीत. आणि तू--माझ्या आदरणीय आणि पूज्य राज्ञी--तुझ्या मृत्यूने तू किती भाग्यवान ठरली आहेस! कारण हे दु:ख अनुभविण्यास तू जगलीच नाहीस! परंतु मी मात्र तसा भाग्यवान नाही; मी माझ्यावर दैवावर मात करून माझ्या वाट्याला आलेल्या आयुष्यापेक्षा जास्त जगलो तो केवळ पुत्रहीन पिता म्हणून जगण्या करिताच! माझ्या ट्रोजन मित्रांच्या शस्त्रांमागून मुलाऐवजी मीच गेलो असतो तर! आणि रुटुलिअन शस्त्रांच्या वर्षावाखाली दडपून जाऊन मीच धारातीर्थी पडलो असतो तर! जर मीच स्वेच्छेने माझ्या प्राणाचा त्याग केला असता, आणि मग ही मिरवणूक मला, पॅलसला नव्हे, घरी घेऊन आली असती तर! परंतु ट्रोजनांनो, मी तुम्हाला दूषण लावणार नाही, किंवा आपल्या संधीलाही नाही, आणि अभ्यागतं मैत्रीत शपथ घेतांना उंचावलेल्या आपल्या हातांनाही नाही. ज्या सर्वनाशाचे वृत्त तुम्ही मजकडे आणीत आहात तो माझ्या वृद्धापकाळात माझ्यावर कोसळावा हे पूर्व नियोजितच होते आणि आरंभा-पासूनच माझ्या दैवभोगासाठी राखून ठेवले होते; आणि, माझ्या पुत्राला तारुण्यातच

मृत्यू प्राप्त व्हावा हे जर केव्हाही अनिवार्य होते, तर तेव्हा तो धारातीर्थी पडला तेव्हा तो ट्रोजनांना लँशिअमला पोहोचण्यास सहाय्य करीत होता आणि त्याने त्या पूर्वी असंख्य व्होल्स्किअनांचा वध केला होता याचे स्मरण करून मला निदान माझे सांत्वन करू दे; आणि पॅलस, सत्यशील इनीआसने फ्रिजियाच्या उमरावांनी, इट्रुस्कन राजपुरुषांनी आणि त्यांच्या संपूर्ण सेनेने तुझ्यासाठी काढलेल्या अंत्ययात्रेहून अधिक इतमामाची अंत्ययात्रा मी तुझ्यासाठी काढू शकलो असतो काय? तुझ्या विजयाचे भव्य स्मारक म्हणून, तुझ्या दक्षिण बाहूने मृत्युमुखी लोटलेले बळी त्यांनी बरोबर आणले आहेत; आणि टर्नस, तुलाही, त्याचे वय तुझ्याइतके असते, आणि त्या वाढीव वर्षांनी तुझ्यासारखेच त्यालाही सामर्थ्य दिले असते तर तूही तुझ्या शस्त्रांनी आच्छादिलेल्या एका प्रचंड वृक्षाच्या खोडाच्या रूपात आता इथे उभा राहिला असतास! परंतु मी माझ्या खाजगी दुःखाने ट्रोजनांना युद्धापासून दूर ठेवता कामा नये, कारण आता तुम्हाला कूच करायला हवे; आणि या संदेशात माझे उत्तर तुमच्या राजाकडे काळजीपूर्वक घेऊन चला; "टर्नसचा मृत्यू,– हे पित्याचे आणि पुत्राचे देणे आता तुझ्या शौर्याच्या शिरी आहे. पॅलसच्या मृत्यूने मला घृणास्पद झालेले हे जीवन मी केवळ त्याकरिताच लांबवीत आहे; आणि टर्नसचा मृत्यू हा तुझ्या स्वतःच्या विजयप्राप्तीची एकमेव संधी आणि माझ्याकरिता तू करू शकशील असे एकच सत्कृत्यही आहे. मी माझ्याकरिता जीवनाकडून कोणताही आनंद अपेक्षीत नाही; ते पाप होईल; परंतु पाताललोकातील माझ्या पुत्राला थोडा आनंद देण्याची अपेक्षा मी करीत आहे."

त्यावेळीच उषेने आपला चैतन्यदायी प्रकाश, दयनीय मानवजातीकरिता, त्यांची कामे आणि त्यांचे कष्ट त्यांच्याकडे परत आणीत वर उंचावला. प्रमुख इनीआस याने आणि राजा टारकॉनने समुद्र किनाऱ्याच्या वळणाने चिता रचल्या होत्या. आपल्या पूर्वजांच्या प्रथेचे अनुकरण करून लोकांनी आपल्या मृतांचे देह तिथे आणले. काळा धूर ओकणारे पलिते चितांच्या तळाशी लावण्यात आले. आणि उंच आकाश त्या धुराने काजळून गेले. नंतर आपली चकचकीत शस्त्रे कमरेभोवती लटकवून त्यांनी भडकलेल्या चितांना तीन प्रदक्षिणा घातल्या; तीनवेळा त्यांनी विधीपूर्वक त्या मृतांच्या शोकाग्नीभोवती घोडदौड केली; आणि त्यांच्या ओठातून आक्रोश उमटला. धरणी आणि त्यांचे शस्त्रेही त्यांच्या अश्रूंनी भिजली होती. माणसांचा आक्रोश आणि रणभेरीचे निनाद आकाशाला भिडले. नंतर मारल्या गेलेल्या लॅटिनांच्या अंगावरून ओरबाडून काढलेली लूट, शिरस्त्राणे, उमदी खड्गे, कमरबंद, कण्यावर घासून तापलेली चाके काहींनी चितांवर फेकली;

आणि दुसऱ्या काही जणांनी मृतांच्या मालकीच्या आवडत्या वस्तू,-ज्यांचा त्यांना काही उपयोग झाला नव्हता अशा-ढाली आणि शस्त्रे आहुती म्हणून टाकली. बरेच धिप्पाड बैल तिथे मृत्युदेवाला बळी म्हणून मारण्यात आले. राठ केस असलेल्या वराहांचे व मेंढ्यांचे कंठ चिरले गेले, चिताग्नीवर रक्त शिंपडण्याकरिता प्रत्येक शेतवाडीतून हे पशु लुटून आणले होते. सर्व किनाऱ्याच्या बाजूबाजूंनी आता त्यांनी आपल्या मित्रांचे दहन होताना पाहिले; अर्धवट जळलेल्या चितांवर त्यांनी रक्षक ठेवले, आणि तेजस्वी चांदण्या जडविलेल्या आकाशात आर्द्र निशा पुरी प्रदक्षिणा करीपर्यंत त्यांना दहनभूमीतून पाय काढवेना.

इतरत्र दुर्दैवी लॅटिनांनीही असंख्य चिता रचल्या. त्यांच्या मृतांपैकी काहींचे,-आणि तसे ते पुष्कळच होते-त्यांनी दफन केले, आणि इतरांची प्रेते त्यांच्या त्यांच्या नगरीत त्यांच्या घरी पाठविण्याकरिता जवळच्या मैदानावर हलविली. हत्याकांडाच्या अस्ताव्यस्त, प्रचंड खचातील उरलेल्या प्रेतांना गणती न करताच त्यांनी भडाग्नी दिला. भडकलेल्या चितांच्या समूहाच्या भक्षणोत्सुक ज्वाला प्रदेशभर दूरवर सर्वत्र लवलवत होत्या. तिसऱ्या पहाटेने निशेची आर्द्र-छाया आकाशातून दूर केल्यावरच त्यांनी जिथे अग्नी धुमसत होता व अस्थी विखुरल्या होत्या तिथले राखेचे ढीग सावडण्यास सुरवात केली; आणि नंतर त्यांनी त्या अस्थींवर अजूनही तप्त असलेल्या मातीचा ढीग रचला.

परंतु त्यावेळी संपन्न लॅटिनसच्या नगरीतील घरातील आक्रोश अति दारुण होता, आणि तेथील दीर्घ, विव्हल शोकसूर पराकोटीला पोहोचले होते. इथे माता आणि त्यांच्या पुत्रांच्या अभागी वधू, शोकाने व्याकूल झालेली बहिणींची अंत:करणे, आणि पित्यांना वंचित झालेली अनाथ बालके होती. या रानटी युद्धाला आणि टर्नसच्या संकल्पित विवाहयोजनेला त्यांनी शिव्याशाप दिले, इटलीच्या अत्यंत मानवंत राजसिंहासनावर टर्नस अग्रहक्क सांगत असल्यामुळे त्यानेच एकट्याने द्वंद्वयुद्धात त्याचा निर्णय करून घ्यावा अशी मागणी त्यांनी केली. आणि इनीआसचे आव्हान आणि द्वंद्वयुद्धाचे आमंत्रण केवळ टर्नसलाच आहे असे हिरीरीने सांगून ड्रँन्सेसने या मागणीला बळकटी आणली. त्याचबरोबर विरोधी वक्तव्या-तून भाषणातून टर्नसच्या बाजूनेही विविध युक्तिवाद करण्यात आले. शिवाय तो राणीच्या शाही अधिकारकक्षेच्या सुरक्षित छायेत होता, आणि त्याची स्वत:ची श्रेष्ठ कीर्ती आणि त्याने जिंकलेली विजयचिन्हे यामुळे त्याच्या हक्काला मोठा आधार प्राप्त झाला होता.

या सर्व अशांततेत आणि अंतर्गत दुहीची आग कमालीची भडकली असता या सर्वांवर कळस म्हणून डायोमिडच्या उत्तराने कष्टी होऊन त्याच्या बलिष्ठ नगरीला पाठविलेले राजदूत परत आले. एवढे सगळे प्रयत्न खर्ची घालून कार्यभाग काहीच साधला नव्हता. नजराण्यांचा, सुवर्णाचा आणि कळकळीच्या विनवण्यांचा काहीच परिणाम झाला नव्हता; लॅटिनांना दुसरीकडून युद्धसहाय्य मिळविणे किंवा ट्रोजन राजाबरोबर शांततासंधीची बोलणी करणे क्रमप्राप्त होते. या घोर निराशेखाली राजा लॅटिनस पार खचून गेला होता. त्याच्या डोळ्यादेखत नुकत्याच रचलेल्या समाध्या परमेश्वराच्या प्रकोपांची साक्ष होत्या व इनीआस हाच निर्विवाद, देवांच्या इच्छेनेच भाग्यशाली पुरूषोत्तम ठरणार आहे अशी सूचना देत होत्या म्हणून राजा लॅटिनसने आदेश पाठवून निमंत्रित केलेल्या राज्यातील सर्व श्रेष्ठ नगरजनांची महासभा त्याच्या प्रासादाच्या भव्य प्रवेशद्वारांच्या आत जमली. गजबजलेल्या वाटांनी सभाजन मोठ्या जमावाने प्रासादाकडे येऊन एकत्र झाले. सर्वांत अधिक वयोवृद्ध असलेला आणि सर्वश्रेष्ठ राजदंड धारण करणारा लॅटिनस कष्टी मुद्रेने त्यांच्यामधे बसला. ताबडतोब त्याने इटोलिअन नगरीहून परत पाठविलेल्या राजदूतांना सभेत उपस्थित होऊन आपले निवेदन करण्याची आज्ञा केली. त्याने विचारलेल्या सर्व प्रश्नांची सविस्तर उत्तरे त्यांच्याकडून राजाला हवी होती. सभेतील परस्पर संवाद एकदम बंद झाले. राजाज्ञा मानून व्हेन्यूलसने चर्चेस प्रारंभ केला, तो म्हणाला:

'देशबांधव हो, आम्ही डायोमिडला भेटलो आणि त्याची आर्गाईव्हची छावणीही पाहिली. प्रवासातील सर्व दिव्यांतून पार पडून आम्ही आमचा प्रवास पूर्ण केला व ज्या हाताने इलिअम भूमीचा नाश केला साक्षात त्या हाताला आम्ही स्पर्श केला. आपला विजय संपादन करून झाल्यावर गॅरगॅनस जवळील आयापिजिअन भूमीतील त्याच्या पूर्वजांच्या वंशावरून नामकरण केलेल्या आर्गिरिपा या नगरीच्या रचनेत डायोमिड दंग होता. आम्हाला त्याच्याकडे नेण्यात आले, व त्याच्याशी मोकळेपणे बोलता आले. आम्ही आमचे नजराणे सादर केले, आणि आम्ही आमची नावे सांगितली पितृभूमीचे नाव सांगितले, आम्हावर कुणी युद्ध पुकारले ते सांगितले. आणि आपिला येण्यातील आमचा उद्देश स्पष्ट केला. त्याने सर्व ऐकून घेतले आणि प्रसन्न गंभीर मुद्रेने उत्तर दिले. 'वा! हे सॅटर्नच्या राज्यातील, भाग्यशाली राष्ट्रांनो. ऑसोनिआच्या प्राचीन परंपरेतील जनहो, कोणत्या असाधारण घटनेने तुमची शांतता भंग पावली आहे आणि शस्त्रसंघर्षाविषयी अत्यल्प ज्ञान असलेल्या तुम्हाला युद्धाला प्रवृत्त केले आहे? आमच्यापैकी

ज्यांनी इलिअमच्या भूमीवर शस्त्रबलान अत्याचार केला, ज्यांची डायमलासुद्धा दया आली असती,–त्या सर्वांनी सर्व जगभर आपल्या पापाचे पूर्ण मोल अनुच्चारणीय प्रायश्चितांनी मोजले आहे. दूरस्थ सिमॉईस नदीने आपल्या पोटात घेतलेल्या वीरांच्याविषयी किंवा ट्रॉयच्या उत्तुंग तटबंदीच्या तळाशी झुंजत असतांना ज्या बिकट आपत्ती आम्हाला सोसाव्या लागल्या त्यांच्या विषयी बोलण्याचे प्रयोजनच नाही. मिनर्व्हाच्या अस्तमान ताऱ्याला आणि त्या युबिअन भूशिराला, त्या खुनशी कॅफिरिअसला ती कहाणी माहीत आहे. त्या मोहिमेनंतर आम्ही दूर-दूरच्या किनाऱ्यावर विखुरलो, अँत्रिअसच्या पुत्राला, मेनेलॉसला तर डोटिअसच्या स्तंभापर्यंत हद्दपार व्हावे लागले. आणि युलिसीझची गाठ एटनातील सायक्लोपाशी पडली. निओटॉलेमसच्या राज्याची काय अवस्था झाली हे मी सांगू शकतो, आयडोमिनिअसचे घट कसे उध्वस्त झाले, आणि लॉक्रिअन आता आफ्रिकेच्या किनाऱ्यावर कसे राहतात हेही मी सांगू शकतो. सामर्थ्यशाली ॲकिॲनांच्या सम्राटाचा, मायसिनिअनचा घात स्वतःच्या नगरवेशीत प्रवेश करीत असतानाच त्याच्या स्वतःच्या दुष्ट राणीच्या हातून झाला; त्याचा आशियावरील विजय पूर्ण सफल झाला होता. परंतु तो व्यभिचारिणी त्याच्या मागावर होती. स्वर्गीय देवांच्या आकसाने मला स्वतःला माझ्या पित्याच्या वेदीकडे, जिला भेटण्याकरिता मी आतुर होतो त्या माझ्या पत्नीकडे. किंवा मनोहर कॅलिडॉन नगरीकडे परत जाऊ दिले नाही. आणि या नंतर एक चमत्कार झाला, खरे म्हणजे एक अपशकुनी व भयंकर भिवविणारे दृश्यच ते! माझे साथीदार मला हरपले. पंख फुटून उंच आकाशात ते उडून गेले! हाय! माझ्या प्रजाजनांवर एक हिडीस आपत्ती कोसळली! आता ते पक्षी झाले आहेत! आमच्या नदीकिनाऱ्यावर भ्रमंती करीत असलेल्या त्या पक्ष्यांचा करुण आक्रोश सगळीकडून, खडकांमधून ऐकू येत असतो. वस्तुतः ज्या दुर्दैवी घटकेला मी माझ्या खड्गाने साक्षात व्हीनसच्या स्वर्गीय देहावर पिसाटपणे हल्ला केला आणि तिच्या हाताला जखम करून महापातक केले तेव्हा पासूनच मी या सगळ्या दुर्घटनांची अपेक्षा करायला खरे म्हणजे हवी होती, अहो! पुनः असल्या अन्य संघर्षात मला जबरदस्तीने ओढण्याचा प्रयत्न करू नका. त्यांचा बालेकिल्ला उध्वस्त केला गेल्यापासून माझ्यामध्ये आणि ट्रोजनांमधे कधीही युद्ध झालेले नाही; आणि त्या जुन्या, दुर्दैवी घटनांच्या आठवणीतही मला मुळीच अभिमान नाही. म्हणून तुमच्या मातृभूमीतून तुम्ही आणलेल्या या भेटी तुम्ही मला नजर करू नका तर त्या इनीआसला नजर करा. मी त्याच्या तीक्ष्ण भाल्यांना तोंड दिले आहे आणि हातघाईच्या झुंजीत त्याला भिडलो आहे; तो त्याच्या उंच धरलेल्या ढालीच्या मागून किती सामर्थ्याने उडी घेतो आणि भिर-

भिरत येणाऱ्या त्याच्या भाल्याची झंजावाती ताकद किती आहे हे मी तुम्हाला माझ्या अनुभवाने सांगत आहे. त्या माझ्या अनुभवावर विश्वास ठेवा. जर इडाच्या भूमीने असल्या आणखी दोन वीरांना जन्म दिला असता तर इनॅकसच्या नगरींवर हल्ला करण्याकरिता ट्रोजनांनी सीमेपार धडक मारली असती. दैवगती उलटी फिरली असती आणि आता ग्रीस शोकात बुडालेली भूमी असती. अभेद्य ट्रॉयच्या तट-भिंतींपुढे निष्फळ झालेल्या दीर्घ कालात हेक्टर आणि इनीआस यांच्या समर्थ बाहूमुळेच विजयश्री ग्रीकांपासून रोखली गेली होती. आणि दहा वर्षेपर्यंत त्यांच्या हातातून सारखी निसटत राहिली. असाधारण शौर्यात आणि सर्वोच्च शस्त्र-सामर्थ्यात दोघेही सारखेच तळपत होते परंतु सत्वशीलतेत इनीआस श्रेष्ठ होता. कोणत्याही अटी पुढे येऊ देत तुम्ही तुमचे उजवे हात शस्त्रसधीमध्ये मिळवा; परंतु शस्त्रसज्ज बाहू-बाहूमध्ये संघर्ष होणार नाही याची मात्र दक्षता घ्या." सत्प्रवृत्त महाराज या एका इतिवृत्तामधे त्या राजाच्या उत्तरातील मुद्दे आणि या भयंकर युद्धाविषयीचा त्याचा दृष्टीकोन आपण श्रवण केला आहे.'

ज्याप्रमाणे गतिमान् नदीच्या प्रवाहाला खडकांचा अडथळा होतो, आणि कोंडलेल्या भोवऱ्यातून पाणी खळखळते आणि लाटांच्या आघातांचा प्रतिध्वनी जवळच्या किनाऱ्यांवर घुमतो त्याप्रमाणे त्या राजदूतांचे भाषण संपताच इटॅ-लिअनांच्या रांगांतील प्रत्येक चिंताक्रांत मुखातून परस्पर विरोधी मते व्यक्त करणारी मोठी कुजबूज एकमेकात सुरू झाली; परंतु त्यांचे विचार स्थिर होताच आणि चिंताग्रस्त ओठ पुन: गप्प होताच, उच्चासनस्थ राजाने प्रथम देवांना उद्दे-शून प्रार्थना केली आणि नंतर त्याने आपले भाषण सुरू केले :

'लॅटिन प्रजाजनहो, या घडीला आपल्या तटभिंतींबाहेर शत्रूने तळ ठोकला असताना, ही महासभा न बोलविता, आपल्यापुढील मुख्य समस्येवर आम्हाला आधीच निर्णय घेणे शक्य व्हावे असे वाटत होते, आणि तसे घडले असते तर ठीक झाले असते. माझ्या प्रदेशबांधवहो, युद्धाचा कधीही शीण न येणाऱ्या आणि पराभूत झाले तरीही कधीच खड्ग खाली न ठेवणाऱ्या अजिंक्य माणसांविरुद्ध आणि देवपुत्रांविरुद्ध आपण अकाली युद्ध पुकारले आहे. इटोलिअन शस्त्रसामर्थ्य तुमच्या सहाय्यासाठी मिळविण्याची तुम्ही कधी आशा केली असेल तर ती सोडून द्या. आपल्यापैकी प्रत्येकजण हवी ती आशा बाळगू शकतो खरी; परंतु आता प्रत्येक संभाव्य आशा कशी क्षीण झाली आहे ते तुम्ही पहाताच आहात. आपल्या सर्व योजना उधळून त्यांची कशी वाताहात झाली आहे हे बाकीचे

सर्व तुम्हाला तुमच्या बोटांच्या स्पर्शाला जाणवणाऱ्या पुराव्यावरून नसेल, तर तुमच्या डोळ्यापुढे असलेल्या प्रत्यक्ष पुराव्यावरून तुम्हाला माहीत आहेच. मी कुणाही व्यक्तीला दोष देत नाही. अमर्याद शौर्याला जे करता येणे शक्य आहे ते त्याने केले आहे. राज्याच्या सर्व सामर्थ्यानिशी आपण हा संघर्ष लढविला आहे. परंतु आताही, मी जिच्यावर विचार करीत आलो आहे ती अनिश्चित योजना मी तुमच्यापुढे मांडतो आणि तुम्ही लक्षपूर्वक ऐकणार असाल तर ती मी थोडक्यात स्पष्ट करतो. आपल्या टस्कन नदीच्या जवळच माझ्या मालकीचा प्राचीन प्रदेश आहे : सिकॅनिअनपर्यंत व सरहद्दीपलिकडेही त्याची मर्यादा पश्चिमेकडे पसरली आहे ऑरन्कन आणि रुट्लिअन लोक त्यांच्या कठीण डोंगराळ भागाची नांगराने मशागत करतात आणि विशेषच खडकाळ भूमीचा कुरणाकरिता उपयोग करतात. पाईन अरण्ये असलेल्या उंच पर्वतप्रदेशासह हा सर्व मुलुख मैत्रीच्या भावनेने ट्रोजनांना द्यावा; संधीच्या योग्य अटी आपण घालू आणि त्यांना आपल्या राज्यामधे आमचे मित्र म्हणून येण्यास आवाहन करू. त्यांची जर तशी उत्कट इच्छा असेल तर त्यांना इथे स्थाईक होऊ द्यावे. आणि त्यांचे तटबंदीबद्ध नगर वसवू द्यावे. परंतु दुसरी एखादी भूमी शोधण्याच्या हेतूने त्यांनी दुसऱ्या एखाद्या राष्ट्राकडे जायचे ठरविले आणि आमच्या भूमीतून जाण्याची त्यांची इच्छा असेल तर—त्यांना तसे न करण्यास काहीच कारण नाही—तर आपण त्यांच्याकरिता बळकट इटॅलिअन ओक लाकडाची वीस किंवा त्याना जितकी सज्ज करण्याचे मनुष्यबळ असेल तितकी जहाजे आपण बांधू. सर्व लाकूड समुद्रकिनाऱ्यालगतच आहे. ट्रोजनांनी जहाजांची संख्या सांगावी व जहाजांचे नमुने द्यावेत आपण त्यांना ब्रॉंझ, मजूर आणि गोद्या उपलब्ध करून देऊ, त्याशिवाय यापुढे मला असे वाटते की अत्युच्च लॅटिन कुलांतील शंभर राजदूतांना आमचा संदेश घेऊन त्यांच्याकडे पाठवावे. आणि एक दृढ संधी घडवून आणावा; शांततेचे प्रतीक असलेली ऑलिव्हची फांदी हाती घेऊन त्यांनी जावे, नजराणे म्हणून सुवर्ण आणि हस्तीदत यांची पदके न्यावीत; त्याचप्रमाणे आमच्या सार्वभौमत्वाचे प्रतीक असलेले सिंहासन व राजवेषही बरोबर न्यावा. आपले उध्वस्त झालेले वैभव पूर्ववत कसे करावे याचा आता उघड विचार सर्वांनी करावा.'

टर्नसच्या कीर्तीमुळे जळफळणारा आणि तिच्यामुळेच हटवादी कडवटपणा आणि आकस यांकडे प्रवृत्ती असलेला पूर्वीप्रमाणेच टर्नसशी वैरभाव बाळगणारा ड्रॅन्सेस नंतर उठला. ड्रॅन्सेस हा एक विपुल संपत्ती बाळगून असलेला पुरुष होता; त्याची शक्ती त्याच्या वाणीत होती; त्याचा हात युद्धात कधी सळसळला नाही

परंतु राजकारणामधे मात्र तो सल्लागार म्हणून सर्वांच्या आदरास पात्र झाला होता. बंड करण्याच्या सहजप्रवृत्तीतूनच त्याला सामर्थ्य प्राप्त होत असे. त्याच्या मातेच्या उच्चकुलामुळे त्याला आपल्या उच्चकुलीन जन्माचा औद्धत्यपूर्ण अभिमान वाटत असे, परंतु त्याच्या पित्याच्या बाजूने मात्र त्याच्या पूर्वजांविषयी काहीच माहिती उपलब्ध नव्हती : आपल्या वक्तृत्वकौशल्याचा उपयोग त्याने आता आपल्या द्वेषाला प्रतिष्ठा आणि अर्थपूर्णता प्राप्त करून देण्याकरिता केला. तो म्हणाला,

" सर्वोत्तम महाराज, आपली सूचना प्रत्येकाला स्पष्ट समजली आहे आणि तिला माझ्या पांडित्याची आवश्यकता नाही; आपल्या राष्ट्राच्या दैवगतीने आपल्यावर काय लादले आहे याची आम्हापैकी प्रत्येकाला मनातून जाणीव आहे! परंतु आम्ही सर्वच भयापोटी पुटपुटतो आणि स्पष्ट बोलण्याचे टाळतो. परंतु ज्याचा आपणा सर्वांना परिचय आहे तो जरी मला स्पष्ट बोलण्याबद्दल छळाचा आणि मृत्यूचाही धाक दाखविणार असला तरीही मी मात्र आता उघड बोलणार आहे. परतु त्याने आता स्वतःची बढाईखोर बडबड बाजूला ठेवावी आणि बोलण्याचे स्वातंत्र्य दुसऱ्यांना द्यावे. ज्याच्या शापित नेतृत्वाने आणि अपशकुनी वृत्तीने आपले इतके श्रेष्ठ वीर कामास आले आणि आमची सर्व नगरी शोकसागरात बुडाली त्याच्याच विषयी बोलतो आहे. तो मात्र आपल्या शस्त्र परजण्याने साक्षात आकाशाला धमकावीत, ट्रोजन छावणी विरूद्ध बारीक सारीक चकमकीत लढत पण स्वतःच्या सुरक्षिततेकरिता पलायनाचाच आश्रय घेत आहे. हे सर्वश्रेष्ठ राजा, तू मोठ्या औदार्याने ज्या पुष्कळ भेटी ट्रोजनांकडे पाठविण्याबद्दल, किंवा त्यांना त्या देण्याचे कबूल करण्याबद्दल आम्हाला सांगत आहेस त्यांमधे आणखी एकीचा समावेश कर अशी मी प्रार्थना करतो. तुझ्या कन्येच्या पात्रतेप्रमाणे विवाह बंधनाने तिला सुयोग्य वराला देऊन या शांतीसंधीला चिरंतर मान्यतेने दृढ करण्याच्या तुझ्या, पित्याच्या अधिकारात कुणाच्याही बळजबरीचा अडथळा येऊ देऊ नको. पण जर आपल्या मनावरील आणि हृदयावरील भयाची पकड खरोखरच इतकी जबर असेल तर आपण प्रत्यक्ष त्यालाच आपली विनंती सादर करू आणि प्रत्यक्ष त्यालाच अधिक मिळतेजुळते घेण्याची विनंती करू. त्याने आता माघार घ्यावी. राजा आणि पितृभूमीला मान देऊन त्याने आपला वैयक्तिक अधिकार सोडावा. होय! लॅशिअमवर लादलेल्या या सर्व यातनांचे तूच मूळ उगमस्थान आहेस, तुझ्या असहाय्य देशबांधवाना तू पुनः पुनः का उघड उघड सकटात लोटीत आहेस? युद्ध आम्हाला कधीही वाचवू शकणार नाही. टर्नस

आम्हाला तुझ्याकडून शांतता हवी आहे. आणि शांततेबरोबरच कधीही मोडता येणार नाही असे एकमेव प्रमाणही हवे आहे. हे पहा, तुझ्याकडे विनंती करण्यासाठी येणारा मीच पहिला आहे. अगदी गुडघे टेकवून विनवितो. तू मला शत्रू मानतोस, आणि मी तुझा शत्रू असेनही, मला त्याची क्षिती नाही. तू तुझ्याच असलेल्या या लोकांवर दया कर. तुझा अभिमान बाजूस सार आणि पराभव स्वीकार. माघार आणि पराभव पुरेशी पाहिली आम्ही; आणि विशाल भूमी-प्रदेशातून तेथील रहिवाशांना हुसकून काढण्याच्या बाबतीतही आम्ही परि:सीमा गाठली आहे. नाहीतर कीर्ती हेच जर तुझे उद्दिष्ट असेल आणि तुझी ईर्षा इतकी हेकट आणि निर्दय असेल, आणि हुंडा म्हणून जर प्रासाद मिळविण्याचे तुझ्या मनाने घेतले असेल तर धाडसाने वाग, आणि शत्रूच्या छातीला छाती भिडवून त्याच्यावर आत्मविश्वासाने चाल कर. केवळ टर्नसला राजघराण्यातील वधू प्राप्त होण्याचे भाग्य मिळावे याकरिता, आमचे जीवन जसे कांही तादृश्य कवडी मोलाचे आहे म्हणून, दफनाशिवाय आणि कुणाच्याही शोकाशिवाय आमचे असंख्य लोक सबंध मैदानावर विखरून-मरून पडावेत असेच आम्ही समजावे की काय ? खरे तर तुझ्याठायी प्रखर अस्मिता असेल आणि तुझ्या शूर पित्याचे थोडेही क्षात्रतेज तुझ्या ठायी असेल तर तुला आव्हान करणाऱ्याच्या डोळ्याला डोळा भिडविण्याची तू आकांक्षा बाळगली पाहिजेस."

या असल्या भाषणाने टर्नस आपल्या स्वभावानुसार मोठ्या त्वेषाने उसळून उठला. आणि रागाने मोठमोठे निश्वास सोडीत त्याने आपल्या अंत.करणातील गाढ कडवटपणाचे ड्रॅन्सेसवर शरसंधान केले.

"होय! ड्रॅन्सेस, नेहमीप्रमाणेच आजही तू खूप बोलून घेतलेस! आणि तेंही युद्ध परिस्थिती बाहूबलाची मागणी करीत असताना. जेव्हा महाजन सभा बोलाविली जाते तेव्हा तू नेहमीच प्रथम हजर असतोस. परंतु जोवर आपल्या नगर भिती शत्रूला मागे रोखीत आहेत आणि खंदक रक्ताने भरून वाहत नाहीत तोवर कोणताही धोका न पत्करता अनिर्बंधपणे तुझ्या तोंडातून बाहेर पडणाऱ्या मोठ्या शब्दांनी हे महासभागृह भरून टाकण्याचा तुला मुळीच अधिकार नाही; तुझ्या उजव्या बाहूने माझ्याइतक्या ट्रोजनांच्या संहाराच्या राशी रचल्याशिवाय आणि माझ्याप्रमाणेच अनेक समरभूमी आपल्या प्रतापाच्या विजयचिन्हांनी सजवून सोडल्याशिवाय ड्रॅन्सेस, तुझ्या नेहमीच्या शैलीतील गरजणाऱ्या भाषणांची आणि माझ्यावर भ्याडपणाचा आरोप करण्याची वेळ येणार नाही. अभिजात जीवंत

शौर्य काय करू शकते याची परीक्षा पहाण्याचे स्वातंत्र्य तुलाही आहे, आणि मला वाटते, शत्रूंच्या शोधात तुला फार दूरही जायला नको, कारण आपल्या सर्व नगरभितींभोवती ते खडे आहेत. काय ठरले मग? आपण शत्रूंवर चाल करून जायचे काय? का घोटाळत आहेस तू? का तुझी लढाऊ वृत्ती नेहमीच फक्त तुझ्या बडबडीच्या उष्ण वाफेत आणि पलायनतत्पर असलेल्या तुझ्या पायातच सामावलेली असणार? आणि तू म्हणतोस मी पराभूत झालो! मी? किळसवाण्या दुष्टा! ट्रोजन रक्ताने फुगलेली टायबर नदी सारखी वहात असताना आणि वारस मृत झाल्यामुळे आणि पराभवाने आर्केडिअनांची शस्त्रे हिरावून घेतल्यामुळे धुळीस मिळालेले इव्हँन्डरचे घर पाहिल्यानंतर मी पराभूत झालो आहे असा दावा कुणीही न्याय्यपणे करू शकेल काय? मी त्यांच्या भितींच्या आत कोंडला गेलो असताना आणि शत्रूच्या तटबंदीच्या आत अडकलो असतानाही ज्यांना मी माझ्या विजयी प्रतापाने एका दिवसात टारटरसमध्ये लोटले त्या पॅन्डरस आणि राक्षसी बिटिअसची किंवा इतर सहस्त्रावधींची मजविषयीची भावना अशी झालेली नाही! म्हणे 'युद्ध आपल्याला कधीही वाचवू शकणार नाही?' माथेफिरू माणसा! हे भाकीत ट्रोजनांच्या आणि तुझ्या जीविताच्या योगायोगाविषयी कर. लॅटिनसच्या शस्त्र सामर्थ्याचा उपहास करून दोनदा पराजित झालेल्या वंशांच्या सामर्थ्याची स्तुती करून दिङ्मूढ करणाऱ्या अंधारात परिस्थिती अधिक साकळून टाकीत रहा. वा:! ट्रोजन मर्दुमकीपुढे आता मिर्मिडॉन प्रमुखही चळाचळा कापू लागतात आणि टायडिअसचा पुत्र डायोमिड आणि लॅरिसिअन ॲकिलीझसुद्धा चळचळ कापतात! ॲड्रिॲटिकच्या लाटांकडून पाठलाग होत असलेली ऑकिडस नदी उलटी वाहत आहे! आणि हा धूर्त बदमाश जेव्हा कलहामधे माझ्यापुढे येण्यास भितो असे ढोंग करतो तेव्हा माझ्याविरुद्ध तो करीत असलेल्या आरोपांची धार अधिक तीक्ष्ण करण्याकरिता या भयाच्या ढोंगाचा उपयोग करण्याचाच केवळ त्याचा हेतू असतो. ठीक! तुझ्यासारख्याचा जीव या दक्षिण बाहूपासून अगदी सुरक्षित आहे; तेव्हा मागे पळू नकोस! तुझा जीव तुला लखलाभ असू दे. तो तुझ्या उरातच जपून ठेव.

'परंतु, महाराज, मी आता तुमच्याकडे आणि तुमच्या महत्वाच्या सूचनेकडे वळतो. तुमचा आपल्या शस्त्रांवर आता विश्वास नसेल, आणि आपण जर या संदेशाप्रमाणे खरोखरीच एकटे पडलो असलो आणि आपल्या सेनेच्या एकाच माघारीने आपण जर पार कोसळलेले असलो आणि जर भाग्य आपली पावले पुन: मागे वळवू शकत नसेल तर मग आपण प्रतिकारशून्य हात पसरून शांततेची

भीक मागू या. परंतु अजुनही—जर आपल्या ठायी त्या पूर्वीच्या शौर्याचा काही अंश उरला असेल तर!! अशी अपकीर्ती पाहण्यापेक्षा जो एकटाच धारातीर्थी पतन पावून मरताना धूळ भक्षण करतो तोच आपल्या अतुल्य वृत्तीने आणि मिळविलेल्या यशाने, इतर सर्व माणसांपेक्षा सुखी ठरतो असे मी मानतो. उलटपक्षी आपणापुढे अजून काही उपाय उरलेला असेल, आपले सर्व मनुष्यबळ उपयोगात आणलेले नसेल, आपणास सहाय्य करतील अशी अजूनही काही इटॅलिअन नगरे आणि राज्ये असतील आणि रक्ताचे मोल देऊनच ट्रोजनांनीही जर ही विजयश्री मिळविली असेल—कारण या झंजावाताने सर्वांनाच सारखे लोळविले आहे आणि त्यांचीही मनुष्यहानी झाली आहे—तर मग आपल्या कार्याच्या अगदी उंबरठ्यावरच आपण अपमानास्पद अपयश का स्वीकारावे? अरे, रणभेरी घुमण्यापूर्वीच आपली गात्रे का कापू लागावीत? कालांतराने आणि पुढे सरकत असलेल्या दिवसांच्या बदलत्या दबावाने अनेकवेळा परिस्थितीत सुधारणा घडवून आणल्या आहेत. दैवाने अनेकांना तोंडघशी पाडले आहे, परंतु फेरे पुरे करीत करीत दैवचक्र पुन्हा परत येते व त्यांना पुनः बळकट भूमीवर ठेवते. ठीक आहे! इटोलिअन आणि त्यांची नगरी आपि आपल्याला सहाय्य करणार नाही. परंतु मेसॅपस आणि त्याच्या संतोषदायी भविष्यज्ञानासह टॉलम्निअस सहाय्य करील, आणि त्यांच्याबरोबरच अनेक राष्ट्रांनी पाठविलेले इतर प्रमुखही सहाय्य करतील. लॅशिअम आणि लॉरेन्टाईन भूमीतून उत्कृष्ट म्हणून निवडलेल्यांच्या वाट्याला येणारी कीर्ती काही क्षुद्र असणार नाही. आणि ब्रॉँझने फुललेल्या तिच्या घोडेस्वारांच्या दलासहित अत्युच्च व्होल्स्किअन कुलातील कॅमिलाही आहेच! परंतु द्वंद्वयुद्धाकरिता ट्रोजनांना केवळ माझीच गरज असेल आणि ते तुम्हाला मान्य असेल, आणि मीच केवळ सर्वांच्या कल्याणात अडथळा आणीत असेन तर मग—होऊन जाऊ द्या—विजयश्रीने आजवर माझ्या बाहुबद्दल एवढा कडवट तिरस्कार कधीच दाखविला नव्हता आणि ती त्यांच्यापासून इतकी दूरही कधी राहिली नव्हती! मग मी एवढी चांगली आशा सुफलित करण्यासाठी प्रयत्न करण्यास नकार का द्यावा? सामर्थ्याने तो जरी ॲकिलीसहूनही श्रेष्ठ असला आणि व्हल्कनच्या हातून घडलेली त्याच्याइतकीच प्रभावी अस्त्रे तो धारण करीत असला तरीही मी मोठ्या आनंदाने त्याच्याशी द्वंद्व-युद्ध करीन. शौर्यामध्ये प्राचीन काळातील कोणत्याही योध्दयाहून कमी नसलेल्या मी, टर्नसने माझे प्राण तुम्हा सर्वांना आणि माझ्या वाग्दत्त वधूचा पिता लॅटिनस याला अर्पण करण्याचा निश्चय केला आहे. इनीआस मला एकट्याला आव्हान करीत आहे काय? मी त्याच्या आव्हानाचा स्वीकार आणि

स्वागत करतो. आणि या आव्हानातून देवांचा प्रकोप प्रकट होत असला तरी ड्रॅन्सेसने माझ्याऐवजीं मरून प्रायश्चित घेणे मला खपणार नाही किंवा शौर्य आणि कीर्तीच केवळ पणाला लावलेली असेल तर तीही मी त्याला प्राप्त होऊ देणार नाही!'

अशा तऱ्हेने परस्परविरोधी तीव्र मतभेद व्यक्त करून ते आपल्या चिंताकुल परिस्थितीचा खल करीत होते. परंतु त्याचवेळी इनीआस आपली छावणी आणि युद्धाची आघाडी हलवीत होता आणि हे वृत्त त्वरेने प्रासादात पसरले आणि त्याने नगरीमधे मोठी खळबळ उडविली आणि प्रबळ घबराट निर्माण केला: युद्धाच्या तयारीने ट्रोजन आणि त्यांच्याबरोबर इट्रुस्कन सेना टायबर नदीपासून सर्व रणभूमी पार करीत सगळीकडून त्यांच्यावर चाल करून येत होती. सर्व राष्ट्रच एकदम मुळापासून हादरले आणि पार गोंधळून गेले. या जबरदस्त धक्क्याने त्यांच्या क्रोधभावना भडकून उठल्या त्यांच्या अधिऱ्या घाईमध्ये शस्त्र उचलण्याबद्दल त्यांनी अट्टाहास धरला. त्यांची वयोवृद्ध मंडळी जरी कुजबुजत होती आणि शोक करीत होती तरी त्याचे सर्व युवक शस्त्रांकरिता ओरडत होते. आणि मग सर्वच वातावरणात चहूबाजूंना, पर्वतावरील अरण्यात सहज वसतीला उतरलेल्या पक्ष्यांच्या कळपाच्या कलकलाटाप्रमाणे किंवा पॅडूसाच्या प्रवाहात मासे असलेल्या जलाशयांवरून प्रतिध्वनित होणारा कर्कश ध्वनी हंसतती काढतात त्याप्रमाणे विविध विसंवादी हेतूंचा एकच कोलाहल उठला

टर्नसने हा क्षण अचूक पकडला आणि तो म्हणाला : 'अरे. असे नाही नागरिकहो! तुम्ही एक नगरसभा बोलावून शांततेच्या वरदानाचे गोडवे गात बसणेच उचित नाही का? हा तर केवळ राज्य जिंकण्याकरिता हाती शस्त्रे घेऊन, आपल्यावर चाल करून आलेला शत्रूच आहे!' अधिक न बोलता ताडकन् उठून तो त्या भव्य प्रासादातून त्वरेने चालता झाला. तो म्हणाला, व्हॉलूसस. तू व्हॉल्स्किअन सेनेस शस्त्रसज्ज होण्याची आज्ञा दे. रुटुलिअनांनाही बरोबर घे. समरांगणावरील रुंद आघाडीवर मेसॅपस आणि कोरास हे युद्धास सिद्ध असलेल्या अश्वदलाच्या हालचाली करतील. नगराकडे येणाऱ्या सर्व मार्गांची नाकेबंदी एका तुकडीला करू दे, आणि तिला मनोऱ्यावर कबजा करू दे. उरलेली सेना मी दाखविलेल्या मार्गाने माझ्याबरोबर हल्ला करील.' या आज्ञांबाबत उहापोह झालाच नाही. नगरीच्या सर्व भागांतून सैन्य त्वरेने आले आणि नगरभिंतींच्या प्रत्येक भागावर चौक्या बसल्या; सेनाप्रमुख राजा लॅटिनस याने स्वतः महाजनसभा

सोडली आणि त्याच्या स्वतःच्या महत्वाच्या योजनाही सोडून दिल्या, या बिकट घडीच्या दडपणाखाली त्याने त्या पुढे ढकलल्या आणि डार्डन इनीआसचे मुक्तपणे स्वागत करून त्याला स्वतःच्या कन्येचा वर म्हणून आनंदाने स्वीकारून त्याला आपल्या नगरीचा मित्र केले नाही याबद्दल तो स्वतःला सतत दोष देत राहिला. दरम्यान माणसे नगरवेशीच्या पुढे सर्वत्र खंदक खणीत होती, आणि बुरजांवर डांब आणि दगड चढवीत होती. तुतारींने हिंसक युद्धाला कर्कश आवाहन केले. माता आणि मुले नगरीभोवती भिंतींवर कडे करून उभी राहिली, कारण निकड निर्वाणीची होती आणि निकराच्या समराने सर्वांवरच भार पडला होता. पुरंध्रींच्या मोठ्या परिवारासह समर्पण द्रव्ये घेऊन स्वतः राणी मिनव्हीच्या बालेकिल्ल्याच्या शिखरावरील मंदिराकडे रथातून गेली. तिच्याबरोबर या सर्व दारुण अनर्थाचे मूळ असलेली कुमारी लॅव्हिनिआ आपले सुंदर डोळे खाली वळवून चालत होती. पुरंध्री वर चढून मंदिरात गेल्या आणि त्यांनी ते धूपाच्या गंधाने भरून टाकले, आणि त्या उच्च प्रवेशद्वारातून दुःखाने व्याकुळ होऊन त्यांनी प्रार्थना केली. शस्त्र-सामर्थ्याच्या देवते, समराची सूत्रचालिका असलेल्या ट्रायटोनिअन कुमारी देवते, या फ्रिजिअन सागरी लुटारूचे शस्त्र तुझ्या हाताने मोड आणि त्याला समरभूमीवर पालथा पाड तुझ्या स्वतःच्या उच्च प्रवेशद्वाराखाली तो धारातीर्थी पडू दे.'

पिसाट उत्साहाने टर्नसने युद्धाकरिता शस्त्रे चढविली. त्याने लालरंगाने चकाकणारे आणि ब्राँझच्या कड्यांनी कडक झालेले उरस्त्राण आधीच चढविले होते. आणि त्याने पोटऱ्यांवर सुवर्णाचे कवच चढविले होते. त्याचे मस्तक अजून अनावृतच होते. परंतु त्याने आपले खड्ग कमरेला लटकविले होते. ज्याप्रमाणे एखादा घोडा दावे तोडून एकदाचा मोकळा होतो आणि आपल्या तबेल्यातून बाहेर दौडत त्याच्या समोरील सर्व खुल्या मैदानातून चौखूर उधळतो आणि तिथे घोड्यांचे कळप चरत असतात त्या कुरणांकडे जातो किंवा एखाद्या आवडत्या नदीत आणखी एकदा डुंबण्याकरिता जातो आणि नंतर पुढे झेपावतो, आपली मान उचावतो आणि आनंदाने खिंकाळतो व त्याची आयाळ त्याच्या खांद्यावर आणि पाठीच्या धारेवर उडते, त्याप्रमाणे उचंबळणाऱ्या, उल्हसित वृत्तीने आणि शत्रूला त्वरित जवळून गाठण्याच्या आशेने बालेकिल्ल्याच्या उतरणीवरून गडबडीने येत असताना सुवर्णाच्या संपूर्ण झळाळीने टर्नस चमकत होता. त्याला भेटण्याकरिता कॅमिला वेगाने घोडा फेकत आली; तिच्यासह तिची व्हॉल्स्किअन तुकडी होती, आणि अगदी नगरवेशीजवळ ती राजकन्या घोड्यावरून पायउतार झाली, आणि तिचे अनुकरण करून तिची सर्व सेनाही चपळाईने उतरून पायउतार झाली.

कॅमिला टर्नसला म्हणाली : 'टर्नस, जर शूरांना आत्मविश्वास बाळगण्याचा अधिकार असेल तर माझ्या ठायी तेवढे धैर्य असल्यामुळे मी इनीआसच्या अश्व-दलाशी झुंजते आणि एकटी इट्रुस्कन अश्वदलावर हल्ला करते. युद्धारंभीच्या पहिल्या संकटांना मला हात घालू दे. तू घोड्यावरून उतरून भिंतीजवळ ठाण मांड आणि आपल्या तटबंदीवर लक्ष ठेव." भयचकित करणाऱ्या त्या आश्चर्य-कारक मुलीवर आपली नजर रोखून, तिच्या संकल्पाबद्दल टर्नस म्हणाला; "इटलीचे वैभव असलेल्या कुमारी, मी तुझे आभार कसे मानू आणि तुझी यथो-चित अशी परतफेड कोणत्या स्वरुपात करू ? परंतु तुझे शौर्य सर्व सन्मानांहून उच्च प्रतीचे असल्यामुळे युद्धासाठी उठविण्याच्या कष्टात तू माझी सहभागी हो. एवढेच मी म्हणू शकतो. वदंतेनुसार आणि आम्ही पुढे पाठविलेल्या आणि आता परतलेल्या टेहळ्यांनी खात्रीपूर्वक सांगितल्याप्रमाणे इनीआसने अश्वदलाच्या हलकी शस्त्रे असलेल्या तुकड्या, सर्व रणमैदानाची टेहळणी करण्याकरिता निश्चयपूर्वक पुढे पाठविल्या आहेत. तो स्वतः रखवाली नसलेल्या अवघड डोंगरी मुलखातील वाटेने येत आहे व उतरणीवरून उतरून तो कोणत्याही क्षणी एकदम झडप घालील. माझ्या मनात रणनीतीतील एक डाव आहे, अरण्यामधे खोलातून जाणारी एक वाट आहे; तिथे सशस्त्र सैनिक ठेवून दोन्ही बाजूंनी जबडा आवळ-ण्याचा माझा विचार आहे. तू मोक्याची जागा घेऊन इट्रुस्कन अश्वदलाला तोंड देण्याची तयारी कर. तुझ्याबरोबर तुला सहाय्य करण्यास उत्सुक असलेला मेसॅपस, लॅशिअममधील तुकड्या आणि टायबर्टसची सैन्य-दलेही असतील, तुला नेतृत्वाच्या जबाबदारीत माझ्याशी सहभागी व्हावे लागेल.' तो असे म्हणाला आणि अशाच शब्दांनी त्याने मेसॅपसला आणि त्याच्या मित्रसेनेच्या अधिकाऱ्यांना प्रोत्साहन दिले, आणि नंतर तो शत्रूवर चाल करून गेला.

तिथे एक छपून राहण्यास आणि युद्धाचे डावपेच लढविण्यास योग्य अशी नागमोडी वळणे असलेली छोटी दरी आहे. पर्णराईने झाकळलेल्या उतरणी दाट-वाटीने दोन्ही बाजूनी येऊन तिला मिळतात. या दरीत जाणारी वाट ओबड-धोबड आहे. तिची तोंडे अरुंद आहेत व प्रवेश मार्ग जाळ्यांनी झाकलेले आणि दुर्गम आहेत. त्या दरीच्या वर अगदी थेट डोंगरमाथ्यावर मोक्यांच्या जागी, सहसा जिथे कुणीही जात नाही असे, नजरेच्या पल्ल्याआड सुरक्षित आडोसा असलेले सपाट मैदान आहे; ते ठिकाण हल्ल्याच्या सोयीचे आहे. मग डावीकडून किंवा उजवीकडून हल्ला चढविण्याची योजना असो किंवा उंचावर उतरणीवर ठाण मांडून खाली प्रचंड शिलाखंड लोटण्याचा डाव असो. तो तरुण सेनानी त्याला

चांगल्या परिचित असलेल्या वाटांनी तिथे त्वरेने गेला. त्याने मोक्याची जागा पकडली आणि त्या झाडीतील आकुंचित जागेत तो प्रतीक्षा करीत बसला.

त्याच वेळी लॅटोनाची कन्या स्वर्गातील आपल्या निवासात तिच्या पवित्र कुमारिकांच्या परिवारातील एकीला, चपळ ओपिसला उद्देशून बोलली; तिने उच्चारलेले शब्द गंभीर होते; ' हे कुमारिके, मला सर्वाहून अधिक प्रिय असलेली कॅमिला हिंसक युद्धात चाल करून जात आहे आणि तिने वृथाच माझी आवडती शस्त्रे धारण केली आहेत. कारण माझे डायनाचे तिजविषयीचे हे प्रेम नवीन नाही किंवा नुकतेच निर्माण झालेलेही नाही. या प्रेमाच्या सुखद मधुर अचानक जागृतीने माझा आत्मा केवळ आताच हेलावून गेला आहे असे नाही कॅमिलाचा पिता मेटॅबस याला, आपल्या बलाच्या औद्धत्यपूर्ण वापरामुळे त्याने आपल्यावर ओढवून घेतलेल्या तिरस्कारामुळे, त्याच्या सिंहासनावरून पदच्यूत करण्यात आले होते. त्याची पुरातन नगरी प्रायव्हेर्नम, हिचा त्याग करणे प्राप्त झाल्यावर, वनवासात साथीदार म्हणून त्याने आपल्या बालकन्येला बरोबर घेतले, आणि युद्धाच्या भर रणधुमाळीमधून तो तिच्यासह पळून गेला. त्याने तिच्या आईच्या कॅस्मिला या नावावरून त्यातील एक अक्षर बदलून तिचे कॅमिला असे नाव ठेवले लांबलचक पर्वतराजींवरील एकाकी अरण्याकडे प्रवास करताना तो तिला आपल्याच अंगावरील वस्त्रात गुंडाळून पुढे छातीशी धरून जात असे, सशस्त्र सेनेच्या निर्दय भयाने त्याला सर्व बाजूंनी घेरले होते. कारण व्हॉल्स्कअनांनी आपले सैन्य सगळीकडे विखुरले होते आणि प्रत्येक ठिकाणी हालचाली करीत त्याने त्याला सगळीकडून वेढले होते. परंतु त्यांच्या पलायनाच्या अगदी वाटेवर अॅमॅसेनस नदी पसरली होती. ढग फुटून कोसळलेला वादळी पाऊस इतका मुसळधार होता की ती दुथडी भरून, दोन्ही किनाऱ्यांच्यावरून फेसाळून वहात होती पोहून जाण्याची तो तयारी करीत असताना त्याच्या कन्येवरील प्रेमाने मेटॅबसला रोखले, कारण तो घेऊन जात असलेल्या प्रेमाच्या ओझ्याला धोका पोहोचेल. अशी त्याला आशंका वाटली. त्वरेने त्याने प्रत्येक संभाव्य मार्गाचा क्रमाने विचार केला आणि जरी त्याच्या मनात संदेह होता तरी त्याने तात्काळ एक दृढ निर्णय घेतला. सुदैवाने, गाठी असलेल्या कठीण ओक लाकडाचा, अग्नीमध्ये पाणी चढविलेला, युद्धात वापरण्याचा एक बळकट भाला त्याच्या हातात होता. प्रथम त्याने आपल्या कन्येला अरण्यातील बुचाच्या झाडाच्या गाभ्यात आणि सालीत घट्ट गुंडाळले. नंतर त्याने तिला तोल राखण्याकरिता त्या भाल्याच्या दांडीच्या मध्यावर बांधले. आणि नंतर त्याने आपल्या बळकट उजव्या हातात भाला सांभाळून धरला आणि आकाशाकडे पाहून आपला स्वर उंचावला. ' वनात वास करणाऱ्या दयाळू

कुमारिके, लॅटोनाच्या कन्ये, मी स्वतः या मुलीचा पिता माझी स्वतःची ही कन्या तुझी सेविका म्हणून तुला अर्पण करीत आहे. जे तिने प्रथमच धारण केले आहे ते तुझे शस्त्र हाती घेऊन, ती तिच्या शत्रूंपासून पळून जात आहे आणि तुला शरणागत आहे. हे देवते, मी तुझी विनवणी करतो, जिला मी आता वाऱ्याच्या झोताच्या अनिश्चिततेवर सोपवीत आहे तिचा तुझी म्हणून स्वीकार कर.' तो बोलत असतानाच त्याने आपला हात मागे घेतला, आणि तो भाला भिरभिरत फेकला, पाणी गरजले आणि त्या फोफावत चाललेल्या नदीवरून कॅमिला त्या धोंघावणाऱ्या भाल्यावरून अगतिकपणे जलद झेपावत राहिली. शत्रू मोठ्या संख्येने जवळ जवळ भिडत आलेले असतानाच मेटॅबसने स्वतःला नदीच्या धारेत लोटले. लवकरच नदीचे पात्र पार करण्यात यशस्वी होऊन त्याने आता डायनाला अर्पण केलेली ती मुलगी बांधलेला तो भाला मातीने लडबडलेल्या गवतातून खेचून बाहेर काढला.

'कोणतीही नगरी मेटॅबसला आपल्या घरात किंवा आपल्या भिंतींच्या आतही घ्यायला तयार नव्हती. आणि त्याची बेबंदवृत्ती त्याला स्वेच्छेने दुसऱ्याच्या स्वाधीन होऊ देत नसल्यामुळे त्याने आपले सारे जीवन मेंढपाळाच्या संगतीत एकाकी पर्वतावर व्यतीत केले. इथे या रानटी वसतीतील घनदाट अरण्यात त्याने आपल्या कन्येचे पोषण एका कळपातील दुभत्या घोडीच्या आचळांनी आणि वन्य-पशूंची आचळे तिच्या नाजूक ओठांसाठी पिळून त्यांच्या दुधावर केले. आणि जेव्हा या बालिकेनें आपल्या स्वतःच्या कोवळ्या पायांच्या तळव्याने आपल्या पाऊलखुणा प्रथम उठविल्या तेव्हा मेटॅबसने तिच्या हाती एक तीक्ष्ण भाला दिला आणि तिच्या खांद्यावर तीक्ष्ण बाण आणि धनुष्य लटकविले. तिच्या कुंतलांवर सुवर्णबंधाऐवजी किंवा अवगुंठनीच्या लांब पदराऐवजी एका वाघिणीची सोललेली चामडी मस्तकावरून खाली पाठीवर रुळत होती. त्या बालवयातही ती आपल्या छोट्या मऊ हाताने छोटे भाले फेकीत असे आणि आपल्या मस्तकाभोवती मऊ कातडी पट्ट्याची गोफण फिरवून स्ट्रायमानचा एखादा करकोचा किंवा एखादा शुभ्र हंस खाली पाडीत असे. अखिल इट्रुस्कन नगरींतील बऱ्याच मातांना तिला आपल्या पुत्राची वधू करण्याची आतुरता होती पण व्यर्थ ! कारण फक्त डायनातच तिला पूर्ण आनंद प्राप्त होत असे, आणि आपल्या शस्त्रावरील आणि कुणीही भंग न केलेल्या आपल्या कौमार्यावरील आपल्या प्रेमाचे तिला सदोदित भूषण वाटत होते. मला राहून राहून वाटते की तिने ट्रोजनांना कधीच आव्हान द्यायला नको होते, आणि ती कधीही असल्या संघर्षात गुंतायला नको होती; कारण मग ती

अजूनही माझी एक अनुयायी म्हणून राहिली असती, आणि अजूनही मला प्रिय राहिली असती.'

परंतु हे वनदेवते चल! नियती देवता आता निर्दयपणे तिच्यावर घाला घालीत असल्याने तू आकाशाच्या उतरणीवरून तुझ्या मार्गाने खाली जा आणि जिथे अभद्र मृत्यूसूचक रौद्र रणकंदन चालले आहे, तिथे लॅटिन भूमीला भेट दे. ही शस्त्रे घेऊन जा आणि या भात्यातून माझ्या सूडाकरिता एक बाण काढ. तिच्या पावन देहाचा उपमर्द करून तिला विद्ध करणाऱ्या माणसाकडून त्याच्या रक्ताच्या रूपाने माझे मोल वसूल कर. मग तो कोणीही असो, ट्रोजन असो वा इटॅलिअन असो. नंतर मी तिचा न लुटलेला, आणि तिची सर्व शस्त्रे जागच्याजागी असलेला तिचा विकल देह धुक्यात आच्छादून तिच्या समाधीकडे घेऊन जाईन, आणि तिच्या मातृभूमीत त्याला विश्रांती प्राप्त करून देईन.' असे डायना म्हणाली आणि काळ्या वादळी वाऱ्यात झाकलेली ओपिस आकाशातील वातावरणातून अलगद खाली उतरली, आणि ती द्रुतगतीने जात असता तिच्या शस्त्रांचा खणखणाट होत राहिला.

तोंवर ट्रोजनांचे एक सैन्यदल नगरभितीजवळ आले; आणि त्याचप्रमाणे इट्रुरिआचे सेनाप्रमुख आणि तुल्यबल तुकड्यात विभागलेले सर्व घोडदलही आले. सर्व समरभूमीवर घोडे घमणाऱ्या टाचांवर डौलदारपणे दौडत होते आणि खेचलेल्या लगामांना हिसडे देत होते व खिंकाळत थयथय नाचत होते. रण-क्षेत्राच्या लांबरुंद प्रदेशावर पोलादी भाल्यांचे जणू पीक उभे राहिले होते आणि ती मैदाने उगारलेल्या शस्त्रांनी झगमगत होती. परंतु मेसॅपस, लॅशिअमचे अश्व-दल, कोरास आणि त्याच्याबरोबर त्याचा भाऊ आणि कुमारी कॅमिलाच्या अश्व-दलाची तुकडी त्यांना मैदानावर गाठण्याकरिता त्यांच्या विरुद्ध कूच करीत होती. त्यांनी आपले उजवे हात जोराने मागे खेचले होते, भाल्यांची फाळे पुढे रोखली होती आणि त्यांची तीक्ष्ण टोके थरथरत होती. योद्धे पुढे कूच करीत होते, घोडे खिंकाळत होते, आणि एकच खळबळ माजत होती. पुढे येणारी दोन्ही सैन्ये आता भाल्यांच्या फेकींच्या पल्ल्यात थबकली. नंतर अचानक उठलेल्या एकाच आरोळी-बरोबर ती पुढे झेपावली आणि आपल्या घोड्यांना ते युद्ध-मदाने वेडे होईपर्यंत पुढे दौडण्याचे प्रोत्साहन देत आणि दौडत असतानाच, त्यांनी सर्व बाजूंनी आकाश झाकळून जाईपर्यंत दाट हिमखंडांसारखा भाल्यांचा वर्षाव केला. टायरेनसने आणि क्रूर अॅकॉन्टिअसने आपले सेनाबळ एकत्र केले आणि भाले सरळ सरसावून चाल

केली. तेच प्रथम धारातीर्थी पडले. ते पडताना झालेला आवाज प्रचंड होता; कारण परस्पर आघाताने त्यांनी आपल्या चतुष्पाद घोड्यांचे उर फोडले आणि उधळून टाकले; एखाद्या वज्राघातासारखा किंवा तोफखान्याने उडविलेल्या एखाद्या अस्त्राप्रमाणे अॅकॉन्टिअस पुढे फेकला गेला साफ आडवा झाला, आणि त्याने आपले प्राण वातावरणात उधळले. सर्व सैन्याच्या रांगात घबराट निर्माण झाला आणि त्या विस्कटल्या. लॅटिन मागे फिरले, त्यांनी आपल्या ढाली पाठीवर लटकावल्या आणि आपल्या स्वतःच्या दलाचे नेतृत्व करीत असलेल्या अॅसिलॅससह ट्रोजन त्यांचा पाठलाग करीत असताना ते नगरभिंतीकडे दौडू लागले. परंतु ते वेशीजवळ पोहोचले असतानाच त्यांनी आपल्या घोड्यांच्या लवचिक माना लगाम खेचून उलटीकडे वळविल्या आणि पुन्हा एकदा आरोळी ठोकली. आणि आता ट्रोजन लगाम सैल सोडून पळाले आणि दूर माघारी गेले. महासागराला जेव्हा भरती ओहोटी येते तेव्हा ज्याप्रमाणे तो एकदा त्याच्या लाटांनी कपारींवर तुषाराचे फवारे उडवीत, दूर किनाऱ्यावरील वाळू सर्वंकष पुराने भिजवीत उंच भिरकावतो व किनाऱ्याकडे सरसरत जातो तर पुनः वेगाने परतताना ओहोटीच्या ओढीत गडगडणारे गोटे बरोबर नेतो आणि पाणी उथळ होऊन मागे हटते आणि मागे कोरडा किनारा राहतो त्याप्रमाणे त्यांच्या हालचाली होत्या. दोनदा इट्रुस्कनांनी रुटुलिअनांची दाणादाण उडविली आणि त्यांना नगरभिंतीपर्यंत मागे रेटले; आणि दोन वेळा त्यांना मागे हटविण्यात आले आणि त्यांना भयाने खांद्यावरून मागे दृष्टीक्षेप करावे लागले आणि त्यांच्या पाठीचे रक्षण करण्याकरिता ढाली पाठीवर बांधाव्या लागल्या. परंतु तिसऱ्यावेळी जेव्हा ते झुंज देत भिडले तेव्हा त्यांच्या सर्व युद्ध आघाड्यांवर ते लढले व त्यांची सैन्ये एकमेकांमध्ये दाट गुंतून पडली प्रत्येक सैनिकाने आपला माणूस निवडला; मरणाऱ्यांचे विव्हळणे वाढले; आणि प्रेते आणि शस्त्रे रक्ताच्या डबक्यांत लोळत होती, आणि शेवटचे आचके देणारे घोडेही माणसांच्या हत्याकांडात मिसळले होते; आणि संग्राम अधिक हिंसक झाला. ऑसिलोकसने रेमुलसच्या घोड्यावर एक भाला फेकला, कारण त्याच्या स्वाराशी भिडायला तो बुजत होता; आणि त्याने ते पोलादाचे टोक त्या घोड्याच्या कानाखाली रुतविले. या आघाताने आणि जखमेच्या असह्य वेदनेने पिसाट झालेल्या त्या घोड्याने खूर आपटले आणि मागच्या पायावर उभे राहून त्याने पुढचे पाय हवेत झाडले आणि आपली छाती फुगवली, आणि खोगिरातून उडालेल्या रेमुलसने धरणीवर लोळण घेतले, कॅटिलसने आयोलासला खाली लोळविले आणि शौर्याने, देहाने आणि शस्त्रानेही सामर्थ्यशाली असलेल्या हर्मिनिअसचाही वध केला; त्याचे मस्तक अनावृत होते व त्याचे केस सोनेरी होते;

त्यांचे खांदे उघडे होते आणि त्याला जखमी होण्याचे भय नव्हते. कुठलाही हल्ला झेलण्यासाठी त्याने पुढे केलेले शरीर असे मजबूत होते. पण तरीही आता त्याच्या रुंद खांद्याच्या थेट मध्यातून तो भाला घुसला होता. आणि तिथेच थरथरत राहिला होता त्याने त्या बलाढ्य माणसाला वेदनेने दुमडून टाकले. लाल काळे रक्त सांडत होते कारण लढण्याच्या ईर्ष्येने ते पोलादी शस्त्रांनी शत्रूंना मृत्यू देत होते आणि जखमांनी प्राप्त होणाऱ्या वीरोचित मरणाची ते आकांक्षा करीत होते.

एखाद्या अमेझाॅनप्रमाणे उल्हासित होऊन बाणाचा भाता लटकवून कॅमिला या सर्व संहारातून दौडत होती. लढताना हालचालीचा मोकळेपणा मिळावा म्हणून एक स्तन तिने उघडा ठेवला होता. कधी ती आपल्या सर्व शक्ती एकवटून आपल्या टणक भाल्यांचा अखंड वर्षाव करीत असे आणि कधी अविश्रांतपणे आपल्या हाताने बळकट परशु चालवीत असे. तिच्या खांद्यापासून तिच्या सुवर्ण धनुष्याचा डायना वापरीत असलेल्या शस्त्राचा, टणत्कार होत असे. आणि कधी तिला माघार घेणे भाग पडलेच तर परतताना मागे वेध घेण्याकरिता ती धनुष्य मागे वळवून तीक्ष्ण बाण सोडीत असे. तिच्याबरोबर तिच्या पसंतीच्या निवडक सहचारिणी–कुमारी लॅरिना, टयुला, आणि ब्रॉन्झपरशु धारण केलेली टार्पिआ या होत्या. डायनाच्या सेविकेने कॅमिलाने स्वतःच्या मानकरणी म्हणून, युद्धात आणि शांततेच्या कालात एकनिष्ठ अनुचारिका म्हणून निवडलेल्या त्या सर्व इटलीच्या कन्या होत्या. आपल्या वैभवशाली लढाऊ वेषात हिपॉलिटाच्या भोवती लढणाऱ्या, दौडताना थर्मोडॉनच्या प्रवाहांवर घोडयांच्या टापांचे प्रतिध्वनी घुमविणाऱ्या, थ्रेसच्या ॲमेझाॅनप्रमाणे, किंवा आपल्या रथातून वीरवृत्तीची पेन्थेसिलिआ जेव्हा युद्धावरून परत येते, आणि तिचे स्त्री-सैनिक मोठयाने, बेबंद, लढाऊ आरोळया ठोकतात आणि त्यांच्या चन्द्रकोरीच्या आकाराच्या ढाली उंचावताना आनंदित होतात त्याप्रमाणे त्या होत्या.

हे क्रुद्ध कुमारिके, तू तुझ्या भाल्याने प्रथम आणि शेवटी कुणाला घोडयावरून उडविलेस ? आणि किती बलवान पुरुषांना रणांगणावर मरणोन्मुख असे झोपविलेस ? प्रथम तिच्यापुढे सामोऱ्या आलेल्या क्लायटिअसचा पुत्र युनिअस याच्या उघडया छातीत फरच्या लाकडाचा दांडा असलेला भाला खुपसून तिने त्याला ठार केले. रक्ताच्या गुळण्या टाकीत तो खाली कोसळला, त्याने रक्ताने भिजलेली माती चावली, आणि प्राण सोडताना तो त्या जखमेवर पडून तडफडत होता. नंतर तिने लायरिस आणि पॅगॅससचा वध केला : धडपडलेल्या घोडयावरून मागे

कोसळत असताना आणि त्याचे लगाम पुनः पकडण्याचा प्रयत्न करीत असताना लायरिसला तिने मारले, आणि त्याच्या सहाय्यास धावून आलेल्या आणि आपल्या कोसळत्या मित्राला सावरण्याकरिता निशस्त्र हात पुढे करीत असताना पॅगॅससचा तिने वध केला. दोघेही पुढे तोंडावर पडले. हिपोटॅसचा पुत्र ॲमॅस्ट्रसलाही तिने त्यांच्यामागे पाठविले आणि भाला फेकण्याकरिता पुढे वाकून दूर पल्ल्यावर भाला-फेक करीत तिने टिरिअस, हारपॅलिकस डेमोफून आणि क्रॉमिस यांचा पाठलाग केला. तिने भिरभिरवीत फेकलेल्या प्रत्येक भाल्याबरोबर एक फ्रिजिअन योद्धा खाली येत होता. थोड्या अंतरावरून शिकारी ऑनिटस त्याला सराव नसलेली युद्धातील शस्त्रे धारण करून आपल्या आयापिजिअन घोड्यावरून दौडत होता. त्याने वीरवृत्ती स्वीकारल्यावर एका बैलाचे सोलून काढलेले चामडे आपले रुंद खांदे झाकण्याकरिता पांघरले आणि डोक्याच्या रक्षणाकरिता जबडा वासलेले आणि विचकलेले पांढरे सुळे असलेले लांडग्याचे शिर त्याने चढविले होते, आणि शस्त्र म्हणून ग्रामजन वापरतात तसला शिकारी भाला त्याच्याजवळ होता, तो सैन्यदलातून जात असताना सर्वाहून एका डोईने अधिक उंच दिसत होता. त्याच्या साथीदारांचा धुव्वा उडवीत असता त्याच्या सुटकेचा मार्ग तोडण्यास आणि त्याला मोकसण्यात कॅमिलाला फारसे प्रयास पडले नाहीत; आणि त्याच्यावर उभे राहून अंतःकरणातील द्वेषाने ती त्याला म्हणाली, ' इट्रुस्कना, तू अरण्यात वन्यपशुंचा पाठलाग करीत आहेस अशी तुझी कल्पना होती काय? मग तुझी आणि तुझ्या साथीदारांची कल्पना चुकीची होती, हे सिद्ध करणारा दिवस उगवला आहे; आणि एका स्त्रीच्या शस्त्राने ते सिद्ध केले जाईल, तरीही तुझ्या पितरांच्या आत्म्यांकडे तू बरोबर घेऊन जाशील ती कीर्ती काही सामान्य असणार नाही. प्रत्यक्ष कॅमिलाच्या भाल्याने वध झाल्याची ती कीर्ती असेल. '

त्या नंतर तात्काळ तिने जबर ताकदवान असलेल्या दोन ट्रोजनांचा, ऑर्सि-लोकसचा आणि ब्यूटिझचा वध केला. ब्यूटिझची पाठ वळलेली होती, आणि तिने आपला भाला त्याचे उरस्त्राण आणि शिरस्त्राण यांच्यामध्ये रुतविला, कारण दौडत असताना त्याची शुभ्र मान तिला दिसली आणि त्याची ढाल त्याच्या डाव्या बाहूवरुन खाली लटकली होती. दीर्घ वर्तुळात तिचा पाठलाग करणाऱ्या ऑर्सि-लोकसपुढून प्रथम ती पळून गेली. नंतर लहान परीघाच्या फेऱ्यात पटकन वळून आणि त्याच्यामागे वाटोळे दौडून तिने त्याला चकविले आणि जिचा पाठलाग होत होता तीच आता पाठलाग करू लागली. तो दयेची याचना करीत सारखा ओरडत असतानाच तिने खोगिरात उंच होऊन बळकट परशूचे घावा मागून घाव घालून

त्याचे चिलखत आणि हाडे फोडली; त्या जखमांनी त्याचा चेहरा अजूनही उष्ण असलेल्या मेन्दूने माखला गेला. आता तिची गाठ अॅपेनाईनवर रहाणाऱ्या ऑनसच्या शूर पुत्राशी पडली. जोंवर दैव त्याला डावपेचाचा उपयोग करू देत असे तोवर तो काही साधारण लिगुरिअन ठरत नव्हता. तिच्या अचानक दर्शनाने घाबरून तो थबकून खडा राहिला. कितीही द्रुतगतीने धावले तरी या झुंजीतून निसटून जाता येणार नाही किंवा त्याच्यावर चाल करून येणाऱ्या राजकन्येलाही दुसरीकडे वळविता येणार नाही असे पाहून त्याने एक चतुर डाव खेळण्याचे ठरविले आणि तो तिच्याशी बोलू लागला : ' एवढा तेज घोडा मांडीखाली असल्यावर स्त्री–योद्धा म्हणून मिरवण्यात भूषण ते कसले? पळून जाण्याचे तुझे साधन बाजूला ठेव; पायउतार होऊन, केवळ पायदळातील द्वंद्वाच्या डावपेचांचाच अवलंब करून सपाट भूमीवर समोरासमोर माझ्याशी लढण्याचें धाडस दाखव. मग कुणाचा भ्रामक गर्व तिच्यावर सर्वनाश ओढवून आणणार ते तुला लगेच कळेल.' तो असे म्हणाला आणि झोंबणाऱ्या संतापाने खवळल कॅमिलाने आपला घोडा साथीदाराच्या स्वाधीन केला आणि निर्भयपणे उभे राहून तिच्या शत्रूप्रमाणेच हाती नग्न खड्ग आणि साधी छोटी ढाल घेऊन तिने पवित्रा घेतला. म्हणून आपण आपल्या डावात यशस्वी झालो असे त्या तरूण लिगुरिअनला वाटले. क्षणाचीही दिरंगाई न करता त्याने मात्र धूम ठोकली, त्याने आपल्या चतुष्पाद घोड्याचा लगाम खेचून त्याला वळविलें आणि लोखंडी टाचा त्याच्या पोटात रूतवून त्याने त्याला चौखूर धावायला लावून तो दूर पळून गेला. ' मूर्ख लिगुरिअना ' ती ओरडली, ' निर्बुद्ध आणि उद्धट अशा या तुझ्या काव्याने तुझी स्वतःचीच फसवणूक होत आहे. तू नेहमीच फसव्या होतास! परंतु या तुझ्या गावरान क्लृप्त्यांचा तुला काही उपयोग होणार नाही. कारण तुझा धूर्तपणा तुला काही सुरक्षितपणे घरी, तुझ्यासारखाच ठक असलेला तुझा बाप ऑनस याकडे नेणार नाही ' तिचे बोलणे संपण्यापूर्वीच ती एखाद्या चमकणाऱ्या विजेसारखी संपूर्ण वेगाने पुढे धावली आणि त्या घोड्याला मागे टाकून त्याच्या पुढे उभे ठाकून त्याचा लगाम तिने हिसकावून घेतला, त्या लिगुरिअनशी सामना केला आणि ज्या सहजतेने एखादा पवित्र ससाणा उंच कपारीवरून उंच उडून दूरवरच्या उंच ढगातील कबूतराला गाठतो त्याला धरतो, पकडतो आणि वक्रनख्यांनी त्याचे पोट फाडतो आणि रक्त आणि उपटलेली पिसे आकाशातून खाली तरंगत येतात, त्याच सहजतेने तिने त्या लिगुरिअनावर त्याचे तिरस्कृत रक्त सांडून सूड घेतला.

पण त्याच क्षणी उत्तुंग ऑलिम्पसवर सिंहासनाधिष्ठित असलेल्या देवांच्या व मानवाच्या पित्याने हे असले कर्म आपल्या तीक्ष्ण डोळ्यांनी पाहिले. त्याने इट्रुस्कन टार्कॉनला घोर युद्धाकरिता चेतविले, त्याला जणू आरणी लावून त्वेषाने पुढे सरसावण्यास प्रवृत्त केले व त्याच्या ठिकाणी प्रकोप उत्पन्न केला. तद्नुसार तिथे सेनेच्या फळीची पिछेहाट होत होती तिथे त्या संहारामधे तो घोडा फेकीत चाल करून गेला. मन वळविण्याच्या प्रत्येक मार्गाचा अवलंब करून त्याने आपल्या अश्वदलाच्या तुकड्यांना आघाडीवर कूच करण्यास आणि प्रत्येक माणसाला नावाने पुकारीत, आणि पराभूत झालेल्यांना एकत्र करून पुन: एकदा झुंजण्यास प्रवृत्त केले : 'इट्रुस्कन हो,' तो म्हणाला, "तुम्ही नेहमीसारखाच शेळपटपणा करीत आहात; पण तुम्हाला शरम वाटण्याइतकीसुद्धा कुवत उरली नाही काय? तुम्हाला भय कशाचे वाटते? तुमच्या काळजातला भ्याडपणा इतक्या खालच्या नव्याच पातळीला पोहोचला आहे काय? केवळ एका बाईने तुमच्या या मोठ्या जमावाची दाणादाण उडवावी आणि तुम्हाला मागे रेटून चौफेर उधळून लावावे ना! मग आम्ही ही खड्गे कशाला धारण करतो आहोत? आपण जर ते वापरू शकत नाही तर हे भाले तरी कशाला हाती धरायचे? प्रेमाच्या हाकेला आणि रात्रीच्या प्रणय संकेतांना साद देण्यात मात्र तुम्ही तत्पर असता! आणि हो! जेव्हा वक्र अलगुज तुम्हाला बॅक्कसच्या उत्सवाला बोलावते तेव्हा तुम्ही मेजावर मांडलेल्या भरगच्च मेजवानीकडे आणि ठिकठिकाणी मांडलेल्या मद्याच्या चषकांकडे आधाशीपणे डोळे लावून असता; खोटी असते ती केवळ तुमच्या भविष्यद्रष्टयाने चांगले शकून वर्तविण्याची आणि चांगला लठ्ठ प्राणी बळी देऊन एखाद्या राजशाही उद्यानात जमण्याचे तुम्हाला आमंत्रण देण्याची! तुम्हाला खरा रस तिथे आहे, आणि तुमचा सर्व पुरुषार्थ त्यात प्रगट होतो!' अशा तऱ्हेने निर्भीडपणे बोलून टार्कॉनने स्वत:चा जीव संकटात घालून घोड्याला टाच देऊन जिथे घनघोर रणकंदन चालू होते तिथे आपला घोडा फेकला, आणि सरळ व्हेन्युलसवर बेदरकारपणे चाल करून त्याने त्याला त्याच्या घोड्यावरून खाली खेचले, त्याला आपल्या उजव्या काखोटीत पकडून स्वत:च्या छातीपुढे धरून खूप जोर करून तो आपल्या शत्रूला घेऊन गेला. आसमंतात एकच आरोळी उठली आणि प्रत्येक लॅटिनाने मागे वळून पाहिले. व्हेन्युलस आणि त्याची शस्त्रे घेऊन टार्कॉन आगीच्या लोळासारखा त्या सखल भूमीवरून दौडत सुटला होता. नंतर त्याच्या शत्रूच्या भाल्याचे पोलादी टोक त्याने मोडले आणि एखादी जिव्हारी जखम करण्यासाठी उघडी पडलेली जागा तो चाचपू लागला. व्हेन्युलसने उलट प्रतिकार केला आणि ताकदीला ताकद लावून त्याचा हात आपल्या कंठापासून दूर

ठेवण्याचा त्याने प्रयत्न केला. ज्याप्रमाणे एखादा सोनेरी गरुड उंच भ्रमण करीत असताना त्याने पकडलेला सर्प पायांनी आवळून आणि नख्या रोवून घेऊन जात असतो, आणि तो सर्प जखमी झाला असूनही वेटोळ्यांमधे वळवळत असतो, आपले ताठ होत जाणारे मणके वर उचलतो आणि ताठ उभा राहतो, आणि तोंडाने अजूनही फुत्कार टाकीत रहातो, परंतु तो गरुड तरीही झगडत असलेल्या त्या सर्पाला आपल्या बाकदार चोचीने टोचीत, छळीत असतो आणि सर्वकाळ आपले पंख उंच हवेत फडफडवीत असतो; त्याचप्रमाणे टॉरकॉन आपली शिकार विजयोत्साहाने टायबर्टाईन सेनेतून घेऊन गेला. आपल्या नेत्याचे उदाहरण अनुसरून आणि त्याच्या यशाची बरोबरी करीत इट्रस्कनांनीही हल्ला चढविला.

आणि आता नियती ज्याच्यावर लवकरच आपला अधिकार गाजवणार होती, तो आरन्स हाती भाला घेऊन, सावधानतेने कॅमिलावर सहजपणे घाव घालण्याची संधी शोधीत तिच्याभोवती दौडत राहिला. ती वेगाने दौडत असता–नाही तिच्या हालचालीचे तो चतुर अंदाज करीत होता. तिच्या पिसाट झेपेत जिथे जिथे ती कुमारिका समराच्या मर्मस्थानी घुसत होती तिथे तिथे आरन्स तिच्या अधिक अधिक जवळ जाऊन, अबोलपणे तिच्या मागावर रहात होता; आणि जिथे द्वंद्वातून विजयी होऊन किंवा शत्रूपुढून माघार घेऊन ती परतत होती तिथे तो तरुण योद्धा वेगाने आणि चाहूल लागू न देता आपला लगाम वळवीत होता. कधी इथे तर कधी तिथे, सतत तो हल्ला करण्याकरिता संधी शोधीत होता; आणि थरथरणारा निर्दय भाला हाती घेऊन सावधानतेने सारखे गोलगोल फेरे मारीत होता, त्याचवेळी सिबिलसला अर्पण केलेला आणि पूर्वी त्याचा पुरोहित असलेला, फ्रिजिअन चिलखतात चमकणारा आणि दूर अंतरावरून ठळकपणे उठून दिसणारा क्लोरिअस आणि तो ज्याच्यावरून बराच वेळ दौडत होता तो, ब्राँझचे तुकडे तुऱ्याप्रमाणे सुवर्णाने दाट एकत्र गुंफलेल्या, पृष्ठभागावर वापरावयाच्या आवरणाने रक्षिलेला, फेसाचे तुषार उडालेला त्याचा घोडा एकाएकी पुढे आला. तो खांद्यावर लटकवीत असलेल्या त्याच्या सुवर्णाने मढविलेल्या लायसिअन धनुष्यातून तीक्ष्ण क्रेटन बाण सोडीत असताना त्याच्या चमकदार लाल आणि परकीय जांभळ्या रंगाच्या पोषाखात तो स्वतःही तेजाने उठून दिसत होता. तो एक भविष्यद्रष्टा होता आणि त्याचे शिरस्त्राण सुवर्णाचे होते. आणि त्याच्या सळसळत्या घड्यांच्या तागाच्या केशरी वस्त्राला लावलेला चाप लाल सुवर्णाचा होता. आणि त्याच्या अंगरख्यावर आणि त्याने चढविलेल्या त्याच्या पोटऱ्यावरील पौर्वात्य चढावांवरही सुवर्णाच्या धाग्याने भरतकाम केले होते. शिकारी

वृत्ती असलेल्या त्या कुमारिकेची नजर दुसऱ्या कुणावरच नव्हती. ट्रॉयची शस्त्रे एखाद्या मंदिराच्या भिंतीवर समर्पित भेट म्हणून लटकविण्याची किंवा जिंकलेल्या सुवर्णालंकारात स्वतःला मिरविण्याच्या मनीषेने तिने केवळ त्याचाच पाठलाग संपूर्ण युद्धाच्या परस्पर झुंजणाऱ्या गदारोळात केला होता. ही लूट लुटण्याच्या स्त्रीसहज तीव्र लालसेने युद्धाच्या आघाड्यांमधून ती बेफिकीरीने दौडत होती; त्याचवेळी शेवटी आरन्सने आपला क्षण साधला आणि कुणाच्या दृष्टोस न पडता आपला भाला फेकला : स्वर्गापर्यंत प्रार्थना पोचविण्याकरिता आवाज उंचावून तो म्हणाला : 'अॅपोलो, सर्वश्रेष्ठ प्रभो, पवित्र सोरॅक्टीच्या रक्षणकर्त्या, आम्ही इट्रुस्कन पाईनकाष्ठाच्या राशीत अग्नी चेतवून झगझगत्या विस्तवावरून आमच्या सत्वशील वृत्तीवरील आत्मविश्वासाने दृढ पावले टाकीत दाट निखाऱ्यामधून चालून तुझी इतर लोकाहून अधिक निष्ठापूर्वक आराधना करतो हे सर्वशक्तिमान पित्या, आमची अप्रतिष्ठा माझ्या शस्त्रांनी धुवून निघावी एवढेच माझे मागणे आहे मी कुमारिकेच्या शस्त्रांच्या लुटीची तिच्या पराभवाच्या विजयचिन्हांची, किंवा दुसऱ्या कुठल्याही लुटीची अपेक्षा करीत नाही; माझ्या शौर्याच्या अन्य कृत्यातून मी ती कीर्ती मिळवीन; आणि जर माझ्या हातून झालेल्या जखमेने ही दुःसह चंडिका–हा दुर्धर शाप–पडली तर खरोखर कुठलीही कीर्ती मिळविल्याशिवायच मी माझ्या पितृभूमीला आनंदाने परत जाईन. फीबसने त्याची प्रार्थना ऐकली, आणि त्याच्या प्रार्थनेतील एका भागाला मान्यता द्यायचे त्याने ठरविले, परंतु उरलेले शब्द त्याने वहात्या वाऱ्यावर सोडून दिले. अचानक मृत्यूची नामुष्की कॅमिलाच्या वाट्याला त्याच्या हातून यावी ही प्रार्थना त्याने मान्य केली; परंतु त्याच्या गर्वोन्नत भूमीने तो परतलेला पहावा हे मात्र त्याने मान्य केले नाही. आणि सोसाट्याने ते शब्द दक्षिण झंझावातात दूरवर उधळून गेले, म्हणून नंतर त्याच्या हाताने फेकलेला भाला हवेतून भिरभिरत गेला; आणि प्रत्येक व्हॉल्स्कियन भयंकर एकाग्रतेने आपल्या राजकुमारीकडे वळला आणि सर्व नजरा तिच्यावर स्थिर झाल्या. परंतु तो भाला आकाशातून झेपावून येत असताना त्याच्या सित्काराचे, त्या भाल्याच्या टोकाने तिच्या उघड्या वक्षाखालील आपल्या लक्ष्याचा वेध करीपर्यंत, तिला भान नव्हते. कुमारिकेचे रक्त प्राशन करीत तो खोलवर घुसलेला भाला तिथेच रूतून राहिला. भयभीत होऊन तिच्या साथीदार त्वरित तिच्या भोवती जमल्या, आणि त्यांनी त्यांच्या कोसळत असलेल्या स्वामिनीला सावरले. भयमिश्रित आनंदाने सर्वाहून अधिक विचलित झालेल्या आरन्सने पलायन केले. आपल्या भाल्यावर आता तो अधिक अवलंबून राहाण्यास धजत नव्हता, किंवा त्या कुमारिकेच्या शस्त्रांनाही तोंड देऊ शकत

नव्हता एखाद्या मेंढपाळाला किंवा मोठ्या बैलाला ठार केल्यानंतर लांडगा ज्या प्रमाणे एखादे भयंकर शस्त्र पाठीवर येण्यापूर्वीच त्याच्या अविचारी कृत्याच्या प्रखर जाणिवेने, लपण्याकरिता ताबडतोब उंच दुर्गम पर्वतराजीत जातो, अरण्याकडे धावताना तो आपले शेपूट सैल सोडून पायामधे घालतो व ते थरथर कापत त्याच्या पोटावर आपटत राहाते, त्या लांडग्याप्रमाणेच गोंधळून गेलेला आरन्स सशस्त्र सैनिकात मिसळून, केवळ पळून जाण्याचीच मनीषा धरून दृष्टीपथातून निघून गेला. आसन्नमरण असलेली कॅमिला तो भाला बाहेर ओढू लागली परंतु ते पोलादाचे टोक बरगडयांपर्यन्त घुसून हाडामधील खोल जखमेत घट्ट रुतून बसले होते. मोठ्या प्रमाणावर रक्तस्त्राव झाला आणि ती जमिनीवर कोसळली. तिचे डोळे थिजले, आणि मृत्यूच्या छायेत पापण्या मिटू लागल्या. तिच्या मुखा–वरील पूर्वीची गुलाबी कांती मावळली आणि शेवटच्या निश्वासाबरोबर, तिच्याच वयाची, तिची सर्वाहून अधिक एकनिष्ठ साथीदार आणि तिच्या सर्व सुख-दुःखातही तिची सहभागी, व एकमेव विश्वासस्थान असलेली ॲक्का हिला उद्देशून ती हे शद्ब बोलली, "ॲक्का, माझ्या भगिनी इथे माझे सर्व प्रयत्न संपले. ही परम यातनाकारी जखम माझा घात करीत आहे, माझ्या भोवतीचे जग पुसट होत आहे आणि अंधारत आहे. तू तुझी सुटका करुन घे. आणि स्वतः टर्नसला हा माझा शेवटचा संदेश सांग; म्हणावे युद्धात पुढे सरसावून ये व ट्रोजनांना नगरी पासून हुसकावून लाव. आणि आता मला निरोप दे." ती बोलत असतानाच लगाम तिच्या हातातून पडला, आणि असहाय्य शक्तिहीन होऊन ती धरणीवर कोसळू लागली. तिची काया थंड पडली होती आणि तिचे प्राण सर्वगात्रांतून हळूहळू मुक्त होत होते. तिने आपली निष्प्राणमान आणि मृत्यूने पराभूत केलेले मस्तक खाली टेकले, आणि तिच्या शस्त्रांनी तिचा त्याग केला. हुंदके देत कड–वटपणे तिचा आत्मा छायाविश्वात निघून गेला. तिच्या मृत्यूने उठलेला, सुवर्ण प्रभा असलेल्या तारकायुक्त आकाशाला भेदणारा आक्रोश दारुण होता. कॅमिला धरणीवर कोसळताच समर अधिक प्रखर झाला आणि सर्व ट्रोजन सेना, इट्रुस्कन प्रमुख आणि इव्हॅन्डरचे आर्कॅडिअन दल यांनी एकजुटीने हल्ला चढविला.

दरम्यान डायनाची द्वारपालिका ओपिस बराच वेळ उंच पर्वतशिखराबर आपल्या नियोजित जागी होती आणि निर्लेपपणे ती युद्धाची पहाणी करीत होती. दूर गदारोळात युद्धपिसाट योद्धयांमध्ये कॅमिलावर झालेला मृत्यूचा दारुण आघात पाहून तिने एक निश्वास सोडला; आणि अगदी खोल अंतःकरणामधून तिचा शोक शब्दरुपाने प्रकट झाला : हे कुमारिके ट्रोजनांना युद्धात आव्हान करण्याच्या

प्रयत्नाबद्दल फार कठीण आणि भारी परतफेड तुला करावी लागली. घोर वनांच्या एकांतात तू डायनाची आराधना केलीस, आणि आमचे प्रसादचिन्ह असलेला भाता खांद्यावरून लटकविलास पण त्याचा तुला काही उपयोग झाला नाही. तरीही तुझ्या देवराज्ञीने मृत्यूच्या अंतिम क्षणी तुला अनादरित ठेवले नाहीं. भूलोकावरील अखिल राष्ट्रातून तुझे निर्याण कीर्ती प्राप्त केल्याविना राहणार नाही; आणि 'नंतर ज्याचा सूड घेतला गेला नाही असा' असा मृत्यू आल्याचा अपमान तुला सहन करावा लागणार नाही. कारण ज्याने तुझा देह, या क्षताने भ्रष्ट केला तो कुणीही असला तरी मरण पत्करून त्याला तुझ्या मृत्यूचे मोल द्यावे लागेल. आणि ती त्याला योग्य अशीच शिक्षा होईल. त्या उत्तुंग पर्वताच्या पायथ्याशी मातीचा एक मोठा ढीग होता. ती प्राचीन लॉरेन्टाईन राजा डर्सिन्नसची समाधी होती; तो मातीची रास रचून बांधलेली होती, आणि सदापर्णी ओकवृक्षाच्या छायेचा तिला आडोसा होता. त्या समाधीजवळ ती देवता त्वरित आली आणि तिच्या समर्थ गतिमान चालीत हृद्य सौंदर्य होते. तिथे ती तात्काल ठाम उभी राहिली आणि त्या ढिगाच्या उंचवटयावरून तिने आरन्सकडे पाहिले. त्याच्या चमकत्य शस्त्रात त्याला तिथे गर्वाने फुगलेला पाहून ती त्याला म्हणाली : 'जणू काही निघून जाण्याकरिता तू असा मागे का वळला आहेस ? तुझी पावले इकडे वळव. इकडे ये,–मरण्याकरिता, आणि कॅमिलाच्या मृत्यूची योग्य परतफेड स्वीकारण्याकरिता, परंतु तुझ्यासारख्या अधमाचा अंत स्वत: डायनाच्या शस्त्रांनी व्हावा हा विचारच असह्य आहे!' असे म्हणून त्या थ्रेशिअन देवतेने तिच्या सुवर्णाच्या भात्यातून एक पिसे लावलेला बाण घेतला. अचूक वेध घेऊन तिने धनुष्य वाकविले. तिने त्या धनुष्याची बाकदार टोके जवळ जवळ परस्परांना स्पर्श करीपर्यंत प्रत्यंचा खेचली आणि दोन्ही हातांनी सारखा जोर लावीत डाव्या हाताने बाणाच्या पोलादी फाळाला स्पर्श केला आणि उजव्या हाताने प्रत्यंचा तिच्या वक्षाला घट्ट भिडवली. आणि नंतर त्याच, एकाच क्षणीं, तो बाण भिरभिरत येत असताना वाऱ्याच्या झोताचा आवाज आरन्सच्या कानी आला, आणि तो बाण त्याच्या आत घट्ट रुतून बसला. त्याच्या साथीदारांनी त्याची काहीच पर्वा केली नाही; त्या दुर्लक्षित ठिकाणी भूमीवरील धुळीत तो शेवटचे विव्हळत असता, आणि श्वासातून प्राण सोडीत असता, त्याला सोडून ते गेले. ओपिस आपल्या पंखांनी उडत ऑलिम्पसला परतली.

आपल्या स्वामिनीच्या मृत्यूनंतर प्रथम पलायन केले ते तिच्या स्वतःच्या हलकी शस्त्रे धारण केलेल्या अश्वदलाने. पार विस्कळीत होऊन रुटुलिअनही पळाले. आणि सामर्थ्यशाली ॲटिनासही पळाला; आपल्या तुकडयांपासून अलग

झालेल्या सेनाधिकाऱ्यांनी व आपले नेते गमावलेल्या सेनादलाने मागे फिरून आणि वेगाने तटभितीकडे दौडून सुरक्षित आसरा शोधला. हाती शस्त्रे परजीत बरोबर साक्षात मृत्यू घेऊन, बेफामपणे त्यांचा अगदी जवळून पाठलाग करणाऱ्या ट्रोजनांना आपल्या अस्त्रांनी रोखण्याची किंवा त्यांच्याविरुद्ध खडे राहण्याची ताकद कुणातच नव्हती. त्याऐवजी त्यांनी प्रत्यंचा ढिल्या पडलेली धनुष्ये आपल्या गळलेल्या खांद्यांवर लटकविली; घोडयांच्या चार खुरांच्या तडाख्याखाली धरणी हादरली आणि उखडून गेली. काळ्या ढगांच्या गदारोळात धुळीचे लोट नगर-भितींकडे आले. टेहेळणी बुरजावर माता उभ्या राहिल्या व त्यांनी त्यांच्या वक्षांवर मुष्टीचे आघात केले, आणि त्यांचा बायकी आक्रोश आकाशीच्या तारकांपर्यंत उंचावला, खुल्या वेशीतून जे पहिले पराजित पळत आत घुसले त्यांच्यापाठोपाठ, पळपुट्यांच्यात मिसळून शत्रुसेनेचा लोंढा आत घुसला; ते पळपुटे आपला दीनवाणा अंत आता टाळू शकत नव्हते; कारण त्यांच्या स्वतःच्या वेशीत, त्यांच्या स्वत.च्या नगरभितीच्या आत आणि त्यांच्या स्वतःच्या इमारतींचा आसरा भोवताली असतानाही ते भोकसले गेले आणि त्यांनी प्राण सोडले. काही आतून बचाव करणाऱ्यांनी नंतर वेशी बंद केल्या. आपल्या मित्रांना आत येण्याचा मार्ग खुला ठेवण्याचे किंवा ते विनवण्या करीत असताही त्यांना नगरभितींच्या आत घेण्याचे धैर्य त्यांना झाले नाही, आणि मग ज्यांनी प्रवेशाच्या मार्गावर सशस्त्र संरक्षण फळी राखली किंवा ज्यांनी पळता पळता आपणहूनच शत्रूच्या शस्त्रांवर स्वतःला लोटून दिले,-त्या सर्वांचा त्यांचा अत्यंत केविलवाण्या रीतीने संहार झाला. त्यांच्या स्वतःच्या आक्रोश करणाऱ्या मातापित्यांच्या डोळ्यांदेखत जे बाहेर कोंडले गेले होते त्यांच्यापैकी काही दाणादाणीच्या गदारोळात खंदकात तोंडघशी लोटले गेले; बाकी इतरांनी लगाम सैल सोडले, आणि घोड्यांना टाच मारून पुढे सरसावताना, त्यांनी त्याना अविचलपणे अटकाव करणाऱ्या वेशीच्या दारांच्या बिजागऱ्यांच्या खांबावर आंधळेपणे धडका घेतल्या. मातृभूमीवरील खऱ्या प्रेमाने प्रेरित झालेल्या आणि कॅमिलाने घालून दिलेले उदाहरण पाहिल्यावर तिचे अनु-करण करण्याचा उत्साह असलेल्या नगरभितीवरील मातांनीही बावरलेल्या अधीरतेने स्वतःच्या हातांनी शस्त्रे फेकली; मात्र पोलादाऐवजी त्यांनी कठीण ओकची दांडकी आणि आगीत जाळून तीक्ष्ण टोके केलेल्या मेढी फेकल्या. समराच्या आघाडीवर मरेपर्यंत भितीचे रक्षण करण्याकरिता त्या पेटल्या होत्या.

तोंवर अरण्यात टर्नसला तो कटु संदेश मिळाला आणि त्याने त्याची विचारशक्ती ग्रासली; कारण अॅक्काने त्या तरुण राजपुत्राला अत्यंत कष्टी

करणारे, व्हॉल्स्किअन फळी नष्ट झाल्याचे, कॅमिलाचा वध झाल्याचे, शत्रूने सर्वांची झंझावाती विजयाने दाणादाण उडविल्याचे, शत्रू नगराकडे महाभयंकर हल्ला चढविण्याकरिता दौडत असल्याचे, आणि नगरभिंतीपर्यंत सर्वत्र घबराट उडाल्याचे व निकराच्या आणीबाणीचे वृत्त आता आणले होते. ज्युपिटरची क्रूर आणि अनिवार्य आज्ञा क्षुब्ध मनाने स्वीकारून तो ज्या पर्वतावर थांबला होता तिथून तो खाली उतरला आणि त्याने घनदाट वनराई असलेली उतरण मागे टाकली. तो दृष्टीपथातून थोडा पुढे जाऊन सखल भूमीवर पोहोचला न पोहोचला तोच ट्रोजन प्रमुख इनीआसने त्या रक्षण नसलेल्या खिंडीत प्रवेश केला, पर्वत शिखर ओलांडले आणि तो वनछायेतून बाहेर पडला. अशा तऱ्हेने दोन्हीही सेनाधिपती आपल्या सर्व सेनेसह आणि परस्परांपासून अगदी थोड्या अंतरावरून अत्यंत त्वरेनें नगरभिंतीकडे निघाले. धुळीचे लोट उठलेल्या रणक्षेत्रातून इनीआसने समोर पुढे पाहिले तेव्हा त्याला लॉरेन्टाईन सेना दिसली, आणि त्याचवेळी पुढे येणाऱ्या पावलांचे आवाज आणि घोड्यांचे फुरफुरणे ऐकून टर्नसने हल्ला करण्यास एकदम सिद्ध असलेल्या इनीआसचे अस्तित्व जाणले. दिवस अस्तंगत होत असताना रात्र पुन: परत आणीत लाल सूर्य जर त्यावेळी आपल्या थकलेल्या घोड्यांना स्पेनच्या सागरात स्नान घालीत नसता तर त्याचवेळी ते संघर्षात भिडले असते आणि युद्धाच्या कसोटीस तोंड देण्यास सज्ज झाले असते. म्हणून त्या सैन्यांनी नगरीच्या समोरच तळ ठोकला आणि आपल्या संरक्षणाकरिता त्यांनी मेढेकोट उभे केले.

सर्ग बारावा

# निर्णय – टर्नसचा मृत्यु

**मा**र्सच्या द्वेषामुळे हतप्रभ झालेल्या लॅटिनांमधे आता सामर्थ्य उरले नाही, आणि प्रत्येक नजर त्याला एकटयाला वेगळा काढून त्याने स्वेच्छेने दिलेले आश्वासन आता पाळावे अशी मागणी करीत आहे हे टर्नसला दिसत होते. त्याचे काळीज घोर युद्धाच्या आकांक्षेने धडधडत होते, आणि जिला चेतविण्याची आवश्यकता नव्हती अशा दुराराध्य ज्वालेने तो पेटला होता. ज्याप्रमाणे आफ्रिकेच्या अरण्यात शिकाऱ्यांनी छातीत भयंकर जखमी केलेला विक्राळ सिंह निर्वाणीची झुंज देतो आणि मोठ्या आनंदाने आपली दाट केसाळ आयाळ मानेवर उडवितो, मागावर असलेल्या शिकाऱ्याने उरात रूतविलेला भाला निर्भयपणे मोडून टाकतो, रक्ताळलेला जबडा उघडतो आणि गर्जना करतो, तसाच टर्नसचा क्रोधायमान आवेश होता आणि त्याचा दुराग्रही त्वेष तसाच उफाळला. उद्दाम वृत्तीने तो राजाशी बोलू लागला : 'मी, टर्नस, कोणताही अडथळा निर्माण करीत नाही. इनीआसच पाठपुरावा करणाऱ्या भ्याडांना त्यांचे आव्हान माघारी घेण्याचे किंवा आपल्या संधीचा भंग करण्याचेही कारण नाही. मी झुंजण्याकरिता जातो. आमचे प्रमुख म्हणून महाराज, या यज्ञाची आयुधे आणा आणि शस्त्र-संधीच्या अटी मुक्रर करा. लॅटिनहो, तुम्ही बसून पाहत असतानाच या उत्तम बाहूने मी त्या पळपुटया आशिआई डार्डनला पाताळात टार्टरसमधे पाठवीन, आणि माझ्या खड्गाने मी एकटा आपल्याला चिकटलेली अप्रतिष्ठा झुगारुन देईन, किंवा मग पराजित म्हणून आपण त्याच्या आधीन होऊ आणि त्याची वधू म्हणून लॅव्हिनिआ त्याच्याकडे जाऊ द्या.'

आपल्या भावनांवर काबू करून लॅटिनसनें टर्नसला उत्तर दिले: 'हे अद्वितीय वीरवृत्ती असलेल्या तरुण राजपुत्रा, तुझ्या झंझावाती शौर्याने तू जितक्या अधिक

प्रकर्षाने तुझी श्रेष्ठता सिद्ध करतोस तितक्याच न्याय बुद्धीने मलाही विचारपूर्वक सल्ला घेतला पाहिजे आणि प्रत्येक धोक्याचा काळजीपूर्वक अंदाज घेतला पाहिजे. तुझा पिता डॉनस याचे राज्य तुझ्याकडे आलेले आहेच. त्या शिवाय तू स्वतःच्या उत्तम बाहुबलाने जिंकलेली अनेक नगरे तुझ्या आधिपत्याखाली आहेतच. आणि शिवाय माझ्याजवळ, लॅटिनसजवळ, सुवर्ण आहे आणि मी वृत्तीने उदार आहे. लॅशिअम आणि लॉरेन्टाईन भूमीत उच्च कुलातील दुसऱ्या अविवाहित युवती आहेत, तर मग मला स्पष्टपणे बोलू दे आणि हे विचार व्यक्त करणे अप्रिय असले तरी ते मला तुला सांगू दे. आणि तूही माझा उद्देश मनापासून समजुन घे. अधर्मकृत्य केल्याशिवाय माझ्या कन्येचा विवाह मी तिला पूर्वी मागणी घातलेल्या कोणत्याही वराशी करू शकत नाही; प्रत्येक मानवी आणि दैवी भविष्यभाषितांनी या विषयी मला पूर्वसूचना दिली आहे. तरीही माझे तुझ्यावरील प्रेम, आपले नात्याचे संबंध आणि माझ्या राज्ञीचे दुःख आणि अश्रू यांचा माझ्यावर प्रभाव पडून मी सर्व विरोध मोडून काढले. वाग्दत्त वधू मी तिच्या नियोजित वरापासून हिरावली आणि दुष्टपणे रणात प्रवेश केला. तेव्हापासून समरातील आपत्तीनी माझा कसा पाठपुरावा केला आहे हें, टर्नस तू स्वतः पाहतो आहेसच, आणि इतर सर्वांहून तुला स्वतः किती घोर यातनांतून जावे लागले हे तुला ज्ञात आहेच. दोन मोठ्या युद्धात पराजित झाल्यामुळे इटलीच्या भवितव्याची कसलीही आशा आपण आता आपल्या नगरीतही बाळगू शकत नाही. टायबरचा प्रवाह आपल्या रक्ताने अजूनही उष्ण आहे आणि आपली विस्तृत मैदानें आपल्या स्वकीयांच्या अस्थीनी पांढरी झाली आहेत, याच विषयाकडे पुनः पुनः वळण्याचे मला काही प्रयोजन आहे का? आणि माझा हेतू बदलत राहण्याइतका मी वेडा आहे का? मृत्यूने टर्नसला प्रथमच दूर केले असते तर मित्र म्हणून ट्रोजनांचा मी उत्सुकतेने स्वीकार केला असता, मग त्या ऐवजी टर्नस अजून सुरक्षित आहे तोवर मी या सर्व संघर्षाचा शेवट का करीत नाही ? तुझे स्वतःचे भाऊबंद रुटुलिअन काय म्हणतील आणि खरोखर अखिल इटलीचा निर्णय काय असेल–जर केवळ माझ्या कन्येशी विवाह करून माझ्या कुलाशी संबंध प्रस्थापित करण्याचा तू प्रयत्न केलास म्हणून मी तुला मृत्यूमुखी लोटले असे सिद्ध झाले तर? दैव करो आणि माझे भय खोटे ठरो! युद्धातील योगायोगांच्या लहरीपणाचा विचार कर. तुझ्या दूर देशातील घरी, आर्डिआत, दूर असलेल्या आपल्या पुत्राची चिंता करणाऱ्या तुझ्या वृद्ध पित्यावर दया कर. ”

परंतु टर्नसचा त्वेषयुक्त निर्धार या शब्दांनी रतीमात्रही ढळू शकला नाही. त्याचा भावनावेग अधिकच तीव्र झाला. उपाययोजनेने विकार कमी होण्या-ऐवजी तो अधिकच बळावला. ज्या क्षणी क्षुब्ध मनावर तो ताबा मिळवू शकला त्या क्षणी त्याने बोलायला सुरवात केली, " महाराज, माझ्याकरिता मी तुम्हाला प्रार्थना करतो की, माझ्याविषयी तुम्हाला जी चिंता वाटते ती सोडून द्या, आणि पुरुषार्थाकरिता मला मृत्यूशी सौदा करू द्या. माझा बाहू दुसऱ्या कोणत्याही माणसासारखाच कणखर पोलादी अस्त्रांचा उत्तम वर्षाव करू शकतो; आणि मी जेव्हा प्रहार करून जखम करतो तेव्हा रक्ताचा पूर इतरांपेक्षा काही कमी प्रमाणात वहात नाही. त्याचे पलायन झाकण्याकरिता त्याची देवता माता आता त्याच्या समीप खचित असणार नाही. ही फसवणूक स्त्रीस शोभणारीच आहे; आणि त्याने अंधाराच्या छायांत लपण्याचा प्रयत्न केला तरी तो व्यर्थ ठरणार आहे. "

परंतु युद्धाच्या पुन्हा उभ्या राहिलेल्या संकटाने राज्ञी भयभीत झाली आणि ती रडू लागली. जणू काही ती आता मरणार आहे अशा आवेगाने तिने आपल्या कन्येच्या त्वेषाने पेटलेल्या प्रियकराला मिठी घातली : ' टर्नस, या अश्रूंची शपथ घालून, तुझ्या अंतःकरणावर अजूनही असर करणाऱ्या आमाताविषयीच्या तुझ्या भावनेची शपथ घालून मी तुला विनविते ! आता तूच केवळ माझे एक आशा-स्थान आहेस; माझ्या वृद्धापकाळातील दुःखात तूच केवळ माझा आसरा आहेस ! लॅटिनसची सर्व सत्ता आणि प्रतिष्ठा तुझ्यावरच अवलंबून आहे; कारण आमचे सर्व घराणे डळमळते आहे व तुझ्या आधारावर कसेबसे सावरून राहिले आहे मी केवळ एकच याचना करते; ट्रोजनांशी निकट भिडून लढणे टाळ. तू योजीत अस-लेल्या युद्धात जी दैवगती तुझी प्रतिक्षा करीत आहे तीच दैवगती टर्नस, माझ्याही वाटयाला येणार आहे. त्यात तुझा अंत झाला तर मीसुद्धा या तिरस्कृत सूर्य-प्रकाशाला सोडून जाईन. कारण बंदीवान होऊन इनीआस माझा जामात झालेला पाहण्यास मी कधीही जिवंत राहू शकणार नाही.

लॅव्हिनिआने आपल्या आईची विनवणी ऐकली. तिच्या तप्त मुखावर तात्काल पसरलेल्या दाट लालिम्याने आरक्त आणि भावविवश झालेल्या गालां-वरून अश्रूंचे ओघळ वाहू लागले; ज्याप्रमाणे एखादा कलाकार हिन्दुस्तानी हस्ती-दंतावर रक्तासारखा लाल रंग देतो, किंवा शुभ्र लिलीपुष्पात मिसळलेल्या असख्य गुलाबपुष्पांचा रंग त्यांच्या शुभ्र रंगावर परावर्तित होतो तसे रंग त्या कुमारीच्या वदनावर दिसत होते. प्रेमातिशयाने टर्नसने आपले नयन तिच्यावर स्थिर केले,

आणि शस्त्रसंग्रामाची त्याची आकांक्षा अधिकच तीव्र झाली. आमाताला त्याने दिलेले उत्तर परिमित होते : 'महाराज्ञी, अश्रूंच्या या अशुभ शकुनाने मला मार्सच्या क्रूर संघर्षावर पाठवू नका अशी मी आपली याचना करतो. मृत्यू पुढे ढकलण्याचे स्वातंत्र्य टर्नसला नाही, इडमॉन आता तू माझा दूत हो आणि माझे हे त्याला न रुचणारे शब्द त्या फ्रिजिअन राजप्रमुखाला सांग. म्हणावे उद्या लाल चक्रांच्या रथातून संचार करणाऱ्या उषेचे आरक्त वदन प्रथम आकाशात प्रकटल्याबरोबर त्याने ट्रोजनांना रुटुलिअनांविरुद्ध रणांगणावर पाठवू नये. परंतु ट्रोजन आणि रुटुलिअन शस्त्रे विश्रांत असायला हवीत, त्याच्या आणि माझ्या रक्तानेच आपण या युद्धाचा निर्णय लावायचा आहे. त्या समरांगणावरच लॅव्हिनिआचे पाणीग्रहण व्हायचे आहे.'

हे शब्द बोलून तो तात्काळ प्रासादाच्या अंतर्भागात निघून गेला. त्याने त्याच्या घोड्यांना आणण्याची आज्ञा केली आणि त्यांचा अधीर अवखळपणा तो आनंदाने पाहत राहिला. हे अभिमान वाटण्यासारखे घोडे साक्षात ओरिथिआने पिल्यूम्नसला दिलेले होते. कारण त्यांची तेजस्वी शुभ्रता हिमाहून वरचढ होती आणि गतीत ते वाऱ्यालाही मागे टाकीत असत. त्यांच्या जवळच त्यांचे चपळ सारथी त्यांना उत्तेजित करण्याकरिता त्यांच्या छातीवर हाताच्या ओंजळीने थोपटीत आणि त्यांच्या मानेभोवती पडलेली आयाळ विंचरीत उभे होते. नंतर टर्नसने सुवर्ण आणि फिक्या सुवर्णरंगी ब्रॉंझने जड झालेले उरस्त्राण खांद्यांवरून चढविले. त्याने आपले खड्ग आणि ढाल ठीक बसविली. आणि आपले लाल पिसांचा तुरा असलेले शिरस्त्राण धारण केले. अग्नीशक्ती व्हल्कनने स्वत: ते खड्ग टर्नसचा पिता डॉनस याच्याकरिता घडविले होते, आणि ते शुभ्र-तप्त असतानाच स्टीक्सच्या पाण्यात त्याला धार चढविली होती. नंतर टर्नसने त्या महालाच्या मध्यावरील उंच स्तंभाला टेकलेला, ऑरन्कन ॲक्टॉरपासून जिंकून घेतलेला तयार असलेला बळकट भाला हाती घेतला. त्याने तो इतका गदगद हलविला की तो थरथरला आणि टर्नस मोठ्याने म्हणाला. 'आजवर माझ्या हाकेला कधीही नकार न दिलेल्या माझ्या भाल्या, आता वेळ आली आहे. एकदा शूर ॲक्टॉरने तुला धारण केले होते; आणि आता तू टर्नसच्या उजव्या हातात आहेस मला फ्रिजिआच्या त्या अर्ध-पुरुषाला धुळीत मिळवू दे, आणि माझ्या सर्व शक्तीनिशी त्याचे उरस्त्राण फोडून काढून त्याच्या चिंध्या मला करू दे. त्याचे सुगंधी वनस्पतीचे तेल लावलेले व चिमट्यांनी कुरळे केलेले केस मला मातीने माखू दे!' ही बेताल अवस्था त्याच्या मनात संचारली. त्याच्या भिरभिरत्या डोळ्यात ज्वाला चमकली. आणि

अंतरंगातील स्फुल्लिंग टाकणारा भयंकर दाह त्याच्या मुखावर प्रकटला. एखाद्या झुंज जुंपण्यापूर्वी डरकाळी फोडून भय निर्माण करणाऱ्या, आणि क्रुद्ध होऊन शिंगे रोखून आपल्या धडकांनी वाऱ्याला आव्हान करीत, एखाद्या झाडाच्या खोडावर चढाईचे पवित्रे घेत किंवा प्रत्यक्ष झुंजीपूर्वी वाळू उडवून किरकोळ ढोसण्या मारणाऱ्या बैलाप्रमाणे तो होता.

दरम्यान, आता सुचविण्यात आलेल्या नव्या योजनेप्रमाणे युद्धाचा निकाल लावण्याच्या शक्यतेमुळे इनीआस आनंदित झाला होता. त्याच्या मातेने त्याच्याकरिता आणलेली शस्त्रे धारण करून, त्यानेही टर्नस इतक्याच निष्ठुर मनोवृत्तीने आपल्या शौर्याला धार चढविली आणि तीव्र संताप चेतविला. आपल्या मित्रांना आणि चिंताक्रांत आणि उदास झालेल्या आयुलस दिलासा देत त्याने या घटनांमागे असलेल्या नियतीदेवतेच्या खेळीविषयी त्यांना समजावून सांगितले. नंतर त्याने आपल्या अधिकाऱ्यांना आपला निर्णय कळविणारा व शांतता-संधीच्या अटी मुक्रर करणारा संदेश राजा लॅटिनसकडे घेऊन जाण्याविषयी सूचना दिल्या.

नव्या दिवसाच्या उषेने पर्वतशिखरावर आपली प्रभा उधळण्यास नुकतीच सुरवात केली होती. आणि सूर्याच्या रथाचे घोडे नुकतेच खोल सागरातून वर येऊन आपल्या उर्ध्वदिशेस केलेल्या नासिकाग्रातून प्रकाशाचे निश्वास टाकू लागले होते. ट्रोजन आणि रुटुलिअन सेनानींनी त्या बलिष्ठ नगरीच्या तटभिंतीजवळच द्वंद्वयुद्धाचे रणक्षेत्र मोजून घेतले होते, आणि त्याच्या मध्यावर दोन्ही पक्ष ज्या देवतांची आराधना करीत असत त्यांच्याप्रीत्यर्थ अग्नीकुंडे आणि तृणाच्छादित वेदी मांडून त्याची सिद्धता ते करीत होते; आणि लांबलचक पूजावस्त्रे परिधान केलेले व पवित्र पूजा-पल्लवांच्या माळा मस्तकी धारण केलेले पुरोहित अग्नी आणि जल आणण्यास सुरवात करीत होते. इटॅलिअन सेनादले खांद्याला खांदा लावून माणसांनी फुललेल्या वेशीतून शिस्तीत बाहेर पडली. दुसऱ्या बाजूने ट्रॉय आणि इट्रुरिआचे सैन्य आपल्या वेगवेगळ्या गणवेषात, जणू काही युद्धाच्या भाषण ललकारीने त्याना रणांगणावर पुकारले असावे, असे संपूर्ण शस्त्रसिद्ध होऊन त्वरेने आले. आणि ऐटदार जांभळ्या आणि सोनेरी वस्त्रात आपल्या सहस्त्रावधी सेनेमधून त्वरेने येणारे सेनाधिकारी, अॅसॅरॅकस कुलातील म्नेस्थिअस, शूर अॅसिलॅस, आणि स्वत: नेप्च्युनचा पुत्र अश्वशिक्षक मेसॅपस हे होते. ठराविक इशाऱ्याबरोबर सर्व आपआपल्या नेमलेल्या जागेवर सरकले; त्यांनी आपले भाले जमिनीत रोवले, आणि त्यांच्यावर आपल्या ढाली टेकवून ठेवल्या. नंतर मोठ्या उत्सुकतेने येणाऱ्या

येणाऱ्या माता, निःशस्त्र जनसमुदाय, दुर्बल आणि वृद्ध यांचा आपल्या घरातून पूर लोटला, आणि ते मनोऱ्यावर आणि घरांच्या छपरावर जमले, किंवा उंच वेशींवर उभे राहिले.

त्याचवेळी, आता आल्बान या नावाने ओळखल्या जाणाऱ्या, परंतु त्याकाळी अनामिक असलेल्या व कसलीही प्रतिष्ठा किंवा ख्याती नसलेल्या टेकडीच्या उंच शिखरावरून जूनोने खाली पाहिले; तिने ते समरांगण निरखून पाहिले, लॉरेन्टाईन आणि ट्रोजन सेना पाहिली, आणि लॅटिनसची नगरीही पाहिली. लगेच ती तिच्याप्रमाणेच देवता असलेल्या टर्नसच्या बहिणीशी बोलली. ती जलाशय आणि रोरावणाऱ्या नद्यांची अधिष्ठात्री देवता होती. हिरावलेल्या कौमार्याची भरपाई म्हणून स्वर्गाचा राजा ज्युपिटर, यानेच हे पद तिला सोपवून दिले होते. 'नद्यांचे गर्वस्थान असलेल्या आणि मला अंतःकरणापासून प्रिय असलेल्या हे जलदेवते, लॅशिअममधील ज्या कुमारिकांना दृढनिश्चयी ज्युपिटरची निःश्रेयस शय्यासोबत करणे भाग पडले होते त्यां सर्वापेक्षा माझी तुझ्यावर अधिक कृपा आहे हे तुला माहीत आहेच, आणि मी तुला तुझ्या आकाशखंडातील तुझे स्थान मोठ्या आनंदाने दिले आहे. ज्युटर्ना, तुला लवकरच भोगाव्या लागणाऱ्या दुःखाबद्दल मी तुला सांगते आहे; मात्र मला बोल लावू नकोस; कारण ज्या ज्या स्थळी दैवाने मला अनुमती दिली, लॅशिअमला नियतीने यश मिळवू दिले, त्या त्या ठिकाणी मी टर्नसचे आणि तुझ्या तटबंदीयुक्त नगरीचे रक्षण केले आहे. परंतु आता तो तरुण राजपुत्र त्याच्या शत्रूहून दुर्बलतर दैवगतीच्या सहाय्याने युद्धात गुंतला आहे हे मला दिसत आहे. तो नियतीदेवतांचा व दुष्ट शक्तींचे प्रावल्य असलेला दिवस जवळ आला आहे. मी स्वतःच्या उघड्या डोळ्यानी हा शस्त्रसंधी आणि द्वंद्व पाहू शकत नाही. परंतु तुझ्या भावाला जर काही अधिक प्रभावी सहाय्य करण्याचे तुझ्या ठायी साहस असेल तर तू पुढे हो, कारण ते इष्टच आहे. कदाचित तुम्हा दुर्दैवी बहिणभावांच्या बाबतीत काही अधिक आशादायक घडेलही!' तिचे बोलणे संपते तोच ज्युटर्नाच्या नेत्रातून अश्रू वाहू लागले. आणि तीन वेळा व आणखी एकदा तिने आपल्या सुंदर वक्षावर हस्तप्रहार केला. 'ही रडत बसण्याची वेळ नाही' सॅटर्निअन जूनो म्हणाली, 'त्वरा कर आणि तुला काही मार्ग सापडला तर तुझ्या भावाला मृत्यूपासून हिरावून घेऊन जा! नाही तर त्यानी घडवून आणलेला हा शस्त्रसंधी उधळून लाव, आणि युद्ध पुनः भडकव. माझ्या अनुमतीनेच तू हे साहस करीत आहेस.' या उत्तेजन देणाऱ्या शब्दांबरोबर ती ज्युटर्नाला विद्धचित्त, अनिश्चित आणि दिङ्मूढ अशा अवस्थेत सोडून गेली.

त्यांचे संभाषण चालू असतानाच राजे स्वतःच पुढे आले. आपला पूर्वज जो सूर्य त्याचे प्रतीक म्हणून स्वतःच्या तेजस्वी मस्तकाभोवती बारा सोनेरी किरणांची प्रभावळ धारण केलेला लॅटिनस चार घोड्यांच्या मोठ्या व प्रचंड रथातून दौडत आला. टर्नस त्याच्यामागून दोन घोड्याच्या रथातून आला. त्याच्या हातात दोन रुंद पात्याच्या भाल्यांचे दांडे थरथरत होते. नंतर ट्रोजन छावणीवरून रोमन कुलाचा संस्थापक सेनाप्रमुख इनीआस, दैदीप्यमान तेजाने तळपत, आपली तारकेप्रमाणे चमकणारी ढाल घेऊन स्वर्गात घडविलेल्या शस्त्रांसह आला. त्याच्या जवळूनच रोमन वैभवाची दुसरी आशा अॅस्कॅनिअस आला. अतिशुभ्र उत्तरीय वस्त्रे परिधान केलेल्या पुरोहिताने एक राठ केस असलेल्या वराहाचे पिल्लू आणि कधीही लोकर न कापलेली दोन वर्षांची मेंढी आणली आणि ते बळी त्याने आधीच प्रज्वलित झालेल्या वेदीवर नेले. त्या राजपुत्रांनी आपले डोळे उगवत्या सूर्याकडे वळविले. मूठभर खारविलेले पीठ अर्पण केले आपल्या शस्त्रांनी त्या पशूंच्या कपाळावर खूण केली आणि आपल्या चषकातून वेदीवर मद्याची अर्घ्ये दिली. नंतर सत्यशील इनीआसने आपले खड्ग अनावृत केले आणि प्रार्थना केली, 'हे सविता, तू आता माझा साक्षी आहेस. आणि हे इटलीच्या भूमी, मी तुला आवाहन करतो; कारण तुझ्याकरिताच आतापर्यंतच्या भयंकर दिव्यातून तरून जाण्यास मला शक्ती देण्यात आली होती. आणि हे सर्व शक्तिमान पित्या, तुझा, आणि तुझीही, हे सॅटर्निअन राज्ञी, हे देवते,–आता शेवटी तरी आमच्यावर अधिक दयावंत व्हाल अशी मी आशा करतो.– मी तुमची प्रार्थना करतो; आणि हे पित्या, प्रत्येक युद्धावर दैवी सत्ता असलेल्या वैभवशाली मार्स, मी तुझी प्रार्थना करतो; आणि निर्झर आणि सरिता, आणि उच्च आकाशस्थ सर्व देवतांनो, आणि निळ्या सागरातील सर्व शक्तींनो मी साहाय्यार्थ तुम्हाला आवाहन करतो. दैवयोगाने जर विजयश्री ऑसोनिअन टर्नसकडे वळली तर हे आता मान्य केले गेले आहे की पराजित जन इव्हँन्डरच्या नगरीला निघून जातील. आयुलस या भूमीवरील आपला अधिकार सोडून देईल, आणि इनीआसची माणसे यानंतर केव्हाही पुन्हा युद्ध करणार नाहीत किंवा पुन्हा सशस्त्र येऊन या राज्याला खड्गाने धाक घालणार नाहीत. परंतु उलट पक्षी विजयाने मार्सची कृपा आमच्यावर आहे असे सिद्ध केले,– आणि मला वाटते हेच अधिक संभवनीय आहे, आणि तसेच घडविण्याचा देवांचा हेतू असू दे–तर ट्रोजनांचे दास्य इटॅलिअनांनी करावे अशी मी कधीही आज्ञा देणार नाही, किंवा मी स्वतःकरिता राज्यधिकाराची अपेक्षाही करणार नाही. या दोन स्वतंत्र राष्ट्रांना समान अटींवर चिरंतन संधी करू दे. मी आमचे ट्रोजन पूजाविधी

आणि ट्रोजन देवतांची प्रतिष्ठा करीन. परंतु आमच्या संयुक्त घराण्यांचा पिता म्हणून सर्व लष्करीसत्ता आणि सर्व नागरी अधिकारवैभव लॅटिनसकडेच राहील. ट्रोजन माझ्याकरिता माझ्या स्वतःच्या तटबंदीबद्ध नगराची रचना करतील, आणि लॅव्हिनिया या नगरीला आपले नाव देईल.

इनीआस प्रथम बोलला, आणि नंतर लॅटिनस बोलला. आकाशाकडे पाहून आणि आपला उजवा हात आकाशाकडे पसरून त्याने प्रार्थना केली. ' इनीआस, मीही पृथ्वी, सागर आणि तारकांची शपथ घेतो, लॅटोनाच्या जुळ्या मुलांची, दोन शिरे असलेल्या जॅनसची, पाताल देवतांच्या सामर्थ्याची, आणि दुराराध्य डिसच्या मदिरांची शपथ घेतो. ज्याचा वज्राघात हे प्रत्येक संधीचे शिक्कामोर्तब आहे त्या पित्याने माझे वचन ऐकावे, ' मी या वेदीला स्पर्श करतो; माझे साथीदार म्हणून मी येथील सर्व देवतांना आणि आपल्या समोर जळत असलेल्या अग्नीला पाचारण करतो. दैवात काहीही असले तरी या इटॅलिअन ऐक्यसंधीचा भंग करणारा दिवस कधीही उगवणार नाही. पृथ्वीवर प्रलयाचा गदारोळ उठला आणि ती लाटांमधे लोटली गेली, आकाशाची शकले होऊन ते नरकात भिरकावले गेले तरी ही कोणतीही शक्ती माझा निश्चय कधीही वाकवू शकणार नाही. माझ्या या राज-दंडाला " त्याच वेळी त्याच्या उजव्या हातात एक राजदंड होता– ' ज्याप्रमाणे आता निश्चित कधीच पालवी फुटणार नाही किंवा त्याच्या फांद्यांची कधी छाया पडणार नाहीं, त्याप्रमाणे, तितक्याच निश्चितपणे माझा निश्चय अढळ राहील– कारण ज्यावेळेपासून त्याच्या वनातील निवासातील, मूळ झाडाच्या खालच्या भागापासून तो कापला होता, त्याच्या फांद्या आणि पालवी पात्याच्या धारेने खाली उतरली होती, आणि त्याची माता त्याला आता नाहीशी झाली होती, तेव्हापासूनच तो पर्णहीन आहे. पूर्वी तो एक वृक्ष होता परंतु आता कारागिरांनी त्याला सुबक ब्रॉन्झमधे बसवून सुशोभित करून लॅशिअमच्या पूर्वजांना तो धारण करण्याकरिता दिला आहे. "

सर्व सेनाधिकाऱ्यांच्या समक्ष त्या शस्त्रसंधीला मान्यता देताना त्यांनी केलेली भाषणे अशी होती. नंतर त्यांनी त्या समर्पित पवित्र पशूंना त्या अग्नीत विधीपूर्वक बळी दिले; आणि ते पशू श्वसन करीत असतानाच त्यांचे अंतर्भाग ओरबाडून बाहेर काढले, आणि वेदींवर नैवेद्याची ताटे भरभरून मांडली.

पण इतके सर्व होऊनही रूटुलिअनांना हे द्वंद्व बऱ्याच वेळापासून अन्याय्य वाटत होते. अनेक विसंवादी भावनांनी त्यांची अंतःकरणे विद्ध झाली होती परंतु आता त्या प्रतिस्पर्ध्यांचे जवळून दर्शन घडल्यावर, आणि त्यांचे असमान

सामर्थ्य लक्षात आल्यावर ते अधिकच अस्वस्थ झाले होते. जेव्हा यौवनाचा गुलाबी रंग फिका झालेल्या गालावर कोवळ्या पुरूषत्वाची लव असलेला टर्नस निःशब्दपणे पुढे आला आणि त्याने विनम्र भावाने अधोवदन होऊन बेदींना वंदन केले तेव्हा त्याच्या दर्शनाने त्यांची चिंता आणखी अधिकच वाढली. अशा तऱ्हेचे बोलणे लोकात पसरत आहे आणि जनसमुदायाच्या भावना अनिश्चित आणि चंचल होत आहेत असे त्याची बहीण ज्युटर्ना–हिच्या लक्षात येताच तिने कॅमेर्संचे रूप धारण केले. कॅमेर्संचा जन्म उच्च पूर्वजांच्या कुलात झाला होता; त्याच्या पित्याच्या शौर्याने त्याला सुकीर्ती प्राप्त झाली होती, आणि तो स्वतः शस्त्रविद्येत खूप पारंगत होता. कॅमेर्संच्या वेषात ज्युटर्नाने सेनेमधून संचार केला. काय म्हणायचे हे तिला पूर्ण माहीत होते. वेगवेगळ्या वंदनांचे पीकच तिने पसरविले आणि ती म्हणाली, ' रूटुलिअन हो, तुमचे झोकदार सैन्य वाचविण्याकरिता एका माणसाचा जीव मृत्यूच्या धोक्यात घालण्याची तुम्हाला शरम नाही का वाटत ? आपण संख्या आणि सामर्थ्याने त्यांच्या बरोबरीचे नाही काय ? हे पहा त्यांचे सर्व सैन्य इथे तुमच्या पुढे आहे; हे ट्रोजन आणि आर्केडिअन आणि टर्नसशी वैर असलेल्या, शकुनांवर अंधश्रद्धा असलेल्या इट्रुस्कनांचे सेनादल आहे. आपल्यातला प्रत्येक एक आड एक माणूस जरी त्यांना भिडला तरी त्या प्रत्येकाला प्रतिस्पर्धी मिळणे कठीण जाईल. टर्नस तर निश्चितच आता ज्या देवतांच्या वेदीवर आपले जीवित समर्पित करीत आहे त्या देवतांप्रत मोठ्या सन्मानाने आरूढ होणार आहे, आणि त्यांची कीर्ती माणसांच्या ओठांवर चिरंतन नांदणार आहे परंतु आपण, जे आज थंडपणे आपल्या रणांगणावर बसले आहोत ते मात्र आपल्या गृहभूमीला मुकणार आहोत आणि उद्दाम धन्यांचे स्वामित्व मानण्यास भाग पाडले जाणार आहोत. "

ज्युटर्ना असे म्हणाली, आणि तिच्या शब्दांनी तरुण योद्धांच्या वृत्ती चेतविल्या, आणि अधिकाधिक तीव्रतेने भडकू लागल्या. रांगारांगांतून कुजबूज सुरू झाली आणि लॉरेन्टाईन आणि त्याचप्रमाणे रूटुलिअनांच्या वृत्तीत बदल झाला. जी माणसे आतापर्यन्त युद्धात उसंत मिळण्याची आणि आपल्या हाल–अपेष्टातून सुटका होण्याची आशा करीत होती त्यांना आता शस्त्रे हवीशी झाली होती; टर्नसवर होणाऱ्या अन्यायाची त्याना दया येऊ लागली आणि तो करार व्हायलाच नको होता असे त्याना मनापासून वाटू लागले. ज्युटर्नाने पुनः एकदा आणि अधिक प्रभावी हालचाल केली. तिने, विशेषतः इटॅलिअनांची मने गोंधळात टाकून त्याच्या संकेताने त्यांची दिशाभूल करण्याकरिता हेतुपुरःसर आकाशात उंच एक चिन्ह प्रकट केले.

कारण ज्युपिटरचे वाहन, लाल छटा मिसळलेल्या सोनेरी रंगाचा दिसणारा एक गरुड, समुद्र किनाऱ्यावरील काही पक्ष्यांच्या, कलकलाट करीत त्याच्या पुढे उडत जाणाऱ्या, कळपांचा पाठलाग करीत व त्यांना सतावीत असताना, त्याने एकदम खाली लाटांवर झेप घेऊन, कळपाचे नेतृत्व करणाऱ्या पुढच्या हंसाला आपल्या नख्यांच्या निर्दय पकडीत धरले. हे दृश्य पाहून इटॅलिअन सावध झाले व लक्षपूर्वक पाहू लागले, आणि त्याना एक आश्चर्यकारक दृश्य दिसले. कारण आता सर्व पक्षी पुढे उडता उडता थांबले आणि मोठ्याने कलकलाट करीत मागे वळले; आपल्या कळपाची मेघासारखी व्यूहरचना करून आपल्या पंखांनी त्यानी आकाश झाकळून टाकले आणि आपल्या शत्रूला माघार घेत आकाशातून पिटाळून लावले. त्यांच्या दबावाने आणि तो वाहून नेत असलेल्या ओझ्याने थकून गेलेला तो गरूड भरारीत अडखळला आणि आपल्या नख्यांतून त्याने आपले भक्ष्य नदीत टाकले. आणि नंतर तो दूर मेघांत उडून गेला. रूटुलिअनांनी या शकुनाचे स्वागत करून मोठ्या उत्साहाने आरोळ्या मारल्या आणि युद्धाची तयारी केली. त्यांच्यातील भविष्यज्ञानी टॉलम्निअस प्रथम बोलला, 'याच शुभ चिन्हाकरिता मी वारंवार प्रार्थना करीत आलो आहे. मी त्याचा स्वीकार करतो आणि यामधे मला देवांचा हात दिसत आहे. मीच तुमचे नेतृत्व करीन. या निर्दय नवागताने त्याच्या युद्धाने दहशत बसविलेल्या, आणि ज्यांचा किनार प्रदेश जणू काही तुम्ही दीन आणि दुर्बल पाखरे आहात अशा तऱ्हेने तो बळजबरीने लुटीत आहे, त्या माझ्या दुर्दैवी देशबांधवानो, तुम्ही खड्ग हाती घ्या. कारण तोही पलायन करील, तो खोल सागरावरून दूर निघून जाईल. परंतु तुम्ही,–तुम्ही एकदिल होऊन संघटित हल्ला केला पाहिजे. तुमच्या राजपुत्राला तुमच्यामधून हिरावून नेणाऱ्या युद्धापासून वाचविण्याकरिता झुंजा."

असे म्हणून तो पुढे झेपावला आणि त्याने पूर्ण सामर्थ्यानिशी एक भाला थेट शत्रूकडे भिरकावला. अचूक नेम धरलेला तो कॉर्नेल लाकडाचा भाला हवा कापीत असता सूं सूं करीत आला आणि त्या भाल्याच्या आवाजाबरोबर तत्क्षणीच एक प्रचंड आरोळी कानी आली, कारण प्रेक्षकांच्या सर्व रांगात तात्काळ गोंधळ उडाला. आणि प्रत्येक मनात प्रक्षोभ उसळला. तो भाला पुढे झेपावला. त्याच्या सरळ मार्गातच एकनिष्ठ इट्रूस्कन मातेच्या पोटी आर्केडिअन गायलिपसपासून झालेले नऊ बलदंड पुत्र उभे होते. त्या भावापैकी एका भावाच्या कमरेत, जिथे शिवलेला कमरपट्टा त्याच्या पोटाला घाशीत होता आणि दोन्ही बाजूच्या टोकात त्याची कडी अडकवली होती तिथे

त्या भाल्याचा प्रहार झाला. तो त्याच्या चमकणाऱ्या शस्त्रांमुळे तेजस्वी आणि देखणा दिसणारा तरुण योद्धा होता; परंतु तो भाला त्याच्या बरगड्यांतून घुसला आणि त्याने त्याला सोनेरी वाळूत लोळविले. त्याचे दुःखाने पोळलेले शूर भाऊ एकजुटीने खडे राहिले. काहींनी खड्गाच्या मुठींना हात घातला व खड्गे उपसली आणि काहींनी पोलादाची अस्त्रे हाती घेतली; आणि सर्वांनीच अंधपणे वाटेल तसा हल्ला चढविला. त्यांच्याविरुद्ध लॉरेन्टाईन दले चाल करून आली; आणि नंतर पुनः एकदा त्यांच्या गर्द रंगांच्या चिलखतात ट्रोजन, इट्रुस्कन आणि आर्केडिअन एकवटून एखाद्या महापुरासारखे आले. खड्गानेच या वादाचा निर्णय लावण्याच्या पिसाट इच्छेचा सर्वांवर इतका सारखाच पगडा बसला होता. एका क्षणात त्यांनी त्या वेदी उध्वस्त केल्या. शस्त्रांच्या गडबडगोंधळाच्या वादळाने आकाश काळवंडले, आणि खाली शस्त्रांचा पाऊस कोसळला मद्याचे चषक आणि यज्ञकुंडे उधळली गेली. स्वतः लॅटिनस पळून गेला, संधी मोडला होता आणि त्याच्या अवमानित देवतांना घेऊन तो परत गेला. काहींनी रथांना घोडे जुंपले, किंवा काही घोड्यांवर झेपावले आणि आपली खड्गे उपसून तयारीत राहिले. संधी उधळून लावण्यास उत्कंठित असलेला मेसॅपस घोड्यावरून दौडत, राजमुकुट धारण केलेल्या एका इट्रुस्कन राजावर, ऑलेस्टीसवर, चाल करून गेला व ऑलेस्टीस घाबरून मागे पळत सुटला. गडबडीने मागे वळताना तो दुर्दैवाने त्याच्या मागेच असलेल्या वेदींमधे अडखळला आणि डोक्यावर आणि खांद्यावर आपटला. मेसॅपस दौडत आला, भाला हाती घेऊन त्वेषाने त्याच्यावर झेपावला आणि ते एखाद्या वाश्याएवढे मोठे शस्त्र हाती घेऊन तो खोगिरात खडा झाला, आणि ऑलेस्टीस दयेची याचना करण्याचा प्रयत्न करीत असतानाच त्याने त्याच्यावर एक जबर घाव घातला. 'आटोपलाच आता त्याचा अवतार !' मेसॅपस ओरडला. 'श्रेष्ठ देवांना अर्पण करायला हा फार चांगला बळी आहे.' तात्काळ इटॅलिअन गोळा झाले आणि त्यांनी त्याचे अजून उष्ण असलेले अवयव तोडले कोरिनिअसने वेदीवरून एक धुमसता पलिता बाहेर खेचला, आणि एबिसस त्याच्यावर वार करण्याकरिता भिडत असतानाच तो वार चुकवून त्याने त्याच्यावर मात केली आणि त्याने तो जळता पलिता त्याच्या तोंडावर मारला त्याच्या दाट दाढीने पेट घेतला आणि तिच्यातून जळणाऱ्या केसांचा वास सुटला. कोरिनिअसने पहिल्या धावाचा पाठपुरावा करून आपल्या डाव्या हाताने, आपल्या भांबावून गेलेल्या प्रतिस्पर्ध्याचे केस पकडले; आपला सर्व भार लावून त्याने आपला गुडघा त्याच्या पोटात रेटून त्याला खाली जमिनीवर खेचले आणि नंतर आपले कडक खड्ग त्याच्या कुशीत खुपसले. नग्न खड्ग हाती घेऊन पोडॅलायरिअस सबंध युद्ध

आघाडीवरून, शस्त्रांच्या वर्षावातून चापल्याने पळत असलेल्या एका मेंढपाळाच्या आल्ससच्या पाठी लागला होता. परंतु उंच पोडॅलायरिअस त्याच्या पुढे खडा होताच आल्ससने आपला परशु मागे घेतला. आपल्या हल्लेखोरावर अचूक नेम धरला आणि त्याच्या कपाळाच्या मध्यापासून व हनुवटीमधून त्याला उभा चिरला आणि त्याचे चिलखत उसळत्या रक्ताने भिजून गेले. पोलादी शस्त्राची दुर्धर निद्रा त्याच्या डोळ्यांवर उतरली आणि त्यांच्यातील प्रकाश चिरंतन अंधारात विझून गेला.

दरम्यान मस्तक अनावृत असलेल्या सत्यशील इनीआसने आपला निशस्त्र हात पुढे केला आणि आपल्या लोकांना मोठ्याने पुकारून तो म्हणाला. 'इतक्या गडबडीने तुम्ही कुठे जात आहात? संघर्षाचा हा अचानक भडका कशाकरिता आहे? तुमचा क्रोध आवरा! आताच संधी झाला आहे आणि त्याच्या अटीही संमत झाल्या आहेत. द्वंद्वाचा अधिकार केवळ माझा एकट्याचा आहे सर्व काही माझ्यावर सोपवा आणि परिणामाचे भय बाळगू नका. कारण जो संधी झाला आहे तो मला पाळलाच पाहिजे, आणि यज्ञविधीच्या वेळी टर्नस केवळ माझ्याशी वचनबद्ध केला गेला आहे' परंतु तो बोलत असतानाच आणि आपल्या माणसांना मोठ्याने पुकारीत असतानाच पिसे लावून सूं सूं करीत येणारा बाण सरळ त्याच्याकडे झेपावला तो कुणाच्या हातून सुटला होता, कुणाच्या शक्तीने तो मार्गस्थ झाला होता, बाण आपल्या मार्गावर सुटला, किंवा कोणत्या अकल्पित योगाने, किंवा कोणत्या देवाने ही अभिमान वाटण्यासारखी प्रतिष्ठा रूटुलिअनांना प्राप्त करून दिली, हे कुणालाच कळले नाही, कारण त्या लक्षणीय कृत्याचे सर्व श्रेय गुप्तच राखले गेले! आपण इनीआसला जखमी केल अशी बढाई मात्र कुणीच कधी मारली नाही. इनीआस आघाडीवरून, आपल्या सेनानींना सोडून निराशेन परतत आहे हे पाहून टर्नस नव्या आकांक्षेच्या आकस्मिक आचेने पुन्हा पेटला, आपल्या घोड्यांना आणण्याची त्याने आज्ञा केली, शस्त्रे मागविली, आणि अत्यंत उत्साहाने, विजेच्या चापल्याने तो आपल्या रथात चढला आणि त्याने लगाम घट्ट पकडले.

लवकरच तो अनेक शूर योद्ध्यांना मृत्यूकडे पाठवीत आणि इतरांना मरणोन्मुख करून तडफडत टाकीत सर्व रणक्षेत्रावर उधळू लागला; त्याने सैनिकांच्या रांगा रथाच्या चाकाखाली चिरडल्या आणि पळून जाणाऱ्यांच्यावर वर्षाव करण्याकरिता त्याने अधिक भाले त्वरेने जमविले. मार्स जेव्हा हिब्रसच्या थंडगार पात्राजवळ क्रोधायमान होऊन आपल्या ढालींचा कडकडाट करीत युद्धासाठी उतावीळ

झालेल्या आपल्या घोड्यांना युद्धाची पूर्व सूचना म्हणून अग्रभागी दौडण्याकरिता लगाम सैल सोडतो, तेव्हा ते दक्षिण आणि पश्चिम वाऱ्यांना मागे टाकीत दूरवरचा थ्रेस प्रदेश त्यांच्या टापांच्या आघाताखाली विव्हळेपर्यंत खुल्या मैदानावरून दौडतात, आणि त्याच्या भोवती सर्वत्र त्याच्याच परिवारातील 'कालभय', 'क्रोध' आणि 'फितुरी' भूलोक पायदळी तुडवीत दौडत असतात; त्या मार्स सारखा टर्नस धिप्पाड आणि रक्तासारखा लाल दिसत होता. मार्स प्रमाणेच आणि त्याच्या इतकाच शूर असलेल्या टर्नसने आपल्या घोड्यांना संग्रामाच्या गदारोळातून त्यांना घाम फुटून, त्यांच्या अंगातून वाफा निघेपर्यन्त दौडण्याकरिता चाबकाने फटकारले. हत्या झालेल्या दीनवाण्या शत्रूंना टाचांखाली तुडवीत ते घोडे डौलाने संचारत होते. उंच उडणाऱ्या टापांनी रक्तयुक्त दवाचा शिडकावा करीत होते आणि त्यांच्या खुरांनी उडविलेली वाळू रक्तात मिसळलेली होती. टर्नसने स्थेनिलस, थॅमायरस आणि फॉलस यांना मृत्युमुखात भिरकावले; शेवटच्या दोघांना हातघाईच्या झुंजीत व पहिल्याला दूरवरून वार करून त्याने मारले; ग्लॉकस आणि लॅडिज या इम्ब्रॅससच्या दोन पुत्रानांही त्याने दूरवरूनच मारले. स्वत: इम्ब्रॅससने त्यांना हातघाईच्या युद्धात लढण्याचे व वाऱ्याहूनही अधिक गतीने घोडदौड करण्याचे शिक्षण देऊन लिसिआत वाढविले होते, आणि दोघांना त्याने सारखी शस्त्रे देऊन सज्ज केले होते, काही अंतरावरच रणधुमाळीच्या मध्यावर चालून जाणारा, पूर्वीच्या काली प्रसिद्ध असलेल्या डोलॉनचा पुत्र कीर्तिमान योद्धा युमिडिस होता. त्याच्या नावाने तो त्याच्या आजोबाचे व त्याच्या साहसी वृत्तीने व शस्त्र कौशल्याने तो त्याच्या पित्याचे स्मरण करून देत असे. ग्रीकांच्या छावणीत जाऊन हेरगिरी करण्याच्या साहसाचे बक्षीस म्हणून पिलीअसच्या पुत्राच्या रथाचे घोडे मागण्याचे डोलॉनने एकदा धाडस केले होते, परंतु असल्या उद्धट कृतीकरिता डायोमिडने त्याला वेगळाच मोबदला दिला आणि ॲकिलीसच्या घोड्यांची हाव त्याने सोडली. टर्नसने युमिडिसला दूर अंतरावर खुल्या मैदानावर पाहिले. प्रथम त्याने त्याच्या आणि आपल्यामधील दूर अंतरावरून एक हलकी बरची त्याच्याकडे फेकली, आणि नंतर त्याने रथाच्या घोड्यांची जोडी रोखली आणि रथाखाली उडी मारली व तो त्याच्यावर धावून गेला खाली पडलेल्या आचके देणाऱ्या शत्रूच्या दोन्हो बाजूला पाय ठेवून तो त्याच्यावर उभा राहिला, त्याच्या मानेवर जोरात पाय दाबून, त्याच्या उजव्या हातातील खड्ग त्याने हिसकावून घेतले आणि जोरात वार करून ते त्याच्या कंठात खुपसले. त्याने एक शाब्दिक टोमणाही मारला; 'ट्रोजना, हे पहा ! तिथेच पड, आणि आमची जी पश्चिमभूमी युद्धाने जिंकण्याचा तुझा हेतू होता तिच्या मैदानावर

आता तुझी लांबी मोज. खड्गाच्या बळावर माझी कसोटी पाहण्याचे जे धाडस करतात त्यांना हेच बक्षिस मिळते, ते असेच आपल्या तटबंदीयुक्त नगरीची स्थापना करतात!' आणि नंतर एक भाला फेकून त्याने ॲस्विटीझला क्लोरिअसला आणि सायबॅरिझला, डॅरिसला व थर्सिलोकस आणि थायमोटीझ यांनाही त्याच्या सोबतीला पाठविले. थायमोटीझला त्याच्या घोड्याने खोगिरातून उडवून आपल्या दोन्ही खांद्यामधून खाली फेकले होते. जेव्हा एडोनिआहून उत्तर झंझावाती वारे गर्जत काळया ईजिअन समुद्रावरून किनाऱ्याकडे त्याच्या लाटा भिरकावीत वहातात आणि त्या वाऱ्यांच्या हल्ल्यापुढे वादळी मेघ आकाशातून पळत सुटतात त्याप्रमाणे जिकडे टर्नस माणसे कापून काढून आपला मार्ग काढीत होता तिथून सैन्याच्या रांगा माघार घेऊन पळ काढीत होत्या. त्यांच्या रांगांच्या रांगा मागे वळून पळत होत्या टर्नस आपल्या हल्ल्याच्या जोरावर सारखा पुढे जात होता आणि तो त्याचा रथ हवेतून फेकीत असताना त्याचा तुरा उडत होता. परतु फ्रिजिअसला त्याची ही हल्ल्याची दौड आणि त्याचा युद्धाचा गर्विष्ठ पुकारही रूचला नाही. तो त्याच्या रथाच्या वाटेतच अगदी मध्य मध्य आडवा झाला, आणि त्याने आपल्या शक्तिमान उजव्या हाताने उधळणारे घोडे पकडले आणि लगामाच्या कडीवर फेसाळणारी त्यांची तोंडे त्याने एका बाजूला फिरविली रथाच्या जोखडाला चिकटून फरपटला जात असताना त्याची कूस उघडी पडली. टर्नसचा रूंद फाळाचा भाला त्याचे दुहेरी उरस्त्राण भेदून नेमका आत घुसला परंतु वरवरच्या जखमेतून तो फक्त मांसालाच खरचटून गेला. त्या अवस्थेतही शत्रूचा प्रतिकार करण्याकरिता फिजिअस वळला,' त्याने आपली ढाल आपल्या पुढे धरली आणि स्वरक्षणाचा प्रयत्न करण्याकरिता आपले तीक्ष्ण खड्ग उपसले. परंतु त्याने हल्ला करण्यापूर्वीच कण्याभोवती भयंकर वेगाने फिरणाऱ्या रथाच्या चक्राने त्याला पुढे तोंडघशी फेकले आणि जमिनीवर त्याला पार आडवा केला. टर्नसने पाठोपाठ तत्क्षणी त्याच्या उरस्त्राणाच्या वरच्या व शिरस्त्राणाच्या खालच्या बाजूच्यामधे आपल्या खड्गाचा वार केला, त्याचे मस्तक तोडून वेगळे केले व धड वाळूत पडू दिले.

टर्नस अशा तऱ्हेने विजयाने सबंध रणांगणावर मृत्यूची उधळण करीत असताना इकडे म्नेस्थिअस, एकनिष्ठ ॲकेटीझ आणि ॲस्कॅनिअस यांनी रक्ताने माखलेल्या आणि पदोपदी लांब भाल्यावर विसावणाऱ्या इनीआसला त्यांच्या तळावर आणले. मोडलेल्या बाणाचे टोक उपटून काढण्याची त्याने त्वेषाने धडपड केली, आणि रूंद पात्याच्या खड्गाने जखमेचे तोंड मोठे करून जिथे बाणाचे टोक रूतून छपून राहिले होते ती जागा उघडी करण्याचा त्याला आराम पडण्याचा,

सर्वात:तातडीचा उपाय त्यांनी करावा. संग्रामात परत जाऊ द्यावे असा इनीआसने हेका धरला. त्याच्याजवळच आयाससचा पुत्र आयापिक्स उभा होता. फीबसचे त्याच्यावर सर्वाहून अधिक प्रेम होते, आणि पूर्वीच, तीव्र प्रेमभावनेच्या भरात त्याने त्याला स्वत:च्या अंगच्या कला व शक्ती, भविष्यज्ञान, वीणा आणि गतीमान धनुविद्या अगदी मोकळेपणी देऊ केल्या होत्या. परंतु त्यावेळी मृत्यूशय्येवर असलेल्या आपल्या पित्याचे प्राण वाचविण्याची आयापिक्सची इच्छा होती, म्हणून कीर्तीची अभिलाषा सोडून त्याने वनस्पतींच्या औषधीशक्ती आणि व्याधी बऱ्या करण्याचे कौशल्य जाणून घेणे आणि या सौम्य कलेचा अवलंब करणे पसंत केले. लांब भाल्यावर ओणावून इनीआस बेबंदपणे गुरगुरत होता; त्याच्या योद्धयांचा समुदाय त्याच्या भोवती होता आणि त्यांमधे अत्यंत कष्टी झालेला आयुलसही होता. परंतु तो त्यांच्या अश्रूनी विचलित झाला नव्हता. भिषग् देवतेप्रमाणे वस्त्र कमरेभोवती बांधून मागे वळविलेल्या वृद्ध आयपिक्सने आपल्या गुणकारी हाताने आणि ॲपोलोच्या प्रभावी वनस्पतीनी प्रत्येक उपायाचा काळजीपूर्वक प्रयोग केला, परंतु सर्व व्यर्थ गेले; आणि व्यर्थच त्याने आपल्या बोटांनी ते बाणाचे फाळ हलविले आणि ते लोहाचे टोक चिमटयाच्या पकडीत पकडले. परंतु त्याला अनूकुल नशिबाची साथ मिळाली नाही आणि त्याचा आश्रयदाता ॲपोलो यानेही त्याला मुळीच सहाय्य केले नाही. रणांगणावरील गर्जनांचा भयभीत करणारा प्रचड व गाढ कोलाहल अधिकाधिक येत होता आणि घोर अरिष्ट जवळ येत होते. आकाशामधे आता धुळीचा एक दाट काळा ढग त्यांना दिसू लागला, घोडेस्वार दौडत येऊन त्यांना भिडले. बाणांचा वर्षाव सरळ त्यांच्या छावणीच्या मध्यावरच होऊ लागला. मार्सच्या क्रूर हाताने रणांगणावर पडणाऱ्या, झुंजणाऱ्या तरुण योद्धयांच्या उग्र आरोळ्या आकाशापर्यन्त निनादत होत्या.

परंतु आपल्या पुत्राच्या वाटयाला अकारण आलेल्या या यातनांनी कळवळलेल्या त्या मातेने, व्हीनसने क्रेटन इडा पर्वतावरून देठावर विपुल पालवीचा बहर असलेली आणि उजळ लाल रंगाची फुले असलेली डिक्टॅम्नस ही वनस्पती तोडली; जेव्हा वेगाने आलेले बाण रानमेंढयाच्या पाठीत रूतून राहतात तेव्हा ही वनस्पती म्हणजे त्यांना सुपरिचित असलेले खाद्य आहे धुक्याच्या अवगुंठनात आपले रूप झाकून व्हीनस ती वनस्पती घेऊन त्यांच्याकडे पृथ्वीवर आली. आणि त्या वनस्पतीच्या औषधी शक्ती, त्यांनी उकळत्या कढईत ओतलेल्या पाण्यात तिने गुप्तपणे अर्करूपे मिसळल्या, आणि शेवटी त्यावर आरोग्यदायी सुधेचे रस आणि सुगंधी सर्वव्याधीविनाशक द्रव्ये शिंपडली. त्याच्या विशेष प्रभावाची जाणीव

नसलेल्या आयापिक्सने या अशा पाण्याने ती जखम धुतली. आणि इनीआसला होणाऱ्या सर्व वेदना एकदम नाहीशा झाल्या; आणि खोल जखमेतून होणारा रक्तस्राव पूर्णपणे थांबला; नंतर ते बाणाचे टोक कुणीही खेचण्याकरिता जोर न लावता, आपोआपच बाहेर पडून सहजपणे आयापिक्सच्या हातात आले. इनीआसची शक्ती पूर्वी-इतक्याच जोमाने त्याला परत प्राप्त झाली. आयापिक्स ओरडला, ' चला, जलदी करा! आमच्या वीर योद्ध्याची शस्त्रे त्याला द्या! तुम्ही असे गप्प का उभे आहात? ' शत्रूशी सामना करण्याकरिता त्यांच्या वृत्ती पुन: चेतविणारा पहिला तोच होता; ' हा आनंददायी चमत्कार कोणत्याही मानवी शक्तीने, किंवा मानवी कौशल्याच्या मार्गदर्शनाने घडवून आणलेला नाही; इनीआस तुला बरे केले तो हात माझा नव्हता. माझ्याहून कुणीतरी अधिक सामर्थ्यशाली कुणी देव तुझ्यासाठी झटत आहे. पूर्वीहून अधिक महान कार्ये करण्याकरिता त्यानेच तुला परत पाठविले आहे. '

युद्धाची तृष्णा लागलेल्या इनीआसने आधीच आपल्या उजव्या आणि नंतर डाव्या पोटरीवर सुवर्णकवचे चढविली होती, आणि या दिरंगाईने अधीर होऊन त्याने आपला तेजस्वी भाला परजला. आणि आता त्याची ढाल त्याच्या बाजूला बसविली, उरस्त्राण पाठीवर चढविले आणि तो चिलखतात असतानाच त्याने ॲस्कॅनिअसला घट्ट मिठीत घेतले आणि शिरस्त्राणाच्या मुखवटयातूनच त्याने त्याच्या ओठांचे पुसटसे चुंबन घेतले. ' मुला, ' तो म्हणाला, ' माझ्याकडून तू शौर्य आणि बिकट श्रम म्हणजे काय ते शीक: सद्‌भाग्य म्हणजे काय हे तुला दुसऱ्याने शिकवावे. आज माझा उत्तम बाहू युद्धात तुझे रक्षण करील आणि जिथे संपन्न विजयी लूट मिळविता येईल तिथे तुला घेऊन जाईल. परंतु यथावकाश जेव्हा तुझे वय प्रौढ होईल तेव्हा तुझ्या स्वकीयांनी तुला घालून दिलेल्या उदाहरणांचे तुला विस्मरण घडणार नाही व तू आपल्या मनात त्यांचे वरचेवर स्मरण करशील, याबद्दल तू दक्ष राहिले पाहिजेस. इनीआस तुझा पिता आहे आणि हेक्टर तुझा चुलता होता. हेच तुझे स्फूर्तीस्थान असू दे. '

हे शब्द उच्चारून तो शक्तीमान भव्य पुरुष आपला राक्षसी भाला हलवीत वेशीतून बाहेर पडला. तो बाहेर पडत असतानाच ॲन्थिअस आणि म्नेस्थिअसही संयुक्त सेनादलाचे नेतृत्व करीत गडबडीने बाहेर पडले. आता सर्व सेनेने ती छावणी सोडली आणि ती पुढे लोटली. सर्व समरांगणावर लवकरच अंध करणाऱ्या धुळीचा भांबावून टाकणारा लोट उठला, आणि त्यांच्या दणाणून टाकणाऱ्या पद्-क्षेपांनी धरणी हादरून थरथरली, समोरच्या मातीच्या भिंतीवरून टर्नसने त्याना

येताना पाहिले; त्याचप्रमाणे त्याच्या ऑसोनिअनांनीही पाहिले आणि त्यांच्या अगदी अस्थिसत्वातून एक थंड थरकाप उठला. परंतु कुणीही लॅटिनाने ऐकण्या–पूर्वीच प्रथम ज्युटर्नाने तो गोंगाट ऐकला आणि तिने त्याचा अर्थ जाणला; ती थरथरली, आणि मागे फिरली. इनीआस वेगाने पुढे आला आणि त्याने आपल्या सेनेची चाल वाढविली. एक काळीकुट्ट भयधाराच जणू त्या खुल्या समरांगणातून सरकत होती. येणारे वादळ त्यांचे वृक्ष उन्मळून पाडील, त्यांची पीके जमीनदोस्त होतील आणि सर्व विस्तृत प्रदेशात सर्वंकस विध्वंस पसरेल या भयाच्या पूर्व जाणिवेने किनाऱ्यापासून दूर असलेल्या प्रदेशातील गरीब शेतकऱ्यांच्या काळजाचा थरकाप उडत असताना, वारे पुढे दौडतात आणि त्याची गर्जना किनाऱ्यावर पोहचवितात. अशावेळी आकाशातून पाऊस कोसळत असताना मध्य सागरावरून भूमीकडे येणाऱ्या एकाद्या वादळी मेघासारखा तो आला. आपल्या सेना शत्रूवर चाल करण्यासाठी पुढे पुढे नेत असताना ट्रॉय-भूमीचा युद्ध–नेता तसाच दिसत होता; आणि त्याच्या सेनेतील प्रत्येक सैनिक अभेद्य–अशा व्यूहरचनेतून खडा होता आणि सर्व सेनादले एकच सेनासागर दिसावा इतकी सैनिकांची फळी फळीला भिडली होती. आणि आता थायम्ब्रीसने नुकताच विशालकाय ओसिरिस–बर आपल्या खड्गाने वार केला होता. म्नेस्थिअसन आर्सेटिअस, ॲकेटीझ इप्यूलो आणि गायस युफेन्स यांचा वध केला. भविष्यज्ञांनी टॉलुम्निअस, ज्याने स्वतः पहिला भाला आपल्या शत्रूवर फेकला होता तोही पडला. एक गगनभेदी आरोळी उठली. रुटुलिअनांना आता आपली तोंडे फिरविण्याची पाळी आली आणि शत्रूला आपल्या टाचा दाखवीत आणि निसटून जाण्याकरिता धुळीच्यां लोटातून धावत त्यांनी पळ काढला. परंतु इनीआसने या पळपुट्यांना मृत्यूकडे पाठविण्याइतका मनाचा हलकेपणा दाखविला नाही, किंवा पायउतार होऊन त्याला भिडण्याचा प्रयत्न करणाऱ्याबरोबर, किंवा ज्यानी त्याच्यावर अस्त्रे रोखली होती त्यांच्या बरोबरही युद्धात गुंतविण्याकरिता त्याने चढाईही केली नाही. कारण तो मागावर होता केवळ टर्नसच्या; दाट धुळीच्या लोटात तो त्याला सर्वत्र शोधीत होता आणि द्वंद्वयुद्धाकरिता एकट्या त्याच्यावरच हक्क सांगत होता.

त्या द्वंद्वाच्या भयाने शूर कुमारी ज्युटर्नाचे काळीज हादरले. म्हणून तिने टर्नसचा सारथी मेटिस्कस याला तो जिथे भोवती लगाम घेऊन उभा होता तेथून त्याला भिरकावून दिले, आणि तो जिथे त्याच्या रथाच्या जोखडावरून खाली घसरून पडला होता तिथेच त्याला दूर मागे टाकले. तिने लगेच त्याची जागा घेतली, थरथरते लगाम हाती घेतले आणि आता प्रत्येक मुद्राविर्भावाने मेटिस्कस

सारखीच-त्याच्या आवाजाने, देहयष्टीने, आणि त्याच्या शस्त्रांनी-त्याच्या सारखीच दिसत असल्याने, तिने त्याच्या सारखेच सारथ्य करण्यास सुरवात केली. ज्याप्रमाणे एखादी पाकोळी एकाद्या काळ्या ठिपक्याप्रमाणे एखाद्या धनिक शेतकऱ्याच्या कोठारातून भिरभिरते, धान्याचे कण तिच्या चिवचिव करणाऱ्या पिलांकरिता घास म्हणून गोळा करताना तिच्या चक्राकार भ्रमणात इकडून तिकडे उंच कोटारां-भोवती फेऱ्या घालते व तिचा आवाज कधी मोकळ्या खोपटातून येतो तर कधी जलाशयाकडून येतो,–त्याप्रमाणे ज्युटर्ना स्वत: घोड्यांच्या मागून शत्रूमधून वेगाने दौडत होती, आणि सबंध रणमैदान आक्रमीत रथाच्या भयंकर गतीबरोबर धावत होती. तिने आपल्या अजून मोठ्या उत्साहात असलेल्या भावाला कधी इकडे तर कधी तिकडे मोठ्या दिमाखात मिरविले, आणि तरीही तिने त्याला कधीही निकराच्या द्वंद्वात भिडू दिले नाही, परंतु त्याऐवजी ती बाजूस वळे आणि दूर रण-क्षेत्रावर उधळत राही. परंतु असे असूनही इनीआस टर्नसला गाठण्याकरिता तिच्या नागमोडी मार्गाने जात राहिला; आणि त्याने त्याला गाठले. आणि उधळलेल्या सैन्यातून जाता जातां त्याने त्याला मोठ्याने हाक घातली. परंतु प्रत्येक वेळी त्याची नजर त्याच्या शत्रूवर पडताच आणि पायांना जणू पंख असलेल्या घोड्यांच्या दौडीशी त्याच्या पायाच्या चापल्याने मात करण्याचा तो प्रयत्न करताच, ज्युटर्ना लगेच लगाम खेचून तो रथ वळवीत असे, आणि दूर पिटाळून नेत असे. इनीआस काय करू शकत होता? दिङ्मूढ असा जणु काही बदलत्या प्रवाहात अडकल्याप्रमाणे, परस्परविरोधी पर्यायांमुळे एकदा या तर एकदा त्या बाजूनी निर्णय घेताना ओढाताण झाल्यामुळे गोंधळून तो हेलकावे खात होता. परंतु आता हलक्या पावलांनी पळत असलेल्या मेसॅपसने, तो आपल्या डाव्या हातात घेऊन जात असलेल्या, लोखंडाची टोके असलेल्या दोन बळकट भाल्यांपैकी एक इनीआसवर रोखला आणि अचूक वेध घेण्याकरिता नेम धरून भिरभिरत फेकला. इनीआस थबकला, आणि स्वत:ला आपल्या ढाली आड करून एका गुडघ्यावर खाली झाला; तरीही त्या जोरात फेकलेल्या भाल्याने त्याच्या शिर-स्त्राणाचा वेध घेतला आणि त्याच्या डोक्यावरील पिसांच्या तुऱ्याची टोके खाली पाडली. या प्रकाराने त्याचा क्रोध खरोखरी पराकोटीला गेला! या विश्वास-घातकी हल्ल्याने त्याची सबंध योजनाच बदलली, माघारी जाणारे घोडे आणि रथ रणातून दूर दौडत जात आहेत हे जाणून त्याने प्रथम ज्युपिटरची दीर्घ प्रार्थना करून त्याला आणि भंग झालेल्या संधीच्या वेदींना त्याचे साक्षीदार होण्याकरिता पाचारण केले, आणि नंतर तो शत्रूफळीच्या मध्ये घुसला. युद्धदेवाने त्याला

दिलेल्या सहाय्याने त्याने निर्दयपणे आणि कसलाही विधिनिषेध न बाळगता भयंकर संहार केला, आणि त्याच्या क्रोधाच्या महापूराची सर्व दारे उघडली.

जेव्हा प्रथम टर्नसने आणि नंतर ट्रॉयच्या योद्धयाने सर्व रणक्षेत्रावरून सेनानीना पिटाळून लावले तेव्हा कोणते अनन्वित प्रकार घडले, मृत्यूने किती थैमान घातले आणि किती सेनाधुरीण नाश पावले हे कोणता देव मला कथारूपाने सांगण्याला मदत करील? जी राष्ट्रे पुढे चिरंतन शांततेत एकत्र नांदणार होती त्यांनी एवढा हिंसक संघर्ष करावा हे, ज्युपिटर, तूच खरोखरी नियुक्त केले होतेस काय? रूट्लिअन सुक्रोच्या कुशीत वार करून इनीआस त्याला भिडला. सुक्रो बरोबरच्या या झटापटीमुळे चाल करून येणाऱ्या ट्रोजनांना प्रथम खीळ बसली आणि ते रोखले गेले. परंतु त्याने इनीआसला फार वेळ गुंतवून ठेवले नाही. त्याने जिथे मृत्यू त्वरित येतो तिथे त्याच्या हृदयाला वेढणाऱ्या बरगड्यांत आपले निर्दय खड्ग खुपसले. टर्नसने पायउतार होऊन अँमिकसवर घाव घातला कारण अँमिकस घोड्यावरून पडला होता. आणि त्याचा भाऊ डायोरिस याचाही त्याने वध केला; अँमिकस चालून येत असताना एका लांब भाल्याने टर्नसने त्याचा वध केला आणि डायोरिसचा आपल्या खड्गाच्या टोकाने. त्याने त्या दोघांचीही शिरे तोडली आणि आपल्या रथावर लटकविली. त्यांच्या रक्तद्रवाचा शिडकावा व्हावा म्हणून त्याने ती तिथे ठेवली होती. इनीआसने टॅलॉस, टॅनाईस आणि शूर सिथिजस यांना मृत्यूकडे पाठविले. त्या तिघांशीही तो एकदमच झुंजला आणि त्यांच्या बरोबरच, इकिऑनच्या नगरीवरून नाम आणि पेरिडिआच्या कुशीतून जन्म प्राप्त झालेल्या उदास ओनाईटीझशीही तो झुंजला, अँपोलोची भूमी लायसिआ येथून आलेल्या काही भावांचा टर्नसने वध केला, आणि युद्धाचा व्यर्थ तिरस्कार करणाऱ्या तरुण आर्केडिअन मेनीटीझचाही त्याने वध केला. लर्नाच्या प्रवाहाजवळ, जिथे विपुल मासे मिळत असत, तिथे त्याचे एक छोटेसे घर होते व स्वतःचा धंदा होता. त्याला सत्ताधारी माणसांच्या पुढे पुढे करणे माहीत नव्हते. त्याच्या वडिलांनी तिथेच खंडाने घेतलेल्या जमिनीत लागवड केली होती. गर्द झाडीतून वेवृक्षांची करकर होणाऱ्या वाळलेल्या अरण्यावर निरनिराळ्या दिशांकडून अग्नीचे लोळ यावेत किंवा उंच पर्वतावरून कराल कपारीवरून नद्यांचे फेसाळलेले पाणलोट रोरावत, उसळत यावेत, आणि त्यांनी सखल भूमीकडे झेपावण्याच्या धांदलीत आपली स्वतःची पात्रेच उध्वस्त करून टाकावीत त्याच प्रमाणे आणि तितकेच झंझावाती आणि उत्सुक इनीआस आणि टर्नस समरातून पुढे लोटले. नंतर त्यांचा क्रोध पूर्वी कधीच झाला नव्हता इतका वादळी झाला. त्यांचे अजिक्य धैर्य वाढत

वाढत अनावर झाले होते. आणि त्यांच्या प्रत्यक आघातामागे त्यांचे सर्व सामर्थ्य एकवटले होते.

म्युरँनस आपल्या कुळातील सर्व पुरूषांची–, आपला प्र पितामह आणि त्यांच्याही पूर्वीचे प्र पितामह-यांची नावे, पुरातन ढंगाने मोठमोठयाने ओरडून सांगत होता; लैंशिअमच्या राजांपासून आलेली ती सगळी वंशावळ होती. झंझावाती वेगाने फेकलेल्या एका प्रचंड शिलाखंडाने इनीआसने त्याला, खाली पाडले आणि धरणी-वर झोपविले. रथाचे जू आणि लगाम अंगावर घेऊन तो पडला आणि त्याच्या चाकांनी त्याला फरपटत नेले. आणि आपला धनी आपल्या टापांखाली पडला आहे याची जाणीव नसलेल्या त्याच्या घोडयांच्या उधळत्या टापांनी वरचेवर आघात करून त्याला पायाखाली तुडविले, मोठ्या गर्वोन्मादाने गर्जत चाल करून येणाऱ्या हायलसला टर्नस सामोरा गेला आणि त्याच्या मस्तकाचे रक्षण करणाऱ्या सुवर्णाच्या शिरस्त्राणावर त्याने अचूक भाला फेकला; शिरस्त्राण भेदून तो मेंदूत घुसला आणि तिथेच रुतून बसला. आणि ग्रीकांतील वीरश्रेष्ठा क्रिथिअस, तुझा उत्तम बाहूही तुला टर्नसपासून वाचवू शकला नाही. कयपेनकसचे देवही इनी–आसच्या हल्ल्यातून त्याला वाचवू शकले नाहीत. त्याची ब्रॉन्झची ढाल तो प्रहार पेलू शकली नाही आणि तो शस्त्रप्रहार त्याने थेट उरावर झेलला व त्याची अवस्था अनुकंपनीय झाली, या लॉरेण्टाईन समरभूमीने इओलस त्याच्या रुंद पाठीवर हात–पाय पसरून धरणीवर पडलेला पाहिला. होय, ग्रीकांचे सर्व सैन्य आणि प्रायमच्या साम्राज्यालाही जो सामर्थ्याने भारी पडला तो ॲकिलिही ज्याला लोळवू शकला नाही तो, इओलस, तू आता पडलास! इथे आता तू तुझ्या मृत्यूला भेटलास. इडाच्या पायथ्याला तुझा भव्य निवास होता, लायरनेसस येथे सुंदर घर होते, परंतु तुझी समाधी लॉरेन्टाईन भूमीवर आहे. आता संपूर्ण दोन्ही सेना परस्परांना भिडण्याकरिता वळल्या, प्रत्येक तुकडी व प्रत्येक सैनिक–परस्परांना भिडले. सर्व लँटिन, सर्व डार्डानिड, नेस्थिअस, प्रतापी सिरिस्टस, अश्वशिक्षक मेसॅपस, शूर अँसिलॅस, संपूर्ण सशस्त्र प्रचंड इट्रुस्कन सेना व इव्हँन्डरची आर्केडिअन सेनादले प्रत्येक माणूस स्वतःच्या सामर्थ्यावर अवलंबून, आणि आपल्या शक्तीचा कणन्‌कण कामाला लावून, अविरत, अविश्रांत, केवळ पराकोटीची पराकाष्ठा करून झुंजत होता.

परंतु नंतर अनन्यसाधारण लावण्यवती देवतेने, इनीआसच्या मातेने, त्याला तटभिंतीवर चाल करुन जाण्याची आणि त्याची सेना नगरीकडे चटकन वळवून,

आकस्मिक संकटाच्या भयाने लॅटिनांना घाबरविण्याची प्रेरणा दिली. रणक्षेत्राच्या निरनिराळ्या भागात टर्नसचा शोध घेत स्वत: आपली दृष्टी फिरवीत असता, इनीआसला जणू कांही शांततेचा काळ असून कुठलाही उपद्रव मुळीच न पोहोचलेली आणि त्या महान युद्धाशी कसलेही कर्तव्य नाही अशी भासणारी, ती नगरी दिसली. संग्रामाच्या आणखी एक अधिक घोर डावाच्या विचाराने त्याची कल्पनाशक्ती एकदम प्रभावित झाली. त्याने आपल्या सेनानींना, नेस्थिअस, सैर्जिस्टस आणि शूर सिरिस्टस यांना जवळ बोलाविले, आणि तो एका उंचवटयाच्या जागेवर उभा राहिला. आपली तीक्ष्ण शस्त्रे किंवा ढाली खाली न ठेवता, सर्व उर्वरित संघटित ट्रोजन सेना तिथे जमली. इनीआस त्यांच्यामध्ये एका उंचवटयावर उभा राहून बोलला: 'माझ्या आज्ञा कुठल्याही दिरंगाई शिवाय पाळल्या जायला हव्यात. ज्युपिटरची आपल्याला साथ आहे पूर्वसूचनेशिवाय माझ्या योजनेत बदल होत आहे म्हणून कुणीही संथपणा करता कामा नये. आज मी या युद्धाचे मूळ असलेली, लॅटिनसच्या राज्याची राजधानी असलेली ही नगरी उखडून टाकणार आहे, आणि त्यांनी पराजय स्वीकारून नम्रपणे आपली सत्ता मान्य केली नाही तर तिची धुमसती छपरे जमीनदोस्त करणार आहे. एकदा पराभूत होऊनही, माझ्याशी पुन: लढण्याची संमती देईपर्यंत, द्वंद्वयुद्धात माझ्यापुढे येण्याचे त्याच्या मनात येईपर्यंत, मी टर्नसची वाट पाहावी असे तुम्हाला वाटते काय? माझ्या देशबांधव हो, या दुष्ट युद्धाचे मूळ, त्याचे उगमस्थान या इथे आहे, आता लवकर पलिते आणा आणि ज्वालांच्या युक्तिवादाने तुमच्या संधींची पुनर्प्रतिष्ठा बळजबरीने प्रस्थापित करा.

इनीआसचे बोलणे संपल्यावर त्याच्या सेनेने पाचरी प्रमाणे व्यूहरचना केली, त्यांच्यातील प्रत्येक वृत्ती समान उत्साहाने प्रयत्न करीत होती, आणि संघटित सामर्थ्याने त्यांनी नगर-भितींवर हल्ला चढविला. आश्चर्यकारक चपळाईने सर्वत्र शिडया आणि आग असा देखावा दिसू लागला. काही ट्रोजन वेशींकडे वळले आणि तेथील पहारे त्यानी कापून काढले. इतरांनी बाणांचा व भाल्यांचा वर्षाव केला आणि आपल्या शस्त्रांनी आकाश झाकळून टाकले. सर्वांच्या पुढे स्वतः इनीआस उभा राहिला आणि तटबंदीकडे हात करून त्याने मोठयाने लॅटिनसवर आरोप केला आणि देवांना साक्षी ठेवून त्याने घोषित केले की त्याच्यावर पुन: एकदा युद्ध लादले जात आहे. दोन वेळा इटॅलिअन त्याचे शत्रू झाले आहेत आणि शस्त्रसंधी भंग करण्याची ही दुसरी वेळ आहे. आणि आता नागरिकांमध्ये घबराट आणि दुही माजली. एखादा मेंढपाळ जेव्हा मधमाशांचा, ज्वालामुखी खडकांतील असंख्य लपून राहण्याच्या जागांपैकी एका जागेतील त्यांच्या पोळयापर्यन्त माग काढतो आणि

त्यामधे झोंबणारा धूर सोडतो आणि आतील माशा घाबऱ्याघुबऱ्या होऊन आपल्या मेणाच्या दुर्गाभोवती इकडून तिकडे घाईगर्दीने धडपडतात, आणि आपल्या संतापाला धार आणण्यासाठी मोठ्याने घोंघावतात आणि झोंबणाऱ्या काळ्या धुराचे लोट त्यांच्या पोळ्याभोवती फिरत असतात–त्यांच्या आवाजाने खडकाचा अंतर्भाग अस्पष्टपणे दुमदुमतो आणि धुराचे भपकारे मोकळ्या हवेत निसटतात; त्याप्रमाणे, अडसर दूर करून डार्डनांकरिता वेशी खुल्या कराव्यात, आणि स्वतः राजाला बुरजावर ओढून आणावे अशी मसलत काही जण देत होते, परंतु इतर काही आपली शस्त्रे घेऊन इकडे तिकडे मिरवू लागले आणि नगरभिंतीचे रक्षण करण्याचा त्यांनी आग्रह धरला.

थकून गेलेल्या लॅटिनांवर एक नवेच, इतके भयंकर संकट कोसळले की त्यांची नगरी अगदी मुळापासून त्यायोगे हादरली. आपल्या महालातून राणीने पाहिले, आणि शत्रू चाल करून येत आहे, नगरभिंतींवर हल्ल्याचे भय आहे, आणि आगीचे लोळ छपरापर्यंत उंचावत आहेत, परंतु हल्लेखोरांचा समाचार घेण्याकरिता कुठेही रुटुलिअन सेना नाही, व टर्नस नेतृत्व करीत असलेल्या सेनेची निशाणीही नाही, असे तिला दिसले. युद्ध–संघर्षात तो तरुण राजपुत्र कामास आला असेच त्या अभागी राणीला वाटले; आणि भ्रमिष्टासारखी होऊन दुःखावेगाने ती ओरडली की ती स्वतःच अपराधी होती; या आपत्तीचे कारण आणि उगमस्थान सर्वस्वी तीच होती. भयभीत, भ्रमिष्ट होऊन तिने आपल्या अंतःकरणातील दुःख शब्दांतून ओतले; आणि स्वतःचे जीवित संपविण्याच्या दृढ हेतूने तिने आपली जांभळी वस्त्रे आवेशाने फाडली आणि हिडीस मृत्यूची तयारी करण्याकरिता उंच तुळईला दोराचा एक फास बांधला. आपल्या राणीवर कोसळलेल्या आपत्तीचे वृत्त लॅशिअमच्या अभागी स्त्रियांना कळताच प्रथम राजकन्या लॅव्हिनिआने स्वतःच्या हाताने आपले फुलासारखे चमकदार केस उपटले आणि गुलाबी गाल ओरबाडले, आणि नंतर तिच्या भोवतीच्या इतर स्त्रिया दुःखातिशयाने बेभान झाल्या, सबंध प्रासाद दूरवर त्या आक्रोशाने प्रतिध्वनित झाला आणि तिथून ते दुःखद वृत्त सर्व नगरीत पसरले. माणसांची अंतःकरणे दुःखात बुडाली. आपल्या राणीचा अंत आणि आपल्या राजधानीचे पतन यांनी दिङ्मूढ होऊन लॅटिनस आपल्या पांढऱ्या केसात मूठमूठ घाणेरडी माती घालून आणि आपण प्रथमच डार्डन इनीआसचे स्वेच्छेने स्वागत केले नाही, आणि त्याचा त्या आपल्या कन्येचा वर म्हणून मुक्तमनाने स्वीकार केला नाही म्हणून स्वतःला सारखा दोष देत, चिंध्या झालेल्या वस्त्रात फिरत होता.

त्यावेळी टर्नस रणक्षेत्राच्या दूरच्या सीमेवर लढत, काही चुकार सैनिकांचा पाठलाग करीत होता, परंतु त्याची चाल आता कमी तेज झाली होती आणि घोडयांच्या आक्रमक दौडीत त्याला होणारा उत्साही आनंद कमी कमी होत होता. वाऱ्याच्या लहरीवर आक्रोशाचा कोलाहल भयाच्या व्याकूळ सुरांबरोबर त्याच्या कानावर आला; नगरातील मोठा गदारोळही, आनंदाची एवढीशी छायाही नसलेल्या कुजबुजीसारखा, प्रत्येक आवाजाला सावध असलेल्या त्याच्या कर्ण-पटलावर आला. 'अरे! तटबंदीवरून हे गोंधळाचे. आक्रोशाचे मोठाले आवाज का येत आहेत ? नगरीकडून इतक्या दूरवर वाहत येणाऱ्या या आरडाओरडीच्या गोंगाटाचा अर्थ काय? तो असे म्हणाला आणि तीव्र मनक्षोभाने त्याने लगाम पकडून मागे खेचले आणि तो थांबला. नंतर मेटिस्कसच्या रूपात त्याच्या रथाचे सारथ्य करणाऱ्या आणि घोडयांना हाकारणाऱ्या, हाती लगाम असलेल्या त्याच्या बहिणीने त्याला चटकन उत्तर दिले : 'टर्नस, इथेच, आपण आहोत इथेच, जिथे-आपले यश आपलाच मार्ग योग्य आहे असे सिद्ध करते तिथेच या ट्रोजनांचा पाठलाग चालू ठेवणे योग्य होईल. पुरुषार्थाने आपल्या घरांचे रक्षण करण्यास दुसरी माणसे समर्थ आहेत. इनीआस इटॅलिअनांवर चालून जात आहे. युद्धाचा गदारोळ उठवीत आहे. आपणही आपले सामर्थ्य लावून कोणतीही दयामाया न करता ट्रोजनांवर मृत्यू मोकळा सोडू या. शत्रूवधात किंवा युद्धात मिळवावयाच्या यशात त्याच्याहून कमी दर्जाचा ठरून तू हे रणक्षेत्र सोडून निश्चित जाणार नाहीस ? टर्नसने तिला उत्तर दिले. 'ज्युटर्ना, मी बऱ्याचवेळा पूर्वी तुला ओळखले आहे; जेव्हा तू धूर्तपणे त्या संधीचा भंग केलास आणि युद्धात स्वतःला गुंतवून घेतलेस त्या पहिल्या क्षणापासून मी तुला ओळखले आहे; आणि आताही तू आपले दैवी रूप वृथा लपवीत आहेस ! परंतु आमचे हे अवघड कष्ट सोसण्या-करिता तू ऑलिम्पसवरून खाली अवतीर्ण व्हावेस अशी कुणाची इच्छा होती ? केवळ तुझ्या दीनवाण्या भावाच्या मरणयातना तुला पाहायला मिळाव्यात म्हणूनच हे झाले होते काय ? कारण आता मला कोणती आशा आहे ? कोणते दैव मला आता जीविताची शाश्वती देऊ शकते ? आता माझ्याजवळ उरले आहेत त्या सर्वांहून मला अधिक प्रिय असलेला म्यूरॅनस एका राक्षसी जखमेने पराभूत होऊन एकाद्या महाकायासारखा पडलेला माझ्या डोळयानी मी स्वतः पाहिला आहे, आणि प्राण सोडीत असताना माझ्या नावाने हाका मारणारा त्याचा स्वतःचा आवाज मी ऐकला आहे. माझ्या मानहानीचे दृश्य पाहणे टळावे म्हणूनच की काय दुर्दैवी युफेन्स मारला गेला, आणि त्याचा देह आणि शस्त्रे ट्रोजनांच्या ताब्यात

आहेत. माझ्या खड्गाने ड्रॅन्सेसच्या अपमानाचे पारिपत्य न करता, आपली घरे नष्ट होत असलेली पाहण्याचा माझा बिकट आपत्तीत कमी असलेला अपमान सहन करण्याकरिता मी जिवंत रहावे काय? की शत्रूकडे मी माझी पाठ फिरवावी आणि टर्नस माघार घेत आहे हे इटलीच्या भूमीला पाहू द्यावे? परंतु मग मरण हे इतके करुणास्पद् असते काय? स्वर्गातील देवांनी आपली कृपा काढून घेतली आहे म्हणून, पाताळातील आत्म्यांनो! तुम्ही तरी दयाळू व्हा. माझा निष्पाप आत्मा भ्याडपणाच्या दोषाच्या बिंदुमात्रही कलंकाशिवाय तुमच्याकडे येईल, कारण माझ्या परमश्रेष्ठ पूर्वजांच्या वाट्याला मी कधीही अप्रतिष्ठा येऊ देणार नाही!'

त्याचे बोलणे संपते न संपते तोच तोंडातील फेसाने भिजलेल्या घोड्यावरून, सबंध चेहऱ्यावर बाणाची भयंकर जखम झालेला सॅकीझ शत्रूच्या फळीतून सोसाट्याने आला. तो टर्नसकडे दौडत आला आणि त्याला नावाने हाक मारून त्याने विनवणी केली: 'टर्नस, आता शेवटी आमचे प्राण तुझ्यावरच अवलंबून आहेत. आपल्या लोकांवर दया कर. शस्त्र धारण करून गर्जत येणारा इनीआस आपली इटॅलिअन गढी तिच्या उंच स्थानावरून खाली खेचण्याची आणि तिला जमिनीवरून उखडून टाकण्याची धमकी देत आहे. आता या क्षणीही जळते पलिते आपल्या घराच्या छपरांवर कोसळत आहेत. आता प्रत्येक लॅटिन मुद्रा, प्रत्येक लॅटिन नजर तुझ्याकडेच वळली आहे. आपला राजा लॅटिनस, आपण कुणाला आपल्या कन्येचा वर मानावे आणि कुणाच्या अटी मान्य कराव्यात या संदेहात स्वतःशीच पुटपुटतो आहे. आणि तुझ्यावर अपार प्रेम असलेली राणी तिला वाटण्याऱ्या आत्यंतिक भयाने सूर्यप्रकाशाचा त्याग करून गेली आहे,- तिने स्वतःच्या हाताने मृत्यूचा स्वीकार केला आहे. एकटे मेसॅपस आणि खबीर ॲटिनॅसच तेवढे वेशींवर आपली युद्धाची आघाडी संभाळून आहेत. त्यांच्या भोवती दोन्ही बाजूला लोहाच्या उभ्या पिकाप्रमाणे तळपती नग्न खड्गे घेऊन शत्रूच्या दाट फळ्या खड्या आहेत. आणि तरीही तू मात्र या निर्मनुष्य कुरणावर तुझा रथ युक्ती प्रयुक्तीने इथे तिथे फिरविण्यात वेळ व्यर्थ घालवीत आहेस."

या विविध आपत्तींच्या चिंतानी व्यग्रचित्त होऊन टर्नस अवाक् झाला. निश्चल आणि निःशब्द होऊन ताठरलेल्या डोळ्याने पाहत तो उभा राहिला. त्या एका हृदयात लज्जा, भ्रम आणि दुःख याच्या मिश्र भावना, सुडाच्या ईर्षेने व्याकुळ झालेले प्रेम आणि स्वतःचा प्रयत्न पूर्णपणे ओळखणारे शौर्य या सर्व भावनांची एकच एक प्रचंड लाट एकदम उसळली. त्याच्या मनावरील भावनांच्या

या छाया दूर सरताच आणि अंत:करण पुन: प्रकाशाने उजळताच त्याने त्याचे आग ओकणारे डोळे तटबंदीकडे वळविले, आणि रथातून त्या महान नगरीकडे पाहिले आणि खरेच, आगीचा प्रचंड लोळ वाऱ्याच्या झोताने आकाशात तरंगत गेला. या मजल्यावरून त्या मजल्यावर झेपावत अग्नीने सबंध एक मनोरा पूर्णपणे वेढला होता. त्यानेच तो मनोरा बळकट तुळयांच्या चौकटीवर खूप उंच असा बांधला होता व मग तो चाकावर घालून सरकत्या पुलावरून उंचावर बसलेला होता 'ज्युटर्ना' तो म्हणाला, 'या क्षणी नियती आपल्यावर मात करीत आहे. आता दिरंगाई करण्याचा विचार करू नकोस. जिथे देव आणि आपले दुर्दम्य दैव आपल्याला बोलावीत आहे तिकडे त्यांच्या मागून जायला हवे.इनीआसशी समोरा-समोर झुंजण्याचे आणि मृत्यूने माझ्याकरिता ज्या काही यातना वाढून ठेवल्या असतील त्या सहन करण्याचे मी ठरविले आहे. ताई! माझ्या प्रतिष्ठेचे मला विस्मरण घडलेले तुला पुन: कधीही पाहावे लागणार नाही. परंतु प्रथम मृत्यूपूर्वी मला हे एकच वेडेपणाचे कृत्य करू दे अशी माझी तुला विनंती आहे." असे म्हणून आपल्या बहिणीला दु:ख करीत सोडून त्याने रथातून जमिनीवर उडी मारली, आणि शत्रूच्या शस्त्रांच्या वर्षावातून तो पुढे झेपावला. एका जोरदार झेपेत तो संग्रामाच्या मध्याच्या पार झाला. पावसाच्या पुराने भोवतालची माती धुपून गेल्यावर वाऱ्याने उपटून काढलेला, किंवा कालचक्राच्या फेऱ्याने खालून आधार सुटलेला, पर्वतशिखरावरून गडगडत खोल खाली कोसळणारा खडक मन मानेल तसा प्रचंड ताकदीने जमिनीवरून वर उसळतो आणि त्याच्या मार्गावरील अरण्ये आणि पशूंचे कळप आणि माणसे यांना भरडीत पुढे लोटत जातो; त्या खडकाप्रमाणे तो आला. शत्रूच्या उधळलेल्या फळीतून टर्नस, जिथे जमीन रक्ताच्या पाटांनी सर्वात अधिक खोलवर भिजली होती आणि फेकलेल्या भाल्यांच्या सोसाट्याने वातावरण भरून गेले होते तिथे नगरभिंतीकडे चाल करून आला. त्याने हाताने इशारा केला आणि तसे करीत असता तो मोठ्याने ओरडला, 'रुटुलिअनांनो आता हात आवरा. लॅटिनांनो, तुमचे भाले रोखा. नशिबात ज काही वाढून ठेवले असेल ते आता माझे एकट्याचे आहे, या संधीभंगाचे प्रायश्चित्त तुमच्या वतीने मीच घ्यावे आणि शस्त्रानेच निर्णय लावावा हेच न्याय्य आहे.' सर्वजण बाजूला सरले आणि त्यांनी मध्ये जागा रिकामी ठेवली.

टर्नसच्या नावाचा पुकार ऐकून ट्रोजनप्रमुख इनीआसने किल्ल्याची उंच तटबंदी सोडली. सर्व अडथळे दूर सारून, त्याने हातातील कार्ये खंडित केली, आणि आपल्या शस्त्रांचा घोर खणखणाट करून उल्हसित वृत्तीने त्याने आपला आनंद

प्रगट केला. तो अँथॉससारखा किंवा इरिकससारखा किंवा सळसळणाऱ्या, चमचमणाऱ्या सदापर्णी ओकवृक्षराईंनी आपले हिमाच्छादित मस्तक आनंदाने आकाशात उंचविणाऱ्या साक्षात पिता अॅपेनाईनसारखा उंच वाटला. या भयंकर घडीला ते द्वंद्वयुद्ध नीट, स्पष्टपणे दिसावे म्हणून सर्वांनीच प्रत्येक रुटुलिअनाने, ट्रोजनाने, आणि इटॅलिअनाने प्रयत्न केला. त्यांच्यापैकी काही उंच बुरुजावर उभे होते आणि इतर, जे भिंतींच्या तळाशीं झुलत्या घणाचे घाव घालीत होते, त्यांनी आपली शस्त्रे खांद्यावरून उतरली आणि खाली ठेवली. जगाच्या दूरदूरच्या प्रदेशात जन्मलेले आणि आता शेवटी एकत्र येऊन खड्गाने निर्णय लावण्याचा प्रयत्न करणारे ते दोन श्रेष्ठ योद्धे पाहून लॅटिनसही आश्चर्यचकित होऊन एकटक पहातच राहिला.

त्यांच्या उपयोगाकरिता एक विस्तृत, सपाट व खुली जागा पाहताच ते वेगाने पुढे धावले, आणि अजून दूर असतानाच त्यांनी आपले भाले फेकले. नंतर ते द्वद्वात परस्परांना भिडले, आणि ते भिडताच त्यांच्या ब्राँझच्या ढालींचा खणखणाट झाला. धरणी त्यांच्या पायाखाली दबून विव्हळली. त्यांनी खड्गाच्या वारांची गती दुपटीने वाढविली आणि पुन: हल्ला चढविला. या झुंजीच्या गदारोळात योगायोग कोणता आणि शौर्य कोणते हे कळणे कठीण होते. प्रचंड सायलावर किंवा उत्तुंग टॅबर्नसवर जेव्हा दोन बैल शिंगाला शिंगे भिडवून निकराने झुंजतात; हंबरणाऱ्या कालवडी कोणता बैल कुरणाचा सम्राट होणार आहे व सर्व कळपावर त्याची हुकमत चालणार आहे या अचंब्यात पडतात: भयभीत झालेले गुराखी मागे सरतात आणि इतर गुरे भयाने स्तब्ध उभी राहतात; प्रत्येक बैल आपली शिंगे थेट मर्मी खुपसण्याची पराकाष्ठा करतो आणि त्यांची मस्तके आणि खांदे रक्ताच्या लोटाने न्हाऊन निघतात, आणि सर्व वन त्यांच्या डरकाळ्यांनी दुमदुमते त्याप्रमाणे ट्रोजन इनीआस आणि डॉनिअन योद्धा ढालीला ढाल लावून परस्परांना भिडले, आणि त्यांच्या भयंकर संगराचे प्रतिध्वनी स्वर्गात उठले. स्वत: ज्युपिटरने एक तराजू हातात घतला, त्याचा काटा काळजीपूर्वक मध्यावर ठेवला आणि नंतर त्यांच्यापैकी कोण या दिव्यातून यशस्वीपणे बाहेर पडणार आहे आणि कोण आपल्याच कुणाचे ओझे भाराने मृत्यूला वेगाने खाली आणणार आहे हे ठरविण्याकरिता त्याने दोन्ही श्रेष्ठ योध्दयांच्या वेगवेगळ्या नियती दोन्ही पारड्यात ठेवल्या.

परंतु त्याचवेळी हल्ला करण्यास सोईस्कर संधी दिसत आहे असे वाटून टर्नस पुढे झेपावला, सर्वशक्तीनिशी आणि पुऱ्या पल्ल्याने त्याने आपले खड्ग उंच

उगारले व वार करण्याकरिता स्वतःला उंचावले, आणि वार केला. ट्रोजन आणि आशंकित झालेले लॅटिन ओरडले; दोन्ही सेनांची सर्व दले भयाने निःस्तब्ध, निश्चल झाली होती. परंतु तेखड्ग मात्र धोकेबाज ठरले आणि मोडले. तात्काल पलायनानें त्याला उसंत मिळाली नसती तर ते खड्ग हवेत असतानाच तो कोपिष्ट वार करणारा निःशस्त्र झाला असता; कारण आपला हात खड्गाशिवाय असून नुसती मूठच हातात आहे, आणि तीही स्वतःच्या खड्गाची अशी वाटत नाही हे पाहून टर्नस पळाला,– पूर्व वाऱ्याहूनही अधिक द्रुतगतीने पळाला.

असे म्हणतात की जेव्हा टर्नस संग्राम सुरू करण्याच्या घाईगडबडीत नव्याने जुंपलेल्या रथात पहिल्याने आरुढ झाला तेव्हा तो आपल्या पित्याचे खड्ग मागेच विसरला होता, आणि त्याऐवजी त्याने त्याचा सारथी मेटिस्कस याचे खड्ग घेतले होते : आणि जोवर त्याला पांगून पळ काढणाऱ्या ट्रोजनांशीच केवळ लढायचे होते तोवर त्याचा उपयोगही झाला होता; परंतु त्याऐवजी त्याला, स्वतः व्हल्कनने घडविलेल्या स्वर्गीय शस्त्रांशी सामना करावा लागल्याबरोबर ते मर्त्य खड्ग वार केल्याबरोबर ठिसूळ बर्फाप्रमाणे शकले होऊन खाली पडले, आणि आता सोनेरी वाळूत पडलेल्या त्या शकलांवरून परावर्तित झालेला प्रकाश त्याच्या तोंडावर पडत होता. या दृश्याने टर्नस घाबराघुबरा झाला आणि खुले मैदान गाठण्याच्या प्रयत्नात एकदा इकडे जाण्याकरिता आणि पुनः दुसरीकडे जाण्याकरिता तो पळत राहिला; आणि इकडेतिकडे पळत असताना त्याने अहेतुकपणे चकरा मारल्या, कारण त्याच्या अवतीभोवती ट्रोजनांनी घट्ट कडे करून त्याला घेरले होते आणि त्याच्या एका बाजूला विस्तृत दलदल होती, आणि दुसऱ्या बाजूला नगराच्या प्रचंड भिंतींनी त्याचा मार्ग रोखला होता.

बाणाच्या जखमेने अधू झालेल्या गुडघ्यांमुळे जरी त्याची गतीं मंदावली होती आणि त्याला दिरंगाई होत होती आणि भयभीत झालेल्या त्याच्या शत्रूच्या मागून धावताना त्याला हवी तेवढी गती येत नव्हती तरी इनीआसच्या पाठलागात काही कमी जोम नव्हता. जेव्हा एखाद्या शिकारी कुत्र्याने एखाद्या काळविटाला नदीच्या दुबेळक्यात पकडावे किंवा लाल पिसांच्या भयंकर जाळ्यात गुरफटवावे, धावत भुंकत त्याच्या पाठीवर जावे; तो काळवीट छुप्या हल्ल्याच्या भयाने आणि नदी किनाऱ्यावरील उंच कपारीच्या भयाने सहस्त्रादिशांनी इकडेतिकडे उधळतो परंतु तो अश्रांत अम्ब्रीअन कुत्रा त्याची पाठ सोडीत नाही, प्रत्येक क्षणाला लचका तोडण्याकरिता तोंड उघडून जणुकाही त्याने त्याला पकडलेच आहे असे

समजून जबडा बंद करतो परंतु त्याच्या जबडयांत काहीच सापडत नाही आणि तो काळवीट अजूनही त्याला हुलकावण्या देत असतो. त्या शिकारी कुत्र्याप्रमाणे इनीआस होता.

आणि आता गदारोळ पराकाष्ठेला पोहोचला. सभोवारच्या सरोवरांच्या आणि नदी किनाऱ्यांच्या परिसरात त्याचा प्रतिध्वनी पुनःपुनः घुमला. त्या आवाजाने सबंध आकाशात गडगडाट झाला. टर्नस पळत होता आणि पळताना तो सर्व रुटुलिअनांना दरडावीत होता व प्रत्येकाला नावाने हाक मारून आपले नित्याचे परिचित खड्ग आणण्याची आग्रहाची मागणी करीत होता. उलट इनीआसने जर कुणी जवळ आलें तर सर्वनाशाची व तात्काल मृत्यूची धमकी दिली, आणि त्यांची संपूर्ण नगरी मुळापासून उखडून टाकण्याच्या त्याच्या दुसऱ्या धमकीने ते अधिकच घाबरले आणि थरथर कापू लागले; आणि जखमी असूनही तो पुढे चाल करून गेला. त्यांनी आतापर्यंत पळून पाच प्रदक्षणा पुऱ्या केल्या होत्या, आणि विरुद्ध दिशेने गोलाकार धावून ते पाच वेळा त्याच वाटेने परतले होते. कारण खरे सांगायचे तर क्रीडेतील एखादे क्षुद्र पारितोषिक झटून मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न नव्हता, तर टर्नसच्या रक्तरूपी प्राणाकरिता त्यांची स्पर्धा होती.

त्या ठिकाणी पूर्वी फॉनसला प्रिय असलेला व त्याला अर्पिलेला एक कडू पाने असलेला रानटी ऑलिव्ह वृक्ष होता; नंतर तिथे एक कठीण लाकडाचे खोडच उरले होते; परंतु पूर्वी वादळातून वाचलेले खलाशी त्याची पूजा करीत असत; आपल्या लॉरेन्टाईन देवाला समर्पित करावयाच्या वस्तू व नवसाची वस्त्रे त्याच्यावर अडकवीत असत. परंतु ट्रोजनांनी त्या खोडाचे पावित्र्य ओळखले नाही आणि युद्धाकरिता जागा मोकळी करण्याकरिता त्यानी ते तेथून हलविले. इनीआसचा भाला त्याच्या स्वतःच्या फेकीच्या जोराने त्या रानटी ऑलिव्ह खोडामध्ये रुतून बसला होता आणि मुळाच्या बळकट पकडीत घट्ट अडकला होता. ज्या शत्रूला स्वतःच्या पायाच्या गतीने तो गाठू शकत नव्हता त्याच्या पाठीवर ते शस्त्र पाठविण्याच्या हेतूने आपल्या शक्तीने तो फाळ खेचून काढण्याकरिता डार्डानिड त्याच्यावर वाकला. भयाने भ्रमिष्ट झालेल्या टर्नसने आता प्रार्थना केली : 'फॉनस, मी तुझी प्रार्थना करतो, माझ्यावर दया कर, आणि माझ्या प्रिय भूमीतील हे मृत्तिके, मी जर सतत तुझी प्रतिष्ठा राखली असेल,–आणि इनीआसच्या या माणसानी मात्र त्यांच्या युद्धाने ती भ्रष्ट केली आहे तर या भाल्याचे टोक घट्ट रुतवून ठेव.' तो असे म्हणाला, आणि ज्या प्रार्थना ऐकून त्याला सहाय्य

करण्याविषयी त्याने देवाचा धावा केला होता, त्या काही व्यर्थ गेल्या नाहीत कारण इनीआस जरी बराच वेळ त्या हट्टी खोडाशी झगडत होता तरी त्या कठीण लाकडाची पकड ढिली करण्याचे सामर्थ्य त्याला कोणत्याही उपायाने प्राप्त होईना; आणि तो आपल्या कार्याकरिता धडपडत असताना डॉनिअन देवता ज्युटर्ना हिने पुन: एकदा सारथी मेटिस्कसचे रुप घेतले, ती पुढे धावली आणि तिने आपल्या भावाला त्याचे स्वत:चे खड्ग परत दिले. परंतु या धीट वनदेवतेला हालचालीची असली मुभा मिळावी याचा संताप येऊन व्हीनस आता जवळ आली आणि तिने तो भाला खोल खोडातून उपटून काढला. आणि आपली शस्त्रे आणि धैर्य परत प्राप्त झाल्यामुळे उल्हासित झालेले–एक आपल्या खड्गावर विसंबून असलेला, आणि दुसरा भाला उंचावून उग्र दिसणारा असे ते योद्धे,–धापा टाकीत, परंतु मार्सच्या छत्राखाली द्वंद्व करण्यास सिद्ध होऊन परस्परापुढे उभे ठाकले.

परंतु त्याचवेळी ऑलिम्पसचा सर्वशक्तिमान अधिपती प्रकाशमान मेघावरून या द्वंद्वाकडे एकाग्रतेने पाहत असलेल्या जूनोला म्हणाला : ' राज्ञी, आता काय शेवट होईल ? या निर्वाणीच्या घडिलाही तुला करण्यासारखे अजून काही उरले आहे काय ? तुला स्वत:ला माहीत आहे आणि तुला माहीत आहे हे तू मान्य करतेस की इटलीचा देव म्हणून स्वर्गात अधिष्ठित होण्याचा इनीआसचा अधिकार आहे, आणि नियतीने त्याला तारकांमधे उच्च स्थान दिले आहे. मग आता तुझा काय हेतू आहे ? किंवा या शीतमेघांमधे रेंगाळून काय मिळविण्याची तुला आशा आहे ? मर्त्य माणसाकडून जखमी होऊन एखाद्या देवतेचा अवमान होणे हे योग्य होते काय ? किंवा ज्या खड्गाला टर्नस वंचित झाला होता ते त्याला परत प्राप्त करून देणे की ज्यामुळे जित योध्दयाला पुन: नवी शक्ती प्राप्त करून दिली होती हे तरी योग्य होते काय ? कारण तुझ्या सहाय्याशिवाय ज्युटर्ना काहीही करू शकली नसती ! परंतु निदान आता शेवटी तरी तू परावृत्त हो आणि माझ्या विनंतीचा तुझ्यावर परिणाम होऊ दे : या तुझ्या अतिरिक्त संतापाचे नकळत भक्ष्य होऊन जाऊ नकोस, किंवा तुझ्या मधुर ओठातून द्वेषाचे शब्द पुन: पुन: उच्चारू नकोस. हा क्षण अंतिम निर्णयाचा आहे. भूमीवर आणि सागराच्या लाटांवर ट्रोजनांना क्लेश भोगीत देशोधडी लावण्याचा आणि एक घोर संघर्ष भडकविण्याचा एका कुलाला घृणास्पद लांछन लावण्याचा आणि एका विवाहाला दु:खाचा कलंक लावण्याइतकाच अधिकार मी तुला दिला होता. यापुढच्या प्रयत्नांना मी प्रतिबंध करतो.'

ज्युपिटर असे बोलला आणि विनम्र मुद्रेने सॅटर्निअन ज्यूनोने उत्तर दिले : 'हे सर्वश्रेष्ठ ज्युपिटर, ते खरे आहे. तुझी ही इच्छा मला माहीत आहे म्हणूनच मी माझ्या मनाविरुद्ध टर्नसचा त्याग केला आहे, आणि पृथ्वीवरून निघून आले आहे. नाहीतर हे भलेबुरे अत्याचारी प्रकार सहन करीत मी माझ्या स्वर्गीय आसनावर बसलेली तुम्हाला कधीच दिसले नसते; परंतु ज्वालांच्या अवगुंठनात मी युद्ध आघाडीवर उभी राहून ट्रोजनांना दारुण रणसंग्रामात खेचले असते. असहाय्य अवस्थेत आपल्या भावाला मदत करण्यास खरोखर मीच ज्युटर्नाला प्रवृत्त केले हे मी मान्य करते; आणि त्याचा जीव वाचविण्याकरिता तिच्या याहूनही अधिक साहसी कृत्यांना माझी संमती होती. परंतु तिने स्वतःच धनुष्य घेऊन खरोखरी बाण सोडावेत असा माझा उद्देश नव्हता. ज्या एका एकमेव प्रयाणाचा श्रेष्ठ देवांनाही सादर धाक आहे त्या स्टीक्सच्या प्रवाहाच्या दुर्दम्य उगमस्थानाची शपथ घेऊन मी हे सांगते. आता माझ्या बाजूने मी माघार घेते. मी युद्धत्याग करते कारण मला आता त्याची घृणा वाटते; परंतु लॅशिअमच्या वैभवाकरिता आणि तुमच्या असलेल्या लोकांकरिता, नियतीच्या दंडकक्षेत न येणारी एक याचना मी तुजकडे करते. त्यांना इष्ट अशा आशादायी विवाहाची मुद्रा उठवून दृढ केलेला एक शांतता–संधी करू दे आणि संधीच्या अटींनी स्वतःला बांधून घेऊ दे; हे असे घडू दे. परंतु त्यांच्या स्वतःच्या भूमीत लॅटिनांना त्यांचे प्राचीन नाव बदलून ट्रोजन होण्याची किंवा टच्यूक्रिअन म्हणून घेण्याची आज्ञा करू नका. किंवा अन्य भाषा बोलण्याची आणि परकी वस्त्रे परिधान करण्याची सक्ती करु नका. अजूनही लॅशिअम अस्तित्वात असू द्या आणि भविष्याच्या शतकांत आल्बन राजेही असू द्यात. इटॅलिअन पौरुषापासून सामर्थ्य प्राप्त करून रोमन वंश वाढू दे. ट्रॉयच्या नगरीचे पतन झाले आहे आणि पतन झालेलीच तिला राहू दे; तिचे नावही नष्टच होऊ दे."

विश्वाच्या आणि अखिल मानवजातीच्या निर्मात्याने स्मित करून तिला उत्तर दिले : 'तू ज्युपिटरची खरी बहीण आणि सॅटर्नचे स्वतःचे दुसरे अपत्य आहेस ! तुझ्या अंतःकरणाच्या खोल गाभाऱ्यात कटुतेच्या ज्या लाटा तू उसळवितेस त्यात किती मोठे सामर्थ्य असते ! पण चल, ज्याच्या आहारी तू कधीच जायला नको होतेस, तो तुझा भयंकर क्रोध आवर. जे तुला हवे आहे ते मी तुला देतो, तू जिंकलेस; माझ्या स्वतःच्या इच्छा मी सोडून देतो, आणि तुझ्या इच्छेप्रमाणेच विहित करतो. इटलीचे पुरातन रहिवासी त्यांच्या पूर्वजांचीच भाषा वापरतील आणि त्यांच्याच प्रथा व रुढींचे पालन करतील; आणि त्यांचे नावही

आता आहे तेच राहील. ट्रोजन केवळ इटॅलिअन वंशात समाविष्ट होऊन त्यांच्यात मिळून जातील. प्रथा आणि यज्ञयागांचे विधी मी विहित करीन. मी सर्वांनाच एक भाषा असलेले लॅटिन करीन. या युतीपासून मिश्र इटॅलिअन रक्ताचा धार्मिक वृत्तीत इतर सर्व लोकांहून आणि प्रत्यक्ष देवांहूनही श्रेष्ठ असा वंश निर्माण झालेला तुला दिसेल. दुसरे कोणतेही राष्ट्र त्यांच्या इतक्या भक्तिभावाने तुझे व्रतविधी साजरे करणार नाही.' आता सुखावलेल्या जूनाने मान हलवून आपली संमती दर्शविली व आपली मनोधारणाही बदलली; आणि याच क्षणी तिने तो मेघ सोडला आणि ती आकाशातून निघून गेली.

'हे घडवून आणल्यानंतर पित्याने पुढील योजनेवर खोल चिंतन केले; ज्युटर्नाला युद्धामधून तिच्या भावापासून विलग करण्याची तयारी केली. असे म्हणतात की 'काळ रात्रीने' एकाच प्रसुतीत ' कराल राक्षसी ' नावाच्या दोन राक्षसींना आणि त्यांच्याबरोबरच टार्टरिअन 'मेगिरा' यांना जन्म दिला होता; त्यांच्या मातेने सर्पांच्या वेटोळ्याने सर्वांना सारखेच बांधले आणि त्यांना वायूची गती असलेले पंख दिले होते. या दोन राक्षसी स्वर्गाच्या उंबरठ्यावरील ज्युपि-टरच्या सिंहासनाजवळ त्याच्या क्रोधाची सेवा करण्याकरिता सिद्ध असतात. जेव्हा जेव्हा देवांचा पिता मृत्यूभयाचा किंवा रोगराईचा हाहःकार उडवितो किंवा पाप-कर्म करणाऱ्या नगरामधे युद्धभयाचा प्रहार करतो तेव्हा त्या दोघी यातना सोस-णाऱ्या मानवजातीच्या भयाची धार अधिक तीक्ष्ण करतात. ज्युपिटरने आता त्यांच्यापैकी एकीला, ज्युटर्नाला एक सावधानतेचे चिन्ह म्हणून भेटण्याची आज्ञा देऊन उंच आकाशातून त्वरेने खाली पाठविले. ती झंझावाताच्या वेगाने भ्रमण करून एखाद्या पार्थिअनाने किंवा क्रेटनाने प्रत्यंचेवरून मेघातून सोडलेल्या आणि मंदप्रकाशातून आपल्या विक्षेपमार्गावरून अदृश्यपणे सोसाट्याने सित्कार करीत झेपावत, ज्या विषाला उतारा नाही, असे क्रूर विष घेऊन जाणाऱ्या बाणासारखी ती निशाकन्या आपला पृथ्वीचा मार्ग आक्रमिताना झेपावली. जेव्हा तिने ट्रोजन आघाडी आणि टर्नसची सेना पाहिली तेव्हा तिने रात्री समाधिशिलेवर किंवा उजाड छपरांवर बसून रात्रीच्या छायांतून उत्तर रात्रीचा चमत्कारिक सूर काढ-णाऱ्या त्या छोट्या पक्ष्याचे रूप धारण केले. हे रूप धारण करून ती राक्षसी फडफडाट करीत पुनः पुनः फेऱ्या मारीत टर्नसच्या तोंडावर झेप घालू लागली आणि आपल्या पंखाच्या फटक्याने त्याची ढाल तिने दूर भिरकावली. एक प्रकारच्या विलक्षण भयाने बधीर झालेली टर्नसची सर्व गात्रे गलित झाली; भयाने त्याचे केस ताठ उभे राहिले; आवाज घशात अडकला. ज्युटर्नाने दूरवरूनच त्या राक्षसीच्या

पंखाचा फडफडाट ओळखून भगिनीसहज दु:खाने आपले केस मोकळे सोडले आणि उपटले, आणि आपल्या नखांनी गाल ओरबाडले आणि आवळलेल्या मुठींनी वक्ष घायाळ केले, 'टर्नस' ती ओरडली. 'तुझी बहीण आता तुला कोणते सहाय्य करू शकणार? पूर्वी मी सर्व कष्ट सोसल्यानंतर आता मला करण्यासारखे काय उरले आहे? कोणत्या युक्तीने मी तुझे दिवसाच्या प्रकाशातील जीवन लांबवू शकते? या असल्या भयाविरुद्ध टक्कर देण्याकरिता मी कसली उभी राहू शकते! आताच, याच क्षणी मी रणांगण सोडून जात आहे. घृणास्पद पाखरांनो, मला भिवविण्याचा प्रयत्न करु नका कारण मी अगोदरच भयभीत झाले आहे. या पंखांचा फडफडाट आणि त्यांच्या ठायीचा मृत्यूचा रव मी चांगला ओळखते; दृढनिश्चयी अंत:-करणाच्या ज्युपिटरची अनिवार्य आज्ञा आता मला स्पष्ट कळून चुकली आहे. माझ्या कौमार्याची परतफेड तो अशी करतो काय? मग त्याने मला चिरंतन जीवन का दिले आणि माझ्या बाबतीत मृत्यूचा दंडक का अवैध केला? नाहीपेक्षा मी या दारुण दु:खाचा निदान अंत तरी केला असता आणि मी माझ्या भावाबरोबर छाया–लोकात प्रवेश केला असता! हेच का माझे अमरत्व? आणि टर्नस, तू गेल्यानंतर माझ्या जीवनात काही तरी आनंद उरणार आहे का? हाय! मला वाटते की कुठे तरी धरणी मला पोटात घेण्याइतकी खोलपर्यंत दुभंगावी आणि मी अमर असले तरी खाली पाताळातील मृतात्म्यांत प्रविष्ट व्हावे!' ती एवढे बोलली, आणि तिने आपल्या मस्तकावर करडे अवगुंठन ओढले आणि हुदके देत तिने सूर मारून स्वत:ला आणि स्वत:च्या सहाय्य करणाऱ्या दैवीशक्तीला, जलप्रवाहात बुडविले.

दुसऱ्या बाजूने आपला वृक्षासारखा प्रचंड असलेला भाला हलवीत इनीआस पुढे चाल करून आला आणि कठोर अंत:करणाने म्हणाला: 'आता आणखी कोणत्या नव्या दिरंगाईची तू वाट पाहत आहेस? टर्नस, आता माघार घेणे नाही, ही आता पळण्याच्या गतीची कसोटी उरली नाही; आता तू माझ्याशी बाहूला बाहू भिडवून शस्त्राच्या घोर कसोटीत माझ्याशी बरोबरी केली पाहिजेस. तुला कोणते रूप घ्यायचे ते घे. आणि तुझ्या ठायी असलेल्या धैर्याच्या किंवा कपटनाटकाच्या कोणत्याही सामर्थ्याला आवाहन कर, तुझी तशीच इच्छा असली तर उंच आकाशातील चांदण्यापर्यंत उड्डाण कर किंवा धरणीच्या उदरातील गव्हरांमधे स्वत:ला कोंडून घे.' आपल्या मानेला झटका देत टर्नसने उत्तर दिले: 'उद्दाम वैऱ्या, तुझ्या संतप्त शब्दांचे मला भय वाटत नाही, मला भय वाटते ते केवळ देवांचे. विशेषत: जोव्हच्या वैर वृत्तीचे; तो अधिक बोलला नाही; परंतु आजूबाजूला पाहताना त्याला,

शेताची सीमारेषा दाखवून तिच्या मालकांचा वाद टाळण्याकरिता ठेवलेला एक प्राचीन आणि प्रचंड शिलाखंड जमिनीवर जवळच हाताशी दिसला. आजकाल धरणी जन्म घालीत असलेल्या शरीरप्रकृतीच्या बारा निवडक माणसांनाही तो खांद्यावरुन नेता आला नसता; परंतु शूर टर्नसने तो अधिऱ्या त्वरेने एका हाताने उपटला आणि तो फेकण्याकरिता स्वतःला उंचावून आणि अत्याधिक वेगाने धावून तो आपल्या शत्रूवर भिरकावणार होता. परंतु धावण्याची किंवा त्या प्रचंड शिलाखंडाला गती दिल्याची–कोणतीच जाण त्याला नव्हती. त्याचे गुडघे लुळे पडले. त्याचे रक्त गोठून कठीण झाले आणि थंडगार पडले. आणि नंतर त्याने फेकलेला तो शिलाखंडही मोकळ्या हवेतून भिरभिरला आणि त्याने आघातही केला नाही किंवा पूर्ण अंतरही ओलांडले नाही. जसे निद्रेमधे कधी कधी रात्री स्तब्धतेची जड झापड आपल्या डोळ्यावर येते, आपण सतत पुढे धावण्याचा निकराचा प्रयत्न करीत आहोत असे आपण स्वप्नात पाहतो, आणि आपला प्रयत्न फसतो, आणि आपल्या पराकाष्ठेच्या प्रयत्नाच्या क्षणी अंधेरी येऊन आपण खाली कोसळतो; आपल्या जिभेत अवसान नसते, शरीरातील इंद्रिये नैसर्गिक असा प्रतिसाद देत नाहीत आणि शब्द किंवा आवाजही बाहेर फुटत नाही; तसेच टर्नसचे झाले होते; कारण प्रथम वार करण्याकरिता त्याने जिथे जिथे सर्व सामर्थ्य पणाला लावले तिथे तिथे त्या अमानुष देवतेने त्याला प्रगतीपासून वंचित केले. त्याच्या अंतःचक्षूपुढून बदलती दृश्ये सरकली. त्याचे डोळे रुटुलिअनांवर आणि त्या नगरीवर स्थिरावले; भयाने तो अडखळला आणि भाल्याच्या जवळ येऊन ठेपलेल्या टोकाच्या भयाने तो थरथरू लागला. आसऱ्याची एकही जागा त्याला दिसेना, किंवा शत्रूवर मर्मभेदी प्रहार करण्याची शक्तीही त्याला गवसेना; त्याचा रथ किंवा रथाचे लगाम हाती घेऊन सारथ्य करणारी त्याची बहीणही त्याला कुठे दिसेना.

टर्नस असा शंकाकुल असताना त्याचा काळ ठरणारा आपला थरथरता भाला इनीआसने त्याच्यावर रोखला. आपल्या सावध नजरेने आपल्याला हवी असलेली संधी हेरून, आपली सर्व शक्ती त्या भाल्यामागे लावून, पूर्ण पल्ल्याने त्याने तो भाला फेकला, वेढ्यामध्ये अग्निक्षेपणास्त्राने द्रुतगतीने फेकलेले दगडही कधी इतक्या वेगाने आघात करीत नाहीत! वज्राघात होताना होणारे विस्फोटही कधी इतके भयंकर नसतात. भयंकर मृत्यू बरोबर घेऊन तो भाला, काळ्या झंझावाताच्या सामर्थ्याने आला. ढालीवरील बाहेरच्या सात थरातून आणि उरस्त्राणाच्या खालच्या कडेतून तो आत गेला आणि रोरावत टर्नसच्या मांडीच्या मधल्या भागात

घुसला. घायाळ होऊन तो सामर्थ्यशाली योद्धा अंगाखाली गुडघा दुमडून धरणीवर कोसळला. रुटुलिअन ताडकन् उभे राहिले आणि विव्हळले; भोवतालच्या सर्व टेकडयांत तो आवाज घुमला, आणि दूर विस्तृत उंच पर्वत प्रदेशातील अरण्यांनी त्याला प्रतिसाद दिला. धरणीवर पडलेल्या पराजित झालेल्या टर्नसने आपली नजर वर केली आणि नम्र याचनेसाठी उजवा हात पसरला, आणि तो म्हणाला, 'ही माझ्याच कर्माची परिणती आहे. मी कोणतीही विनंती करीत नाही. तुला प्राप्त झालेले भाग्य तू उपभोग. आणि जर दीनवाण्या पित्याच्या दुःखाचा तुझ्या मनावर काही परिणाम होत असेल तर–आणि तुझा स्वतःचा पिता अँकायसीझ माझ्या पित्यासारखाच होता–तर मी तुजपाशी याचना करतो की वार्धक्यावस्थेतील माझ्या पित्यावर–डॉनसवर–दया कर आणि मला परत पाठव–किंवा तुला तसेच हवे असेल तर गतप्राण झालेला माझा देह माझ्या लोकांच्या स्वाधीन कर. तू जिंकला आहेस, आणि पराजित होऊन मी उंचावलेले माझे दोन्ही हात ऑसोनिअनांनी पाहिले आहेत. लॅव्हिनिआ आता तुझीच वधू आहे. तुझा द्वेष आता या पलिकडे अधिक वाढवू नकोस.'

चिलखतात उग्र दिसणारा इनीआस निस्तब्ध उभा राहिला; परंतु त्याचे डोळे अस्वस्थ होते, आणि खाली येणारा आपला उजवा हात त्याने आवरला. आणि आता टर्नसने केलेल्या याचनेने त्याच्या शंकाकुल मनावर कोणत्याही क्षणी जास्त प्रभाव टाकला असता, आताच त्याच्या मनावर ती परिणाम करू लागली होती. परंतु अचानक त्याच्यापुढेच, त्याने टर्नसने खांद्यावरून लटकविलेला पॅलसचा तो शापित खड्गाचा पट्टा आणि चमकते खिळे ठोकलेला, जेव्हा टर्नसने जिंकून त्याला घायाळ करुन धरणीवर पाडले तेव्हा त्याच्या मित्राच्या मालकीचा असलेला, त्याला पूर्व परिचित असलेला कमरपट्टा पाहिला. तोच खड्ग लटकविण्याचा पट्टा टर्नसने आता आपल्या खांद्यावर लटकविला होता, आणि हे विजयचिन्ह त्याला घातक ठरले. त्याची स्वतःची सूडाच्या कटुतेची स्मृति चाळविणारे त्या लुटीचे दृश्य इनीआसच्या डोळयांनी आकण्ठ प्राशन केले. त्याचा क्रोध भडकला आणि त्या क्रोधाने क्षुब्ध होऊन तो म्हणाला : 'तू माझ्या पकडीतून इथून निसटून जावेस काय ? माझे ज्याच्यावर प्रेम होते त्याची लूट तू परिधान केली आहेस !

मी जो घाव आता घालीत आहे त्याने पॅलस, स्वत: पॅलसच केवळ तुझी आहूती घेत आहे; हे घोर खलपुरुषा, तुझ्या रक्तातून तोच तुझ्यापासून हा यथायोग्य दंड वसूल करीत आहे." असे म्हणून आणि क्रोधाने उसळून त्याने आपले खड्ग टर्नसच्या उरात पूर्णपणे रुतवले. त्याची गात्रे सैल पडून थंड झाली, आणि विव्हळत त्याचे संतप्त प्राण पाताळ लोकात निघून गेले.

# ग्रीक व रोमन दैवते :

विश्व देवांनी निर्माण केले असे ग्रीक मानीत नसत. विश्वाने देव निर्माण केले अशी त्यांची कल्पना होती. देवांच्या पूर्वीच पृथ्वी आणि स्वर्ग यांची निर्मिती झाली. तेच पहिले मातापिता. टायटन ही त्यांची मुले आणि देव त्यांची नातवंडे.

टायटन आणि बारा श्रेष्ठ ऑलिम्पिअन :

'ज्येष्ठ देव' म्हणजेच टायटन; हे अनेक युगे विश्वात श्रेष्ठ होते. ते महाकाय आणि अत्यंत बलवान होते. ते असंख्य होते परंतु त्यांच्यातील काही थोडेच महत्वाचे आहेत. (१) क्रोनस याचे (लॅटिन नाव सॅटर्न) : झ्यूसने (लॅटिन नाव ज्युपिटर) त्याला पदच्युत करून सत्ताग्रहण करीपर्यंत टायटनांवर राज्य होते. रोमन पुराणग्रंथांप्रमाणे ज्युपिटर सत्तेवर आल्यावर सॅटर्न इटलीत पळून गेला आणि तिथे त्याने 'सुवर्ण युग' निर्माण केले. दुसरे टायटन म्हणजे ओशन (महासागर), त्याची पत्नी टेथिस; हायपेरिअन (सूर्य, चन्द्र आणि उषेचा पिता); निमॉझिनी (स्मरणशक्ती) थेमिस (न्याय); आणि ॲटलस आणि प्रोमिथिअस या पुत्रांमुळे महत्व प्राप्त झालेला आयपिटस. झ्यूसच्या सत्ताग्रहणानंतर पदच्यूत न झालेले एवढेच टायटन होते.

टायटनांनंतर सत्तेवर आलेले बारा श्रेष्ठ ऑलिम्पिअन होते. ऑलिम्पस हे त्यांचे निवासस्थान होते, परंतु ते नक्की काय होते, कुठे होते हे सांगणे कठीण आहे. परंतु ऋतु त्याचे द्वारपाल होते आणि आत देवांची निवासस्थाने होती. हे बारा ऑलिम्पिअन म्हणजेच पुढील स्वर्गीय कुटुंब :

(१) झ्यूस (ज्युपिटर) त्याचे दोन भाऊ (२) पॉसायडोन (नेप्च्यून) (३) हेडीस (प्लूटो) (४) हेस्टिआ (व्हेस्टा) ही त्यांची बहीण (५) हीरा (जूनो) ज्युपिटरची पत्नी. (६) एअरीझ (मार्स) हा त्यांचा मुलगा (७) अथीनी (मिनर्व्हा) (८) ॲपोलो (९) ॲफ्रॉडाईटी (व्हीनस) (१०) हर्मिस (मर्क्यूरी) (११) आर्टिमीझ (डायना) आणि हीराचा पुत्र (१२) हिफीस्टस (व्हल्कन) -तो ज्युपिटरचा पुत्र होता असेही मानतात.

## झ्यूस (ज्युपिटर)

झ्यूस (ज्युपिटर) आणि त्याच्या भावांनी चिठ्ठ्या टाकून विश्वावरील सत्तेची विभागणी केली. पॉसायडोन (नेप्च्यून) च्या वाट्याला समुद्र आला आणि पाताळ लोक हेडीझकडे आला. ज्युपिटर सर्वसत्ताधीश झाला. तो स्वर्गाचा स्वामी आणि पर्जन्य आणि मेघ यांचा देव झाला. त्याने वज्र धारण केले. तो सर्वशक्तीमान होता तरी सर्वव्यापी आणि सर्वज्ञ नव्हता. त्याला विरोध होत असे आणि त्याची फसवणूकही होत असे. 'इलिअड' काव्यात पॉसायडोन त्याची फसवणूक करतो. आणि जूनोही त्याची फसवणूक करते. नियती त्याच्याहून श्रेष्ठ आहे.

तो एका पाठोपाठ अनेक स्त्रियांच्या प्रेमात पडतो आणि जूनोपासून त्याचा बेईमानपणा लपविण्याकरिता तो सर्वप्रकारच्या युक्त्यांचा उपयोग करतो, तथापि मानवाकडून ज्याप्रमाणे त्याच्या आराधनेची मागणी तो करीत असे त्याचप्रमाणे सद्वर्तनाची करीत असे. ट्रॉयच्या छावणीतील ग्रीक सैन्याला त्याने बजावले होते, "खोटे बोलणाऱ्या किंवा शपथभंग करणाऱ्या माणसांना मी सहाय्य करीत नाही." गीते आणि पुराण कथामधील ज्युपिटरांमध्ये संयोग झाला असावा. ज्या नगरामधे पूर्वी दुसऱ्या दैवताची आराधना होत असे तिथे ज्युपिटरच्या आराधनेचा प्रसार झाला की दोन्ही देवतांचा यथावकाश संयोग होत असे. पूर्वीच्या दवाची पत्नी ज्युपिटरकडे जात असे. परिणामी त्याला अपकीर्ती प्राप्त होत असे.

त्याची अभेद्य ढाल भयावह होती. गरुड हा त्याचा पक्षी, ओक त्याचा वृक्ष आणि ओकवनातील ओकपर्णांच्या सळसळीतून त्याची वाणी प्रसारीत होत असे; आणि तेथील पुरोहित तिचा अन्वयार्थ लावीत असत.

## जूनो (हीरा)

जूनो ही सॅटर्नची कन्या ज्युपिटरची बहीण आणि पत्नी होती. ओशन आणि टेथिस या टायटनांनी तिचे पालन केले. ती विवाहाची रक्षणकर्ती देवता होती आणि विवाहित स्त्रिया तिच्या कृपाकक्षेत होत्या. ज्युपिटरच्या प्रेमात पडलेल्या असंख्य स्त्रियांना शिक्षा करणे किंवा त्यांचा छळ करणे,–मग ज्युपिटरने त्यांच्यावर अत्याचार केलेला असो किंवा त्यांची फसवणूक केलेली असो,–हेच तिचे मुख्य कार्य दिसते. त्या किती निष्पाप होत्या किंवा किती अनिच्छेने फशी पडल्या

याची तिला पर्वा नव्हती. तिचा अतिद्वेष्टी क्रोध त्यांचा आणि त्यांच्या पुत्रपौत्रांचाही सतत पाठपुरावा करीत असे. अवमान ती कधी विसरत नसे. पॅरिसने ज्युनो, मिनर्व्हा आणि व्हीनस यापैकी व्हीनसची सर्वात अधिक लावण्यवती स्त्री म्हणून निवड केली; तेव्हा तिचा झालेला अपमान ती सहन करू शकली नाही म्हणून ट्रोजन युद्धाचा शेवट ट्रॉयच्या दारुण समूळ नाशात झाला; नाही तर त्या युद्धाचा सर्वमान्य सन्माननीय शेवट झाला असता. ट्रॉयचा सर्वनाश होऊन ते नामशेष झाल्यावरही तिचा द्वेष संपला नाही.

एका कथेनुसार ती योद्धयांची कनवाळू रक्षक देवता आहे आणि थोर कृत्यांचे स्फूर्तिस्थान आहे. प्रत्येक घरात तिची उपासना होत असे आणि गृहिणी तिच्या सहाय्याकरिता प्रार्थना करीत. प्रसूतीमध्ये तिची कन्या एलिथिआ त्यांना सहाय्य करीत असे.

गाय आणि मोर तिला प्रिय होते आणि आॅरगॉस ही तिची आवडती नगरी होती.

## नेप्च्यून (पॉसायडोन)

नेप्च्यूनची सर्व सागरांवर अधिसत्ता होती. ज्युपिटरच्या खालोखाल तोच श्रेष्ठ मानला जातो. ईजिअन समुद्राच्या दोन्ही किनाऱ्यांवरील ग्रीक दर्यावर्दी होते म्हणून नेप्च्यून त्यांच्या दृष्टीने अधिक महत्वाचा होता. टायटन ओशनची नात ॲम्फिट्राईट ही त्याची पत्नी होती. सागरतळाशी त्याचा रम्य प्रासाद असे. परंतु बहुधा तो ऑलिम्पसमधेच असे. माणसाला त्याने प्रथम घोडा दिला. वादळी आणि शांत सागरावर त्याचे नियंत्रण होते. सागराच्या लाटांवरून तो त्याच्या रथातून जाऊ लागला म्हणजे वादळ शांत होत असे आणि सहजपणे फिरणाऱ्या त्याच्या रथाच्या चाकांमागून शांतता येत असे. त्याच्या हाती सतत त्रिशूळ असतो आणि त्याने तो पृथ्वी हादरवीत असे. बैल आणि घोडे यांच्याशी त्याचा कसला तरी संबंध होता. परंतु बैलाचा इतर काही देवांशीही संबंध होता.

## प्लूटो (हेडीझ)

ऑलिम्पिअन भावांपैकी हा तिसरा. पाताल लोक आणि मृतात्मे यांच्यावर त्याची सत्ता होती. तो समृद्धी आणि भूमीगत मूल्यवान द्रव्यांचाही देव होता. ग्रीक आणि रोमनही त्याला 'डिस' (श्रीमंत) या दुसऱ्या नावाने संबोधीत असत. त्याचे

शिरस्त्राण मस्तकावर धारण केले असता अदृश्य होता येत असे. तो आपल्या अंधाऱ्या राज्यातून क्वचितच बाहेर पडत असे. त्याचे आगमन स्वागतार्ह नसे. तो अदय, अनिवार्य, परंतु न्याय्य होता. भयावह होता परंतु दुष्ट नव्हता.

## पर्सिकोनी (प्रॉझरपाईन)

पर्सिकोनी (प्रॉझरपाईन) ही भूमीकन्या त्याची पत्नी होती. त्याने तिला मृत्यूलोकातून पळवून नेले आणि पाताल लोकाची राणी केले. तो मृतांचा राजा होता परंतु मृत्यू नव्हता. मृत्यूला ग्रीक थॅनॅटॉस व रोमन ऑर्कस म्हणत असत.

## मिनर्व्हा (पॅलस अॅथीना)

मिनर्व्हा ही एकटया ज्युपिटरची कन्या होती. मातेच्या गर्भातून तिचा जन्म झाला नाही. पूर्ण वाढ झालेली आणि पूर्ण चिलखतात असलेली मिनर्व्हा ज्युपिटरच्या मस्तकातून बाहेर पडली. ती अत्यंत भयावह आणि निर्दय युद्धदेवता आहे. परंतु बाहेरच्या शत्रूंपासून राज्याचे आणि घरांचे रक्षण करण्याकरिताच ती युद्धप्रवण होते असाही दाखला आहे. ती मुख्यतः नगराची देवता आहे आणि ती नागरी जीवन, शेती, कलाव्यवसाय यांची रक्षणकर्ती देवता आहे. तिने खोगीर प्रथम निर्माण केले आणि माणसांच्या उपयोगाकरिता घोडयांना शिक्षण दिले.

ज्युपिटरची ती लाडकी होती. आणि त्याची भयावह ढाल आणि त्याचे संहारक शस्त्र, वज्र तीच संभाळीत असे. तिचे डोळे घारे होते. तीन कुमारी देवतांतील ती मुख्य होती आणि तिचा उल्लेख 'कुमारी' पार्थेनॉस असा होत असे आणि तिच्या मंदिराला पार्थेनॉन म्हणत असत. पुढे तिला सूज्ञता, समज आणि पावित्र्याचे प्रतीक मानले जाऊ लागले.

अॅथेन्स ही तिची आवडती नगरी होती. तिने निर्माण केलेला ऑलिव्ह हा तिचा आवडता वृक्ष होता व घुबड हा तिचा पक्षी होता.

## फीबस अपोलो

ज्युपिटर आणि लॅटोनाचा पुत्र. याचा जन्म डेलॉस या एका लहान बेटावर झाला. ग्रीक काव्यात त्याच्या सौंदर्याची वर्णने आहेत. तो सर्वश्रेष्ठ संगीतकार असून आपल्या सुवर्ण बीन वादनाने ऑलिम्पसवरील देवांचे मन रिझवितो. तो सर्वश्रेष्ठ धनुर्धर असून त्याचे धनुष्य रुप्याचे आहे. तो आद्य भिषग्वरही आहे.

तो प्रकाशाचा देव आहे. म्हणून तो सत्याचाही देव आहे. त्याच्या मुखातून असत्याचा उच्चार कधीही होत नाही. पार्नेसस पायथ्याशी असलेले त्याचे मंदिर ग्रीक पुराण ग्रंथात त्याच्या भविष्यभाषितांकरिता सुप्रसिद्ध आहे. तिथे कॅस्टॅलिग्ना हा पवित्र झरा व सेफिसस ही नदी होती. ते पृथ्वीचे केन्द्रस्थान असल्यामुळे यात्रिक तेथे जात असत. सत्यान्वेषी मुमुक्षूंनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे समाधी लावणाऱ्या योगिनींकडून मिळत असत. योगिनी ज्या तिवईवर आसनस्थ होत असे त्याखालील विवरातून येणाऱ्या वायुमुळे ही समाधी अवस्था प्राप्त होत असे.

डेलॉस बेटावर जन्म झाल्यामुळे त्याला डेलिअन, पॉर्नेससच्या गुहेत राहणाऱ्या सर्पाचा वध केला म्हणून पायथिअन असेही संबोधीत असत. लायसिअन असेही त्याला संबोधित असत. म्हणजे वृक देवता, प्रकाश देवता व सूर्य देवता. त्याचप्रमाणे लायसिआची देवता. वस्तुतः टायटन हायपेरिअनचा पुत्र हेलिऑस हाच सूर्यदेवता होय.

अपोलो हे दयाधन दैवत होय. परमेश्वर आणि माणूस यांच्यातील एकमात्र दुवा होय. तो ईश्वरी इच्छा माणसाला कळवून परमेश्वराची कृपा संपादन करण्यास माणसाला सहाय्य करणारी देवता होता.

लॉरेल हा त्याचा वृक्ष. अनेक प्राणी त्याला प्रिय होते. त्यातूनही डॉल्फिन मासा आणि कावळा हे अधिक प्रिय होते.

## आर्टिमीझ (डायना)

तिचे जन्मस्थळ सिन्थस पर्वत; यावरून तिला सिन्थिआ असेही संबोधीत असत. ज्युपिटर आणि लॅटोनाची कन्या; अॅपोलोची जुळी बहीण. तीन कुमारी देवतांतील एक. सर्व वनांची व वन्य जीवांची स्वामिनी. देवांची मुख्य मृगयाधिकारी. आदर्श शिकाऱ्याप्रमाणे ती बाल पशूंचा वध करीत नसे. म्हणून तिला यौवनाची रक्षणकर्तीही मानतात. परंतु एका कुमारीचा बळी देईपर्यंत तिने ग्रीक आरमार ट्रॉयकडे जाऊ दिले नव्हते.

फीबस हा सूर्य होता. डायना चन्द्र होती; फिबी सेलिनी (ल्यूना) याही चन्द्रदेवताच. परंतु अॅपोलो आणि डायना यांच्या बाबतीत पुराणात गोंधळ आहे. ती हेलिआसची बहीणही होती. पुढे तीच हेकेटीही मानली आहे. हेकेटी ही त्रिदेही देवता आकाशात सेलिनी, भूलोकावर आर्टिमीझ आणि पाताल लोकात हेकटी. अंधाराची देवता तशीच चन्द्रदेवता–अंधारातील कृत्याशीही तिचा संबंध जोडला

होता. तिच्याविषयीच्या कल्पनेतील हा बदल परस्पर विरोधी आहे. सुष्ट दुष्ट वृत्तींचा हा आविष्कार आहे.

सायप्रस हा तिचा वृक्ष आणि सर्व वन्यजीव तिचे आवडते; परंतु मृग सर्वांत अधिक प्रिय.

## व्हीनस (अॅफ्रॉडाईटी)

सौंदर्य आणि प्रीती देवता. ज्युपिटर आणि डायोनीची कन्या समुद्रफेनातून ती उद्‌भवली अशीही कथा आहे. हा उद्‌भव सिथेरा येथे झाला व वाऱ्यांनी तिला सायप्रसला नेले. म्हणून तिला सिथेरिआ आणि सिप्रिअन असेही म्हणतात. समुद्र-फेसातून उद्‌भवली म्हणून अॅफ्रॉडाईटी (अॅफ्रॉस = फेस) म्हणतात. तिच्या सौंदर्याच्या मोहिनीने देव आणि मर्त्य माणसेही स्वतःला विसरून जात. या सौंदर्य आणि प्रीती देवतेचा पती व्हल्कनसारखा लंगडा, कुरूप आणि ओंगळ पण बलशाली देव होता.

ज्युपिटरचा आणि त्याची कन्या व्हीनस यांचा शरीरसंबध कधीही झाला नव्हता. परंतु तिच्या मेखलेच्या मोहिनी-प्रभावाने तो नेहमी तिच्या मोहात पडत असे. म्हणून चिडून तिचा नक्षा उतरवण्याकरिता त्याने तिला एकदा एका मर्त्य माणसाच्या प्रेमात पडावयास लावले. तो माणूस म्हणजे देखणा अँकायसिस, इनीआसचा पिता. त्याच्यापासूनच व्हीनसला इनीआस झाला. व्हीनस एका फिजिअन राजकन्येच्या रूपात आली आणि जाताना त्याने व्हीनसशी संभोग केला हे कुणालाही सांगू नये असे सांगितले. अॅन्कायसीझ या प्रकाराने भयभीत झाला आणि या पापाबद्दल त्याने दयेची याचना केली. पुढे मित्रांबरोबर मद्यपान करीत असता त्याचा मित्र त्याला म्हणाला 'व्हीनसशी संभोग करण्यापेक्षा त्या माण-साच्या मुलीबरोबर संभोग करण आवडेल की नाही?' त्यावर गैर सावधपणे अँकायसीझ म्हणाला 'नाही! दोघींच्या बरोबर संभोग केल्यामुळे हा प्रश्न मला अप्रस्तुत वाटतो.' ज्युपिटरने हे त्याचे उत्तर ऐकले आणि आपल्या वज्राने अँकायसीझवर प्रहार केला. त्यामुळे तो नष्टच व्हायचा परंतु व्हीनसने आपली मेखला मध्ये टाकली व वज्र त्याच्या पायाशी जमिनीत घुसले. परंतु त्या धक्क्याने अँकायसीझ कायमचा अपंग झाला.

मर्टिल हा सुगंधी वृक्ष तिचा आवडता. कबूतर, चिमणी आणि हंस तिचे आवडते पक्षी.

## मर्क्युरी (हर्मिस)

ज्युपिटर आणि ॲटलसची कन्या माईआ यांचा पुत्र तो अत्यंत डौलदार आणि चपळ होता, त्याच्या पायातील चढावाला पंख होते आणि त्याच्या मुकुटावर आणि त्याच्या हातातील दंडावर पंख होते. तो ज्युपिटरचा दूत होता. तो सर्व देवात अधिक चाणाक्ष आणि धूर्त होता. तो सर्वश्रेष्ठ शर्विलक होता. जन्म झाल्याबरोबर त्याने ॲपोलोची खिल्लारे चोरली. ज्युपिटरने ती परत करायला लावली आणि मर्क्युरीने कासवाच्या पाठीपासून नुकतेच तयार केलेले तंतुवाद्य, वीणा लायर ॲपोलोला भेट देऊन त्याची क्षमा मिळविली. तो व्यापार विनिमय आणि व्यापाऱ्यांचा देव आहे. तो मृतात्म्यांचा मार्गदर्शक असून त्यांना पाताळ लोकात घेऊन जातो. पुराण कथात इतर देवांहून त्याचा अधिक भाग असतो.

## मार्स (एअरीझ)

ज्युपिटर आणि जुनोचा पुत्र. तो युद्धाचा देव होय. ज्युपिटर आणि जुनो दोघेही त्याचा तिरस्कार करीत. तो खुनशी असून मानव जातीवरील तो शाप ठरला आहे. तो भ्याडही आहे. वेदनेने तो ओरडतो आणि जखमी झाला तर पळून जातो. समरांगणावर त्याचा परिवार मोठा असतो. एरीझ ही त्याची बहीण (दुही); तिचा पुत्र संघर्ष. युद्ध देवता एनिओ ही त्याच्याबरोबर असते. 'भय' 'थरकाप' आणि 'घबराट' ही सारी रणांगणावर संचार करू लागली म्हणजे पृथ्वी विव्हळते आणि रक्ताचे पूर वाहू लागतात.

रोमनांना मार्स अधिक आवडत असे. त्याच्या समरांगणावर प्राप्त होणारा मृत्यू ते भूषणावह मानीत असत. तो व्हीनसचा प्रियकर होता आणि तिचा पती व्हल्कन त्याचा तिरस्कार करीत असे. परंतु तो केवळ युद्धाचे प्रतीक असावा. मर्क्युरी, जूनो किंवा ॲपोलोसारखे त्याला स्वतंत्र व्यक्तिमत्व दिसत नाही. कोणत्याही नगरीत त्याची आराधना होत नसे. उत्तर ग्रीसच्या थ्रेसमधील क्रूर आणि रानटी जमातीतून तो आला असावा. इनिइडच्या प्रारंभीच व्हर्जिलने त्याचे स्मरण केले आहे हे ट्रोजनांच्या आणि पर्यायाने रोमनांच्या त्याच्यावरील भक्तीचे सूचक आहे.

गिधाड हा त्याचा पक्षी.

## व्हल्कन (हिफीस्टस)

अग्नीदेव. ज्युपिटर आणि जूनोचा पुत्र. परंतु तो एकटचा जूनोचाही पुत्र मानला जातो. ज्युपिटरने अॅथीनाला जन्म दिला. त्याचा सूड घेण्याकरिता तिने त्याला जन्म दिला असेही मानीत. सर्व सुंदर देवात तो एकटाच कुरुप होता. तो लंगडाही होता. तो जन्मतःच कुरुप होता म्हणून जूनोने त्याला स्वर्गातून फेकून दिले अशी कथा आहे. तो जूनोचा बचाव करीत असता चिडून ज्युपिटरने त्याला खाली फेकले अशीही कथा आहे. तो देवांचा शिल्पकार आहे. त्यांची निवासस्थाने शस्त्रे, चिलखते तोच घडवीत असे. त्याच्या कारखान्यात त्याने सुवर्णात घडविलेल्या सेविका त्याचे काम करीत. त्याचा कारखाना एटनाच्या किंवा दुसऱ्या ज्वालामुखीच्या तळाशी असतो. 'इलिअड' या होमरच्या महाकाव्यात अग्लाईआ ही त्याची पत्नी होती असा उल्लेख आहे. 'ओडिसी' या त्याच्याच काव्यात व्हीनस त्याची पत्नी होती असा उल्लेख आहे.

तो शांतताप्रिय देव असून नागरी जीवनात अॅथीना इतकेच त्याला महत्व होते. ती दोघेही, कारागिरी, शेती, आणि कला या नागरी जीवनाला आधारभूत असलेल्या कार्याच्या आश्रयदात्या देवता होत.

## व्हेस्टा (हेस्टिआ)

ही ज्युपिटरची बहीण होती, आणि अथीना नायनाप्रमाणे कुमारी होती. ती घरकुलाची देवता होती. नवजात अर्भकाचा कुटुंबात स्वीकार करण्यापूर्वी ते तिच्या दर्शनास आणावे लागत असे. प्रत्येक भोजनापूर्वी आणि नंतर तिला नैवेद्य दाखवीत असत. प्रत्येक नगरीत तिचे मंदिर असे आणि तेथील अग्नी नित्य प्रज्वलित असे. नवी वसाहत करताना जुन्या नगरीतील तिच्या वेदीतील अग्नी आणून नवा अग्नी चेतविला जात असे. रोम नगरीत सहा कुमारी योगिनी (व्हेस्टल्स) तिचा अग्नी प्रज्वलित ठेवीत.

## ऑरोटा

उषादेवी, टिटोनस तिचा पती. आणि तिचा पुत्र एथिओपिआचा मेम्नॉन याचा पिता. तो काळा होता. ट्रॉयच्या युद्धात त्याला वीरगती प्राप्त झाली. टिटोनसला अमर करण्याकरिता ऑरोटाने ज्युपिटरची प्रार्थना केली आणि त्याने

ती मान्य केली. परंतु अमरत्वाबरोबर चिरयौवन मागायला ती विसरली होती. म्हणून तो वृद्ध झाला परंतु मरू शकत नव्हता. त्याने मृत्यूकरिता प्रार्थना केली परंतु व्यर्थ. शेवटी ऑरोटाने त्याला एका खोलीत बंद केले आणि ती निघून गेली. आणि तो तिथे निरर्थक वटवट करीत राहिला. त्याची सर्व शक्ती संपली होती आणि तो केवळ झाडाच्या सालीसारखा वाळून गेला होता. तो सतत लहान लहान होत गेला. शेवटी ऑरोटाने त्याचे गवतावरील टोळात रुपांतर केले.

## पाताल लोक

पाताल लोकावर ज्युपिटरचा भाऊ हेडीझ किंवा प्लूटोचे राज्य होते. त्याची राणी प्रॉझरपाईन (पर्सिकोनी) होती. पृथ्वीच्या गर्भातील गुप्त स्थळी हा पाताल लोक आहे. टार्टरस आणि एरिबस हे त्याचे दोन भाग आहेत. सर्वात खोल असलेले एरिबस ही पृथ्वीपुत्राची बंदीशाळा असून मृत झाल्याबरोबर आत्मा तिथे जातो. या दोन्ही विभागात तसा फरक नसून या सर्व प्रदेशाला टार्टरस असेच नाव आहे.

होमरच्या काव्यात पाताललोकाची कल्पना अस्पष्ट आहे. छायांची वसती असलेला हा छाया लोक आहे. सर्वच भासमय आहे. आत्म्यांना अस्तित्व असले तर ते एखाद्या दुःस्वप्नासारखे यातनामय आहे. पुढच्या कवींनी पाताल लोकात दुष्टांना शासन आणि पुण्यात्म्यांना आनंद प्राप्त होतो अशी कल्पना केली आहे. व्हर्जिलने अधिक तपशीलासह ही कल्पना सुस्पष्ट केली आहे. या प्रदेशाची भूरचनाही त्याने वर्णिली आहे. पाताल लोकाची वाट ॲकेरॉन नदीकडे जाते. ही नदी शोकनदी कोसायटसला मिळते. एक वृद्ध नावाडी केअरॉन मृतात्म्यांना पैलतीराला नेतो. पुढेच टार्टरसचे प्रवेशद्वार आहे. तिथे रखवालीवर सबंरस हा तीन शिरे व अग्नीसर्पाचे शेपूट असलेला राक्षसी कुत्रा असतो. तो सर्व आत्म्यांना आत जाऊ देतो परंतु एकालाही बाहेर जाऊ देत नाही. आत प्रवेश करताच प्रत्यक आत्म्याला तीन न्यायाधीशांपुढे उभे केले जाते, तिथे त्यांचा निवाडा होतो. दुष्टांना अनंत यातना भोगायला व पुण्यात्म्यांना एलिशिअन क्षेत्रात चिदानंद भोगण्याकरिता पाठविले जाते.

ॲकेरॉन आणि कोसायटसशिवाय अग्नीनदी फ्लेगेथॉन, अनिवार्य शपथेची नदी स्टीक्स आणि विस्मरणाची नदी लीथि व ऑरोनस या ॲकेरॉनच्या उपनद्या आहेत.

इथेच कुठेतरी प्लूटोचा प्रासाद आहे. परंतु त्याचे वर्णन कुणी केले नाही.

## बॅक्कस (डायोनिसस)

बॅक्कसच्या जन्माविषयी अनेक आख्यायिका आहेत, परंतु त्या सर्वात त्याचे मातृत्व अनेक देवतांकडे असल्याचे दिसत असले तरी पितृत्व ज्युपिटरकडेच आहे. एक कथा मात्र अधिक ग्राह्य मानली जाते.

ज्युपिटरचे राजा कॅडमस याची कन्या सेमिलीबरोबर गुप्त प्रेमप्रकरण होते. ज्युपिटर तिला मानवीरुपात भेटत असे. मत्सरी जूनो (हेरा) तिला एका म्हाताऱ्या शेजारणीच्या रुपात भेटली व तिने तिला सांगितले की त्याने आपल्या खऱ्या रुपात प्रकट व्हावे. तो कदाचित् एखादा राक्षसही असेल. सेमिलीने तसा हट्ट धरला तेव्हा संतापून ज्युपिटर प्रचंड प्रकाशाच्या व विद्युत्पाताच्या रुपात प्रकट झाला व सेमिली त्यात भस्म झाली परंतु हर्मिसने सहा महिन्याचा गर्भ वाचविला व ज्युपिटरच्या मांडीत शिवला पुढे तीन महिन्यानी ज्युपिटरने डायोनिससला जन्म दिला म्हणून त्याला 'द्विज' म्हणतात.

जन्मतःच ज्यूनोच्या आज्ञेवरून टायटनांनी डायोनिससच्या चिंध्या केल्या परंतु ऱ्हिआने त्याला पुनः जिवंत केले. त्याला वाढविण्यात अनेक अडचणी निर्माण झाल्या. परंतु मोठा झाल्यावर त्याने नायसा पर्वतावर मदिरेचा शोध लावला. नंतर तो इजिप्तमधे गेला व टायटनांचा पराभव करून त्याने राजा अॅमॉनला परत राज्य प्राप्त करून दिले. नंतर हिन्दुस्तानात येऊन त्याने अनेक नगरे वसविली व द्राक्षवेलींची लागवड शिकविली. त्यानंतर त्याने जगभर भ्रमंती करून स्वतःचा सांप्रदाय वाढविला. त्याच्या उत्सवात प्रचंड जल्लोष असे. त्याच्या प्रभावाने त्याचे भक्त पिसाट होत असत. त्याच्या उत्सवांना बॅकॅनाल म्हणत व भक्तांना बॅकॅनॅलिअन्स म्हणत, या पिसाटपणात त्याने काही क्रूर हत्याही केल्या. पुढे फ्रिजीआ मार्गे तो युरोपला आल्यावर त्याची आजी ऱ्हिआ हिने त्याच्या पापाचे क्षालन केले. नंतर तो पाताललोकात गेला व प्रॉझरपाईनला मर्टलची लाच देऊन त्याने आपली आई सेमिली हिला स्वर्गात आणले व तिला तिथे चिरंतन स्थान मिळवून दिले. मत्सरी जूनो शेवटी गप्प बसली.

हा आनंद आणि मदिरा यांचे दैवत आहे. ज्युपिटर आणि थीब्सची राजकन्या सिमेली यांचा पुत्र. बॅक्कस हा एकच देव असा आहे की ज्याचा पिता देव

आणि माता मानवी आहे. आनंदोत्सव आणि मद्याचा हा देव श्रेष्ठ शिकारीही आहे. तो द्राक्षवेलीचे प्रतीकही आहे. हिवाळ्यामधे त्याचा अंत होतो आणि नंतर त्याचा पुनर्जन्म होतो. मृत्यूबरोबर सर्व संपत नाही. त्याच्यामधे पुनरुज्जीवनाची कल्पना अभिप्रेत आहे. शरीर मर्त्य आहे परंतु आत्मा अमर आहे. तो रंगमंचाचाही देव आहे. त्याच्या रथाला चित्ते जुंपलेले आहेत.

## कलादेवता ( MUSES )

कलादेवता नऊ होत्या. त्या ज्युपिटर (झ्यूस) व नेमोसाईन ( Mnemosyne स्मरणशक्ती ) यांच्या कन्या होत. प्रारंभी त्यांना वेगळी व्यक्तिमत्वे नव्हती. पुढे त्यांची क्षेत्रे भिन्न झाली.

क्लिओ ही इतिहासाची देवता. युरेनिआ ही खगोलशास्त्राची; मेल्पोमिनी ही शोकान्त नाटयाची; थॅलिआ ही हास्य नाटयाची; टर्प्सिकोअर ही नृत्याची; कॅलिओपी ही महाकाव्याची; इरॅटो ही प्रेमकाव्याची, पॉलिहायम्निआ ही भक्तीगीतांची, व युटर्पि ही काव्याची देवता होती.

त्या हेलिकॉन पर्वतावर बारनॅसस शिखरावर किंवा ऑलिम्पसवर राहात असत म्हणून त्यांना 'पर्वत देवता' ही म्हणत असत.

## ॲटलस

टायटन आयपिटसचा पुत्र आणि प्रोमिथिअसचा भाऊ. ज्युपिटरने आपला पिता सॅटर्न याच्याविरुद्ध बंड केले तेव्हा सॅटर्न (क्रोनस) आणि त्याचे साथीदार टायटन यांनी ज्युपिटर आणि त्याची पाच भावंडे यांच्याविरुद्ध तुंबळ युद्ध केले. या युद्धात प्रोमिथिअसने ज्युपिटरला सहाय्य केले. टायटनांचा पराभव झाला. ज्युपिटरने त्यांना भयंकर शासन केले. ॲटलसला सर्वात अधिक कडक शिक्षा झाली. अवजड पृथ्वी सतत खांद्यावर बाळगण्याची शिक्षा त्याला झाली. ती खांद्यावर घेऊन तो सतत उभा असतो. एकदाच त्याला हे ओझे हर्क्यूलीझच्या खांद्यावर थोडा वेळ देता आले होते.

## हर्क्युलीज (Hercules)

हर्क्यूलीजचा जन्म थीब्ज येथे झाला. तो ॲम्फिट्रिऑन नावाच्या सेनापतीचा पुत्र आहे असे मानले गेले. परंतु वस्तुतः तो ज्युपिटरचा पुत्र होता.

ॲम्फिट्रिऑन युद्ध आघाडीवर असताना ज्युपिटर त्याचे रुप घेऊन त्याची पत्नी आल्कमेना हिच्याकडे आला होता. तिने दोन मुलांना जन्म दिला. ज्युपिटरपासून हर्क्युलीजला व इफिक्लसला ॲम्फिट्रिऑनपासून हीराला (जूनो) हे कळल्यापासून ती हर्क्युलीसचा द्वेष करू लागली. व तिने त्याला ठार मारण्याचे ठरविले.

हर्क्युलीसला विचारशक्ती कमी होती. तो अधिक भावनाविवश होता. अद्‌भूत शरीर सामर्थ्य व सरळ साधा स्वभाव हे त्याचे विशेष गुण. या बाबतीत तो ॲथेन्सचा वीरपुरुष थिसिअसहून भिन्न होता. थिसिअस शूर असून बुद्धिवान होता. दयाळू होता. हर्क्युलीझ चटकन भावनेच्या आहारी जात असे. परंतु तो सहनशीलही होता. एवढी असामान्य शक्ती अंगी असूनही तो आपल्या हातून घडलेल्या दुष्कर्माचे परिक्षालन करण्याकरिता निमुटपणे शासन घेत असे. अनेकवेळा दुसऱ्यानी त्याला क्षमा केली तरी तो स्वत: स्वत:ला शासन करीत असे.

तो सर्वात श्रेष्ठ शक्तिमान पुरुष असल्यामुळे देवांनाही त्याच्या सहाय्याची गरज भासत असे. पृथ्वीपुत्र टायटननी देवांविरुद्ध पुकारलेल्या बंडात हर्क्युलीझनेच त्यांचा पाडाव केला. हर्क्युलीझ देवांना म्हणून बरोबरीच्या नात्याने वागवीत असे. एकदा तो डेल्फीला अपोलोला कौल लावायला गेला असताना तेथील योगीनीने त्याला उत्तर दिले नाही तेव्हा त्याने चिडून तेथील पवित्र तिवई उचलली व आपण ती घेऊन जाऊन आपले स्वत:चे देववाणी मंदिर बनवितो अशी धमकी दिली. ॲपोलोला अर्थात हे मंजूर नव्हते, परंतु हर्क्युलीझ त्याच्याशी लढायला तयार होता. ज्युपिटरने मध्यस्थी करून हा तंटा मिटवला.

पाळण्यातच दोन राक्षसी सर्पांना मारण्यापासून त्याच्या पराक्रमांना प्रारंभ झाला. त्याला संगीत आवडत नसे. सहज मारलेल्या बासरीने त्याच्या संगीत शिक्षकाचा मेंदू बाहेर आला तेव्हा त्याला फार दु:ख झाले. त्याचे तलवार, कुस्ती, या विषयांचे शिक्षक मात्र वाचले.

पुढे त्याने थोस्पिअन सिंहाला ठार मारले व त्याची चामडी तो नेहमी परिधान करी. त्याने मिनॅनस राजाला जिंकले व त्याची कन्या मेगारा हिच्याशी विवाह केला. पत्नीवर व मुलांवर त्याचे निरतिशय प्रेम होते परंतु वेडाच्या भरात त्याने त्यांची हत्या केली. हेराने त्याला कधीही क्षमा केली नव्हती. तिनेच ही वेडाची लहर निर्माण केली होती. शुद्धीवर आल्यावर त्याने आत्महत्या करून

प्रायश्चित घेण्याचा विचार केला परंतु त्याचा मित्र थिसिअस याने त्याला त्या विचारापासून परावृत्त केले. व तो त्याला अॅथेन्सला घेऊन गेला. परंतु अपराधाची भावना त्याला स्वास्थ्य लाभू देईना. तो डेल्फीला गेला. व तेथील योगिनीलाही त्याने प्रायश्चित घेतले पाहिजे असे वाटले. तिने त्याला मिसिनीचा राजा युरिस्थिअस याच्याकडे पाठविले. युरिस्थिअसने त्याला अत्यंत अवघड अशी बारा कामे करायला लावली. ती 'हर्क्युलीझचे श्रम' म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यातील शेवटच्या कामगिरीत त्याला पाताललोकी जाऊन हेडीझचा रखवालीचा तीन डोकी असलेला राक्षसी कुत्रा घेऊन यावे लागले.

या सर्व पराक्रमात डायोमिडकडे असलेल्या चार मनुष्यभक्षक घोड्या घेऊन येण्याच्या कामगिरीत हर्क्युलीझचे व्यक्तिमत्व प्रकट होते. डायोमिडकडे जाताना त्याने आपला मित्र अॅड्मिटस याच्या घराला भेट देण्याचे ठरविले. परंतु ही वेळ अत्यंत दुःखाची होती. अॅड्मिटसची पत्नी अॅलसेस्टिस नुकतीच मरण पावली होती. विशेषतः तिने आपले आयुष्य आपल्या पतीला दिले आणि त्याला वाचविले होते म्हणून तो अति दुःखी होता. ( त्याच्याकडे सेवक म्हणून शासन भोगणाऱ्या अॅपोलोने त्याचे आयुष्य संपले असून दुसऱ्या कुणी त्याच्याऐवजी मरण स्वीकारल्यास तो वाचेल असे सांगितले होते. त्याच्या आसन्नमरण मातापित्यापासून त्याच्या सर्व जीवलग मित्रांपर्यन्त सर्वांनी त्याला नकार दिला. )

हर्क्युलीस अतिथी म्हणून आला आहे असे कळताच अॅड्मिटसने त्याचे स्वागत केले. दुःखाचा मागमूसही त्याला दिसू दिला नाही. घरामधे एक त्रयस्थ स्त्री मेली आहे असे सांगितले. शोकाचे आवाज त्याच्या कानी जाऊ नयेत म्हणून त्याला दूरच्या महलात ठेवले व सेवकांनी त्याच्या मेजवानीची व मदिरेची उत्तम व्यवस्था ठेवली. तो खूप प्याला व असभ्य गाणी गाऊ लागला. सेवकांना ते रुचले नाही. त्यांचे दुर्मुखलेले चेहरे पाहून त्याने एका सेवकाला पकडले व त्याने त्याला सांगितले की मृत स्त्री ही राणी अॅलसेस्टिस होती. हर्क्युलीझ अवाक् झाला व स्वतःच्या असभ्य वर्तनाबद्दल स्वतःला दूषणे देत तो प्रायश्चित्ताचा विचार करू लागला. व मृत्यूकडून अॅलसेस्टिसला परत आणण्याचे त्याने ठरविले. तडक उठून तो मृत्यूकडे गेला व तिला परत घेऊन आला. अॅड्मिटस प्रेतयात्रेहून परत आला तेव्हा हर्क्युलीझने त्याला विचारले " या स्त्रीला तू ओळखतोस काय? " अॅड्मिटसला वाटले ते तिचे पिशाच्च आहे. हर्क्यूलीझने त्याला सांगितले की ती त्याची पत्नी असून मृत्यूशी झगडून त्याने तिला परत आणले आहे.

राजा युरिटसने केलेल्या त्याच्या अपमानाचा सूड म्हणून त्याने त्याला जिंकून ठार मारले व त्याची सुंदर राजकन्या आयोली हिला गुलाम म्हणून त्याची दुसरी पत्नी डिएनिराकडे पाठविले. डिएनिराला वाटले हर्क्युलीसचे आयोलावर प्रेम असावे म्हणून तिने सेन्टॉरच्या मनांत रंगविलेले मंत्रप्रभाव असलेले वस्त्र त्याच्याकडे पाठविले. ते अंगावर ओढताच त्याच्या शरीराचा आत्यंतिक दाह झाला त्याला घरी आणले. डिएनाराला ते समजले व तिने आत्महत्या केली. परंतु मृत्यू हर्क्युलीझकडे येत नव्हता म्हणून तोच मृत्यूकडे गेला; मृत्यूनंतर तो ऑलिम्पसला गेला. तिथे हेराचा द्वेष संपला व त्याने तिची कन्या हिबी हिच्याशी विवाह केला.

## देवभाषिते (The Oracles)

एखाद्या बिकट समस्येविषयी किंवा विवाद्य प्रश्नाविषयी देवाला कौल लावून निर्णय घेण्याची प्रथा फार पुरातन आहे. देव वाणी ही नानाप्रकारे निर–निराळ्या संकेतातून व्यक्त होते. ग्रीसमध्ये विशिष्ट मंदिरांतून ही भाषिते प्रकट होत असत. अशा मंदिरात सर्वात प्राचीन स्थान डोडोनिअन झ्यूसचे होते. फार प्राचीन काळी इजिप्तमधील थीब्ज मधून दोन काळी कबूतरे उडाली. एक लिबियातील आमनला गेले व दुसरे डोडोनाला. ती दोन्ही कबूतरे ओक वृक्षावर उतरली. हीच देवाची भाषिते असे मान्य झाले. डोडोना इथे कबूतरांच्या घुमण्याचा आवाज ऐकून, किंवा ओकवृक्षाच्या पानांची सळसळ ऐकून, किंवा त्या वृक्षाच्या डहाळयांना टांगलेल्या पितळेच्या भांड्यांचा आवाज ऐकून तेथील योगीनी भाषिते प्रकट करते. ऑलम्पिआ येथील मंदिरातील योगीनी बळी दिलेल्या पशूंची आतडी पाहून भाषिते प्रकट करते.

डेल्फी येथे अॅपोलोचे प्रसिद्ध मंदिर होते. त्याशिवाय त्याची लायसिअम व अरगॉस येथे मंदिरे होती. परंतु बुरिअन इस्मेनिअम येथील मंदिरात पुरोहित भाषिते प्रकट करीत.

पॅट्री येथे डिमिरचे मंदिर होते. जूनोचे पॅगी येथे. पृथ्वीमातेचे एजिएरा येथे. त्याशिवाय हर्क्युलीज, याचे अकिअन बुरा येथे. पॅसिकोचे •लॅकोनिअन थॅलामी येथे. अशा अनेक ठिकाणी अनेक देवतांची मंदिरे देवभाषिते प्रकट करीत असत.

## निरिईडज (Nereids)

सागर आणि सरिता यांच्या मीलनातून निरिईडांचा जन्म झाला. परंतु तोवर मनुष्य निर्माण झाला नव्हता म्हणून देवता ॲथीनीच्या संमतीने आयापिटसपुत्र प्रोमिथिअसने त्यांना देवांचे रुप दिले. त्याकरिता त्याने फॉसिसमधील माती आणि पाणी वापरले. आणि ॲथीनीने त्यांच्यात प्राण ओतले. त्या संख्येने पन्नास असून समुद्रदेवता थेरिस हिच्या परिचारिका आहेत. एका कथेनुसार त्या समुद्रपरी डोरिस आणि वृद्ध द्रष्टा निरिअस याच्या कन्या होत. निरिअसला आपले रुप बदलता येत असे.

## सिर्सी

सिर्सी : ईईआ बेटावरील अत्यंत सुंदर चेटकी. तिच्या प्रदेशाजवळ येणाऱ्या प्रत्येक माणसाचे ती पशूत रुपांतर करीत असे. ट्रॉयच्या युद्धाहून परतणाऱ्या युलिसिझची गलबते या बेटाच्या किनाऱ्याला लागल्यावर या बेटाची पाहणी करण्याकरिता पाठविलेल्या खलाशांच्या तुकडीतील सर्वांना तिने डुकरे केले आणि डुक्करवाड्यात ठेवले. युलिसिझने हा सर्व प्रकार पाहिला. या सर्वांची सुटका करण्याचा उपाय हर्मिसने युलिसिसला सांगितला. त्याने एक वनस्पती (मॉली) त्याला दिली त्यामुळे सिर्सीच्या जादूचा त्याच्यावर काही परिणाम होणार नव्हता. तिचा उपयोग झाला; परंतु सिर्सी युलिसीसच्या प्रेमात पडली आणि युलिसीस एक वर्ष तिच्याजवळ राहिला. राजा टेलेगॉनस लॅटिनस हा त्यांचा मुलगा अशी ही कथा आहे. सिर्सीनेच युलिसिसला पाताल लोकात प्रवेश करण्याचा उपाय सांगितला.

ग्लॉकसचे सीलावर प्रेम होते. परंतु तो अर्धमानव अर्ध मीन होता आणि ती भयाने त्याच्यापासून पळून गेली. म्हणून मदतीकरिता तो सिर्सीकडे गेला. परंतु तीच त्याच्या प्रेमात पडली. परंतु त्याचे प्रेम अढळ होते म्हणून तिने त्याला एक औषधी द्रव्य तिच्या स्नानाच्या पाण्यात टाकण्याकरिता दिले. त्याच्या प्रभावाने सीला कराल राक्षसी झाली.

## सायक्लोप्स (Cyclops)

प्रारंभी पृथ्वी मातेला केऑस पासून ती झोपली असता युरॅनस हा पुत्र झाला. पर्वत शिखरावरून तिच्याकडे अनुरागाने पहात असता त्याने तिच्या गुप्त

गव्हरांवर बीजाचा वर्षाव केला आणि तिने गवत, फुले, झाडे व अनुरुप पशु व पक्षी यांना जन्म दिला. याच वर्षावामुळे नद्या वाहू लागल्या व त्यांनी खोल जागा पाण्याने भरून टाकल्या. अशा तऱ्हेने सरोवरे व सागर निर्माण झाले.

नंतर तिने शंभर हात असलेल्या ब्रायरिअस, गायजीस आणि कॉटस या राक्षसांना नंतर अर्धमानव एकाक्ष महाकाय राक्षस सायक्लोप्स यांना जन्म दिला. ते तीन होते. ब्रॉन्टिस, स्टिरोप्स आणि आर्गिस. ते आद्य लोहार व बांधकाम कारागीर होते. युलिसीझची सिसिलीमधे यांच्याच पुत्राशी गाठ पडली होती. एटनाच्या तळाशी ते व्हल्कनचे कारागीर म्हणून काम करीत असत.

## चंडिका (Furries)

बंडखोर सायक्लोप्सना टार्टरसमधे फेकून दिल्यानंतर युरॅनसने पृथ्वीमातेच्या पोटी टायटनांना जन्म दिला. पृथ्वीने टायटनांना युरॅनसवर हल्ला करण्यास प्रवृत्त केले. सात टायटनपैकी क्रोनस हा सर्वात लहान होता. त्याने त्यांचे नेतृत्व केले. पृथ्वीमातेने त्याला गारगोटीपासून घडविलेला विळा शस्त्र म्हणून दिला. युरॅनस झोपलेला असताना त्यांनी त्याच्यावर हल्ला केला त्या विळयाने क्रोनसने त्याच्या लिंगावर घाव घातला व त्याला नपूंसक केले. डाव्या हाताने लिंग धरून युरॅनसने टायटनांना केप ड्रेपॅनमजवळ त्यांच्या विळयासहित समुद्रात फेकून दिले. परंतु त्या जखमेतून ठिबकणाऱ्या रक्ताचे थेंब पृथ्वीवर पडले आणि तिने तीन इनिनायसना– चंडिकांना–जन्म दिला. त्या पितृहत्येचे गुन्हे आणि वचनभंग यांचा सूड घेतात. त्यांची नांवे ॲलेक्टो, टायसिफॉनी, आणि मेगॅइरा अशी आहेत. त्या इरिबसमधे राहतात. त्या झ्यूस (ज्युपिटर) आणि इतर सर्व ऑलिम्पिअनांहून ज्येष्ठ आहेत. त्या जख्ख म्हाताऱ्या असून केसांऐवजी त्यांच्या डोक्यावर सर्प आहेत. त्यांची डोकी कुत्र्याची आहेत, शरीर कोळशासारखे काळे असते वटवाघुळाचे पंख असतात व डोळे रक्तासारखे लाल असतात. तरुणांचा वृद्धांविषयीचा उद्धटपणा, बालकांचा मातापित्यांविषयी अनादर, यजमानाचे अतिथीविषयी गैरवर्तन आणि नगरजनांचे वा नगरपित्याचे शरणागतांबाबतचे गैरवर्तन याना त्या शासन करतात. अपराध्याला त्या पाताललोकातूनही शोधून काढतात. त्यांच्या हाती पितळेची गदा असते व त्यांचे बळी हालहाल होऊन मरतात. त्यांचे नाव घेणेही अशुभ मानतात म्हणून त्यांचा उल्लेख 'युनिमाईड्स' 'दयाळु स्त्रिया' असा करतात.

## हार्पिज (Harpies)

सुंदर केस आणि गतिमान पंख असलेल्या या समुद्रपरी इलेक्ट्रा हिला थॉमसपासून झालेल्या मुली होत. एरिनीस् या चंडिकेनें शासन केलेल्या अपराध्यांना त्या हिरावून नेत असत. त्या एका क्रेटमधील गुहेत राहात असत.

## सर्ग १ ला

### १. गॅनिमीड

एक सुंदर ट्रोजन राजपुत्र, ट्रॉसचा मुलगा, ज्यूपिटरच्या गरुडाने झडप घालून त्याचे हरण करून त्याला स्वर्गाची राजधानी ऑलिम्पस येथे नेले. तो ज्युपिटरचे मद्याचे प्याले भरीत असे. त्याच्या पूर्वी जूनोची कन्या हेबी हे काम करीत असे. हर्क्युलीझशी तिचा स्वर्गात विवाह झाल्यानंतर गॅनिमीडला त्या कामासाठी आणण्यात आले.

### २. अजॅक्स

हा ट्रोजन युद्धातील शूर ग्रीक सेनानी होता. ग्रीकांनी ट्रॉयचा नाश केला त्यावेळी प्रायमची कन्या कॅसांड्रा अॅथीनाच्या (मिनर्व्हा) मंदिरात देवतेच्या मूर्तीला मिठी मारून त्या देवतेच्या आश्रयाने बसली होती. ग्रीकांनी तिच्यावर हात टाकला व या अजॅक्सने तिला वेदीवरून फरफटत ओढीत बाहेर आणले. मंदिरात घडलेल्या या महापातकाचा एकाही ग्रीकाने निषेध केला नाही. संतप्त मिनर्व्हा नेपच्यूनकडे गेली व तिने सूडाची प्रतिज्ञा केली.

### ३. ट्रायटन

ट्रायटन हा पॉसायडोन आणि अॅम्फिट्राईट यांचा पुत्र होता. हा समुद्राचा तुतारी–वादक होता. पॉसायडोनच्या आज्ञेने समुद्राच्या खवळलेल्या लाटा शांत करण्यासाठी तो तुतारी वाजवी.

## सर्ग २ रा

### १. अँड्रोमॅकी

. ट्रोजन योद्धा, राजा प्रायमचा पुत्र हेक्टर याची पत्नी. हेक्टरला ट्रोजन युद्धात वीरगती प्राप्त झाल्यावर ती ग्रीकांची बंदीवान झाली. ट्रॉयच्या पतनानंतर प्रायमची राणी हेक्यूबा आणि अॅन्ड्रोमॅकी एवढ्याच उरल्या होत्या, आणि अॅन्ड्रो-

मॅकीचा पुत्र बाल ॲस्टिनॅक्स. तो लहान असल्यामुळे ग्रीक त्याला अपाय करणार नाहीत असे तिला वाटले. परंतु ग्रीकांनी त्यालाही ट्रॉयच्या नगरभिंतीवरून फेकून दिले. ग्रीक सेनानी ॲकिलीज याचा पुत्र निओटॉलेमस याच्या ताब्यात ती गेली, त्याने तिला एपिरसमध्ये नेले. नंतर तिने हेक्टरचा भाऊ हेलेनस याच्याशी लग्न केले.

## २. गॉर्‌गॉन्स

तीन भयंकर कुमारींचे समायिक नांव. स्थिनो, युरिएल, व मेड्सा. त्या फॉसिस व सेटो यांच्या कन्या होत्या म्हणून त्यांना फॉसिड्ज असेही म्हणत. नंतरच्या कथात त्या लिबियात होत्या असे म्हटले आहे. त्यांच्या मस्तकावर फुत्कार टाकणारे सर्प होते. त्यांना पंख होते. त्यांच्या नख्या धातूच्या होत्या व दात भयंकर होते. तिघींपैकी मेडुसा ही मर्त्य होती. स्थिनो, युरिएल अमर होत्या. मेडुसा प्रथम एक सुंदर कुमारी होती. पॉसायडोनशी शरीरसंबंध होऊन क्रायसेऑर व पेगॅसस या दोन पुत्रांना तिने अथीनाच्या मंदिरात जन्म दिला; म्हणून अथीनाने तिचे भयंकर राक्षसीत रूपांतर केले. ती इतकी भयंकर दिसू लागली की जो कोणी तिच्याकडे पाहील तो शिला होई. पर्सिअसने युक्तीने ढालीतील तिच्या प्रतिबिंबाकडे पाहून तिला ठार केले. अथॉनाने नंतर तिचे शिर आपल्या ढालीच्या मध्यावर बसविले.

## ३. हेलेन

ट्रॉयच्या सर्वनाशाचे मूळ हेलेन. ही ज्युपिटर आणि लेडाची कन्या होती. तिचा तथाकथित पिता राजा टिन्डॅरस व बंधू कॅस्टर आणि पोलक्स होते. परंतु ट्रॉयच्या सर्वनाशाची बीजे राजा प्रायमचा पुत्र पॅरिस याच्या दुबळेपणात आहेत. त्याच्यामुळे ट्रॉयचा सर्वनाश होणार आहे अशी पूर्वसूचना मिळाली होती म्हणून प्रायमने त्याला दूर मेन्ढरे राखण्याकरितां ठेवले होते.

कलह देवता एरिस ही अर्थातच ऑलिम्पसवर अप्रिय होती. कुठल्याही समारंभाला तिला निमंत्रण नसे याची तिला स्वाभाविकच भयंकर चीड होती. राजा पिलिअस आणि समुद्रकन्या थेटिस यांच्या विवाहाला तिला निमंत्रण नव्हते. तिने कलागत लावण्याकरिता मेंजवानीच्या प्रसंगी एक सुवर्णाचे सफरचंद टाकले. त्यावर लिहिले होते 'सर्वं श्रेष्ठ लावण्यवतीला.' सर्वच स्त्रियांना ते हवे होते

परंतु शेवटी जूनो मिनर्व्हा आणि व्हीनस यांच्यातूनच निवड करायची होती. ज्युपिटरला निवड करण्याची विनंती करण्यांत आली परंतु त्याने धूर्तपणे अंग काढून घेतले. त्याने त्यांना निर्णयाकरिता इडापर्वताकडे जावयास सांगितले, पॅरिस तिथेच आपल्या वडिलांची मेंढरे राखीत होता. या तिन्ही देवता त्याच्या-कडे निर्णयाकरिता गेल्या. सौंदर्यातले त्याला चांगलेच गम्य होते. परंतु त्याने निर्णय घ्यायचा होता तो त्यांच्याकडे पाहून न घेता, त्यांनी दाखविलेल्या प्रलो-भनांचा विचार करून घ्यायचा होता. जुनोने त्याला युरोप आणि आशियाचे साम्राज्य देऊ केले, अर्थानाने तो ग्रीकांच्याविरूद्ध यशस्वी युद्ध करून ग्रीकांना नामशेष करील असे सांगितले. व्हीनसने त्याला वचन दिले की ती त्याला जगातील सर्वश्रेष्ठ सौंदर्यवती प्राप्त करून देईल. ते सुवर्णाचे सफरचंद पॅरिसने व्हीनसला दिले.

त्याच सुमारास राजा पिलिअसने लावण्यवती हेलेनचे स्वयंवर मांडले होते. असंख्य राजपुत्र हेलेनच्या अभिलाषने आले होते. आणि त्यांच्यात संघर्ष होऊ नये आणि कन्येचा विवाह निर्वेधपणे पार पडावा म्हणून राजाने प्रत्येक राजपुत्राकडून वचन घेतले की हेलेन ज्याला वरील त्याला इतर सर्वांनी संरक्षण दिले पाहिजे व त्यांच्या विवाहाचे पावित्र्य राखले पाहिजे. हेलेन आपल्यालाच वरणार असे प्रत्येकालाच वाटत असल्यामुळे त्यांनी त्याला संमती दिली; हेलेनचा विवाह अॅगेमेम्नॉनचा भाऊ मेनेलॉसशी झाला.

व्हीनस याच लावण्यवतीकडे पॅरिसला घेऊन गेली. मेनेलॉसने त्याचे आदरा-तिथ्य केले. परंतु मेनेलॉसला काही कामाकरिता क्रेटला जावे लागले. पॅरिसवर पूर्ण विश्वास टाकून तो निघून गेला आणि हेलेनला घेऊन पॅरिस ट्रॉयला आला.

अशातऱ्हेने हेलेनच्या विवाहाच्यावेळी केलेल्या कराराचा भंग झाला व मेनेलॉस ग्रीकांचे व इतर राजपुत्रांचे सहाय्य घेऊन ट्रॉयवर चाल करून गेला.

## ४. मेनेलॉस

मेनेलॉस हा अॅगेमेम्नॉनचा भाऊ होता. डिन्डॅरस हा हेलेनच्या मातेचा लेडाचा पती होता. हेलेनच्या स्वयंवरात त्याने मेनेलॉसची हेलेनचा वर म्हणून निवड केली. पॅरिसने सुवर्ण सफरचंद व्हीनसला (अॅफ्रॉडाईटी) दिले तेव्हा तिने

त्याला जगातील सर्वांत सुंदर युवती त्याला देण्याचे वचन दिले होते. ही युवती म्हणजे हेलन हे व्हीनसला माहीत होते. पुढे पॅरिस मेनेलॉसकडे पाहुणा म्हणून गेला व त्याच्या अनुपस्थितीत हेलनला त्याने पळवून आणले. यातूनच ट्रोजन युद्ध व ट्रॉयचा सर्व नाश ओढवला. या सर्वनाशातून व्हीनसने इनीआसला वाचविले तसेच हेलनलाही वाचविले व तिला मेनिलेअसच्या स्वाधीन केले.

## सर्ग ३ रा

### १. कॅसॅन्ड्रा

ट्रॉयचा राजा प्रायमची एक कन्या. अपोलोचे तिच्यावर प्रेम होते आणि त्यानेच तिला भविष्यज्ञान दिले होते. पुढे तिने त्याच्या प्रेमाला नकार दिल्यावर तो संतापला. तो तिला प्राप्त झालेले भविष्यज्ञान नष्ट करू शकत नव्हता परंतु तिच्या भविष्य भाषितावर कोणी विश्वास ठेवणार नाही असा त्याने तिला शाप दिला. प्रत्येक वेळी तिने ट्रोजनांना काय घडणार आहे याची पूर्व सूचना दिली परंतु तिचे कुणी मानले नाही. अॅगॅमेम्नॉनने पीझाचा राजा टॅन्टॅलसबरोबर युद्ध करून त्याचा वध केला व त्याची राणी क्लायटेमनेस्ट्राशी बळजबरीने विवाह केला. त्याने तिची कन्याही बळी दिली होती. त्यामुळे तिला त्याच्याविषयी घृणा होती. अॅगॅमेम्नॉनपासून तिला ऑरिस्टिस हा पुत्र व इलेक्ट्रा, लॅओडाईस व इफिजिनिआ किंवा इफिअॅनासा या तीन मुली झाल्या. पुढे अॅगॅमेम्नॉन ट्रॉयच्या युद्धावर दहा वर्षे गेला. त्यावेळी त्याच्याशी वैर असलेल्या एजिस्थसने क्लायटिमनेस्ट्राशी प्रेम संबंध प्रस्थापित केला. आणि अॅगॅमेम्नॉनच्या आगमनानंतर त्याचा वध करण्याची योजना आखली. कालांतराने अॅगॅमेम्नॉन प्रायमकन्या कॅसॅन्ड्रा हिला प्रेयसी म्हणून बरोबर घेऊन आला. क्लायटेमनेस्ट्राने छद्मीपणे त्याचे स्वागत केले व तो स्नान करीत असता स्वतःच्या हाताने त्याला ठार केले व कॅसॉन्ड्रालाही ठार मारले.

### २. फिनिअस

आर्गोनॉट्स सुवर्ण लोकरीच्या शोधात समुद्रपर्यटन करीत असता हार्पीजच्या देशाला आले. तिथे त्याना फिनिअस भेटला, अॅपोलोने त्याला भविष्यज्ञान दिले होते. आणि त्याचे भविष्यकथन अचूक असे. ज्युपिटरला हा प्रकार रूचला नाही

कारण तो काय करणार आहे हे माणसांना अज्ञात असणे हितावह होते. म्हणून ज्युपिटरने फिनिअसला भयंकर शिक्षा केली. तो अन्न भक्षण करू लागला की हार्पी येत आणि त्याचे अन्न दुर्गन्धीने भ्रष्ट करीत. आर्गोनॉट्स आले तेव्हा अन्नावाचून तो अत्यंत कृश झाला होता. त्याने त्यांचे स्वागत केले आणि त्याला वाचविण्याची विनंती केली. बोरिसच्या दोन पुत्रांनी हार्पींचा पाठलाग केला व ते त्याना मारणार इतक्यात आयरिसने हार्पीज फिनिअसला पुन: त्रास देणार नाहीत असे वचन दिले,

## सर्ग ४ था

### १. कोइअस (COEUS)

सर्व जीव-वस्तुमात्रांची देवता युरिनोम हिने सहा ग्रहांच्या मातृपितृ देवता निर्माण केल्या. ते टायटन होते. मेटिस (फीबी) आणि कोइअस हे मंगळाचे माता-पिता होते. लेटोना (लेटो) ही त्यांची कन्या. (झ्यूस) ज्युपिटरचे तिच्यावर प्रेम होते. परंतु प्रसुतीसमयी त्याने त्याची पत्नी हीरा हिच्या भयाने लेटोचा त्याग केला. त्याच भयाने तिला कुणीच आसरा देईना म्हणून भटकत भटकत डेलॉस नावाच्या पाण्यावर तरंगणाऱ्या भूमीला आली. त्या बेटाने तिचे स्वागत केले, तिथे तिने आर्टिमीझ (डायना) या कन्येला व अ‍ॅपोलो या पुत्राला जन्म दिला. हर्क्युलीझने भविष्यविद्या कोइअसपासून मिळविली असे मानले जाते.

### २. एन्सेलॅडस (Enceladus)

ज्युपिटरने (झ्यूस) टायटनना टार्टरसमधे बंदीवान केले म्हणून संतापलेल्या राक्षसबंधूंनी देवांविरूद्ध बंड पुकारले व ऑलिम्पसवर गुप्त हल्ला करण्याची योजना आखली. हे राक्षस पृथ्वीपुत्र होते व त्यांचा जन्म थ्रेशिअन फ्लेग्रा येथे झाला होता. ते संख्येने चोवीस होते. या युद्धात हर्क्युलीझच्या सहाय्यानेच केवळ देव वाचले होते. देवांनी एकेक राक्षसाला जखमी केले व हर्क्यूलीझने त्यांचा वध केला. या प्रकाराने नाउमेद होऊन उरलेले राक्षस पृथ्वीकडे पळाले. देवांनी पाठलाग केला. अ‍ॅथीनीने एक विक्राळ अस्त्र एन्सेलॅडसवर फेकले. त्याने तो राक्षस भुईसपाट झाला व त्याचे सिसिली बेट झाले.

## सर्ग ५ वा

### १. पॅन्डॅरस

ट्रॉयच्या युद्धातून ऑकिलिजने आणि त्याच्या मिर्यिडॉन्सनी अंग काढून घेतले असे कळताच ट्रोजनांनी जोरदार हल्ला चढविला. घाबरून ॲगमेम्नॉनने शस्त्रसंधी केला, या संधीप्रमाणे पॅरिस आणि मेनेलॉस यानी द्वंद्व करून हेलेनच्या मालकीचा निकाल लावायचा होता. द्वंद्व अनिर्णित राहिले कारण पॅरिसचा पराभव होण्याचा रंग दिसताच व्हीनस त्याला धुक्याच्या आवरणात लपेटून घेऊन गेली. जूनोने ॲथीनीला पाठवून लायकाऊनचा पुत्र पॅन्डॅरसकडून तह भंग करविला. त्याने मेनिलेअसवर एक बाण सोडला. जूनोने डायोमिडला पॅन्डॅरसचा वध करण्यास प्रवृत्त केले. आणि ईनिआसला आणि व्हीनसलाही त्याने जखमी केले.

## सर्ग ६ वा

### १. डिडॅलस (Daedalus)
### आयकॅरस (Icarus)

डिडॅलस हा एक श्रेष्ठ शिल्पी होता. त्याने मिनोटॉरकरिता क्रेटमधे भुल–भुल्लैया बांधला. थिसियस त्यातून कसा सुटू शकेल हे त्याने ॲरिॲड्नीला दाखविले. ॲथीनिअनांना बाहेर पडण्याचा मार्ग सापडला. तो डिडॅलसच्या सहाय्याशिवाय नसावा असे मानून राजा मिनॉसने डिडॅलसला व त्याचा पुत्र आयकॅरस यांना तुरूंगात टाकले. त्याने दोन पंखांचे जोड केले. ते पंख लावून पितापुत्रांनी उड्डाण केले. डिडॅलसने आयकॅरसला समुद्रावरून मध्यम उंचीवरून भ्रमण करावयास सांगितले. कारण फार उंच गेल्यास सूर्याच्या उष्णतेने मेण वितळून पंख गळून पडलें असते. क्रेटवरून ते सहज विनाप्रयास निघून गेले. परंतु या नव्या अनुभवाची नशा पुत्राच्या डोक्याला भिडली. तो उच उंच उडाला, व उष्णतेने पंख गळून पडले व तो समुद्रात पडून बुडाला. पिता पुढे सिसिलीला गेला. तेथील राजाने त्याचे स्वागत केले. त्याच्या सुटकेने संतापलेल्या मिनॉसने त्याला पकडून आणण्याकरिता योजना आखली. परंतु त्या प्रयत्नात मिनॉसच मारला गेला.

### २ पॅसिफी

पॉसायडनने मिनॉसला एक देखणा उमदा बैल भेट दिला. मिनॉसने तो पॉसायडनला बळी द्यायचा होता. परंतु मिनॉस इतक्या उमद्या पशूला बळी देऊ

शकला नाही. मिनॉसला याबद्दल शिक्षा करण्याकरिता पॉसायडनने मिनॉसची पत्नी पॅसिफीच्या मनात त्या बैलाविषयी विकृत वासना निर्माण केली. त्या बैलाबरोबर केलेल्या समगमातून पॅसिफीला मिनॉटॉर-नावाचा माणसाचे शिर व बैलाचे धड असलेला राक्षस झाला. पॅसिफी ही हेलिऑसची (सूर्यदेव) कन्या होती.

## ३. ऑर्फिअस (ORPHEUS)

देव हेच आद्य संगीतकार होते. त्यांच्यानंतर काही मानवांमधील श्रेष्ठ संगीतकार या कलेत देवांशीही बरोबरी करणारे होते. थ्रेस देशातील ऑर्फिअस हा असाच श्रेष्ठ संगीतकार होता. त्याची आई अमर कलादेवता ( Muse ) होती, पिता थ्रेसमधील एक राजपुत्र होता. संगीतामधे त्याला अॅपोलोशिवाय दुसरा प्रतिस्पर्धी नव्हता. तो गाऊ लागला किंवा वाद्य वाजवू लागला म्हणजे सर्व चराचर सृष्टी त्याच्या मागून जात असे. नद्या आपला प्रवाह बदलत असत. त्याचा युरिडाईसीबरोबर विवाह झाला परंतु लगेचच सर्पदंशाने तिचा मृत्यू झाला. तिला पाताललोकातून परत आणण्याकरिता तो तेथे गेला. त्याच्या संगीताच्या मोहिनीने प्लुटोने त्याची ही मागणीही मान्य केली परंतु एका अटीवर. पाताल विवरातून पूर्णपणे बाहेर पडेपर्यन्त त्याने त्याच्या मागून जाणाऱ्या युरिडाईसीकडे पाहावयाचे नाही. विवराच्या तोंडाशी प्रकाश दिसून तो बाहेर पडल्याबरोबर त्याने मागे वळून पाहिले. ती अजून आतच होती. बाहू पसरून तो तिच्याकडे गेला परंतु ती परत खाली गेली. त्याला पातालात पुनः प्रवेश मिळाला नाही. आणि उर्वरित आयुष्य त्याने वनामधून पर्वतराजीतून भटकण्यात, संगीतात घालविले. पुढे मिनॅड या भयंकर राक्षसींनी त्याचे अवयव तोडून हिब्रस नदीत त्याचे शिर फेकून दिले. कला देवतांनी ऑलिम्पस पर्वताच्या पायथ्याशी त्याची समाधी बांधली.

## ४. पॉलक्स

पॉलक्स आणि कॅस्टर हे स्पार्टाचा राजा टिन्डॅरसची पत्नी लेडाचे पुत्र. तिला पतीपासून कॅस्टर आणि क्लायटेम्नेस्ट्रा ही दोन मर्त्य मुले झाली. आणि हंसाच्या रुपाने तिला भेटलेल्या ज्युपिटरपासून पॉलक्स आणि हेलेन ही दोन अमर मुले झाली. परंतु कॅस्टर आणि पॉलक्स या दोघांनाही ज्युपिटरचे पुत्र मानले जात असे. थिसअसने हेलिनाला पळवून नेले असता त्यांनी तिला सोडवून आणले. हे दोघे इडास आणि लिन्सिअस यांच्याकडे गेले. काही कारणावरून चिडून इडासने कॅस्टरला ठार केले आणि पॉलक्सने लिन्सिअसला ठार केले, आणि ज्युपिटरने

इडासला वज्राने ठार मारले. आपल्या भावाच्या दुःखाने पॉलक्सने ज्युपिटरची प्रार्थना करून स्वतःलाही मृत्यू मागितला. म्हणून ज्युपिटरने कॅस्टरला पॉलक्सच्या जीवनांत सहभागी होण्यास परवानगी दिली. तेव्हापासून ते हेडीझमध्ये आळी-पाळीने राहत असत.

## ५. थिसिअस (THESEUS)

थिसिअस हा अँथेन्सचा वीरपुरुष राजा इजिअसचा पुत्र होता. त्याच्या जन्मापूर्वीच इजिअस अँथेन्सला गेला व त्याच्या आईने त्याचे पालन केले. तिला होणारे अपत्य मुलगा असेल तर त्याने प्रचंड शिलेखाली ठेवलेले त्याचे खड्ग व चढाव त्याच्या पुत्राने ती प्रचंड शिला उचलून घेऊन त्याच्याकडे अँथेन्सला यावे असा संकेत ठरला. यथावकाश थिसिअस मोठा व बलवान झाला व भूमार्गाने अनेक साहसे करीत अँथेन्सला पोहोचला परंतु त्याच्या पराक्रमाची कीर्ती त्यापूर्वीच इजिअसच्या कानावर गेली होती. परंतु थिसिअस आपला पुत्र आहे हे त्याला माहीत नव्हते. कॉरिन्थहून आलेल्या मिडीआला हे माहीत होते. राजाच्या अज्ञा-नाचा फायदा घेऊन थिसिअसला पेयातून विषप्रयोग करण्याचे तिने व राजान योजिले. परंतु पेय घेण्यापूर्वीच थिसिअसने आपले खड्ग उपसले व राजान त्याला आपला पुत्र म्हणून ओळखले. मिडीआ पुनः पळून गेली.

क्रेटचा राजा मिनॉस याचा पुत्र इजिआसकडे अतिथी म्हणून आला असता इजिअसने त्याला एका संकटमय मोहिमेवर पाठविले. त्यात त्याचा मृत्यू घडला म्हणून मिनॉसने अँथन्सवर स्वारी केली व त्याचा पराभव केला. कराराप्रमाणे अथेन्समधून दरवर्षी सात युवती व सात युवक मिनॉसला मिनेटॉरचे भक्ष्य म्हणून पाठविण्याचे ठरले. दुसऱ्या वर्षी थिसिअसने स्वतः जाण्याचे ठरविले. इजिअसला त्याने आपली साहसी योजना सांगितली व तो यशस्वी होऊन परत आला तर त्याच्या गलबताला पांढरे शीड लावून तो परतेल असा संकेत ठरला.

मिनॉसची कन्या ॲरिॲड्नी हिचे त्याच्यावर प्रेम बसले व डिडॅलसच्या सहाय्याने तिने थिसिअसला मिनेटॉरचा वध करून त्या भूलभूलैयातून बाहेर पडण्याचे रहस्य सांगितले. मिनेटॉर हा मिनॉसची राणी पॅसिफी हिचा वृषभापासून झालेला मानवाचे मस्तक व वृषभाचा देह असलेला राक्षस होता. थिसिअसने त्याचा वध केला व ठरल्याप्रमाणे ॲरिॲड्नीला घेऊन तो इतर ॲथेनिअन युवक युवतींबरोबर ॲथेन्सला निघाला. परंतु नॅक्सॉस येथे ॲरिॲड्नीची आणि त्याची काही कारणाने ताटातूट झाली ती कायमचीच.

परतताना यशस्वी झाल्याच्या आनंदात तो पांढरे शीड लावायला विसरला व आपल्या पुत्राची उत्कंठेने वाट पाहणाऱ्या इजिअसने तो मृत्यू पावला असे समजून समुद्रात उडी घेतली. थिसिअस अथेन्सचा राजा झाला परंतु त्याने राजाचे सर्व अधिकार खाली ठेवले व लोकसत्ता प्रस्थापित केली.

मृतपराजितांचे यथोचित क्रियाकर्म करता यावे म्हणून त्याने थीब्जवर आपले सैन्य चाल करून नेले व मृतांचे दहन करून त्या नगरीला दुसरा कोणताही उपद्रव न देता तो परतला. वृद्ध इडिपसला त्याने आश्रय दिला. वेडा झालेल्या हर्क्युलीजला त्याने ताळ्यावर आणले व आत्महत्येपासून वाचविले थिसिअसला साहसाची आसक्ती होती. तो ॲमेझॉनांच्या देशात गेला व हिपॉलिटा हिला घेऊन आला. तिला पुढे पुत्र झाला तो हिपॉलिटस. त्याच्या जन्मानंतर ॲमेझॉननी अथेन्सवर स्वारी केली व त्या हिपॉलिटाला घेऊन गेल्या. अशा साहसप्रेमातूनच त्याचा कॅलिडॉनचा राजा पिरिथॉस याच्याशी स्नेह जमला. पिरिथॉसही साहसप्रेमी होता परंतु तो थिसिअसइतका सुदैवी नव्हता आणि थिसिअसने त्याला अनेक संकटातून वाचविले. पिरिथॉसच्या विवाहात त्याने अत्याचारी सेन्टॉर्सना पिटाळून लावले. पिरिथॉसची ती पत्नी लवकरच वारली व त्याने आता जगातील सर्वात कडेकोट बंदोबस्तात असलेल्या पाताललोकांच्या राज्ञीला, प्रॉझर्पाईनला पळवून आणण्याचा बेत केला. आणि या साहसात थिसिअसने त्याला सहाय्य करण्याचे मान्य केले. परंतु त्यापूर्वी त्याने स्वत: बाल हेलेनला पळवून आणण्याचे ठरविले. ती मोठी झाल्यावर तो तिच्याशी विवाह करणार होता. त्याप्रमाणे त्याने तिला पळवून आणले आणि हे दोघे मित्र प्रॉझर्पाईनला पळवून आणण्याकरिता पाताललोकात गेले. हेडीझला त्यांचा येण्याचा हेतू उमगला व त्याने त्यांचे स्वागत केले व त्यांना विस्मरणाच्या आसनावर बसविले; ते तिथेच चिकटून बसले. पुढे हर्क्युलीज आपल्या कामाकरिता आला तेव्हा त्याने थिसिअसला तिथून उचलले परंतु पिरिथॉसला तो वाचवू शकला नाही.

थिसिअसने पुढे ॲरिॲड्नीची बहीण फीड्रा हिच्याशी विवाह केला व या विवाहातून पुढे तिच्या कामवासनेमुळे हिपॉलिटसचा अंत झाला. तिने स्वत: आत्महत्या केली. कालांतराने राजा लायसोमिडीजने त्याचा वध केला

## ६. हिपॉलिटस : फिद्रा : थिसिअस

हिपॉलिटस हा थिसिअस आणि अमेझॉनची राणी हिपॉलिटा यांचा पुत्र. पुढे थिसिअसने उतारवयात फीड्राशी विवाह केला. हिपॉलिटसला लहानपणापासूनच दक्षिणेतील एका दूरच्या नगरात ठेवले होते. त्याच्या मनात सुखासीनता, ऐषाराम

आणि स्त्री संबंधाविषयी अप्रीती होती. तो व्हीनसचा उपहास व डायनाची आराधना करीत असे. थिसिअस फिद्राला घेऊन आपल्या नगरीत परत आला तेव्हा पितापुत्रात फार प्रेम निर्माण झाले. आपल्या सावत्र आईकडे हिपॉलिटसचे कधीच लक्ष गेले नाही. परंतु तिच्या मनात मात्र त्याच्याविषयी वासना निर्माण झाली. परतु तिची कामना पूर्ण होण्याचा कोणताच मार्ग तिला दिसेना. तिचा पती घरात नव्हता. तिच्या म्हाताऱ्या दाईने तिला सर्वतोपरी सहाय्य करण्याचे मान्य केले. तिने हिपॉलिटसला सर्व स्पष्ट सांगितले. त्याला अत्यंत घृणा वाटली आणि तो घरातून बाहेर पडला. अंगणात फीद्रा बसली होती तिला ताडताड बोलून त्याने वडील घरात असल्याशिवाय घरात पाऊल टाकणार नाही असे सांगून घर सोडले. कामांध झालेल्या फिद्राने स्वतःचा घात करून घेतला परंतु हिपॉलिटसने आपल्यावर अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न केला म्हणून आपण आत्मघात केला असे पत्र तिच्या हातात होते. हिपॉलिटस आपले निरपराधित्व सिद्ध करू शकत नव्हता. थिसिअसचा त्याच्यावर विश्वास बसेना. त्याने त्याला घरातून हाकलून दिले. तो घरातून बाहेर पडला परंतु मृत्यू त्याची वाट पहात होता. समुद्र किनाऱ्यावरून रथ हाकीत असता समुद्रातून एक बैलरूपी राक्षस बाहेर आला. घोडे बुजले, रथ उलटून फुटला आणि हिपॉलिटस गंभीररित्या जखमी झाला. डायनाने सर्व सत्य थिसिअसला सांगितले. जखमी हिपॉलिटसला घरी आणले. पिता पुत्रातील गैरसमज दूर झाला परंतु हिपॉलिटस मेला आणि थिसिअस शोक सागरात बुडाला.

(काही कथांप्रमाणे डायनाने त्याला पुनः जिवंत केले )

## ७. प्रोक्रिस

प्रोक्रिसचा सेफॅलसशी विवाह झाला होता. त्याच्या विवाहानंतर थोड्याच काळात ऑरोराने त्याला पळवून नेले. कारण तो शिकारी होता आणि रोज सकाळी मृगया करताना ऑरोरा त्याला पहात असे, आणि तिचे त्याच्यावर प्रेम बसले. परंतु सेफॅलसचे प्रोक्रिसवर आत्यंतिक प्रेम होते त्यामुळे ऑरोरा पराभूत झाली आणि तिने त्याला त्याच्या पत्नीकडे जाऊ दिले परंतु जाताना ती त्याला म्हणाली ' तू जितका एकनिष्ठ आहेस तितकी तुझी बायको एकनिष्ठ आहे का पहा. ' प्रोक्रिस सुंदर होती आणि तो फार काळ दूर होता म्हणून त्याच्या मनात तिच्याविषयी संशय आला. तिची परीक्षा पाहण्याकरिता वेषांतर करून तो गेला.

तिला पाहताच तिच्या निष्ठेविषयी त्याची खात्री पटली परंतु ऑरोराचे शब्द त्याला आठवले. त्याने प्रोक्रिसचे प्रियाराधन सुरू केले. तिचे एकच उत्तर होते. " मी सेफॅलसची आहे तो कुठेही असला तरी माझे प्रेम त्याच्यावरच आहे. परंतु एक दिवस तिचा नकार थोडा क्षीण वाटला म्हणून प्रकट होऊन त्याने तिची निर्भर्त्सना केली. ती काही न बोलता बाहेर पडून निघून गेली. तिला पुरूष जाती विषयीच तिरस्कार वाटू लागला. त्याला ती गेल्यावर पश्चाताप झाला आणि त्याने तिला शोधून काढले, तिची याचना केली. कालांतराने तिने त्याला क्षमा केली. आणि नंतर काही काल ते एकत्र राहिले. ते रोज मृगयेला जात असत. वनात ते मृगयेच्या शोधात अलग झाले. सेफॅलसला झुडपात हालचाल दिसली म्हणून त्याने प्रोक्रिसने दिलेला अचूक भाला फेकला त्याने तिच्या हृदयाचा भेद केला आणि ती मतप्राण होऊन पडली.

## ८. एरिफिल

इडिपसचा पुत्र पॉलिनिसिश याने थीव्ज्वर चालून जाण्याकरिता उठाव केला तेव्हा त्याला इतर सहा प्रमुख मिळाले. त्या पैकी आरगॉसचा राजा अॅड्रॅस्टस आणि दुसरा त्याचा मेहुणा अॅम्फिआरॉस होता. अॅम्फिऑरास अनिच्छेनेच युद्धावर गेला होता कारण तो भविष्यज्ञानी होता आणि अॅडॅस्टस शिवाय दुसरे कुणीही जिवंत परतणार नाही हे त्याला माहीत होते, परंतु तो आणि त्याचा मेहुण यांच्यात काही वाद झाला तर त्याने त्याची पत्नी आणि अॅड्रॅस्टसची बहीण एरिफिल हिचा निर्णय मानायचा अशी शपथ घेतली होती. पूर्वीच्या एका वादात तिने त्यांचा समेट घडविला होता. पॉलिनिसिसने एरिफिलला एक सुंदर रत्नहार दिला व तिचे मन आपल्या बाजूला वळवून घेतले होते. पुढे अॅड्रॅस्टस सोडून बाकीचे पाचजण युद्धात मारले गेले.

## ९. इव्हॅडनी (Euadne)

थीव्ज्वर जे सात चालून गेले त्यांच्यातील अॅड्रॅस्टस शिवाय सर्वांचा वध झाला. त्यांचे अंत्यकर्म करण्यास थीव्ज् राजा क्रेऑनने मनाई केली होती. अॅथेन्सचा राजा थिसिअस याला थीव्ज्शी युद्ध करून हे क्रियाकर्म करावे लागले. पॉलिनिसिसचे अंत्यकर्म त्याची बहीण अॅन्टिगनी हिने स्वतःच्या प्राणाचे मोल देऊन पार पाडले होते. उरलेल्या पाचांच्या चिता भडकल्यावर कॅपॅनिअसची पत्नी इव्हॅडनी हिने त्याच्या चितेत उडी घेतली आणि ती सती गेली.

## १०. टॅन्टलस

हा ज्युपिटरचा पुत्र होता. देवांमध्येंही त्याला मान असे. आणि त्यांच्या–बरोबर तो भोजन घेत असे आणि अमृतपानही करीत असे, त्याने देवांना एकदा आपल्या प्रासादात भोजनास बोलाविले. त्याला इतका गर्व झाला होता की त्यांच्या विषयीचा आपला तिरस्कार व्यक्त करण्याकरिता त्याने आपल्या एकुलत्या एक पुत्राचा पेलॉप्सचा वध करून त्याचे मांस शिजवून देवांना वाढले. हेतू हा की देव मनुष्यमांस भक्षक आहेत असा कलंक त्यांना लागावा. देवांना हा प्रकार कळला आणि त्यांनी त्याला अशी शिक्षा केली की पुनः कुणीही असे उद्दाम साहस करू नये. त्यांनी त्याला हेडीझमधे एका जलाशयात ठेवले, परंतु त्याने व्याकुळ होऊन पाणी पिण्याचा प्रयत्न केला तर सर्व पाणी आटून जात असे, भोवताली फळांनी लहडलेली झाडे होती. परंतु ती घेण्याचा प्रयत्न करताच वाऱ्याने फळे दूर जात. त्यामुळे तो सतत तहानेला आणि भुकेला तिष्ठत असे.

## ११. अॅलोइड्ज (ALOEIDS) अॅलोइअसचे पुत्र

ट्रायोप्सची कन्या इफिमिडीआ हिचे इफिऑल्टिझ व ओटस हे दोन अनौरस पुत्र होते. तिचे नेप्च्यूनवर (पॉसायडोन) प्रेम बसले. समुद्रकिनाऱ्यावर पडून ती ओंजळीने स्वतःच्या ओटीत समुद्रलाटांचे पाणी ओतीत असे. त्यातून तिला गर्भधारणा झाली. नंतर तिने अॅलोइअसशी विवाह केला म्हणून तिच्या पुत्रांना अॅलोइड्ज असे म्हणतात. प्रतिवर्षी ते एक वाव रुंद व एक पुरुष उंच वाढत असत. नवव्या वर्षी त्यानी ऑलिम्पसविरुद्ध युद्ध पुकारले. इफिऑल्टिझने हेराशी (जूनो) व ओटसने आर्टिमीझशी (डायना) संभोग करण्याची स्टीक्सच्या नांवाने अनिवार्य शपथ घेतली. अॅरीझला (मार्स) प्रथम कैद करून त्यांनी त्याला निशस्त्र केले त्याला बांधले व एका पितळच्या भांड्यात बंद करून आपल्या सावत्र आईच्या घरात ठेवले. पेलिअन पर्वतावर ओसापर्वत ठेवून त्यांनी ऑलिम्पसवर हल्ला केला. दुसऱ्या माणसाकडून किंवा देवाकडून त्यांचा मृत्यू नसल्यामुळे ते उन्मत्त झाले होते.

अॅपोलोच्या सल्ल्यावरून आर्टिमीझने त्यांना निरोप पाठविला की त्यांनी जर वेढा उठविला तर ती नॅकसस बेटावर ओटसशी शय्यासोबत करील. परंतु अशा तऱ्हेचा निरोप हेराकडून इफिऑल्टिझने आला नसल्यामुळे दोघात त्या बेटावर वाद झाला. आर्टिमीझ स्वतः एका कबूतराच्या रुपात तिथे उपस्थित होती.

दोघांनी दोन बरच्या घेतल्या व आपण दुसऱ्यापेक्षा अधिक श्रेष्ठ नेमबाज आहोत हे सिद्ध करण्याकरिता त्या कबूतरावर त्या फेकल्या परंतु ते त्या दोघांच्या मधेच उडत होते म्हणून त्या बरच्या त्यांच्याच शरीरातून आरपार गेल्या व दोघेही मृत होऊन पडले.

## १२. इक्झिऑन

फ्लेगायसचा पुत्र इक्झिऑन याने इओनिअसची कन्या डायाशी विवाह करण्याचे मान्य केले व इओनिअसला मेजवानीला बोलविले परंतु आपल्या प्रासादापुढे खड्डा खणून आत विस्तव पेटवून ठेवला व वरून तो खड्डा बंद केला. इओनिअस त्या खड्डयात पडून जळून गेला. हे कृत्य अत्यंत हीन आहे असे सर्व देवांना वाटले परंतु ज्युपिटरला तसे वाटले नाही. कारण आपल्या प्रणयप्रकरणात ज्युपिटरनेही असली कृत्ये केली होती म्हणून त्याने इक्सिऑनचे केवळ पापक्षालनच केले असे नव्हे तर त्याला आपल्या पंक्तीस भोजनास बसविले.

परंतु इक्सिऑन कृतघ्न होता. त्याने जूनोलाच भ्रष्ट करण्याचा बेत केला. त्याला वाटले अशा तऱ्हेने ज्युपिटरच्या बदफैलीपणाचा सूड घेण्याची संधी जूनो आनंदाने स्वीकारेल. परंतु ज्युपिटरला त्याच्या मनातील योजना कळली. त्याने मदिरेच्या नशेत बुडालेल्या इक्झिऑनकडे जूनोचे रुप दिलेली मेघाची चिंधोटी पाठविली व त्यांचा प्रणय चालू असता इक्झिऑनला पकडले. ज्युपिटरने त्याला हर्मिसच्या स्वाधीन केले व ' उपकारकर्त्यांचा मान राखावा ' असा जप करीपर्यंत त्याला निर्दयपणे फटके मारायला व नंतर त्याला जळत्या व सतत फिरत्या चाकावर जखडून टाकायला सांगितले.

खोटी मेघाची बनविलेल्या जूनोने–तिला पुढे नेफेली म्हणू लागले.–पुढे सेन्टॉरसला जन्म दिला. तो पुढे मोठा झाल्यावर त्याने मॅग्नेशिअन घोड्यांच्या पोटी सेन्टार्सना जन्म दिला.

# सर्ग ७ वा

## १. डॅनी (DANAE)

आरगॉसचा राजा ॲक्रिसिअस याचे एकुलते अपत्य कन्या डॅनी. पुत्रलाभाच्या आशेने कौल लावण्याकरिता तो डेल्फीला गेला. तेथील योगिनीने त्याला पुत्रलाभ

होणार नाही व त्याच्या कन्येच्या पोटी जन्मणारा पुत्र त्याचा वध करील असे सांगितले. कन्येचा वध करणे परमेश्वराच्या प्रकोपाच्या भयाने त्याला शक्य नव्हते म्हणून त्याने तिला जमिनीखाली पितळेच्या घरात बंदीवान केले. त्या घराचे छप्पर प्रकाश व हवेकरिता मोकळे ठेवले होते. रात्रंदिवस काहीच करण्यासारखे नसल्यामुळे ती सतत त्या झरोक्यातून आकाशाकडे पाहत राही. एकदा एक गूढ चमत्कार घडला. त्या झरोक्यातून सुवर्णाभिषेकाची वर्षा झडली आणि तिचा महाल सुवर्णाने भरून गेला. साक्षात ज्यूपिटरच सुवर्णाभिषेकाच्या व वर्षावाच्या रुपाने तिच्याकडे आला. हे कसे घडले हे कळले नाही, पण तिला झालेला पुत्र ज्युपिटरचाच आहे हे तिला उमगले. त्याचे आगमन फार काळ गुप्त राहिले नाही. त्याचे नाव पर्सिअस होते.

## पर्सिअस (Persius)

ज्या कारणाने ॲक्रिसिअस डॅनीला मारू शकला नाही, त्याच कारणामुळे तो तो पर्सिअसलाही मारू शकला नाही. त्याने एका मोठ्या पेटीत त्यांना ठेवले व ती समद्रात फेकून दिली. रात्र संपल्यानंतर सकाळी एका कोळयाला–डिक्टीसला – ती पेटी आढळली. त्याने ती उघडली व तो डॅनी आणि पर्सिअस यांना घरी घेऊन गेला. पॉलिडेक्टस हा त्या देशाचा राजा होता व डिक्टीसचा भाऊ होता. डॅनी अजूनही फारच सुंदर दिसे व त्याला ती हवी होती परंतु पर्सिअस नको होता. पर्सिअस आता तरुण झाला होता. म्हणून पर्सिअसचा काटा काढण्याकरिता त्याने पर्सिअसला गॉरगॉनाविषयी सांगितले व आपल्याला एका गॉरगॉनचे शिर आणलेले आवडेल असे सांगितले. पुढे पॉलिडेक्टसने आपण विवाहबद्ध होणार आहोत असे जाहीर केले व मित्रांना मेजवानीस बोलाविले. प्रत्येक निमंत्रिताने काही नजराणा आणण्याचा रिवाज होता. पर्सिअस गरीब होता म्हणून त्याने मेडुसाचे शिर त्याला नजर करण्याचे ठरविले. ती एक गॉरगॉन होती.

या साहसात हर्मिसने व ॲथीनाने त्याला सहाय्य केले. त्याने मेडूसापर्यन्त पोहोचण्याकरिता काय केले पाहिजे ते सांगितले. हर्मिसने आपले खड्ग व पंखाचे खडाव त्याला दिले. ॲथीनाने आपली ढाल त्याला दिली. मेडुसा गॉरगॉन या तीन बहिणी होत्या. मेडुसा मर्त्य होती. दुसऱ्या दोघी अमर होत्या. परंतु त्या तिघीत मिळून एकच डोळा होता. त्यांच्याकडे पाहणारा माणूस तात्काल शिला होऊन पडत असे म्हणून त्या बहिणी आपला डोळा एकमेकात देत असताना म्हणजे

त्या अंध असताना पर्सिअसने त्या ढालीत त्याचे प्रतिबींब पाहून खड्गाने एकीचे मेडुसाचे डोके कापायचे असे ठरले. त्याप्रमाणे पर्सिअसने केले व थैलीत ते शिर टाकून त्याने र्हमिसच्या पंख असलेल्या खडावाच्या सहाय्याने उड्डाण केले.

त्याच्या परतीच्या मार्गावर त्याला समुद्र किनाऱ्यावर ॲण्ड्रोमेडा ही युवती भयंकर सागर सर्पाचे भक्ष्य होण्याकरिता जखडून टाकलेली आढळली. त्याने त्या सर्पाचा वध केला व ॲण्ड्रोमेडाला घेऊन तो आपल्या देशी आला. त्या कोळयाची बायको वारली होती व पॉलिडेक्टसच्या भयाने डॅनी आणि डिक्टीस यांनी एका मंदिरात आश्रय घेतला होता. पर्सिअस सरळ राजवाडयात गेला व त्याने ते गॉरगॉनचे मस्तक पॉलिडेक्टस व त्याच्या लाचार दरबारी माणसाना दाखविले. ते तात्काल दगड होऊन पडले. पर्सिअसने डिक्टीसला राजा केले व आपल्या आईला व ॲण्ड्रोमेडाला घेऊन तो ग्रीसमध्ये ऑरगॉसला गेला. ॲक्रिसिअस लॅरिसाच्या राजाकडे गेला होता. तिथे पर्सिअसने स्पर्धेत फेकलेली थाळी चुकून ॲक्रिसिअसला लागली व तो मारला गेला. अशा तऱ्हेने अॅपोलोचे भाकित खरे ठरले.

## २. जेनस

जेनस हा 'शुभारंभाचा देव' आणि त्याच्या कार्याचा अंतही शुभ होत असे. त्याचे रोममधील मुख्य मंदिर पूर्व पश्चिम होते. त्याला दोन दरवाजे होते आणि त्याच्या मधे जेनसची मूर्ती होती. तिला दोन्ही दिशांना दोन तोंडे होती. एक तरूण व वृद्ध शांततेच्या काळात ही दारे बंद असत. पहिल्या सातशे वर्षात ती फक्त तीन वेळा बंद होती. राजा न्युमाच्या कारकीर्दीत, प्युनिक युद्धानंतर इ. पू. २४१ मध्ये कार्थेजच्या पराभवानंतर आणि ऑगस्टसच्या कारकीर्दीत वर्षाच्या पहिल्या महिन्याचे नाव जानेवारी हे जेनसच्या नावावरूनच पडले आहे. नवीन वर्षारंभाच्या दिवशी जेनसचा उत्सव असे. त्या दिवशी लोक एकमेकांना भेटीच्या वस्तु देत. त्यात मिठाई व तांब्याच्या नाण्यांचा समावेश असे. नाण्यावर एका बाजूला जेनसची दोन मस्तके व दुसऱ्या बाजूला जहाज असे.

## ३. लॅपिथ (LAPITHS)

पिरिथोस हा लॅपिथ (डोंगरात रहाणारी एक पौराणिक जमात) होता. तो इक्झीऑन आणि डायाचा पुत्र होता. कुणी म्हणतात तो ज्युपिटरचा आणि डायाचा पुत्र होता. पिरिथोस आणि हिपोडॅमिआ यांच्या विवाह प्रसंगी त्याने सर्व ऑलि–

म्पिअनांना निमंत्रण केले होते. परंतु पिलीअस आणि थैरिस यांच्या विवाहप्रसंगी ॲरीझ ( मार्स ) आणि एरीझ ( त्याची बहीण ) यांनी घातलेले गोंधळ लक्षांत घेऊन त्यांनाच फक्त बोलाविले नव्हते. ( त्या विवाहातही एरीझला निमंत्रण नव्हते ) म्हणून तिने हेरा, ॲफ्रॉडाईटी आणि ॲथीना यांच्या मधे एक सुवर्ण सफरचंद टाकले त्यावर लिहिले होते 'सर्वात सुंदर स्त्री करिता!' या प्रकारा-तूनच शेवटी ट्रॉयचे युद्ध उद्‌भवले ) पिरिथोसच्या विवाहातही मदिरा प्राशन करून सेन्टॉर्सनी प्रत्यक्ष वधूवरच अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न केला व पिरिथोसचा मित्र थिसिअस याने त्यांना प्रयासाने हुसकावून लावले. परंतु सेन्टॉर्सनी नंतर आपले सैन्य आणून हा वंशच नष्ट करून टाकला. यामधे मार्सचा संबंध होता.

## सर्ग १० वा

### १. सायक्नस (हंस)

ज्या तीन युवकांचे राजहंसात रुपांतर केले गेले ते. (१) ॲपोलोचा पुत्र (२) ट्रोजनांचा मित्र; याला ॲकिलीझने ठार यारले (३) फिटॉनचा मित्र याला तारकांमधे स्थान मिळाले होते. आणखी एय चौथा होता;– ॲरिस– याला हर्क्यूलीझने ठार मारले.

## सर्ग ११ वा

### १. डायोमिड

ॲकिलीझच्या वधानंतर ट्रॉयच्या बाहेरील ग्रीक सैन्यात दोनच श्रेष्ठ वीर उरले होते. अजॅक्स आणि डायोमिड. राजपुत्र इनिआॅस आणि डायोमिड यांची रणांगणावर गाठ पडली, आणि डायोमिडने त्याला जखमी केले तेव्हा त्याची आई व्हीनस त्याच्या रक्षणाकरिता धावली. तिने त्याला आपल्या हातात उचलून घेतले. परंतु व्हीनस देवता असली तरी ती भित्री आहे हे माहीत असलेल्या डायोमिडने तिच्यावरही हल्ला केला आणि तिच्या हाताला जखम झाली. दुःखाने विव्हळत तिने इनिआसला खाली टाकले आणि ती ऑलिम्पसवर परतली परंतु अपोलो इनिआसला घेऊन परगॅमसला गेला आणि डाईआने त्याची जखम बरी केली



( अॅत्रिअसचे घराणे )
अटलस = प्लेअनी
( ट्रोजनांचे पूर्वज )
टॅन्टॅलस
ओनोमॉस = स्टेरोप
ज्युपिटर = माईआ
इलेक्ट्रा = ज्युपिटर
ट्यूसर
पेलॉप्स
हिपोडेमिआ
कारमेन्स = मक्यूरी
आसिअस् = डार्डनस
बेटिआ
एत्रिअस
इव्हॅन्डर
पॅलस
एरिक्थॉनस
हेलिन = मेंनिलेएस
अॅगमेम्नन = क्लायटिमनेस्ट्रा
हर्मिओनी
ओरेस्टिस
ट्रॉस
आयलस
( ट्रॉयचा राजवंश )
अॅसॅरॅकस
गॅनिमिड
( एसिड )
एईकस
लॅओमडन
सिसिअस
कॅपिस
थेटिस = पेसिअस
टेलॅमॉन = हेसॉयनी
प्रायम = हॅक्यूबा
अॅकायसिस = व्हीनस
अॅकिलीझ
ट्यूसर
(ग्रीक वंश)
हेक्टर
इलिओनी
पॅरिस
डायफीबर
पॉलिटीझ
हेलेनिअस
पॉलिडोरस
कॅसन्ड्रा
क्रेउसा = इनीआस




ट्रॉय आणि ग्रीक राजवंश




लेशिअम मधील युध्द

# शब्द–नाम सूची

ACESTES (ॲसेस्टीस) ट्रोजन वंशातील एक राजप्रमुख. इनीआस सिसिलीला येण्यापूर्वीच तो तिथे स्थाईक झाला होता.

ACHAEANS (ॲकिअन्स) होमर ग्रीकांना या नावाने संबोधीत असे.

ACHERON (ॲकेरॉन) 'दुःखाची नदी' हेडीसमधील एक नदी.

ACHILLES (ॲकिलीझ) एक ग्रीक योद्धा. 'इलिअड' या होमरच्या महाकाव्यातील एक महत्वाची व्यक्तिरेखा. ट्रोजन युद्धातील ग्रीक सेनानी. पॅरिसच्या बाणाने याचा त्या युद्धात वध झाला.

ACRISIUS (ॲक्रिसिअस) दक्षिण ग्रीसमधील आर्गॉसचा एक पुराणप्रसिद्ध अतिप्राचीन राजा.

ACTIUM (ॲक्टिअम) ग्रीसच्या वायव्य किनाऱ्यावरील एक भूशिर. एका सागरी युद्धात ऑगस्टसने इथेच ॲन्टनी आणि क्लिओपाट्रा यांचा इ. पू. ३१ मधे पराभव केला. (ऑगस्टसला त्याकाळी ऑक्टेव्हिअस असे म्हणतअसत)

ADRASTUS (ॲड्रॅस्टस) ऑर्गॉसचा पुराणातील राजा. थीब्झच्या रणधुमाळीत त्याचे दोन जावई कामास आले आणि ते दृश्य पाहून तो निस्तेज झाला.

AEACIDES (ईसिडीस्) इॲकसचे वंशज व ॲकिलीझचे आणि मेसिडॉनचे राजे यांचे पूर्वज

AEAEA (ईईआ) चेटकी सिर्सीचे वसतीचे बेट. होमरच्या 'ओडिसी' या महाकाव्यात या बेटाचा उल्लेख आहे.

AEGAEON (इजीऑन) देवांविरुद्ध युद्ध पुकारणारा पुराणातील एक राक्षस.

AENEAS (इनीआस) व्हीनस आणि ॲन्कायसिझचा पुत्र. डार्डनांचा नायक. ट्रोजन राजवंशीय; ट्रोजन युद्धात बराच महत्वाचा भाग घेतला. ट्रॉयच्या पतनानंतर उर्वरित ट्रोजनांचा नेता.

| | |
|---|---|
| AETOLIA | (ईटोलिआ) डायोमिडचे वायव्य ग्रीसमधील मूळ ठिकाण. |
| AGAMEMNON | (अॅगमेम्नन) मेनेलॉसचा भाऊ. आणि ट्रॉयला वेढा घातलेल्या ग्रीक सेनेचा प्रमुख सेनाधिपती. |
| AGATHYRSANS | (अॅगॅथीर्संस) उत्तर ग्रीसमधील एक आदिवासी जमात. |
| AGENOR | (अॅगेनॉर) टायरचा एक प्राचीन राजा. |
| AGRIPPA | (अॅग्रिपा) ऑगस्टसच्या नौदलाचा अॅक्टिअम येथील सरसेनानी. |
| AGYLLA | (अॅगिला) रोमच्या वायव्येस २० मैलावरील एक इट्रुस्कन नगर; केरेचे दुसरे जास्त प्राचीन नाव. |
| AJAX | (एजॅक्स) एक ग्रीक योद्धा परंतु होमरच्या 'इलिअड' या महाकाव्यातील प्रमुख ग्रीक सेनानी एजॅक्स नव्हे. प्रस्तुत एजॅक्सने मिनर्व्हाच्या आश्रयाला आलेल्या प्रायमकन्या कॅसँड्राचा विनयभंग केला आणि या पापकर्माचे त्याला प्रायश्चित्त मिळाले. घरी परतत असता त्याचे जहाज फुटून तो मरण पावला. 'इलिअड'मधील एजॅक्सने ट्रॉयच्या पतनापूर्वी आत्मघात केला होता. |
| ALBA LONGA | (अॅल्बा लाँगा) अल्बन टेकड्यावर अॅस्कॅनिअसने बसविलेले लॅटिन नगर. |
| ALCIDES | (अल्सिडीस) हर्क्यूलीझचे दुसरे नाव. अॅल्सिअसचा नातू. |
| ALLIA | (अॅलिआ) टायबरला मिळणारी एक उपनदी. इ. पू. ३९० मधे रोमनांचा इथे मोठा पराभव झाला. |
| ALUEUS | (अॅलिअस) पुराणातील एक राक्षस. ओटस आणि एफिॲल्टिझ या त्याच्या महाकाय पुत्रांनी देवांशी युद्ध केले. |
| ALPHEUS | (अॅल्फिअस) ऑलिम्फिआ जवळून वाहणारी नैर्ऋत्य ग्रीसमधील एक नदी. |

AMTHUS (अॅम्थस) सायप्रसमधील एक शहर. इथे व्हीनसची उपासना होत असे.

AMAZONS (अमेझॉन्स) आशिआ मायनर आणि थ्रेसमधील पुराणातील स्त्री योध्दया.

AMMON (अॅमॉन) इजिप्शिअन देव अॅमाऊन. याचे ज्युपिटरशी साधर्म्य आहे.

ANCHISES (अॅन्कायसीझ) इनीआसचा पिता. ट्रोजन राजवंशीय त्याच्या धार्मिक प्रवृत्तीचे फल म्हणून व्हीनस देवतेशी त्याचा प्रेमसंबंध जडला. तिचा व त्याचा पुत्र इनीआस होय.

ANCUS (अॅन्कस) रोमचा चवथा राजा.

ANDROGEOS (अॅड्रोजिऑस) ( १ ) एक ग्रीक राजा – सर्ग दुसरा. ( २ ) क्रेटचा राजा मिनॉस याचा पुत्र. याचा वध अथीनिअनांनी केला असावा.

ANDROMACHE (अॅड्रॉमॅकि) प्रायमपुत्र हेक्टर याची पत्नी. हेक्टर हा 'इलिअड' मधील प्रमुख ट्रोजन योद्धा.

ANTENOR ( अॅन्टिनॉर ) इनीआस पूर्वीच इटलीला पळून गेलेला एक ट्रोजन राजपुत्र.

ANTONY ( अॅन्टनी ) मार्क अॅन्टनी, ऑगस्टसचा प्रतिस्पर्धि. ऑक्टिअम येथे ऑगस्टसने याचा पराभव केला.

ANUBIS (अॅनबिस) श्वान रूपातील एक इजिप्शिअन देव.

APOLLO ( अपोलो ) सूर्य देवता, भविष्यज्ञान, धनुर्विद्या व वैद्यक यांची आधिदेवता. ग्रीक भाषेत यालाच फीबस म्हणतात. ज्युपिटर व लॅटोनाचा पुत्र.

ARAXES (अॅरक्झिस) कॅस्पिअन समुद्राला मिळणारी आर्मीनिआतील एक नदी.

ARCADIA (आर्केडिआ) दक्षिण ग्रीसमधील पर्वत प्रदेश.

**ARCTURUS** (आॅर्कटयुरस) स्वाती नक्षत्र. ध्रुव ताऱ्याजवळील बूटिज या नक्षत्र पुंजातील एक तेजस्वी तारा.

**ARDEA** (आर्डिआ) इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील रोमच्या दक्षिणेकडील शहर. रूटुलिअनांची राजधानी (रटलॅन्ड आधुनिक टॅरॅसिना)

**ARETHUSA** (अॅरिथ्यूझा) दक्षिण ग्रीसमधील एक नदी किंवा जल–देवता. अल्फिअस या नदी देवाने तिचा पाठलाग केला तेव्हा ती सागराखालून सिसिलीत गेली असे मा नतात.

**ARGILETUM** (आर्जिलिटम) फोरम जवळील रोमचा गजबजलेला भाग 'आर्गसचा मृत्यू' असा त्याचा अर्थ मानतात.

**ARGOS** (आर्गॉस) दक्षिण ग्रीसच्या उत्तरेकडील शहर अॅगमेम्ननची राजधानी. मिसेनीच्या ऐवजी हेच अॅग–मेम्नॉनचे घर व राजधानी होती असे काही लोक मानतात.

**ARGUS** (आर्गस) १) आयोवर पहारा ठेवण्याकरिता नेमलेला सातव्या सर्गातील तीक्ष्ण दृष्टीचा रक्षक. याला पुढे मर्क्युरीने मारले. (२) आर्जिलिटम येथे मारला गेलेला गूढ 'परकीय' माणूस. (सर्ग आठवा)

**ARGYRIPA** (आर्गिरिपा) इटलीतील अॅप्युलिआ येथे डायमिडने वसविलेल्या आर्पि नगरीचे दुसरे नाव.

**ARIADNE** (अॅरिअॅड्नी) क्रेटचा राजा मिनॉस याची कन्या. भूलभूलैय्यातून सुटका करून घेण्यात हिने थिसिअसला सहाय्य केले.

**ARICIA** (अॅरिशिआ) अल्बा लाँगाच्या दक्षिणेकडील शहर. इथे डायनाची उपासना होत असे.

**ARISBA** (अॅरिस्बा) ट्रॉयच्या जवळच असलेले एक नगर.

**ARPI** (आर्पि) दक्षिण इटलिच्या पूर्व किनाऱ्यावर डायोमिडने वसविलेले नगर. आधुनिक काळातील फॉजिआजवळ ते होते. ट्रॉयच्या लढाईनंतर ते वसविले गेले.

**ASCANIUS** (ॲस्कॅनिअस) इनीआस आणि क्रिऊझा यांचा बालवयी पुत्र. आयुलस हेही त्याचे नाव होते.

**ASIA** (एशिआ) आशिआ मायनर किंवा आशिआ मायनरचा पश्चिम किनारप्रदेश एवढाच अर्थ व्हर्जिलला अभिप्रेत होता.

**ASTYANAX** (ॲस्टॉयॅनॅक्स) हेक्टर आणि ॲंड्रॉमकि याचा लहान मुलगा. ट्रॉयच्या पतनानंतर हेक्टरचा वंश वाढू नये म्हणून ग्रीकांनी याला ट्रॉयच्या नगरभितीवरून फेकून मारले.

**ATHOS** (ॲथॉस) आताच्या सॅलोनिकाच्या जवळील तीन भूशिरांपैकी अतिपूर्वेकडील एक.

**ATLAS** (ॲटलस) वायव्य आफ्रिकेतील एक पर्वत. आकाश आणि पृथ्वी याना अलग राखणारा एक काल्पनिक राक्षस.

**ATREUS** (ॲट्रिअस) मिसिनीचा राजा. ॲगमेम्नॉन आणि मेनेलॉस यांचा पिता.

**AUFIDUS** (ऑफिडस) अग्नेय इटलीतील एक नदी. ती ॲड्रि-ॲटिकला मिळते.

**AUGUSTUS** (ऑगस्टस) ज्युलिअस सिझरचा दत्तक पुत्र. रोमन साम्राज्याचा संस्थापक व पहिला सम्राट (इ. पू. २७ ते इ. स. १४) व्हर्जिलचा आश्रयदाता मिसिनॅस हा ऑगस्टसचा एक महत्वाचा मंत्री होता.

**AULIS** (ऑलिस) ट्रॉयच्या मोहिमेवर निघताना सर्व ग्रीक सेना या बंदरात एकत्र झाली.

**AURORA** (ऑरोरा) उषादेवी किंवा (बऱ्याच वेळा शुद्ध) उषा.

**AURUNCAN** (ऑरन्कन) मध्य इटलीचे मूळचे रहिवासी.

**AUSONIAN** (ॲसोनिअन) ऑरन्कनांचे दुसरे नाव. व्हर्जिल या नावाचा उपयोग इटॅलिअन लोक या अर्थीच करतो.

AVENTINE (ॲव्हेन्टाईन) रोम भोवतालच्या सात टेकड्यांपैकी एक.

AVERNUS (ॲव्हर्नस) नेपल्सजवळील एक सरोवर. आधुनिक काळातील लॅगो डी ॲव्हर्नो. मृतांच्या विश्वात जाण्याचे प्रवेशद्वार येथे होते असा समज होता.

BACCHUS (बॅक्कस) ग्रीक डायोनिसस. वनस्पती आणि मदिरा यांचा देव. काहीशा रानटी 'बॅकिक' विधींनी बॅकसच्या भाक्तणी याची आराधना करीत. ही आराधना विशेषतः थीब्सजवळ सिथिरॉन पर्वतावर होत असे. बॅकिक उत्सवात स्त्री 'बॅकॅनल' (भक्त) कडून याची आराधना होत असे.

BACTRIA (बॅक्ट्रिआ) कॅस्पिअन समुद्रापलिकडील आशिआतील एक देश.

BAIAE (बाइई) आधुनिक बेईआ. नेपल्सजवळील समुद्र-किनाऱ्यावरील एक स्थळ.

BARCA (बार्का) उत्तर आफ्रिकेतील सिरिनी जवळील शहर.

BEBRYCIAN (बेब्रिसिअन) उत्तर आशिआ मायनर मधील बेब्रिशिआ किंवा बिथिनिआ येथील रहिवासी.

BBLLONA (बेलोना) युद्धदेवता. मार्ससारखी पर्यायी स्त्री देवता.

BERECYNTUS (बेरिसिन्टस) सिबिलीचे स्थान म्हणून पूज्य मानलेला ट्रॉय जवळील एक पर्वत.

BOREAS (बॉरिॲस) मानवी रुपातील उत्तर वारे.

BRIAREUS (ब्रायरिअस) शमर हात असलेल्या एजिअन राक्षसाचे दुसरे नाव.

BRUTUS (ब्रूटस) एक रोमन उमराव. जुलूमशहा टार्क्विन याचे याने इ. पू. ५१० मध्ये पारिपत्य केले असे मानतात.

**BUTHROTUM** (बथरोटम) ग्रीसच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक बंदर. आधुनिक कॉर्फूजवळ हे असावे.

**CAENEUS** (केनिअस) (१) सर्ग सहामधे एक पौराणिक व्यक्तिरेखा. मुळात समुद्रकन्या असलेल्या केनिअसचे पॉसिडोनने (नेप्च्युनने) अजिंक्य पुरुषात रुपांतर केले आणि व्हर्जिलच्या कथेप्रमाणे पुन: स्त्रीत रुपांतर केले. (२) सर्ग नऊमधे एक इटॅलिअन योद्धा.

**CAERE** (केरि) रोमच्या वायव्येकडील एक इट्रुस्कन शहर.

**CAIETA** (काएटा) इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक भूशिर. आधुनिक गाएटा.

**CALCHAS** (कॅलचॅस) ग्रीक सेनेबरोबर ट्रॉयच्या तळावर असलेला एक भविष्यवेत्ता.

**CALLIOPE** (कॅलीओपी) काव्यदेवता. कला देवतांपैकी एक, कवींची स्फूर्तीदेवता.

**CALYDON** (कॅलिडॉन) वायव्य ग्रीसमधील एक शहर, डायमिडचे मूळ गाव; डायनोने एक भयंकर अस्वल पाठवून या शहराला शासन केले. त्या अस्वलाने सर्व शहर उध्वस्त केले.

**CAMARINA** (कॅमरिना) सिसिलीतील एक शहर. 'कॅमरिना हलवू नका' अशी देववाणी असताना तेथील रहिवाशांनी ती झिडकारुन कॅमरिना नावाची एक दलदल कोरडी केली, त यामुळे शत्रूंना जवळून हल्ला करून हे स्थळ जिंकणे शक्य झाले.

**CAMILLA** (कॅमिला) एक वीरांगना; ग्रीक ॲमेझॉनचा हा इटॅलिअन पर्याय.

**CAMILLUS** (कॅमिलस) इ. पू. ३९० मधे गॉल्स्नी जिकलेले रोम या रोमन सेनानीने मुक्त केले. त्यानेच रोमचे ध्वज नंतर गॉल्स् कडून जिंकून परत मिळविले.

CAPITOL (कॅपिटॉल) रोमभोवतालच्या सात टेकड्यांपैकी एका टेकडीचे शिखर. याच शिखरावर पुढे ज्युपिटरचे मंदिर बांधण्यात आले.

CARIANS (कॅरिअन्स) नैर्ऋत्य आशिआ मायनरमधील.रहिवासी.

CARPATHIAN (कार्पेथिअन)-ऱ्होड्स आणि क्रेटजवळील एजिअन समुद्र

CARTHAGE (कार्थेज) उत्तर आफ्रिकेतील फिनिशिअन वसाहत. इ. पू. २६४ पासून रोमबरोबर कार्थेजची तीन घनघोर युद्धे झाली. त्यांना प्युनिक युद्धे असे म्हणत. दुसरे युद्ध हॅनिबॉलने केले. इ. पू. १४६ मधे कार्थेजचा नाश झाला.

CASSANDRA (कॅसॅन्ड्रा) राजा प्रायमची कन्या (पहा तळ टीप सर्ग तिसरा).

CATILINE (कॅटिलाईन) एक रोमन क्रांतिकारक. इ. पू. ६३ मधे सिसिरोने याचा एक कट दडपून टाकला.

CATO (केटो) रोमन सनातनी मुत्सद्दी; कर्मठ नीतिज्ञ म्हणून प्रसिद्ध.

CENTAUR (सेन्टॉर) पुराणातील अर्धमानव अर्ध अश्व असा प्राणी. हे अत्यंत हिंस्त्र असत. त्यांच्यातील एक 'चिरॉन' मात्र त्याच्या दयाळुपणाबाबत आणि सूज्ञतेबाबत प्रसिद्ध होता.

CERAUNIA (सेरॉनिआ) ग्रीसच्या पश्चिम किनाऱ्यावरील ' वज्र भूशिर '.

CERES (सिरीज) भूमाता. धनधान्य-समृद्धीची देवता. ग्रीकांची डिमिटर देवता.

CHALYBEAN (शॅलिबिअन) शॅलिबीज्नी वापरलेली, लोखंड तयार करण्याची पुराणातील पद्धती. शॅलिबझ हे लोखंडी कामाचा शोध लावणारे पुराणप्रसिद्ध संशोधक होते. हे उत्तर आशिआ मायनर येथील रहिवासी असावेत असा अंदाज आहे.

CHARON (कॅअरॉन) ग्रीक पुराणशास्त्राप्रमाणे मृतात्म्यांना स्टिक्स नदीवरून मृतांच्या जगात घेऊन जाणारा नावाडी. याला इट्रुस्कन मृत्यू देव मानीत असत.

CHARYBDIS (कॅरिब्डिज) मेसिनाच्या सामुद्रधुनीतील एक पुराण-प्रसिद्ध राक्षसी. (म्हणजे प्रचंड भोवरा?)

CHIMAERA (शिमेइरा) (१) सर्ग पाचमधे एका गलबताचे नाव. (२) सर्ग सहावा आणि सातवा मध्ये सिंह, मेंढा आणि सर्प याचे मिश्रण असलेला पुराणातील एक राक्षस.

CIRCE (सिर्सी) माणसांचे पशूत जादूने रुपांतर करणारी एक चेटकी. होमरच्या ओडिसी या महाकाव्याच्या दहाव्या सर्गात हा कथाभाग आला आहे. सायक्लोप्सच्या बेटावरून साहसपूर्ण सुटका करून घेतल्यानंतर युलिसीझ आणि त्याचे साथीदार प्रचंड वादळाने सिर्सिच्या बेटाला लागले होते.

CIRCEII (सिर्सिई) व्हर्जिलच्या कथेप्रमाणे सिर्सि या चेटकीचे बेट. तिच्या नावावरूनच या बेटाला हे नाव पडले असावे. होमरच्या काव्यात सिर्सि इइआ या बेटात राहाते असा उल्लेख आहे. हे ठिकाण आधुनिक टेरासिना जवळ इटलीच्या किनाऱ्यावर असावे.

CISSEUS (सिसिअस) (१) एक ट्रोजन योद्धा. (२) प्रायमची पत्नी राणी हेक्यूना हिचा पिता. पॅरिसच्या जन्मापूर्वी तिला आपण जळत्या पलित्याला जन्म दिला आहे, असे स्वप्न पडले होते.

CITHAERON (सिथेरॉन) थीबझ् जवळील एक पर्वत. इथे बॅक्कसची उपासना होत असे. आणि तेथून भविष्य कथनाची देववाणी प्रकट होत असे.

CLAROS (क्लॅरॉस) आशिआ मायनरमधील कोलोफोन जवळील एक शहर. इथे अँपोलोचे मंदिर होते. या मंदिरातूनच अॅपोलोची भविष्यभाषिते प्रकट होत असत.

CLAUDIAN (क्लॉडिअन) एका उच्च रोमन घराण्याचे नाव.

CLAUSUS (क्लॉसस) सॅबाईन मधील एक उमराव. इ. पू. ५१४ त तो रोमला गेला आणि तेथे त्याने क्लॉडिअन वंश स्थापन केला असे मानतात.

CLOELIA (क्लोइलिआ) पॉरसेनाने ओलीस ठेवलेली एक रोमन युवती. मोठ्या साहसाने तिने आपली बंदीशाळेतून सुटका करून घेतली आणि टायबर नदी पोहून ती रोमला परतली.

CNOSSOS (नॉसॉस) क्रेट मधील प्रमुख नगर. मिनॉसचे गाव. इथेच भुलभुलैय्या होता.

COCLES (कॉक्लीझ) 'एकाक्ष' होरॅशिअसचे टोपण नाव. त्याने टायबर नदीवरील पुलावर शत्रूंना रोखून धरले व त्याच्या मागे रोमन साथीदारांनी तो पूल तोडून टाकला, हा इतिहास प्रसिद्ध आहे.

COCYTUS (कॉकायटस) 'शोकाची नदी' हेडीझ मधील एक नदी.

COEUS (कोइअस) पृथ्वी पुत्र; एक टायटन.

CORINTH (कॉरिन्थ) मध्य ग्रीकमधील संयोग भूमीजवळील एक संपन्न शहर. ममिअसच्या नेतृत्वाखाली इ. पू. १४६ मधे रोमनांनी जिंकून त्याचा विध्वंस केला.

CORYBANTES (कॉरिबॅन्टीझ) आशिआ मायनरमधे सायबेलीचे पिसाट रानटी उत्सव करणारे नर्तक - पुरोहित. त्याच प्रमाणे क्रेटमधील सायबेलीच्या पर्यायी देवतेचेही पुरोहित.

CORYTHUS (कॉरिथस) आशिया मायनरला निघून जाण्यापूर्वी डार्डनस इटली मधील या नगरात राहात होता. दुसऱ्या एका कथेनुसार कॉरिथस हे त्याच्या पित्याचे नाव होते. (आधुनिक ॲरेझो जवळील कॉर्टोना हे नगर असावे.

COSSUS (कॉसस) इ. पू. ४२८ मधे फायडेनी जिंकणारा रोमन सेनानी. शत्रू-सेनानीला याने द्वंद्व युद्धात ठार मारून त्याची शस्त्रे लुटली. (सेनानीची शस्त्रे लुटणे हा मोठा पुरुषार्थ समजत)

CREUSA (क्रिउझा) राजा प्रायमची कन्या. इनीआसची प्रथम पत्नी आणि ॲस्केनिअसची माता.

CUMAE (क्यूमी) आधुनिक पॉझ्युओली जवळील एक शहर. इथे देवांची भाषिते प्रकट होत असत आणि मृतांच्या जगात जाण्याकरिता इथून एक प्रवेशद्वार होते. हे शहर नेपल्सजवळ उत्तरेस आहे. क्यूमिअन म्हणजे क्यूमी येथे.

CUPID (क्यूपिड) प्रेम देव. व्हीनसचा पुत्र. हा नेहमी कुमाराच्या स्वरूपात कल्पितात. ग्रीक प्रेम देवाचे नाव इरॉस (Eros) होय.

CURES (क्यूरेस) एक छोटे सॅबाईन नगर. रोमचा दुसरा राजा न्यूमा याचे गाव.

CURETES (क्युरेटीस) कॉरिबॅन्टीझ प्रमाणेच नर्तक-पुरोहित ज्युपिटरच्या (झ्यूस) क्रेटमधील जन्म कथेशी संबंधित असलेल्या पुराणकथेत याचा उल्लेख येतो.

CYBELE (सायबेली) हिलाच 'फ्रिजिअन माता' असे म्हणत असत. आशिआ मायनरमधील महत्वाची देवता. उन्मादक प्रमोदात्मक विधींनी हिची आराधना, विशेषतः बेरिसिन्टस आणि सायबेलस या पर्वत प्रदेशात होत असे. हिजडे हे तिचे भक्त असत.

CYCLOPS (सायक्लॉप्स) सिसिली येथील एकाक्ष राक्षस. युलिसिझने (ओडिसिअस) पॉलिफिमस नावाच्या सायक्लॉप्सचा एकमेव डोळा फोडून स्वतःची आणि साथीदारांची सुटका करून घेतली. (ओडिसी सर्ग ९)

CYCNUS (सायक्नस) याचा अर्थ 'राजहंस' असा आहे. लिग्युरिआचा पौराणिक राजा. याचे फियॉनवर प्रेम होते. त्याचे हंसामध्ये रूपान्तर केले गेले.

CYLLENE (सायलेनी) मर्क्युरीचे जन्मस्थळ. दक्षिण ग्रीकमधील एक पर्वत.

CYNTHUS (सायन्थस) डेलॉस बेटावरील एक टेकडी.

CYPRIAN (सिप्रीअन) व्हीनसचे दुसरे नाव वा विशेषण. सायप्रसमधे व्हीनसची अनेक मंदिरे होती.

CYTHERA (सिथेअस) ग्रीसच्या आग्नेय किनाऱ्याजवळील एक बेट. व्हीनसची इथे विशेष आराधना होत असे. समुद्र–फेनात तिचा जन्म झाल्यानंतर वाऱ्यांनी तिला या बेटाला आणले म्हणून तिला 'सिथेरिअन' म्हणतात.

DAEDALUS (डीडॅलस) क्रेटन भूलभुलैय्याची रचना करणारा शिल्पकार. थिसिअस आणि अॅरिअॅड्नीला तिथून बाहेर पडण्यास त्यानेच मदत केली. क्रेट सोडून जाणे भाग पडल्यावर याने स्वतः करिता व त्याचा मुलगा इकॅरस याच्या करिता पंख बनविले. तो क्यूमीला पोहोचला. तिथे त्याने अॅपोलो मंदिर बांधले. इकॅरस मात्र कोसळून मेला.

DANAAS (डॅनाज) ग्रीकांना सर्वसाधारणपणे या नावाने संबोधीत.

DANAE (डॅनेई) आॅरगॉसची पुराणकथांतील एक राजकन्या. हिला एका पेटीतून समुद्रात लोटून दिले. तिच्याबरोबर तिचा बालक पर्सिअसही होता. काही कथांनुसार ते सेरिफास या बेटाला आले. व्हर्जिल ते इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील आर्डिआला आले असे सांगतो.

DARDANUS (डार्डनस) ट्रॉयचा पुराणकथातील संस्थापक आणि ट्रोजनांचा आदिपुरुष. तो इटलीतून ट्रॉयला गेला म्हणून ट्रोजनांना डार्डनस, डार्डनिअन्स, व डार्डनिड्स असेही म्हणतात.

DAUNUS (डॉनस) टर्नसचा पिता म्हणून रुटुलिअनांना डॉनिअन असेही म्हणत.

DECII (डेसीइ) एक रोमन घराणे. या घराण्यातील दोघांनी इ. पू. चौथ्या शतकात इटॅलिअन युद्धात आत्मबलिदान करून आपल्या सेनेचे रक्षण केले.

DEIPHOBUS (डायफोबस) एक ट्रोजन राजपुत्र. प्रायमचा पुत्र पॅरिसच्या मृत्यूनंतर याने हेलनशी लग्न केले. जेव्हा ट्रॉय पडले तेव्हा बहुतेक तिच्या सहाय्याने ग्रीकांनी त्याचा वध केला.

DELOS (डेलॉस) एजिअन समुद्रातील एक लहान बेट, अपोलोची जन्मभूमी. त्याच्या नावाने पूज्य मानलेली. म्हणून त्याला 'डेलिअन देव' असेही संबोधितात.

DIANA (डायना) ग्रीक आर्टिमीझ; अपोलोची बहीण, तिची तीन रूपे आहेत. आकाशात फीबी (चंद्र) डायना, पृथ्वीवर कुमारी शिकारी व पातालात हेकटी किंवा ट्रायव्हिआ. म्हणून तिला "तीन मार्गांची देवता" असेही म्हणतात. मंत्रतंत्र जादू यांच्या विधींशी ती संबधित आहे.

DIDO (डायडो) फिनिशिअन राजकन्या. हिनेच कार्थिजची स्थापना केली व तिथे राज्य केले. 'इलिस' असेही तिचे नाव होते.

DINDYMA (डिन्डिमा) आशिआ मायनरमधील एक पर्वत. इथे सायबेलीची विशेष आराधना होत असे.

DIOMEDE (डायोमीड) एक ग्रीक योद्धा. 'इलिअड' मध्ये प्रसिद्ध; यानेच व्हीनसला (अॅफ्रोडायटी) व मार्सला (अॅरीज) युद्धात जखमी केले असा कथाभाग आहे. शिक्षा म्हणून स्वदेशातून, इटोलिआतून त्याला हद्दपार व्हावे लागले. आग्नेय इटलीत त्याने आर्पि नगरी वसविली.

DOG - STAR (डॉग-स्टार) श्वान तारका-व्याध. त्याच्या उदयाच्या काळात हवा कोरडी व रोगट असते.

DRUSI (ड्रुसि) रोमन घराणे. या घराण्यातील बरेच पुरुष राजकारणात आघाडीवर होते.

EDONIA (इडोनिआ) ग्रीसच्या उत्तरेकडील थ्रेसमधील मुलूख

ELIS (एलिस) नैर्ऋत्य ग्रीसमधील एक शहर.

ELISSA (इलिसा) डायडोचे दुसरे नाव.

EPIRUS (एपिरस) वायव्य ग्रीसमधील प्रदेश. आधुनिक अल्बानिआ.

ERATO (इरॅटो) प्रेमकाव्य देवता; कलादेवतांपैकी एक.

EREBOS (एरिबस) मृतांच्या जगातील एक भाग; बहुतांशी एक खोल दरी.

ERIDANUS (एरिडॅनस) पुराणातील एक नदी. हिचा उगम पातालात होता. नंतरची 'पो' किंवा 'ऱ्हाईन' नदी, असावी.

ERIPHYLE (एरिफाईल) पुराणातील एक नायिका, हिने आपला पती ॲम्फिअॅरॉसशी प्रतारणा केली आणि तिचा पुत्र आल्केमिऑनने तिचा वध केला.

ERYMANTHUS (एरिमॅन्थस) दक्षिण ग्रीसमधील एक पर्वत. हर्क्युलीझने या पर्वतात एक वराह मारला.

ERYX (एरिक्स) (१) एक पुराणप्रसिद्ध सिसिलिअन योद्धा; विख्यात मुष्टीयोद्धा आणि व्हीनसचा पुत्र (२) आताच्या ट्रॅपॅनी जवळील सिसिलीतील एक पर्वत. एरिक्स या योद्धयावरूनच या पर्वताला हे नाव प्राप्त झाले. इथे व्हीनसची खास आराधना होत असे. (३) या पर्वताजवळील नगरी.

ETRUSCANS (इट्रस्कन) बहुधा आशिआ मायनरमधील एका राष्ट्रातील लोक. आताचे फ्लॉरेन्स आणि नेपल्स यांच्यामधील प्रदेशातील (इट्रुरिआ) इटलीच्या वायव्येस यानी वसाहत केली होती.

EUBOEA (युबिआ) उत्तर ग्रीसच्या पूर्वेकडील जवळचेच एक मोठे बेट.

EUMENIDES (युमिनीडीझ) चंडिकांना सौजन्याने दिलेले नाव 'दयाळू देवता' रक्तपाताचा आणि शापाचा बदला घेणाऱ्या देवता (शाप देवता)

EUROTAS (युरोटॅस) दक्षिण ग्रीसमधील स्पार्टाजवळून वाहणारी नदी.

EURYSTHEUS (युरिस्थिअस) टायरिन्सचा पुराणातील राजा. हे शहर दक्षिण ग्रीसच्या उत्तरेस आहे. या राजानेच हर्क्युलीझला इथे 'बारा कष्टप्रद कामे' नेमून दिली होती.

EVADNE (इव्हेड्नी) कॅपॅनिअसच्या मृत्यूनंतर दुःखाने सती गेलेली त्याची पुराणातील वीरपत्नी.

EVANDER (इव्हॅन्डर) आर्कॅडिआचा पुराणातील ग्रीक राजा. याने रोमच्या स्थापनेसाठी संभाव्य स्थळ निश्चित केले.

FABII (फॅबीइ) एक रोमन घराणे. इ. पू. २१६ मधे या घराण्यातील एका प्रसिद्ध पुरुषाने दुसऱ्या प्युनिक युद्धात रोमन सेना वाचविली. गनिमी युद्धात त्याने हॅनिबॅलशी सर्वंकष युध्दाचा प्रसंग टाळला. चकमकींचा अवलंब करून रोमन सेनेचा बचाव केला म्हणून याला 'कन्क्टेटर' म्हणजे 'निष्क्रिय' "युध्दांत सावधगिरी बाळगणारा" असे म्हणत.

FABRICIUS (फॅब्रिसिअस) पायरस आणि मॅसिडन याच्याविरुध्द युध्दात (इ. पू. २८२–२७९) भाग घेतलेला रोमन सेनानी हा गरीब परंतु निस्पृह होता.

FAUNUS (फॉनस) प्राचीन इटॅलिअन वनदेव त्याचप्रमाणे वन्यपशूंचा देव. कधी कधी याला एक देव या रुपाने ओळखीत तर कधी कधी अनेक 'फॉन्स' या छोटया देवांच्या रुपात (यांना शिंगे व शेपूट असे).

FUCINE (फसाइनी) रोमच्या पूर्वेकडील सुमारे पन्नास मैलावरील एक सरोवर.

FURIES (फ्युरीज) चंडिका. रक्तपाताचा सूड घेणाऱ्या देवता. यांना युमिनीडीझ किंवा 'शापदेवता' असेही म्हणत.

GAETULIANS (गीटचूलिअन्स) उत्तर आफ्रिकेतील एक रानटी जमात. तिची वसतीची ठिकाणे अनेक आहेत.

GANYMEDE (गॅनिमीड) एक तरुण ट्रोजन राजपुत्र. ट्रॉझचा पुत्र. ज्युपिटरने याला स्वर्गात नेले. आणि आपला मद्यचषक-धारक म्हणून नेमले.

GARMANTIANS (गार्मान्टिअन्स) उत्तर आफ्रिकेतील एक जमात.

GARGANUS (गारगॅनस) इटलीच्या पूर्व किनाऱ्यावरील एक भूशिर. आधुनिक गारगॅनो.

GAULS (गॉल्स) इटली आणि फ्रान्स पादाक्रांत केलेली एक जमात. इ. पू. ३९० मधे दक्षिणेत घुसून त्यांनी रोम जिंकले. नंतर त्यांना तिथून हुसकावून लावण्यात आले. पुढील दोन शतकात हे लोक पराभूत झाले.

GELA (गेला) (१) सिसिलीमधील एका ग्रीक शहराचे नाव. आधुनिक टेरानोव्हा. या नावाचा अर्थ 'हास्य' असा आहे. परंतु या शहराचा इतिहास दुःखद आहे. (२) सिसिलीतील एक नदी.

GELONIANS (गेलोनिअन्स) दक्षिण रशियातील एक जमात.

GERYON (गेरिअन) हर्क्युलीझने मारलेला पुराणातील एक त्रिदेही राक्षस.

GETAE (गेटाई) डॅन्यूब नदीच्या मुखाजवळ राहणारी एक जमात.

GLAUCUS (ग्लॉकस) (१) सर्ग पाचमध्ये 'वृध्द समुद्रपुरुष' (२) सर्ग बारामध्ये एक ट्रोजन योध्दा. (३) सर्ग सहामध्ये एक मृत योध्दा, किंवा त्याचा पूर्वज. (इलिअड सर्ग ६ व इतरत्र त्याचा उल्लेख आहे.)

GRACCHUS (ग्रॅकस) रोमन राजघटनेत सुधारणा करणारे दोन बंधू इ. पू. १३३–१२२.

GRAVISCAE (ग्रॅव्हिस्की) इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक बंदर, रोमच्या उत्तरेला असलेले इट्रुस्कन शहर टारक्विनी याचे बंदर. या नावाचा अर्थ 'जड' असा आहे. त्या शहराच्या अनारोग्यकारी हवामानावरून हे नाव त्याला प्राप्त झाले असावे.

GRYNIUM (ग्रायनिअम) आशिआ मायनरच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक शहर. इथे अपोलोची भाषिते प्रकट होत असत.

HARPALYCE (हार्पॅलिसी) पुराणातील एक थ्रेशिअन राजकन्या. वीरांगना आणि शिकारी.

HARPY (हार्पी) पक्ष्याचे धड आणि मानवी डोके असलेली पुराणातील राक्षसी.

HEBRUS (हेब्रस) (१) थ्रेसमधील एक नदी. (२) व ट्रोजन योध्दा.

HECATE (हेकटी) पाताललोकची देवता. जादुविद्येशी हिचा संबंध होता. (पहा 'डायना')

HECTOR (हेक्टर) राजा प्रायमचा पुत्र. इलिअडमधील प्रमुख ट्रोजन योध्दा.

HELEN (हेलिन) स्पार्टाचा राजा मेनेलॉअस याची पत्नी. पॅरिसचे तिला पळवून घेऊन जाणे हे ट्रॉयच्या लढाईचे व सर्वनाशाचे मूळ कारण होय. ही हेलिन ऑफ ट्रॉय म्हणून प्रसिध्द आहे.

HELICON (हेलिकन) अँथेन्सच्या उत्तरेकडील पर्वत. सर्व कलादेवतांचे निवास येथेच होते. हा पर्वत बिऑटिआमध्ये आहे.

HERCULES (हर्क्युलीज ग्रीकमध्ये हेरॅक्लिस) पुराणातील अत्यंत बलवान पुरुष. ज्युनोने (हीरा) याचा खूप छळ केला. आणि त्याला अत्यंत बिकट बारा कामे करावयास लावली. त्यामध्ये त्याला राक्षसांचा वध करावा लागला. म्हणून त्याला बरेचवेळा मानव जातीचा तारक असे मानले जाते.

HERMIONE (हर्मिअनी) मेनिएलस आणि हेलिनची कन्या. ग्रीक राजकन्या.

HERMUS (हर्मस) आशिआ मायनरमधील एक नदी.

HERNICAN (हर्निकन) रोमच्या आग्नेयेकडील मध्य इटलीतील हर्निसी प्रदेशातील.

HESIONE (हेसिअनि) ट्रॉयच्या पहिल्या राजांपैकी एक राजा लेओमिडॉन याची कन्या. सागरी राक्षसापासून हर्क्यु-लीझने हिचे रक्षण केले.

HESPERIA (हेस्पेरिआ) 'संध्या भूमी' (म्हणजे पश्चिम) इटली आणि सिसिलीला ग्रीकांनी दिलेले नाव.

HESPERIDES (हेस्पेरिडीझ) 'पश्चिमेच्या कन्या' दूर पश्चिमेतील नंदनवनांत राहणाऱ्या पौराणिक युवती. याच नंदन-वनात सुवर्णफलांचे झाड होते.

HIPPOLYTA (हिपॉलिटा) अमेझॉनची राणी. थिसिअसची पत्नी.

HIPPOLYTUS (हिपॉलिटस) पुराणातील एक वीरपुरुष. हिपॉलिटा आणि थिसिअस यांचा पुत्र. सावत्र आई फीड्रा हिने त्याच्यावर खोटे आरोप केले. थिसिअसचे आपल्या पित्यावर नेप्च्यूनवर उपकार होते म्हणून थिसिअसच्या विनंतीवरून नेप्च्यूनने हिपॉलिटसचा मृत्यू घडवून आणला. (नेप्च्यून म्हणजेच पॉसिडोन)

HOMOLE (हॉमॉली) उत्तर ग्रीसमधील (थेझली) एक पर्वत.

HYDAS (हायडॅस) रोहिणी नक्षत्र. 'पर्जन्य तारका' टॉरस. (वृषभ) तारकापुंजाचा भाग. पावसाळ्यात या तारका मध्य रात्री उगवतात.

HYDASPES (हायडॅस्पिझ) हिन्दुस्तानातील सिंधुनदीला मिळणारी उप नदी. कदाचित झेलम. रावळपिंडीजवळ

HYDRA ( हायड्रा ) जल सर्प. हर्क्युलीझने मारलेला एक पौराणिक राक्षस.

HYRCANIAN (हायरकॅनिअन) आधुनिक पर्शियाच्या ईशान्येकडील मुलुख. हायरकॅनिया येथील.

ICARUS (आयकॅरस) डीडॅलसचा पुत्र.

IDA (ईडा) अनेक पर्वतांचे नाव. विशेषत: ट्रॉयजवळील पर्वत, व क्रेटमधील पर्वत, ट्रोजन ईडा–क्रेटन ईडा.

IDALIUM ( आयडेलिअम ) सायप्रसमधील एक नगर. इथे व्हीनसची खास आराधना चालत असे.

IDOMENEUS (आयडोमिनिअस) क्रेटमधून ट्रोजन युद्धावर आलेल्या ग्रीकांचा नेता.

ILIA (इलिआ) रोममधील व्हेस्टाची योगिनी. न्हिआसि–ल्व्हिआ असेही तिला म्हणत. रोमचे संस्थापक रोम्युलस आणि रेमस यांची माता.

ILIONEUS (इलिओनिअस) इनीआस बरोबर प्रवास करणारा वयोवृद्ध आणि आदरणीय ट्रोजन.

ILIUM (इलिअम) ट्रॉयचे दुसरे नाव.

ILUS (आयलस) (१) ॲस्केनिअसचे पहिले नाव. नंतर ते आयुलस ( IULUS) असे झाले. (२) ट्रॉसचा पुत्र आणि लेऑमिडॉनचा पिता. (३) इनीआस बरोबर असलेला एक ट्रोजस योद्धा.

INACHUS (इनॅकस) आरगॉसचा पुराणातील अतिप्राचीन राजा. आयोचा पिता.

| | |
|---|---|
| IO | (आयो) आरगॉसची राजकन्या. ज्युपिटरचे हिच्यावर प्रेम होते. त्याने तिचे गाईत रूपांतर केले आणि खुनशीपणे तिचा छळ केला. |
| IRIS | |
| ISMARA | (इस्मॅरा) थ्रेसमधील एक पर्वत, आणि एक शहर. |
| ITHACA | (इथाका) ग्रीसच्या पश्चिम किनाऱ्यावर असलेले युलिसीझचे बेट (ओडिससचे मूळ घर) |
| IULUS | (आयुलस) अॅस्कॅनिअसचे दुसरे नाव. जुलिअन घराण्याचा मूळ पुरुष. इनीआसचा पुत्र. ऑगस्टसही त्याच कुलातील होता. |
| IXION | (इक्झीअन) जुनोवर (हीरा) हल्ला करण्याचे पाप केलेला पुराणातील एक योद्धा. |
| JANICULUM | (जॅनिक्युलम) रोमच्या वायव्येला टायबर नदीपलिकडे असलेली एक टेकडी. |
| JANUS | (जेनस) दोन मुखे असलेला देव. दारे आणि आरंभाचा देव. |
| JOVE | (जोव्ह) ज्युपिटरचे दुसरे नाव. |
| JULIUS | (ज्युलिअस) ज्युलिअस सिझरच्या कुलाचे नाव आणि त्याचा दत्तकपुत्र ऑगस्टस याच्याही. |
| JUNO | (जुनो) ज्युपिटरची पत्नी. ग्रीक हीरा. ट्रोजनांच्या विरुद्ध; कारण पॅरिसने तिला सौन्दर्यात व्हीनसहून कमी ठरविले. |
| JUPITER | (ज्युपिटर) देवांचा राजा व पिता. याला जोव्ह असेही म्हणतात. ग्रीक झ्यूस. |

JUTURNA (ज्युटर्ना) इटलीमधील निर्झरांची देवता. टर्नसची बहीण.

KID-STARS (किड स्टार्स) ऑरिगा (सारथी) तारकापुंजाचा भाग. पावसाळ्याशी संबंधित आहे.

LAERTES (लेअर्टिझ) युलिसीसचा पिता.

LAODAMIA (लेओडॅमिआ) प्रोटेसिलॉसची तरुण वधू. ट्रॉयच्या किनाऱ्यावर उतरलेला तो पहिला ग्रीक होता. त्याच्या मृत्यूची वार्ता ऐकून तिने आत्महत्या केली.

LAOMEDON (लेओमिडॉन) राजा प्रायमचा पिता. ट्रॉयचा पुरातन राजा. अपोलो नेप्च्यून आणि हर्क्युलीझ यांनी त्याच्या केलेल्या सेवेचा मोबदला त्यांना दिला नाही, या अप्रामाणिकपणाबद्दल प्रसिद्ध आहे.

LAPITHS, LAPITHAE ( लॅपिथ्स-लॅपिथी ) उत्तर ग्रीसमधील एक जमात. त्यांनी सेंटार्सबरोबर लढाई केली असा पुराणात दाखला आहे.

LARISSA (लॅरिसा) अकिलीझचे गाव. यावरून त्याला लॅरिसिअन असे म्हणत. आधुनिक व्होलॉसजवळ थेसलीमधील एक शहर.

LATIUM (लेशिअम) इटलीतील पर्वतरांगाजवळील किनारपट्टीचा प्रदेश, रोमच्या दक्षिणेकडील प्रदेश. तेथील लोकांना लॅटिन व राजाला लॅटिनस असे संबोधीत.

LATONA (लॅटोना) अपोलो आणि डायनाची माता. एक देवता.

LAURENTINE (लॉरेन्टाईन) लेशिअमच्या किनारपट्टीवर राहणारे प्राचीन लोक. त्यांचे नगर लॉरेन्टस म्हणजेच लॅव्हिनिअम असावे.

| | |
|---|---|
| LAVINIA | (लॅव्हिनिआ) राजा लॅटिनस याची तरुण कन्या. टर्नसची वाग्दत्त वधू. परंतु नंतर इनीआसची तिचा विवाह झाला. |
| LAVINIAN | (लॅव्हिनिअन) लॅव्हिनिआमध्ये, आधुनिक ओस्टिआ आणि ॲन्झिओ यांच्यामधे लॅशिअम किनारपट्टीजवळ इनीआसने वसविलेले नगर. |
| LEDA | (लीडा) स्पार्टाचा राजा टिन्डॅरिअसची पत्नी. हेलिनची माता. |
| LELEGEIANS | (लेलिजिअन्स) आशिआ मायनरमधील प्राचीन रहिवासी. |
| LEMNOS | (लेम्नॉस) एजिअन समुद्रातील एक बेट. इथे व्हल्कनची (हेफेस्टसची) खास उपासना होत असे. |
| LETHE | (लीथि) 'विस्मृती' पाताललोकातील एक नदी. तिचे पाणी प्याले की स्मरणशक्ती नष्ट होत असे. |
| LEUCATE | (ल्युकेटी) इथाकाजवळील ग्रीसच्या पश्चिमेकडील ल्युकॅस बेटावरील भूशिर. |
| LIBURNIAN | (लिबर्निअन) ॲड्रिॲटिकच्या उत्तरेकडील प्रदेशातील येथील गलबते वेगवान असत. |
| LIGURIAN | (लिग्युरिअन) इटलीच्या अति वायव्येकडील लिग्युरिआ प्रदेशातील रहिवासी. आधुनिक जिनोआजवळ. |
| LIPARA | (लिपॅरा) सिसिलीच्या ईशान्येकडील बेटांपैकी स्ट्रॉम्बोली जवळील एक छोटे ज्वालामुखीचे बेट. |
| LOCRIANS | (लोक्रिअन्स्) उत्तर ग्रीसमधील लोक. हे पुढे इटलीच्या द्वीपकल्पात आणि उत्तर आफ्रिकेच्या किनाऱ्यावर गेले. |
| LUPERCI | (ल्युपर्कि) फक्त लांडग्यांची कातडी (टो) परिधान केलेले तरुण. फॉनसच्या उत्सवात भाग घेऊन 'सीमोल्लंघनाचे' विधी करणारे तरुण. या उत्सवात (ल्युपरकॅलिआ) सुप्रजाजननार्थ मांत्रिक विधी असत. |

LYCAEAN (लायकेइअन) आर्केडिआमधील लायकिअस पर्वतावरील रहिवासी.

LYCIA (लिसिआ) आशिआ मायनरच्या नैर्ऋत्येकडील प्रदेश. तेथील रहिवाश्यांना लिसिअन्स म्हणतात.

LYDIA (लिडिआ) पश्चिम आशिआ मायनरमधील प्रदेश.

LYRNESSUS (लायर्नेसस) ट्रॉयजवळील शहर. अकिलीझने याचा पाडाव केला.

MAEOTIS (मिऑटिझ) क्रिमिआजवळील अँझॉन्हचा समुद्र.

MAIA (माईआ) मर्क्युरीची माता. एक देवता.

MALEA (मॅलिआ) आग्नेय ग्रीसमधील भूशिर. आधुनिक केप मेटॅपॅसच्या पूर्वेकडील स्थळ.

MANLIUS (मॅन्लिअस) इ. पू. ३९० मधील रोमवरील गॅलिक आक्रमणाच्या वेळी रोमच्या किल्ल्याचे रक्षण करणारा रोमन अधिकारी, पवित्र हेसांनी दिलेल्या पूर्वसूचने-वरून त्याने जागा लढविली व रक्षिली.

MARCELLUS (मार्सेलस) (१) सर्ग ६ मधे शेवटी उत्तर इटलीत इ.पू. २२२ मधे गॉलसचा पराभव करून द्वंद्वात शत्रू सेनानीला ठार करून त्याची शस्त्रे लुटलेला रोमन सेनापती. (२) सर्ग सहामध्येच शेवटी ऑगस्टसचा पुतण्या आणि त्याच्यानंतर पुढे सम्राट होईल अशी अपेक्षा असलेला तरूण, परंतु इ. पू. २३ मधे तो विसाव्या वर्षीच मरण पावला.

MARS (मार्स) युद्ध देव. (ग्रीक एअरीझ) पहा 'ग्रीक देव-देवता.'

MASSYLIAN (मॅसिलिअन) उत्तर आफ्रिकेतील एका जमातीतील माणूस.

MEGARA (मेगॅरा) सिसिलीच्या पूर्व किनाऱ्यावरील एक बंदर.

MELAMPUS (मेलॅम्पस) पुराणातील एक प्राचीन कवी व भविष्यद्रष्टा.

MELIBOEA ( मेलीबोइआ ) आधुनिक व्होलॉसच्या उत्तरेकडील थेझलीतील एक शहर.

MEMNON (मेम्नॉन) एक इथिओपिअन योद्धा. ऑरोराचा (डॉन-उषा) पुत्र. याने ट्रोजनांना ग्रीकांच्या विरूद्ध सहाय्य केले. त्याचे चिलखत स्वर्गीय बनावटीचे होते.

MENELAUS (मेनेलॉस) स्पार्टाचा राजा. ॲगमेम्ननाचा भाऊ व हेलिनेचा पती.

MONOECUS (मोनोइकस) 'एकटा राहणारा' मॉन्टे कार्लेवर, आधुनिक मोनॅकोजवळ हर्क्युलीझ एके ठिकाणी काही काल एकांतवास करून होता असा समज आहे.

MERCURY (मर्क्युरी) देवांचा दूत आणि मृतात्म्यांचा वाटाड्या. ग्रीक हर्मीस.

METTUS ( मिटस ) अल्बा लॉंगाचा लॅटिन सेनानी, रोम बरोबरील युद्धात याने आपला शद्ब पाळला नाही.

MINCIUS (मिन्सिअस) व्हर्जिलच्या जन्मस्थळाजवळील आणि मान्टुआजवळील उत्तर इटलीतील एक नदी.

MINERVA (मिनर्व्हा) रोमन युद्ध देवता. ज्युपिटरची कन्या. (पहा ग्रीक देव देवता)

MINIO (मिनिओ) रोमच्या उत्तरेकडील इट्रुरिआतील एक नदी.

MINOS (मिनॉस) क्रेटचा पुराणातील एक राजा. डिडलसने याच्या करिता भुलभुलैय्या बांधला. मृत्यूनंतर हा मृतांचा न्यायाधिश झाला. (व्हडमॅन्यसप्रमाणे)

MINOTAUR (मायनोटॉर) मनुष्यदेह आणि बैलाचे शिर असलेला पुराणातील राक्षस. पॅसिफिचा पुत्र, भुलभुलैय्यात रहात असे व तिथे पाठविलेल्या कैद्यांचे भक्षण करीत असे.

| | |
|---|---|
| MISENUS | (मिसेनस) इनीआसचा अनुयायी नेपल्स आणि इस्चिआ यांच्या मधील कॅपो मिसिनो या भूशिराला याचे नाव प्राप्त झाले. |
| MORINI | (मॉरिनि) आधुनिक बेल्जिअममधील प्रदेशातील एक गॅलिक जमात. |
| MUSAEUS | (म्युझिअस) पुराणातील प्राचीन कवी. पहिला कवी ऑर्फिअस नंतर हा होऊन गेला. |
| MYCENAE | (मायसेनी) कोरिन्थच्या संयोगभूमीच्या दक्षिणेकडील एक प्राचीन शहर. होमरच्या काव्यात हे ॲगमेम्ननच्या राजधानीचे शहर होते असा उल्लेख आहे. |
| MYRMIDONS | (मिर्थमिडन्स) थेसली मधील एक ग्रीक जमात. यांनी ॲकिलीजला ट्रोजन युद्धात एक सैन्य दल पुरविले होते. |
| NEMEA | (नेमीआ) मध्य ग्रीसच्या संयोगभूमीजवळील एक शहर. हर्क्युलीझने इथेच एक भयंकर सिंह मारला. |
| NEOPTOLEMUS | ( निओटोलेमस ) ॲकिलीझचा पुत्र. याचेच नाव पायरसही होते. |
| NEPTUNE | (नेप्च्यून) समुद्रदेवांपैकी सर्वात महत्वाचा देव. ग्रीक पॉसिडोन. |
| NEREUS | (निअरिअस) प्राचीन समुद्रदेव. याच्या कन्या निरिईड्ज या समुद्र पऱ्या होत. |
| NUMA | (न्युमा) (१) रोमचा दुसरा राजा धार्मिक व शांततावादी होता. (२) सर्ग नऊमधे रात्रीच्या हल्ल्यात मारला गेलेला इटॅलिअन योद्धा. (३) (कदाचित् व्हर्जिलच्या विस्मरणाने) सर्ग दहा मधेही तो आहे. |
| NUMICUS | (न्युमिकस) लॅव्हिनिअम आणि आर्डिआमधील लॅशिअम-मधील छोटी पण अति पवित्र नदी. |

NUMIDIAN (न्युमिडिअन). उत्तर आफ्रिकेतील भटक्या जमातीतील मनुष्य. या जमातीतील लोक उत्तम घोडेस्वार होते आणि खोगीराशिवायच घोड्यावर बसत.

NUMITOR (न्युमिटॉर) (१) रोम्युलस आणि रेमसचे पितामह. (२) एक इटॅलिअन योद्धा.

NYSA (नायसा) बॅक्कसचे (डायोनिसस) जन्मस्थळ. हा पर्वत आशिआत कुठेतरी असावा (किंवा पुराणातील कल्पित पर्वतही असावा).

OCEAN (THE OCEAN) (ओशन) पृथ्वीभोवती वाहणारी नदी (महासागर) अशी कल्पना आहे.

OECHALIA (ईशॅलिआ) हर्क्युलीझने लुटलेले युबिआतील एक शहर. (युबिआ ग्रीसच्या पूर्व किनाऱ्याजवळील प्रदेशात असावे).

OENOTRIA (इनोट्रिआ) इटलीतील एका प्रदेशाचे प्राचीन नाव. येथील रहिवासी 'इनोट्रिअन्स' होत.

OLYMPUS (ऑलिम्पस) ईशान्य ग्रीसमधील एक उंच पर्वत. आधुनिक सॅलोनिकाच्या बाजूला असावा. स्वर्ग. होमरच्या वर्णनाप्रमाणे ज्युपिटर व बहुतेक सर्व देव येथे वसती करीत; कधी कधी मात्र या शब्दाचा 'आकाश' एवढाच अर्थ होतो.

ORCUS (ऑर्कस) प्लूटोचे दुसरे नाव. मृतांचा अधिपती. मृतात्म्यांचे जग म्हणूनही हा शब्द वापरतात.

ORESTES (ऑरेस्टीझ) ॲगमेम्नन आणि क्लायरिमनेस्ट्रा यांचा पुत्र. ॲगमेम्नन ट्रॉयहून परतल्यावर तिने त्याचा खून केला. ऑरेस्टीझने अपोलोच्या आज्ञेवरून आपल्या आईचा वध करून पित्याच्या खुनाचा सूड घेतला. या प्रमादाकरिता चंडिकांनी त्याचा छळ केला.

ORICUM (ऑरिकम) पश्चिम ग्रीसमधील एक शहर; इटलीच्या 'टाचे' समोर.

ORION (ओरायन) शिकारी म्हणून प्रसिद्ध असलेला पुराणातील एक राक्षस. डायनाने त्याचे मृगशीर्ष नक्षत्रपुंजात रुपांतर केले. शारदसंपाताच्या सुमारास सूर्योदयाबरोबर याचाही उदय होतो.

ORITHYIA (ऑरिथीया) पुराणातील एक नायिका. बोरिॲसचे (उत्तर वारा) हिच्यावर प्रेम होते. तिचेही वाऱ्यात रुपांतर झाले.

ORPHEUS (ऑर्फिअस) पुराणातील आद्य कवी असावा अशी समजूत आहे.

ORTYGIA (ऑर्टिजिआ) 'लावीचे घरटे' (१) डेलॉस (२) सिसिलीतील सायरॅक्यूजचा भाग.

OSCANS (ऑस्कॅन्स) लॅशिअमच्या दक्षिणेकडील कॅम्पानिआ भागात राहणारी प्राचीन जमात.

OTHRYS (ऑथ्रिस) (१) सर्ग दोनमधे पॅन्थसच्या पित्याचे नाव. (२) सर्ग सातमधे थेसलीमधील एक पर्वत.

PACHYNUS (पॅकिनस) माल्टाच्या बाजूचे सिसिलीच्या दक्षिण किनाऱ्यावरील भूशिर.

PACTOLUS (पॅक्टोलस) आशिआ मायनरमधील एक नदी. हिच्या प्रवाहातून सुवर्ण कण वाहत असत.

PADUA (पॅड्यूआ) उत्तर इटलीतील व्हेनिसजवळचे एक शहर.

PALAMEDES (पॅलॅमिडीझ) एक ग्रीक योद्धा. ट्रॉयच्या वेढयाच्या काळात युलिसीझने याच्यावर केलेल्या राजद्रोहाच्या आरोपावरून याचा वध करण्यात आला.

PALATINE (पॅलेटाईन) रोम भोवतालच्या सात टेकडयापैकी एक. ऑगस्टसचा 'प्रासाद' याच टेकडीवर होता.

PALICUS (पॅलिकस) एक अज्ञात देव किंवा पौराणिक वीरपुरुष. सिसिलीत याची आराधना होत असे.

PALINURUS (पॅलिनुरस) (गलबतावर वरामाकडून वाहणारा वारा). इनीआसचा सुकाण्या; इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील, भूशिराला याचे नाव प्राप्त झाले असावे. सॅलेर्नोच्या दक्षिणेस काही अंतरावर हे ठिकाण आहे.

PALLANTEUM (पॅलॅन्टिअम) (१) पॅलसच्या नावावरून नाव प्राप्त झालेले आर्केडिआतील एक शहर. (२) भावी रोमच्या जागी इव्हॅन्डर राजाने पॅलेन्टाईन टेकडीवर वसविलेली वसाहत.

PALLAS (पॅलॅस) (१) मिनर्व्हाचे दुसरे नाव. (२) इव्हॅन्डरचा पूर्वज (३) इनीआसबरोबर युद्धावर गेलेला इव्हॅन्डरचा तरूण पुत्र.

PAN (पॅन) वनभूमीचा व पशूंच्या कळपाचा देव. मेषदेव (अर्धा मेष व अर्धा मानव) ग्रामजनामध्ये हा 'घबराट' (Panic) निर्माण करी. याचे वास्तव्य आर्केडियामध्ये होते.

PANDARUS (पॅन्डॅरस) (१)सर्ग नऊमधे इनीआसचा एक वीर.(२) सर्ग अकरामधे ग्रीकांच्या बरोबर ट्रोजनांचा झालेला युद्धबंदी कराव भंग करून ग्रीकांवर शरसंधान करणारा एक पूर्वीचा ट्रोजन योद्धा.

PAPHOS (पॅफॉस) सायप्रसमधील एक शहर, इथे व्हीनसची खास उपासना होत असे.

PARIS (पॅरिस) राजा प्रायमचा पुत्र. हेक्टरचा भाऊ. याने हेलिनला स्पार्टाहून पळवून आणले होते.

PARTHENOPAEUS (पार्थेनोपिअस) थिब्ज् विरूद्ध चालून गेलेल्या सात जणांपैकी एक पौराणिक योद्धा.

PARTHIANS (पार्थिअन्स) इ. पू. ५३ मधे कार्थिज येथे रोमनांचा दारूण पराभव करणारी मध्यपूर्वेतील कुशल तिरंदाजांची एक जमात. इ. पू. १९ मधे त्यांच्याशी तह करून ऑगस्टसने त्यांनी जिंकून नेलेले रोमचे ध्वज परत आणले.

PASIPHAE (पॅसिफी) क्रेटचा राजा मिनॉसची पत्नी. मायनटॉरची माता.

PALASGIANS (पॅलॉस्गिअन्स) ग्रीस आणि इटली व इतर ठिकाणचे अति प्राचीन रहिवासी. आदिवाशी असावेत असे मानतात.

PELEUS (पील्यूस) ॲकिलीझचा पिता. पुराणातील एक ग्रीक योद्धा.

PELOPS (पीलॉप्स) प्राचीन मायसेनी राजवंशाचा संस्थापक; ॲगमेम्नन आणि मेनेलॉअसचा पूर्वज. त्याचेच नांव पेलोपॉनिसीला प्राप्त झाले. (पिलॉप्सचे बेट)

PELORUS (पेलोरस) सिसिलीच्या ईशान्य किनाऱ्यावरील एक भूशिर.

PENTHESILEA (पेन्थेसिलिआ) ॲमेझॉनची पुराणातील राणी.

PENTHEUS (पेन्थिअस) थिब्ज्‌चा पुराणातील राजा. बॅकसने याला वेडा बनविले.

PHAEACIA (फीएशिआ) पुराणातील एक प्रदेश (कदाचित कार्फ्यू असावा) ओडिसी सर्ग ६ ते ८ मधे उल्लेख आहे.

PHAEDRA (फीड्रा) थिसिअसची दुसरी पत्नी हिपॉलिटसची सावत्र आई. हिचे हिपॉलिटसवर प्रेम जडले आणि नंतर त्याच्या मृत्यूला कारण झाली.

PHAETHON (फीथन) पुराणातील एक वीर पुरुष. आपला पिता सूर्य याचा रथ याने एकदा हाकला. पण त्याचा ताबा सुटून घोडे उधळले. ज्युपिटरने वज्राने त्याचा वध केला.

PHENEOS (फीनीऑस) दक्षिण ग्रीसमधील एक आर्केडिअन शहर.

PHILOCTETES (फिलॉक्टीटीज) ग्रीक योद्धा हर्क्युलीझने वापरलेले धनुष्य याच्याकडे होते. या धनुष्याचा उपयोग करून त्याने ट्रॉय जिंकण्यास ग्रीकांना सहाय्य केले.

PHLEGYAS (फ्लेगायस) लॅपिथींचा पुराणातील राजा. डोल्फी येथील अपोलोचे मंदिर याने जाळले, पाताललोकात या बद्दल त्याला प्रायश्चित्त भोगावे लागले. कोणत्याही क्षणी कोसळू शकणाऱ्या खडकाखाली त्याला सतत बसविले.

PHOEBE (फीबी) सर्ग चार मधे चन्द्रदेवता (पहा डायना)

PHOEBUS (फीबस) (पहा अपोलो) हेलिऑस (सूर्य) आणि याच्यामधे कधी कधी गोंधळ होतो.

PHORCUS (फॉर्कस) एक समुद्र देव.

PHRYGIA (फ्रिजीआ) मध्य व उत्तर आशिआ मायनरचा एक भाग. फ्रिजिअन म्हणजे ट्रोजन असे बरेच वेळा मानतात. पण ते बायकी असे अवहेलनात्मकरीत्या मानले जात. सायबेली ही त्यांची माता (फ्रिजिअन माता).

PHTHIA (थिआ) उत्तर ग्रीसमधील थ्रेसचे जुने नाव. ॲकिलीजची मूळ भूमी.

PICUS (पायकस) प्राचीन इटॅलिअन देव सुतारपक्ष्याच्या रुपातील देव (सुतारपक्षी).

PILUMNUS (पिलुम्नस) प्राचीन इटॅलिअन देव. (भालाईत).

PIRITHOUS (पिरिथोस) पर्सिफोनीला (प्रॉझरपाईनला) पाताल-लोकातून पळवून आणण्याच्या प्रयत्नात थिसिअसचा साथीदार.

PISA (पिसा) (१) दक्षिण ग्रीसमधील शहर. (२) वायव्य इटलीतील एक शहर.

PLEMMYRIUM (प्लेमिरिअम) ('पूर') सायरॅक्यूजजवळील सिसिलीच्या पूर्व किनाऱ्यावरील भूशिर.

PLUTO (प्ल्यूटो) ऑर्कस. ज्युपिटरचा भाऊ. ग्रीक हेडीझ्मध्ये मृतांचा राजा.

POLYBOETES (पॉलीबीटीझ) विपुल गोधनाचा स्वामी. हा कदाचित ट्रोजन योद्धा पॉलिफिटीझ असावा. इलिअड सर्ग १३ मध्ये याचा उल्लेख आहे. स्पेलिंग निरनिराळे करतात.

POLYPHEMUS (पॉलीफीमस) युलिसीझने अंध केलेला सायक्लॉप्स. (पहा ओडिसी सर्ग नऊ).

PORSENNA (पॉर्सिना) इ. पू. ५१० मध्ये हद्दपार केलेल्या राजा टार्क्विनला परत सिंहासनाधिष्ठित करण्याकरिता रोमवर चाल करून गेलेला इट्रुस्कन राजा.

PORTUNUS (पॉटर्चूनस) बंदरांशी संबंधित असलेला समुद्रदेव.

PRIAM (प्रायम) ट्रॉयचा शेवटचा राजा. हेक्यूबाचा पती. हेक्टर, पॅरिस, कॅसॅन्ड्रा, हेलेनस, ड्रायफीबस आणि इतर बऱ्याच मुलांचा पिता.

PRISTIS (प्रिस्टिझ) शार्क किंवा व्हेलमासा, गलबताचे नाव.

PROCRIS (प्रोक्रिस) पौराणिक नायिका. हिला आपला पति सेफॅलस याच्या निष्ठेविषयी संशय निर्माण झाला. पुढे त्याच्या हातून अपघाताने हिचा वध झाला.

PROSERPINE (प्रॉझरपाईन – प्रॉझर्पिना या शद्बाचे अर्थ–इंग्लीश स्पेलिंग) सिरीजची (डिमिटर) कन्या. प्लूटोने हिला पळवून नेऊन तिला पाताललोकाची राणी केले. ग्रीक पर्सिफोनी.

PROTEUS (प्रोटिअस) भविष्यज्ञान असलेला समुद्रदेव. याला कोणतेही रूप धारण करता येत असे. 'प्रोटिअसचे स्तंभ' इजिप्त जवळ होते असे मानले जाते.

PYRRHUS (पायरस) ॲकिलीझचा पुत्र. निओटॉलेमस याचे दुसरे नाव.

**QUIRINUS** (क्विरायनस) एक अतिप्राचीन इटॅलिअन देव. रोम्युलसलाच नंतर हे देवपण प्राप्त झाले असावे, असे मानतात. यालाही एक महत्वाचे रोमन राष्ट्रीय दैवत मानतात. त्याच्या संबंधित असलेल्या प्रत्येक गोष्टीला किंवा रोमनांनाही क्विराईन किंवा क्विरिनल ही उपाधी लावीत. याचा अर्थ 'क्विराइनसचे लोक' किंवा भालाईत असा होत असावा. (क्विरस म्हणजे भाला)

**REMUS** (रीमस) रोम्युलसचा भाऊ आणि रोमचा सहसंस्थापक रोम्युलसला अधिक अनुकुल शुभशकुन (रोमच्या स्थापने बद्दल) प्राप्त झाले होते, आणि त्याने पॅलेटाईनवर बांधकामास सुरवात केली. रीमसने उपहासाने भिंती-वरून उडी घेतली आणि रोम्युलसने मत्सराने त्याला ठार केले.

**RHADAMANTHUS** (रॅडॅमॅन्थस) क्रेटमधील नॉसॉसचा पुराणातील राजा. मृत्यूनंतर मृतांचा न्यायाधिश म्हणून त्याची नियुक्ती झाली.

**RHEA** (र्‍हिआ) (१) अतिप्राचीन ग्रीक देवता. सॅटर्नची पत्नी व ज्युपिटर, जुनो, नेप्च्यून आदींची माता. (२) व्हेस्टाची रोमन योगिनी इलिआ किंवा र्‍हीआसिल्व्हिआ असेही तिचे नाव होते. रोम्युलस आणि रिमसची माता.

**RHESUS** (रिसस) ट्रॉयच्या वेढ्याच्यावेळी ट्रोजनांच्या सहाय्याला आलेला थ्रेसचा राजा. युलिसीझ आणि डायमिड यांनी त्याच्या छावणीवर छापा घातला आणि त्याचा वध केला. (पहा इलिअड सर्ग १०)

**RHOETEUM** (रोटिअम) ट्रॉय जवळचे एक बंदर. रोटिअन म्हणजे फक्त ट्रोजन असाही कधी कधी अर्थ होतो.

**ROMULUS** (रोम्युलस) मार्स आणि इलिआचा पुत्र. इ. पू. ७५३ मधे याने रोमची स्थापना केली.

**RUTULIAN** (रुटुलिअन) रुटुलीआचे रहिवासी, टर्नसचे हे राष्ट्र हे रोमच्या दक्षिणेस आधुनिक अॅन्झिओ जवळ असावे.

**SABELLIANS** (सॅबेलिअन्स) एक इटॅलिअन जमात. यामधे रोमच्या पूर्वेकडील प्रदेशात राहणारे सॅबाईनही समाविष्ट आहेत. किंवा सॅबेलिअन्स म्हणजेच सॅबाईन लोक असेही मानतात. रोमच्या प्राथमिक इतिहासावर आणि धर्मावर यांचा फार मोठा प्रभाव होता.

**SABINUS** (सॅबिनस) सॅबाईनोचा पुराणातील एक प्राचीन राजा

**SALAMIS** (सॅलॅमिस) (१) अॅथेन्स जवळील एक बेट. (२) त्या नावाचे सायप्रस मधील एक शहर. ट्रोजन युद्धानंतर अजॅक्सचा सावत्र भाऊ टयूसर याच शहराला आला.

**SALII** (सॅलिई) मार्सच्या उत्सवात रोममध्ये पवित्र ढाली हातात घेऊन नाचणारे रोमन पुरोहित.

**SAME** (सॅमि) इथाका जवळचे एक बेट.

**SAMOS** (सॅमॉस) आशिआ मायनरच्या पश्चिम किनाऱ्याजवळील एक बेट.

**SAMOTHRACE** (सॅमोथ्रेस) ट्रॉयच्या पश्चिमेस डाईनेलीस जवळचे एक बेट.

**SARPEDON** (सर्पेडन) लिसीआचा राजपुत्र, ज्युपिटरचा पुत्र आणि राजा प्रायमचा मित्र. ट्रॉयच्या युद्धात याचा वध झाला (इलिअड सर्ग १६)

**SATURN** (सॅटर्न) ग्रीक क्रॉनॉस. ज्युपिटर आणि जुनोचा पिता. (पहा ग्रीक व रोमन देव व देवता पृष्ठ)

**SCAEAN** (स्किअन) 'डावा हात' ट्रॉयच्या नगरभिंतीतील एका वेशीचे नाव.

**SCIPIO** (स्किपिओ) कॉर्नेलीच्या कुलाचे नाव. या कुलातील अनेक पुरूष प्युनिक युद्धात प्रसिद्ध सेनानी होते. त्यापैकी स्किपिओ ॲफ्रिकॅनस हा कार्थेजिमिअनांचा झामाच्या युद्धात (इ. पू. २०२) निर्णायक पराभव झाला तेव्हा सेनापती होता.

SCYLLA (सीला) (१) सर्ग तीन मधे मेझिनाच्या सामुद्रधुनीतील एका गुहेत राहणारी एक समुद्र राक्षसी. जवळून जाणाऱ्या गलबतांतील खलाशांचे ती भक्षण करीत असे (२) सर्ग सहा मधे एका गलबताचे सीला राक्षसीवरून दिलेले नाव.

SCYROS ( स्कायरॉस ) ट्रॉयच्या मोहिमेबर निघण्याकरिता ॲकिलीजचे सैन्य एजिअन समुद्रातील या बेटावर जमले निओटॉलेमसचे जन्मस्थळ.

SCYTHIANS (सिथिअन्स) दक्षिण रशियातील एक जमात. या जमातीतील लोक घोडदौडीत पटाईत होते.

SELINUS (सेलिनस) पश्चिम सिसिलीतील एक शहर (पार्सली)

SERRANUS (सेरॅनस) (१) सर्ग सहामधे रेम्यूलसचे नाव; पहिल्या प्युनिक युद्धात रोमनांचे नेवृत्व करण्याकरिता याच्या शेतवाडीतून याला बोलाविण्यात आले. इ. पू. २५५ मधे शत्रूने याला आफ्रिकेत कैद केले. (२) सर्ग नऊमधे इनीआसच्या विरूद्ध लढलेला एक इटॅलिअन योद्धा.

SIBYL (सिबिल) नेपल्स जवळील क्युमी येथील योगिनी आणि भविष्यदर्शी. मुख्यत्वे ग्रीकभूमीच्या सीमेवर आणखी योगिनीं असल्याचा इतरत्र उल्लेख आहे.

SICANIANS (सिकॅनिअन्स) शूर योद्धयांची एक जमात. त्यांच्या विषयीचा इतिहास अज्ञात आहे. ते मध्य इटलीत राहत असत. पुढे ते इटलीस गेले असावेत. परंतु ते कदाचित आफ्रिकेतून इटलीत पूर्वीच आले असावेत. सिसिलीच्या पूर्व किनाऱ्यावरच सिकॅनिअन उपसागर आहे.

SIDON (सायडन) टायर जवळचे फिनिशिअन शहर.

SIGEUM (सिजिअम) ट्रॉयजवळचे एक बंदर, सिजिअमची सामुद्रधुनी म्हणजेच आताच्या डारडॅनेलीजची सामुद्रधुनी.

SILA (सिला) 'अंगठा' दक्षिण इटलीतील पर्वत रांग.

SILVANUS (सिल्व्हॅनस) न कसलेल्या जमिनीचा इटॅलिअन देव.

SIMOIS (सिमॉइस) ट्रॉयच्या सखल प्रदेशातील नदी.

SIRENS (सायरेन्स) अत्यंत मधुर आवाजात गाऊन खलाशांना काठावरील खडकांकडे आकर्षित करणाऱ्या युवती (ओडिसी सर्ग १२)

SIRIUS (सिरिअस) व्याध तारा. उत्तर उन्हाळयात सूर्योदया-बरोबर याचाही उदय होतो. (DOG-STAR) श्वान तारका. त्या वेळी हवा कोरडी व रोगट असते.

SPARTA (स्पार्टा) दक्षिण ग्रीस मधील एक शहर. मेनेलॉअस आणि हेलेनचे गाव.

STHENELUS (स्थेनेलस) (१) 'इलिअड' मधील एक ग्रीक योद्धा. (२) इनीआसबरोबर असलेला एक ट्रोजन योद्धा.

STROPHADES (स्ट्रॉफॅडीज) ग्रीसच्या नैर्ऋत्य किनाऱ्याजवळची दोन छोटी बेटे.

STRYMON (स्ट्रायमन) थ्रेसमधील एक नदी. इथे करकोच्यांची वसाहत होती.

STYX (स्टिक्स) 'तिरस्कार'; पाताललोकातील एक नदी. पाताललोकाच्या संपूर्ण परिमितीभोवती ती अनेक वेढे घालते अशी समजूत आहे. यापासून झालेले विशेषण Stygian स्टिजिअन याचा अर्थ 'मृत्यूकारक' किंवा 'पाताललोकीचा' असा होतो. 'प्राणघातक'.

SYMAETHUS (सायमिथस) पूर्व सिसिलीमधील नदी व एक शहर.

SYRTES (सर्टिस) आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरील दोन उप-सागर. एक ट्रिपोली आणि बेंगाझी यांच्यामधे दुसरा ट्रिपोली आणि ट्यूनिस. यांच्यामध्ये. वालुकामय असून बंदरांच्या अभावाबद्दल प्रसिद्ध.

TABURNUS (टॅबर्नस) दक्षिण इटलीतील आधुनिक कॅझटीच्या पूर्वेकडील पर्वतप्रदेश.

**TARCHON** (टार्कॉन) इनीआसच्या इट्रुस्कन मित्रसेनेचा नेता. या नावाचा टार्क्विनशी कदाचित् संबंध असावा.

**TARENTUM** (टॅरेन्टम) आधुनिक टॅरॅन्टो. इटलीचे अंतर्गत बंदर.

**TARPEIA** (टार्पेइआ) (१) सर्ग आठमधे सॅबाईनांना फितूर झालेली रोमन युवती. (२) सर्ग अकरामधे कॅमिलाची सखी.

**TARQUIN** (टार्क्विन) रोमच्या दोन इट्रुस्कन राजांचे नाव. यापैकी दुसरा 'जुलमी टार्क्विन' याला ब्रुटसने उठाव करून पदच्युत केले. (इ. पू. ५१०).

**TARTARUS** (टार्टरस्) पाताललोकाच्या अतिखोल भागातील प्राचीन नरकाचा एक भाग.

**TATIUS** (टॅटिअस) पहिल्या रोमन रहिवाशांबरोबर युद्ध करणारा सॅबाईन राजा. नंतर त्याने तह केला व रोमलस बरोबर राजसत्तेत सहभागी झाला.

**TENEDOS** (टेनेडॉस) ट्रॉयजवळील एक छोटे बेट. ट्रॉयच्या नैर्ऋत्येला.

**TEREUS** (टिरिअस) थ्रेसचा पुराणातील राजा. त्याची मेहुणी प्रॉकनीची बहीण फिलोमेला हिच्यावर त्याने बलात्कार केला. सूड म्हणून प्रॉक्नीने त्यांचा पुत्र आयरिसचा वध केला. पुढे तिघांचेही पक्ष्यात रुपांतर झाले.

**TEUCER** (ट्यूसर) (१) बहुतेक उल्लेखात ट्रॉयच्या राजघराण्याचा पूर्वज. म्हणून ट्रोजनांना ट्यूसेरिअन म्हणतात. (२) सर्ग एकमधे सॅलॅमिसच्या मोठ्या अजॅक्सचा सावत्र भाऊ. हा पुढे सायप्रसला गेला. आणि व्हर्जिलच्या कथेनुसार तो डायडोला परिचित होता.

**THALIA** (थॅलिआ) गीत आणि कथा यांची देवता. कलादेवतांपैकी एक.

**THEBES** (थीब्ज्) उत्तर ग्रीसमधील एक शहर. पेन्थिअसचे गाव

**THERMODON** (थर्मेडन, पूर्व आशिआ मायनरमधील एक नदी.

THERSILOCHUS (थर्सिलोकस) (१) सर्ग सहामधे एक ट्रोजन योद्धा. इलिअड मधे याचा उल्लेख आहे. (२) इनीआस बरोबरचा एक योद्धा.

THESEUS (थिसिअस) अॅथेन्सचा पुराणातील राजा. मायनहॉरला ठार करून क्रेटहून ॲरिॲड्नीला घेऊन गेला. पिरि-थाऊस बरोबर पातालातून प्राझरपाईनला काढून नेण्याचा याने प्रयत्न केला.

THETS (थेटिस) समुद्र देवता. अँकिलीझचीं माता.

THOAS (थोस) ग्रीसच्या ईशान्येकडील देश. आधुनिक सॅलो-निका आणि डार्डनेलीस यांच्यामधील बऱ्याच किनारी प्रदेशाचा समावेश थ्रेसमधे होता.

THRACE (थ्रेस) ग्रीसच्या ईशान्येकडील देश. आधुनिक सॅलो-निका. आणि डार्डनेलीस यांच्यामधील बऱ्याच किनारी प्रदेशाचा समावेश.

TIBER or TIBERIS (टायबर किंवा टायबेरिस) मध्य इटलीतील नदी. ही नैर्ऋत्येकडे वाहते. या नदीच्या मुखापासून बारा मैल, वर, दक्षिण किनाऱ्यावर रोम वसविण्यात आले. ही घटना इनीईडमधील घटनानंतर सुमारे चारशे वर्षानंतरची आहे. ट्रोजनांची पहिली वसाहत नंतरच्या ऑस्टिआच्या जागेवर, या नदीच्या मुखाजवळ दक्षिण किनाऱ्यावर झाली. ही नदी देव होती असे कधी कधी मानतात. तिच्या नावाची रुपे थायब्रिस, थार्यम्ब्रिस अशीही आहेत. तिच्या देवरुपाला टायबेरिज्स असे म्हणतात.

TIBER (टायव्र्) रोमच्या ईशान्येस १५ मैलावरील एक गाव. आधुनिक टायव्होली येथील लोकांना 'टायबर्टाईन' म्हणत.

TIMAVUS (टायमॅव्हस) वायव्य इटलीतील पोच्या उत्तरेकडील नदी.

TYRYNTHIAN (टायरिन्थिअन) टायरिन्थचे रहिवासी. हे शहर दक्षिण ग्रीसमधील आर्‌गॉसजवळ आहे. हर्क्युलीझचे गाव.

TISIPHONE (टायसिफॉनी) पाताललोकातील सूडबुद्धी कृत्या. (रक्तपाताचा सूड घेणारी).

TITANS (टायटन्स) पुराणातील राक्षसाचे कुल. ज्युपिटर जुनोच्या पूर्वीची पिढी. चन्द्र सूर्य यांच्यापैकीच म्हणून सूर्याला 'टायटॅनिक' (किंवा हायपेरिअन) म्हणतात.

TITHONUS (टिथोनस) ऑरोराचा मानवी पती. याला अमरत्व प्राप्त झालें परंतु चिरयौवन मिळाले नाही. (ऑरोरा-डॉन-उषा).

TITYOS (टायटिऑस) डायनाची व अ‍ॅपोलोची माता लॅटोना हिच्यावर हल्ला करणारा पुराणातील राक्षस. पाताल-लोकात त्याला या कृत्याकरिता शासन झाले.

TMARUS (ट्मारस) एपिरसमधील एक पर्वत. येथील लोकांना 'ट्मारिअन' म्हणत.

TORQUATUS (टॉरक्वॅटस) सॅम्नाईट युद्धातील रोमन सेनानी. हा कडक शिस्तीचा भोक्ता होता.

TRITON (ट्रायटन) एक समुद्र देव किंवा मर्मन (अर्धमानव अर्ध मत्स्य). समुद्र शिंपल्याची तुतारी हा वाजवीत असे. पॅलस अ‍ॅथीनाचा समुद्राशी काही गूढ संबंध असल्यामुळे तिला 'ट्रायटनिअन' म्हणतात. कदाचित आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरील 'ट्रॉयटॉनिस' सरो-वराशीही हा संबंध असावा.

TRIVIA (ट्रायव्हिआ) तीन मार्गांची देवता. हेकटीची उपाधी (पहा डायना)

TROILUS (ट्रॉयलस) राजा प्रायमचा तरूण पुत्र. अ‍ॅकिलीझने याचा वध केला. त्याच्या क्रिसिडाशी असलेल्या प्रेम-संबंधाची कथा मध्ययुगानंतर प्रचलित झाली आहे.

TROY (ट्रॉय) डार्डनेलीस जवळचे आशिआ मायनर मधील सर्वात प्राचीन शहर. होमरच्या 'इलिअड' मधील घटना इथे घडल्या. ट्रॉयचा सर्वनाश इ. पू. १२०० मध्ये झाला असावा असे पारंपारिकतेने मानतात. होमरचे ट्रॉय हे या जागी निरनिराळ्या वेळी उभविले गेलेल्या अनेक शहरांपैकी सातवे असावे असे पुराणवस्तु शास्त्रज्ञ मानतात.

TULLUS (टयूलस) रोमचा तिसरा राजा. याने अल्बा लाँगा जिकले आणि मिटसचा वध केला.

TURNUS (टर्नस) रुटुलिअनांचा तरुण राजा. रुटुलिअन हे इटॅलिअनच होत. आधुनिक ऑग्झिओ पासून जवळच रोमच्या दक्षिणेस असलेले ॲड्रिआ शहर यांची राजधानी होती.

TYDEUS (टायडिअस) डायॅमिडचा पिता.

TYNDAREUS (टिन्डॅरिअस) हेलेनचा पिता किंवा तथाकथित पिता म्हणून तिला 'टिन्डॅरिड' म्हणतात.

TYPHOEUS (टायफिअस) ज्वालामुखी खाली बंदीवान असलेला ज्वालांचे निश्वास टाकणारा पुराणातील राक्षस.

UCALEGON ( युकॅलिगन ) 'निष्काळजी' इलिअड मधे उल्लेख असलेला एक ट्रोजन योद्धा.

UFENS (युफेन्झ) (१) सर्ग सात मधे पश्चिम इटलीतील एक नदी. (२) सर्ग बारामधे एक इटॅलिअन योद्धा.

ULYSSES ( युलिसीझ ) ओडिसिअसचे लॅटिन रुप. ट्रॉयच्या युद्धातील ग्रीक योद्धा, आणि ओडिसीमधील मध्यवर्ती वीरपुरुष. त्याला 'इथाकाहून आलेला पुरुष' असे म्हणतात.

**UMBRIAN** (अम्ब्रिअन) उत्तरमध्य इटलीचा रहिवासी, शिकारी कुत्र्याच्या एका जातीचे नाव. जसे आपण 'लॅब्रॅडॉर' किंवा 'स्काय टेरिअर' म्हणतो.

**VELIA** (व्हेलिआ) सॅलेर्नोच्या दक्षिणेस सुमारे पन्नास मैलांवर इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावरील समुद्रकाठावरील एक स्थळ.

**VELINE** (व्हेलाईन–इंग्लीश स्पेलिंग) मध्य इटलीतील एक नदी आणि सरोवर. आधुनिक रिएटीजवळ रोमच्या ईशान्येस सुमारे चाळीस मैलावर.

**VENUS** (व्हीनस) प्रेम देवता; इनीआसची माता. ग्रीकांची ॲफ्रोडाइटी. सायप्रसमधे आणि सिसिलीतील एरिकस मधे अनेक ठिकाणी तिची मंदिरे होती. अशी स्थलनामे इनीआस विषयीच्या कथा रचण्यास सहाय्यभूत होतात. इनीआसचा मार्गही त्यामुळे स्पष्ट होतो. (पहा ग्रीक व रोमन दैवते)

**VESTA** (व्हेस्टा) अति प्राचीन रोमन देवता. गार्हपत्याग्नीशी संबंधित. रोमनाना हिच्याविषयी अत्यंत आदर असे (पहा ग्रीक व रोमन दैवते)

**VIRBIUS** (व्हायर्बिअस) पुराणातील इटॅलिअन वीरपुरूष. हिपॉलिटसनेच हा पुनर्जन्म घेतला असा समज आहे. त्याच्या मुलाचेही तेच नाव होते असे दिसते.

**VOLSCIAINS** (व्हॉल्स्किअन्स) रोमजवळ राहणारी इटॅलिअनांची एक जमात. आताच्या मॉन्टी लेपिनी पर्वतावर, रोमच्या आग्नेय प्रदेशात यांची वसाहत होती.

**VOLTURNUS** (व्हॉल्टर्नस) नैऋत्य इटलीतील कॅसिलिनम–आधुनिक कॅपेनी- मधून वाहणारी नदी. आधुनिक व्हॉलटर्नो.

**VULCAN** (व्हल्कन) ग्रीकांचा हेफिस्टस, अग्नी आणि धातुकामाचा देव. व्हाल्कॅनो (ज्वालामुखी) हा शब्द त्याच्या नावावरून आला. माऊंट एटनाजवळील सिसिलीच्या ज्वालामुखीच्या प्रदेशास व्हल्कानिआ हे नाव आहे. एजिअन समुद्रातील लेम्नॉस बेटात याची उपासना होत असे. (पहा ग्रीक रोमन दैवते).

**XANTHUS** (झॅन्थस) ट्रॉयच्या सखल प्रदेशातून वाहणारी नदी.

**ZACYNTHUS** (झॅसिन्थस) ग्रीसच्या पश्चिम किनाऱ्यावरील इथाकाजवळील एक बेट.

**ZEUS** (झ्यूस) ग्रीकांचा देवाधिदेव. रोमन ज्युपिटर. (पहा ग्रीक व रोमन दैवते).

